श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं

अर्पिलेला

# पहिला सुमनहार

## अनुक्रमाणिका



## चित्रें





श्री

## रामदास आणि रामदासी.

भाग एकतिसावा

## श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला

# पहिला सुमनहार

## प्रस्तावना

सज्जनीं सुगंध सुमनें दिधलीं । तीं प्रेमभरें एकत्र गुंफिलीं ।
श्रीवाग्देवताचरणकमलीं अर्पिलीं । साष्टांगनमनपूर्वक ॥

श्रीसमर्थांच्या कृपेनें शक १८२४ ( इ. स. १९०२ ) पासून, जेथें जेथें म्हणून श्रीसमर्थसांप्रदायिक मठ अथवा घराणीं असल्याचा शोध लागे तेथें तेथें दर चैत्रवैशाखांत ( उन्हाळ्याच्या सुट्टींत ) व मार्गशीर्षपौषांत ( नाताळच्या सुट्टींत ) संशोधनार्थ जाण्याचा क्रम सुरू झाला. मठामठांत व घराण्याघराण्यांत जेवढा म्हणून संग्रह पाहण्यांत येई तेवढा सर्वच्या सर्व एकदम मागण्याला आरंभीं आरंभीं धैर्य होत नसे. तसें धैर्य केलें असतें तर कदाचित् कांहींच मिळतें ना. म्हणून इतरांचे ग्रन्थ तसेच सोडून फक्त श्रीसमर्थ व त्यांचे सांप्रदायी एवढ्यांचे च हस्तलिखित ग्रन्थ आरंभीं मिळूं लागले. पण याचा परिणाम वाईट झाल्याचें पुढें आढळून आलें. घेऊन गेले तेवढेंच चांगलें असलें पाहिजे व टाकून गेले

तें तें महत्त्वाचें नसलें पाहिजे अशी भलती च अकारण अवास्तव कल्पना करून घेऊन उरलेल्या संग्रहाची काहीं ठिकाणीं नंतर फार च हेळसांड करण्यांत आली, असें पुढ़ा त्या त्या ठिकाणीं जाण्याचा प्रसंग आला तेव्हां दिसून आलें. वाईट वाटलें, पण इलाज नव्हता! आरंभींच एकदम सर्वच्या सर्व मिळविण्याच्या आशेत पडलों असतों तर मुळींच काहीं हातीं आलें नसतें! काहीं मागें ठेवून गेलों तों त्याची अशी दशा झाली! काहीं ठिकाणीं मग वारंवार जाऊन उरलें-सुरलें होतें नव्हतें तें हि सर्व पुढें घेऊन आलों.

संग्रह साचत चालला. आपल्या पश्चात् त्याचें काय होणार, असा प्रश्न वयपरत्वें मनात वारंवार येऊं लागला. अग्निनारायणाच्या मनात आलें किंवा ज्याच्या हातीं तो जाणार त्याना त्याची आस्था वाटली नाहीं, तर सारा संग्रह एकत्र करून त्याचा समुच्छेद केल्याचें समुच्चिवपातक आपल्या माथीं बसणार, अशी भीति वाटूं लागली. संग्रह तर विविध आणि अति मोलाचा. खरोखर त्याचें मोल च करता येणार नाहीं. तो पृथ्वीच्या मोलाचा आहे, असें म्हटलें तरी तें मोल कमी पडेल. ज्या संग्रहात प्रत्यक्ष श्रीसमर्थांच्या हातची वाल्मीकिरामायणाची दिव्य प्रत आणि त्यानीं स्वहस्ताक्षरें लिहिलेलें तें गोड पत्र, अशीं आहेत, सर्व श्रीसांप्रदायिक ग्रन्थ आहेत, पूर्वपरिचित आणि अपरिचित अशा शेंकडों साधुसंतांचे आणि कवींचे हजारों ग्रन्थ आहेत, ऐतिहासिक आणि सांप्रदायिक अस्सल कागदपत्रें आहेत, उद्धवकल्याणदिनकररंगीम इत्यादि श्रीसमर्थशिष्यांचीं आणि श्रीशिवछत्रपति-संभाजीराजाराममोरोनिमलरामचंद्रनीलकंठ इत्यादि राजकारणी महापुरुषांचीं हस्ताक्षरें आहेत, त्या संग्रहाचें कोण काय कसें मोल करणार? संग्रहाच्या या महत्त्वानें माझ्या मनात भीति उत्पन्न केली. निर्विवाद त्याचें संरक्षण होईल, शक्य तर संवर्धन होत राहील व यथावकाश प्रकाशन हि होईल, अशी काहीं तरी योजना केली पाहिजे, असें वाटूं लागलें. ठरविलें, संग्रह महाराष्ट्राच्या स्वाधीन करून आपण मोकळे व्हावें, असा निश्चय करून

## श्रीसमर्थवाग्देवतामंदिर

उभारावें अशी कल्पना केली, ती महाराष्ट्रास निवेदन केली, तिजला त्याची तत्काळ सहानुभूति मिळाली आणि प्रथमपासून ठरविल्याप्रमाणें त्या त्या मितीला आणि घटिकेला मंदिराचीं सर्व कामें निर्विघ्नपणें पार पडलीं. भूमिपूजन १८५६

च्या अधिक आषाढ शु. १३ स झालें, भाद्रपद शु. ४ स मंदिराच्या कामास आरंभ झाला, तें वेळेवर पुरें होत आलें, त्यात सर्व संग्रह कपाटात सुरक्षित जाऊन बसला आणि १८५७ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ च्या शुभ मुहूर्तावर श्रीमत सौ. मा. महाराणी इंदिराबाईसाहेब होळकर यांच्या हस्तें त्याचें उद्घाटन झालें. उद्घाटनसमारंभ मला अपूर्व भासला यात नवल नाहीं, पण जमलेल्या सर्व मंडळींना तो तसा वाटला. याला कारणें तीन.

समर्था तुझीये कृपेवीण कांहीं ।
स्वतः अल्प ही कार्य होणार नाहीं ॥

ती श्रीसमर्थांची कृपा हें पहिलें आणि मुख्य कारण, त्या कृपेंतच सर्व सत्पुरुषांचा आणि थोर पूर्वजांचा आशीर्वाद आला. दुसरें कारण श्रीमत सौ. महाराणीसाहेबांची श्रीसमर्थकार्याविषयींची भावना व तिसरें सर्व सन्मित्रांचें सर्वतोपरि साहाय्य.

समारंभाचें सविस्तर वर्णन 'श्रीरामदास आणि रामदासी' मासिकाच्या १६५ व्या अंकात, वृत्तचर्चेच्या १९५ व्या लेखांकात आलें आहे. उद्घाटनप्रसंगीं श्रीमत सौ. मातु:श्री यांचें भाषण अति गंभीर झालें, इतकें कीं, त्या गांभीर्यानें सारा विद्वत्समाज भारला गेला. महाराणीसाहेब म्हणाल्या :—

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नम ॥

प्रिय बंधु व भगिनींनो,

ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी हा दिवस आपणा महाराष्ट्रीयांना चिरस्मरणीय झाला आहे. श्रीसमर्थरामदासस्वामींनीं आपल्या आयुष्यातील ६५ वर्षे समाजांत ज्ञानप्रसारार्थ खर्चिलीं, समाजात संघटणा केली, आणि या मजबूत पायावर त्यांनीं या च दिवशीं क्षत्रियकुलावतंस गोब्राह्मणप्रतिपालक पुण्यश्लोक श्रीशिवछत्रपतींचा राज्याभिषेकसमारंभ घडवून आणिला.

तीनशें वर्षांचे परकी अंमलाखालीं आम्हास आपले संस्कृतीचा विसर पडत चालला होता, त्या आम्हांत प्रथम स्वत्व उत्पन्न केलें, आणि सर्व कार्यांचा कळस च कीं काय, राज्यारोहणाचा समारंभ घडवून आणून समाजास सजीवी केलें. एवढें महत्कार्य ज्या दिवशीं घडून आलें तो हा महत्पुण्याईचा दिवस ! या दिवसात केवढी तपश्चर्या सांठली आहे !

या च मुहूर्तावर तितकें च महत्त्वाचें कार्य करण्यास्तव श्रीयुत देवांनीं आपणांस पाचारिलें आहे. कार्यास लागणारी तपश्चर्या, अध्ययन, अनुभव व अधिकार ज्यांकडे वसत आहेत अशा अनेक व्यक्ति येथें व इतरत्र आहेत, याची पूर्ण जाणीव असून हि कार्याची जबाबदारी आम्हीं धाष्टर्यानें पत्करिली. श्रीसमर्थांच्या सेवेनें " आत्मसार्थकता " साधण्याची सुसंधि व्यर्थ घालवावयाची नव्हती, हें एक कारण होतें, आणि श्रीयुत देवांचा आग्रही शब्द मोडण्यास मन धजेना, हें हि दुसरें कारण होतें.

सत्कार्योत्तेजक सभेनें गेले ४२ वर्षांत गाजावाजा न करितां निरपेक्षबुद्धीनें जी सेवा केली, तीमुळें महाराष्ट्रात निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेलें वाङ्मय आज एकत्रित झालें आहे.

या संग्रहाची यादी प्रसिद्ध झाली आहे. ती पहाता सहा शतकांचें, अनेक पंथांचें, अनेक ज्ञातींचे स्त्रीपुरुषांनीं रचलेलें हें वाङ्मय आहे. महाराष्ट्राचे उदयउन्नत कालाचें हें वाङ्मय आहे. हें सर्व खरें तरी संग्रहांतील बरा च मोठा भाग श्रीसमर्थवाङ्मयाचा असल्यामुळें त्याच नावाखालीं सर्व वाङ्मयाचा उल्लेख करणें हें व्यवहारास धरून होईल.

अशा या वाङ्मयाचे जनिते व प्रणेते जे श्रीसमर्थ यांचे चरित्राचें विहंगमदृष्टीनें अवलोकन केल्यास ह्या वाङ्मयाची सिद्धता व योग्यता लक्षांत येईल.

श्रीसमर्थांचा जन्म जांब गावीं सन १६०९ त झाला. त्यांनीं सन १६८१ त देह ठेविला. अखिल भरतखंड ही त्याची कर्मभूमि झाली. " आधीं केलें " या भागाकडे त्यांचीं ३६ वर्षें लागलीं. त्या अवधींत तपश्चर्या व देशपर्यटन हीं त्यानीं साधलीं. पुढील ३६ वर्षें " मग शिकविलें " या कार्यांत खर्चीं पडलीं. साराश तप, पर्यटन, भूतदया व योग या चार साधनांनीं पवित्र व पूर्ण झालेली बुद्धि जें वाङ्मय प्रसवली त्या वाङ्मयाच्या प्रसारानें व प्रसादानें श्रीशिवछत्रपतींनीं स्वराज्य संपादिलें,

स्वधर्म पोषिला, संतांनीं ज्ञान दिलें, श्रीसमर्थांनीं ज्ञानास संघटणेची जोड दिली.

या तीन दिवसांत वाचल्या जाणाऱ्या निबंधांची यादी प्रसिद्ध झाली आहे. तो निबंधसुमनहार खरोखर सुंदर च होईल! राजकारण, समाजशास्त्र, नीति, धर्म, शास्त्र, कला, काव्य व इतिहास इत्यादि दृष्टींनीं या वाङ्मयाचें अवलोकन होणें म्हणजे पर्यायानें संशोधनकार्य च होय. विद्वान् वक्ते, समाजनेते, नवे जुने पंडित आज या पवित्र कार्यांत सर्व एकत्रित झालेले पाहून आनंद वाटतो व भविष्यकाळ उज्ज्वल दिसूं लागतो.

ह्या तीन दिवसांचे कार्यक्रमांत भाग घेणाऱ्या विद्वान् वक्त्यांना व नेमलेल्या विश्वस्त मंडळास एक विनंति आहे. श्रीसमर्थवाङ्मयाचा प्रवेश खेड्यापाड्यांतून, शाळागृहांतून, तसेंच कॉलेज व विश्वविद्यालयांमधून कसा करितां येईल याचा सर्वानुमतें विचार व्हावा.

या कार्याची सांखळी बांधून ती जनतेपुढें व अधिकारी वर्गापुढें यावी. चातुर्मास सुरू होण्यापूर्वी असा प्रयत्न व्हावा कीं, प्रत्येक श्रीराम व श्रीहनुमानमंदिरांतून श्रीमद्दासबोधाचें पारायण व विवेचन गांवोगांवीं व्हावें. " मनाचे श्लोक " गृहशिक्षणांत अंतर्भूत व्हावेत. मराठी पहिले यत्तेपासून एम्. ए. पर्यंतचे अभ्यासक्रमांत श्रीसमर्थवाङ्मय अधिकारानुरूप प्रविष्ट व्हावें. एम्. ए. च्या "ऐच्छिक मराठींत" श्रीसमर्थकालखंड ( Shree Samarth Epoch ) संशोधनार्थ अभ्यासिला जावा. विद्वानांपुढें विचार ठेवले आहेत. या योजनेस श्रीसमर्थांनीं आशीर्वाद द्यावा; अस्तु.

आतां या पवित्र, पूज्य व विविधवाङ्मययुक्त मंदिराचें उद्घाटन करावयाचें. तत्पूर्वी आर्यावर्तांतील सर्व देवता, ऋषिमुनी, आचार्य, योगी, तपस्वी, साधुसंत यांचे चरणीं नम्र नमन करून प्रार्थितों कीं, श्रीसमर्थ-वाङ्मय आम्हांस व आमचे भावी पिढीस समर्थ करो, असा आशीर्वाद द्या!

सर्वेऽत्र सुखिन: संतु सर्वे सतु निरामया: ॥
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दु:खमाप्नुयात् ॥
॥ श्रीरस्तु ॥ शुभं भवतु ॥

समारंभ त्रयोदशी, चतुर्दशी आणि पौर्णिमा असे तीन दिवस झाला. पहिल्या दिवसापुरत्या महाराणीसाहेब हजर राहूं शकल्या, पुढच्या दोन दिवसाचा कार्यक्रम 'बदलापुर'चे कर्ते श्री. नारायण गोविंद ऊर्फ नानासाहेब चापेकर यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. समारंभाचें एक मुख्य अंग म्हणजे अनेक विद्वानांच्या

निबंधाचें वाचन

हें होतें. पहिल्या दिवशीं न्यासपत्र (Trust-deed) सादर होऊन पहिले चार निबंध वाचण्यात आले व बाकीचे निबंध पुढच्या दोन दिवसांत वाचले गेले. एकदर चवरेचाळीस निबंध सादर झाले. जे निबंधकार हजर होते त्या बहुतेकांनीं आपले निबंध स्वत: वाचले किंवा त्याचा सारांश सांगितला व इतर निबंधांत मुख्य सूत्र काय होतें तेवढेंच निवेदन करण्यात आलें. तरी तीन दिवस थोडे झाले. सर्व निबंध वाचण्यास सात दिवस पुरले नसते आणि त्यावर चर्चेला अवसर मिळाला असता तर एक महिना हि अपुरा पडला. विश्वस्त मडळानें ठराव करून हे निबंध प्रकाशित करण्यास सत्कार्योत्तेजक सभेस परवानगी दिली. सभेनें एक लहानशी समिति नेमून तिच्याकडे हें प्रकाशनाचें कार्य सोपविलें. श्रीमंत बाळासाहेब पत-प्रतिनिधि हे 'श्रीसमर्थांचें राजकारण' या विषयावर निबंध लिहिणार होते, परंतु आजारीपणामुळें समारंभाच्या दिवसापर्यंत त्यांना निबंध लिहितां आला नाहीं. तो मागाहून मजकडे आला. शिवाय तो इतका मोठा आहे कीं, तो सवडीनें स्वतत्र-पणेंच छापणें इष्ट होय, असें ठरविलें आहे. जे थोडे निबंध समितीनें तूर्त बाजूस ठेवले आहेत, ते हि पुढें मागें प्रसिद्ध होतील. कांहीं निबंध त्वरित अन्यत्र छापण्यासाठीं निबंधकारांनीं मागविले, ते त्यांजकडे परत पाठविण्यात आले.

तूर्त या हारांत ३५ निबंधरूपी सुमनें गुंफिलीं आहेत. त्यांच्या गुणदोषां-विषयीं कांहीं हि बोलण्याचा अधिकार प्रस्तावनेंत मी मजकडे घेत नाहीं. तो अधिकार वाचकांचा आहे. सुमनें निरनिराळ्या उपवनांतील भिन्न भिन्न जातींचीं आहेत. तीं स्वभावत:च सर्व सारखीं सुवासिक असू शकणार नाहींत. तीं सर्व सर्वांना सारखींच आल्हादकारक वाटतील असें म्हणतां येत नाहीं. शिवाय पुष्प

हातीं घेऊन त्याचा वास घेणाऱ्या प्रत्येकाची आवड निवड भिन्न असणार. निरनिराळ्या ठिकाणचीं फुलें गोळा करून त्यांचा हार गुंफून तो श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पण करण्याचा हा पहिलाच प्रयत्न. त्या मानानें तो यशस्वी झाला आहे, असें मला वाटतें. महाराष्ट्रानें तो गोड करून घ्यावा, अशी विनति आहे.

श्रीमंत सौ. मा. महाराणी इंदिराबाईसाहेब होळकर यांचा मी ऋणी आहें. शहरातील, जिल्ह्यातील व जिल्ह्याच्या बाहेरचे जे जे स्त्रीपुरुष समारंभास आले, जे येऊं शकले नाहींत पण ज्यांनीं आशीर्वादपत्रें पाठविलीं किंवा मनातल्या मनात यथाश्रितनपर आशीर्वाद दिले, ज्यांनीं निबंध लिहून पाठविले, ज्यांनीं ते येथें येऊन वाचले, त्या सर्वांचे मजवर उपकार झाले आहेत. समारंभाच्या अपूर्वतेचें सारें श्रेय या सर्व मंडळींना आहे.

शेवटची प्रार्थना श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणाना! महाराष्ट्रानें केलेली सेवा मान्य व्हावी, कृपा असावी! प्रतिवर्षी ज्येष्ठ शु. १३ स वार्षिक समारंभ होत जावा, असें विश्वस्त मंडळानें ठरविलें आहे. दिवसानुदिवस महाराष्ट्रात श्रीसमर्थचरित्रग्रन्थसंप्रदायादिविषयक व्यासंग वाढत जावा व त्याचें फल महाराष्ट्रास उपभोगावयास मिळावें, अशी प्रार्थना आहे.

धुळें
१८५७ माघ व. ९

चिटणीस
सत्कार्योत्तेजक सभा



## ॥ श्रीसद्गुरुस्तवन ॥

जय जय देवा ब्राह्मण्य गुरु । जय जय देवा परम गुरु ।
जय जय देवा परात्पर गुरु । नरनारायण अन्तरसी ॥ १
जय जय देवा धरामरा । जय जय देवा मायाभूभारहरा ।
जय जय देवा सहस्रकरा । बोधभास्करा दिनमणी ॥ २
जय जय त्रिकाडवेदरक्षणी । जय जय धर्मउपासनासरक्षणी ।
जय जय ज्ञानविज्ञानपूर्णलक्षणी । अलक्ष लक्षणी परब्रह्म ॥ ३
जय जय सकामकर्मदळणी । जय जय नि कामधर्मप्रतिपाळणी ।
जय जय धर्मअर्थकाममोक्षप्रदानी । कैवल्यब्रह्मदानी जगद्गुरु ॥ ४
जय जय दडकारण्यनिवासा । जय जय मायारण्यनिवासा ।
जय जय ब्रह्मारण्यनिवासा । मायातीता निरजना ॥ ५
जय जय ब्रह्मचर्यशिखामणी । जय जय परब्रह्मनिर्वाणी ।
जय जय विमळ ब्रह्म निर्गुणी । छात्रजनसरक्षका ॥ ६
जय जय भरतवर्षाभिमानना । जय जय भरतखडजनपावना ।
जय जय ब्राह्मण्यकुळसद्भावना । पावनपावना हनुमानजी ॥ ७
जय जय वैराग्यभाग्यउदया । जय जय ज्ञानविज्ञानसूर्योदया ।
जय जय अनत अपार स्वरूपोदया । उदयअस्तेविण विराजसी ॥ ८
जय जय गिरिकधरनिवासा । जय जय देवा जगन्निवासा ।
जय जय मुनिमानसहसा । आत्मयारामा सुखमूर्ति ॥ ९

— प्रताप

# ( १ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

## श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील संग्रहाचें स्वरूप

( लेखक— गणेश शंकर देव, एल्‌एल्. बी., धुळें )

जें वडिलीं निर्माण केलें । तें पाहिजे पाहिलें ।
काये काये वडिलीं केलें । किती पाहावें ॥ १५-९-२२

( १ ) "गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेलें श्रीरामदासी संशोधन" या मथळ्या खालीं शके १८५२ पासून श्रीरामदासी मासिकांत आपलें संशोधनवृत्त महाराष्ट्रास सादर करण्यास ती. शंकर श्रीकृष्ण देव यानीं आरंभ केला. आतापर्यंत सत्कार्योत्तेजक सभेनें जो संग्रह केला, त्यापैकीं एक एक बाड हातीं घेऊन, तें किती वर्षांचें जुनें असावें, त्याची पृष्ठसंख्या किती, त्याची स्थिति काय, त्याचा लेखनकाल कोणता, लेखक कोण, त्यांत कोणाकोणाची कविता आहे, त्यात नवीन काहीं प्रकरणें आहेत कीं काय, त्यावरून कोणत्या नवीन गोष्टींचा बोध होतो, अशा स्वरूपाचें प्रत्येक बाडाचें टाचण संशोधनवृत्तात करण्याचें काम चालू झालें व तें अद्यापि चालू आहे. संशोधन-वृत्ताच्या पहिल्या खंडात, अशा रीतीनें, चवदा ठिकाणच्या ५३६ बाडाची नोंद करण्यात आली आहे. दुसरा खंड चालू आहे. त्याचीं पहिलीं २४० पृष्ठें आता-पर्यंत रामदासी मासिकात प्रसिद्ध झालीं असून त्यांत पुढील ५३७ ते ११०९ म्हणजे आणखी ५७३ बाडें नोंदण्यात आलीं आहेत. पहिला खंड संपूर्ण व दुसरा खंड झाला तितका, असे दोन्ही खंड हातात घेऊनच मी आपणास ही माहिती सादर करीत आहें.

( २ ) याशिवाय अजून सरासरी इतकींच बाडें व सुमारें दोन अडीच हजार कागदपत्रें यांची नोंद घ्यावयाची आहे, असा अंदाज आहे. रामदासी संशोधनाच्या ४०८ पृष्ठांच्या पहिल्या खंडाला ६२ पानांची विस्तृत आणि व्यापक ( Exhaustive ) सूचि जोडण्यात आली आहे. अशीच सूचि दुसऱ्या खंडालाहि देण्यांत यावयाची आहे. हे दोन्ही खंड म्हणजे या संग्रहाच्या वर्णनात्मक याद्याच ( Descriptive Catalogues ) होत. कोणा हि अभ्यासकाला, आपणास हवें असलेलें बाड, या सूचीवरून नेमकें काढतां येईल. ज्या ज्याचा जो व्यासंग असेल त्याला त्याप्रमाणें या सूचीचा उपयोग होणार आहे. उदाहरणार्थ, एकाद्यास अमृतरायाची तेवढी कविता पहावयाची असेल, त्यानें सूचींत अमृतराय पाहिले म्हणजे ते कोणकोणतीं बाडें पहावीं तें सांगतील. ज्याची आतापर्यंत नोंद झाली आहे, अशीं ११०९ बाडें या मंदिरात कपाटातून अनुक्रमानें लावून ठेवलेलीं आहेत. प्रत्येक बाडाला खालीं वर जाड पृष्ठिपत्रें लावलीं असून तावड्या रितीनें तीं बांधण्यात आलीं आहेत, आणि पृष्ठिपत्रावर बाडाच्या क्रमाकाची चिठी लावण्यात आली आहे. ज्याची नोंद घ्यावयाची आहे, असा मुख्यतः तंजावरकडील व कारंजें वगैरे भागातील सारा संग्रह दोन तीन कपाटात सुटें तसाच ठेवण्यांत आला आहे. त्याचें काम यापुढें सुरू होईल.

( ३ ) हें सारें आपल्या पूर्वजाचें जुनें ठेवणें आहे. महाराष्ट्रानें आपलें सारें ऐहिक वैभव ओवाळून टाकावें, इतका तो संग्रह बहुमोल आहे, असें त्याचें वर्णन कोणी कोणी करितात. याचा अर्थ इतकाच कीं, असा हा बहुमोल संग्रह आहे. असा हा संग्रह आजपासून कांहीं शर्तीवर महाराष्ट्राच्या मालकीचा होत आहे. त्या संग्रहाचें किंचित् अंतरंग, मला जसें समजलें असेल तसें तें, आपणांस निवेदन करावें, अशी मला आज्ञा झालेली आहे.

( ४ ) पहिल्या ५३६ बाडांतच, गेल्या चारपांचशें वर्षांतील लहानमोठ्या, ज्ञातअज्ञात, प्रकाशित–अप्रकाशित

अशा ४५९ कवींची

थोडीफार कविता आलेली आहे. बाकी उरलेल्या संग्रहांत या ४५९ पैकीं जरी बरेच कवि आणि ग्रंथकार येतील, तरी त्याशिवाय आणखी सुमारें शेदोनशें नवीन नावें उपलब्ध होतील. आद्यकवि मुकुंदराज याच्यापासून पेशवाईच्या अंतकाळीं होऊन गेलेले भक्तमंजरीमालाकार राजाराम प्रासादी याच्यापर्यंत, म्हणजे

सुमारें ६०० वर्षांच्या काळांत जे संतकवि होऊन गेले, त्यांपैकीं पूर्वी ऐकूनहि ठाऊक नव्हते असे सुमारें शंभर तरी कवि या संग्रहांत आढळतील, असा भीत भीत केलेला अंदाज आहे. नोंदलेल्या बाडापुरतेंच म्हणावयाचें तर, बहेरू, सहजबोधसिंह, एका शामनाथ, नित्यानंद, नृसिंहसुत, जयरामजनाकित, काकात्मज, शिवसुत मच्छुंद, पामर, आनदराम, भवानी गंगू, विजय, आत्मसान, दीन सदाशिव, गुंडा, भाऊ, बापु शामराज, मोरो शाम, भट गोपाळ, गुरु बाबा, स्वानदस्वामी, आदिक्यबोध, सदानद, सुखबोध, वगैरे अनेक कवींची ओळख महाराष्ट्रास प्रथम याच संग्रहावरून झाल्याचें दिसून येईल.

( ५ ) संस्कृत, हिंदुस्थानी, गुजराथी, मारवाडी व कानडी या भाषातील हि थोडी फार कविता या संग्रहांत आहे.

( ६ ) या संग्रहात इतरांची श्रीसमर्थस्तवनपर व इतर प्रकाशित आणि अप्रकाशित कविता तर आहे च, पण खुद्द श्रीसमर्थांची हि, पूर्वी कोठें हि प्रसिद्ध न झालेली, अशी बरीच कविता आहे. त्या कवितेचा अजून एक भाग निवावयाचा आहे. सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेला, श्रीरामदासी ग्रथमालेंतील तिसरा भाग, श्रीसमर्थांची कविता, मनाचे श्लोक, करुणाष्टकें व पदपदावरें, ही श्रीसमर्थांची कविता सभेनें त्या बाडांवरून छापली तीं सारीं बाडें या संग्रहात आहेत. सभेनें छापलेला दासबोध, डोमगाव येथील मठांत असलेल्या खुद्द श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या मूळ प्रतीवरून छापलेला आहे. त्या मूळ प्रतीवरून तंतोतंत केलेली श्रीमत् दासबोधाची एक प्रत या संग्रहात ठेवण्यात आली आहे.

( ७ ) श्रीसमर्थांचें चरित्र व रामदासी संप्रदाय यावर नवीन प्रकाश पाडणारीं, श्रीसमर्थांचीं व इतरांचीं, अनेक पदपदावरें या संग्रहात आहेत. शिवराम म्हणजे उद्धव हा उलगडा होऊन, दिवाकर व उद्धव याच्या वादावर नवीन प्रकाश या संग्रहामुळें पडला; तुकाराम आणि श्रीसमर्थ याच्या भेटीचा एक नवीन प्रसंग या संग्रहावरून महाराष्ट्रांत विदित झाला, हनुमंतस्वामींची बखर खरोखर लिहिली कोणी व तिची विश्वसनीयता किती हें ठरविण्याला या संग्रहाचा उपयोग होणार आहे; हनुमंतस्वामींनीं मूळ बखर शके १७११ त लिहिली ती त्रोटक होती, तिचा विस्तार करून मल्हार रामराव चिटणीस व रंगो लक्ष्मण यानीं शके १७३९ त नवीन बखर तयार केली, व ही नवीन तयार झालेली बखर आज हनुमंतस्वामींच्या नावावर मोडत आहे, या गोष्टी या संग्रहावरून स्पष्ट झाल्या

आहेत; सज्जनगडी आपल्या चितारस्थानी श्रीहनुमताचें देवालय बांधावें, अशी आज्ञा आपला अवतार समाप्त करण्यापूर्वी श्रीसमर्थांनी केली असल्याचें, कागद पत्राच्या पहिल्या खडांतील अट्ठेचाळीसाव्या लेखांकावरून दिसून येतें; या गोष्टीला उद्धवाच्या कवितेंत दुजोरा मिळतो. त्या देवालयांतील मारुतीच्या मूर्तीचा आकार कसा असावा, आणि स्वरूप कसें असावें, हें हि श्रीसमर्थांनी अगोदर च सांगून ठेवलें असल्याचें उद्धवाच्या कवितेवरून कळतें. लेखांक ४८ वें तें पत्र व उद्धवाची कविता असणारें तें बाड हीं या संग्रहांत आहेत, कोणत्या हि चरित्रग्रंथांत आढळून न येणारी श्रीसमर्थांच्या स्वप्नसाक्षात्काराची माहिती या संग्रहांत असलेल्या श्रीसमर्थांच्या च एका करुणाष्टकावरून महाराष्ट्राच्या कानीं प्रथम आली. अशा श्रीसमर्थचरित्रपर व अवांतर शेंकडों महत्त्वाच्या बाबी या संग्रहावरून पुढें येत आहेत व येणार आहेत.

( ८ ) " निवृत्तेश्वरी " नावाचा ग्रंथ पूर्वी कोठें ऐकून हि ठाऊक नव्हता. ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीप्रमाणें, निवृत्तिनाथाचा निवृत्तेश्वरी नावाचा अठरा अध्यायाचा ग्रंथ होता, एवढीच अपूर्व माहिती महाराष्ट्रास प्रथम ४१ व्या बाडाकावरून झाली, तर त्या ग्रंथाच्या पहिल्या आठ अध्यायाची तीनशें वर्षांपूर्वीची एक प्रत या संग्रहांत असल्याचें बाडांक १५० वरून महाराष्ट्रांत जाहीर झालें. महाराष्ट्रास अपरिचित असलेले, प्रकाशनायोग्य, असे अनेक ग्रंथ या संग्रहांत आहेत. असे ग्रंथ निदान पाचशें तरी असावेत, असें म्हणतात ! या संग्रहांत ज्योतिषाचे ग्रंथ बरेच आहेत. मंत्र, यंत्र, तोडगे, शकुन, प्रश्नाच्या रीती, नानाविध रोगांचीं नाना औषधें, यांविषयीं हि विपुल माहिती या संग्रहावरून होण्यासारखी आहे. कांहीं कांहीं बाडांतून जमाखर्च आहेत, त्यांचा उपयोग त्या वेळची आर्थिक स्थिति जाणण्यास होईल. या संग्रहांत असलेल्या एकनाथी भागवताच्या पृष्ठमानेच्या प्रती इतकी जुनी प्रत महाराष्ट्रांत दुसरीकडे कोठें हि आज तरी उपलब्ध नाहीं. हनुमतस्वामीकृत बखरीच्या सात आठ प्रती आहेत, पण त्याशिवाय मराठी राज्याची बखर, प्रतापसिंह महाराजांची बखर, अशा इतर हि बखरी आहेत, बाबाजी भोसले यांच्यापासून शाहुमहाराज दक्षिणेंत येऊन राज्य करूं लागेपर्यंतचा भोसले घराण्याचा वृत्तांत या संग्रहांत आहे.

( ९ ) जांबगांव, चाफळचे उपाध्ये, चाफळचे ढवळे, मेढे, उंबरजमठ, शिराळ्याचे देशपांडे, मनपाडळेमठ, पारगांवमठ, डोमगांवमठ, शिरवळचा

चाजी गोसाव्यांचा मठ, टाकळीमठ, महाबळेश्वर, मर्ढे येथील सिद्धामृत मठ वगैरे ठिकाणचीं मिळून सुमारें ७००।८०० कागदपत्रें सत्कार्योत्तेजक सभेनें आतांपर्यंत छापलीं आहेत. याशिवाय इतर ठिकाणचीं दीडदोन हजार कागदपत्रें प्रकाशनाची वाट पहात या संग्रहात पडून आहेत.

( १० ) बाळाजी विश्वनाथ, नानासाहेब पेशवे, थोरले माधवराव, माधवराव नारायण प्रधान, मोरो त्रिमल, मोरेश्वरसुत भैरव प्रधान, मोरेश्वर पंडितराव, नीळकंठ मोरेश्वर, रामचंद्र नीळकंठ अमात्य, परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि, श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि, श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधि, भगवंतराव त्र्यंबक प्रतिनिधि, श्रीकराचार्य पंडितराव, नारो शंकर सचीव, राणोजी शिंदे, सेनापति संताजीराव घोरपडे, सर्जेराव घाटगे, कल्याणस्वामी, कल्याणाचे बंधु दत्तात्रय, हनुमंतस्वामी, उंब्रजमठपति केशवस्वामी, कल्याणशिष्य मुद्गल गोसावी, उद्धव गोसावी, वगैरे साम्प्रदायिक व ऐतिहासिक थोर व्यक्तींचीं हस्ताक्षरें तर या संग्रहांत आहेतच, पण त्याशिवाय शाहुमहाराज, राजाराममहाराज, संभाजीमहाराज,

खुद्द श्रीशिवछत्रपति आणि श्रीसमर्थ

यांचीं हस्ताक्षरें या संग्रहात आहेत. महाराष्ट्रानें अजून तें पूर्णपणें मान्य केलेलें नाहीं, पण श्रीशिवछत्रपतींचीं " मोर्तवसुद " अशीं स्वदस्तुरचीं अक्षरें असलेलीं, निरनिराळ्या काळांतील कांहीं पत्रें या संग्रहात आहेत. रघुनाथभटाना श्रीसमर्थांनीं स्वहस्तें लिहिलेलें तें ५२ ओळींचें पत्रचसें काय, पण खुद्द श्रीसमर्थांनीं स्वतः केलेली वाल्मीकि-रामायणाची प्रत या संग्रहात आहे.

( ११ ) प्रत्येक बाड न् बाड व पत्र न् पत्र पहावेंसें वाटावें. पण त्यात हि विशेष प्रेक्षणीय आणि प्रदर्शनीय अशा अनेक वस्तु या संग्रहात आहेत. त्यापैकीं कांहीं प्रदर्शनमेजात ( शोकेसमध्यें ) निराळ्या ठेवल्या आहेत, त्या आपण अवश्य पहाव्या. कल्याणांनीं स्वहस्तें लिहिलेलें, श्रीसमर्थांच्या कवितेचें, वेब्स्टरच्या डिक्शनरीएवढें, तें प्रचंड बाड पहावें, या बाडाचें अक्षर कसें सुंदर एका टाकानें लिहिलेलें आहे, अग्नीच्या दिव्यांतून तें जणू विजयी होऊन सुरक्षित बाहेर पडलें आहे, त्यानुभवदिनकरकार दिनकरांच्या हस्ताक्षराचें, पोथीचें तें शेवटचें पान अवलोकावें, कल्याणांनीं दिवाकराना लिहिलेल्या त्या पत्रावरून नजर फिरवावी, अनेक थोर थोर पुरुषांचीं हस्ताक्षरें पहात पहात श्रीशिवछत्रपतींचीं "मोर्तबसुद" हीं स्वदस्तुरचीं अक्षरें असलेल्या त्या पाचसहा पत्राकडे वळून दृष्टि स्थिर

करावी, तों च २०॥ इंच लांबीचा, ८। इंच रुंदीचा आणि २॥। इंच जाडीचा तो प्रचंड पोथा डोळ्यांसमोर येतो; तो इतका मोठा आहे कीं, त्याला पोथी न म्हणतां पोथा म्हणण्यांत येतें, तें कसें बरोबर आहे हें मनांत येऊन त्याच्या प्रचंड-पणाचें आश्चर्य वाटूं लागतें न लागतें तों च, त्याच्या शेजारीं च असणाऱ्या मुठींत मावणाऱ्या दासबोधाच्या चिमुकल्या प्रतीकडे नजर जाऊन त्या प्रतीचें कौतुक वाटतें; पलिकडे हीं काय चित्रें दिसतात म्हणून पहावें तों १५० रुपयाना सभेनें विकत घेतलेली " सचित्र पंचरत्नी गीता " दिसते. ही गीता सभेला दीडशें रुपयाना मिळाली असेल, पण जर्मनींतला एकादा तज्ज्ञ माणूस तिची किंमत दीड दोन हजार रुपये सहज करील; गीतेंतील त्या अप्रतिम चित्रांचें कौतुक करीत जरा पलिकडे नजर फिरवावी, तों

श्रीसमर्थांनीं रघुनाथभटांना स्वहस्तें लिहिलेलें तें पत्र

दृष्टीस पडतें, आणि 'तुमचें मन मजवरी बहुत आहे तें तुमचे आवडी च्या गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें' ह्या श्रीसमर्थांनीं रघुनाथभटाच्या निमित्तानें जणूं महाराष्ट्रास च कायमचा आशीर्वाद दिलेला आहे व आत्मकल्याणाचा मार्ग दाखविला आहे कीं काय, असा विचार मनात येतो तों, शेजारीं च असलेली, श्रीसमर्थांनीं आपल्या वयाच्या चवदाव्या, पंधराव्या, सोळाव्या, सदतिसाव्या, आणि एकेचाळिसाव्या वर्षी लिहून पुरी केलेली

वाल्मीकि-रामायणाची प्रत

पहाण्यात येऊन तेथें च मन विराम पावतें.

(१२) या वस्तु व इतर कांहीं प्रेक्षणीय बाडें मंदिरात वरच्या मजल्यावर प्रदर्शनमेजात आपणास पहावयास मिळतील. या दर्शनार्थ ठेवलेल्या बाडात गिरिधराचीं रामायणें व चाके, दासोपंतांच्या गीतार्णवातील दपोऱ्या अक्षराचा नववा अध्याय, उद्धवांच्या हातचीं बाडें, ग्रंथराज दासबोधाची जन्मभूमि असलेल्या शिवतरच्या घळींत लिहिली गेलेली अनुभवामृताची प्रत, निश्चयाचा महामेरु, कोणाचा भरंवसा न धरावा, अखंड सावधान असावें, इत्यादि महत्त्वाचीं प्रकरणें, श्रीसमर्थकृत रामायणाची सुंदर प्रत, इत्यादि बाडाकडे आपलें लक्ष्य अवश्य जाईल च. या प्रदर्शनमेजात आणखी एक कौतुकास्पद वस्तु आहे ती म्हणजे प्रतापगडावरील

श्रीरामवरदायिनी देवीचे शिक्के

उमटविलेला कागद होय. ते शिक्के आपण पहावे व त्याखालील मजकूर याचाश

अशी विनंति आहे.

( १३ ) मनाला उद्विग्नता वाटावी, असें या संग्रहात काहींच नाहीं, असें मात्र आपण समजू नये. या बाडाचें संपादन करीत असता कित्येक बाडाची झालेली दुर्दशा पाहून संपादकांनी अनेकदा दु:खोद्गार काढले आहेत. बाडांक ७७० आणि ७७१ हीं दोन बाडें प्रदर्शनमेजात मुद्दाम ठेविलेलीं दिसतात. तीं बाडें आपल्या अज्ञानाचें आणि अनास्थेचें उत्तम प्रदर्शन करीत आहेत. कदाचित् हा काळाचा हि परिणाम असेल. हीं दोन्हीं बाडें बरींच मोठीं आहेत. पण पावसाचें पाणी पडून पडून त्या बाडाची एक च लठ्ठ भाकरी, किंवा भाकरीपेक्षाहि समर्पक दृष्टांत द्यावयाचा तर, एकच लठ्ठ गोवरी बनली आहे! वाग्देवतेच्या चरणीं निवेदन न करावें, तर कोणापुढें हें गाऱ्हाणें मांडावें!

( १४ ) या संग्रहावरून नवीन कवींची जशी माहिती होते, तशी हल्लीं ज्ञात असलेल्या कवींची कांहीं अप्रकाशित कविताहि या संग्रहात आढळते. श्रीसमर्थांशिवाय इतर साधुसंतांची हल्लीं प्रकाशित असलेली कविता कशी अशुद्ध छापलेली आहे, आणि त्यामुळें अर्थाचा अनर्थ कसा होतो, किंवा कांहीं अर्थच कसा होऊं शकत नाहीं, याचीं दहावीस ठळक ठळक मनोरंजक उदाहरणें रामदासी संशोधन-वृत्तात प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्यांपैकीं दोन च आज आपल्यासमोर आणीत आहें.

( १५ ) अर्थाचा अनर्थ करणारें उदाहरण ३५८ या बाडाची नोंद करताना देण्यात आलें आहे. त्या बाडात इतर प्रकरणांबरोबर १०८ श्लोकांची हरिराजकृत "रामायणटीका" आलेली आहे. ही टीका शके १८०८ त श्री. जनार्दन बाळाजी मोडक यांनीं काव्येतिहाससंग्रहात छापली होती. टीकेच्या उपसंहारातील दुसरा श्लोक मोडकांनीं काव्येतिहाससंग्रहात असा छापला:—

सत्पुत्र त्याचा हरिराज नामें ।
करी न विद्या न विधान नेमें ।
करूनि आर्याश्रय अर्थ त्याणें ।
समर्पिला रामपदीं सुखानें ॥

"जुन्या काळीं बाळबोधींत पुष्कळदा र हें व्यंजन मोडी न सारखें काढीत. वाचणारा सावध नसला तर र चें न वाचून जावो. तसें मोडकांचें या श्लोकात झालें. त्यांनीं र ऐवजीं न वाचला आणि ध्या चें द्या वाचायाला त्यांना कांहीं च कठीण गेलें नाहीं." पण याचा परिणाम मात्र

करी रविध्यान विधान नेमें ।
ऐवजीं
करी न विद्या न विधान नेमें ।

असें छापण्यांत होऊन अर्थाचा अनर्थ झाला !

( १६ ) दुसरें उदाहरण अशुद्ध पाठामुळें अर्थ च कसा होत नाहीं याचें आहे. तें रामदासी संशोधनवृत्तात २०७ या बाडाची नोंद करताना देण्यात आलें आहे. या बाडात इतराची कविता आहे, तसें च तुकारामाचे काहीं अभंग हि त्यात आहेत. सन १८९६, सन १९०३, सन १९०८ व सन १९१२ या साली निरनिराळ्या प्रकाशकांनीं तुकारामाची गाथा प्रसिद्ध केली आहे. या सर्व गाथातून कानामात्रावेलांटी अशा किरकोळ फरकानें तुकारामाचा खालील अभंग आढळतो.

अनंत जन्में जरी केल्या तपरासी
तरी हा न पवसी म्हणे देह ॥ ध्रु० ॥
ऐसें जें निधान लागलेंसे हातीं ।
त्याची केली माती भाग्यहीना ॥ १ ॥
उत्तमाचें सार वेदाचें भांडार ।
ज्याच्यानें पवित्र तीर्थें होती ॥ २ ॥
म्हणे तुकयाबंधु आणिक उपमा ।
नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥ ३ ॥

हा अभंग लक्षावधि लोकांनीं भाविकपणें वाचला आणि ऐकला असेल, पण अर्थांतरीं मन न घालता भाविकपणानें केवळ पारायण करणारे च बहुतेक ! पण ज्या कोणीं या अभंगाचा अर्थ करण्याचा प्रयत्न केला असेल, त्याच्या मनांत या अभंगात काहीं तरी चुकतें आहे, अशी शंका आली असेल हि. " ' तरी हा न पवसी म्हणे देह !' म्हणजे काय ? ' म्हणे देह ' याचा काय अर्थ ? कोण म्हणे ? " उत्तमाचें सार किंवा वेदाचें भांडार असें वर्णन कोणत्या देहाचें करतात ? तीर्थांना हि ज्याच्या योगानें पवित्रपण येतें, असें काय आहे ? अशा शंका ज्याना आल्या असतील, त्याच्यापुढें सुद्धा वरीलप्रमाणें अशुद्ध च अभंग टाकला, तर त्यांनी तरी त्याचा काय अर्थ करावा !

पण या संग्रहांतील २०७ व्या बाडात तुकारामाचा हा अभंग आढळतो,

व " या अभंगाचा जो गामा तेवढा च नेमका अधर उडवून प्रकाशकांनीं त्यास कसें निर्जीव करून सोडलें आहे, हें लक्षात येतें." २०७ व्या बाडांतील तो अभंग असा :—

अनंत जन्मांतरीं केल्या पुण्यरासी ।
तरी हा न पवसी ब्राह्मण देह ॥ ध्रु० ॥
ऐसें हें निधान लागलेंसे हातीं ।
त्याची केली माती भाग्यहीना ॥ १ ॥
उत्तमाचें सार वेदाचें भांडार ।
ज्याचेनी पवित्र तीर्थें होती ॥ २ ॥
तुका म्हणे दुजी आणिक उपमा ।
नाहीं तों या जन्मा द्यावयासी ॥ ३ ॥

( १७ ) महाराष्ट्राच्या कानीं इतक्या विस्तारानें ही हकिकत हुसऱ्यादा घालण्याचा हेतु असा कीं, आपल्या सर्व संतकवींच्या काव्यांच्या शुद्ध आवृत्त्या काढण्याची किती आवश्यकता आहे, हें महाराष्ट्राला पटावें, आणि " यापुढें कोणा हि संतकवीच्या काव्याची संपूर्ण आणि शुद्ध प्रत काढावयाची झाल्यास या संग्रहाकडे धडल्यावांचून तसें करणें जवळ जवळ अशक्य होईल," हें महाराष्ट्राच्या ध्यानीं यावें !

( १८ ) असें या संग्रहाचें थोडक्यात स्वरूप आहे. " या बाडाला मोल नाहीं, या च काय, पण कोणत्या च बाडाचें मोल करता यावयाचें नाहीं. ही आपल्या महाराष्ट्राची बहुमोल अशी खरी संपत्ति आहे. जिचेची विलक्षण चाड आणि पूर्वजांचा निस्सीम अभिमान असलेलीं स्वतंत्र राष्ट्रें असली संपत्ति डोक्यावर घेऊन नाचतीं ! नाचतात च, आपण पहातों आणि ऐकतों ! " असें या संग्रहाचें वर्णन, कल्याणांच्या त्या बाडाची नोंद करतांना, रामदासी संशोधनसूचींत करण्यात आलें आहे; आणि नुकतें च गेल्या महिन्यात आपण केसरींत वाचलें च कीं, शेक्सपीयरला डोक्यावर घेऊन नाचणाऱ्या इंग्लंडात त्याच्या ग्रंथाचें एक जुनें हस्तलिखित ३१०० पौंडाना नुकतें च विकण्यात आलें, आणि त्यापूर्वी त्याच्या अशा च दुसऱ्या हस्तलिखित ग्रंथसंग्रहाला बारा हजार पौंडावर किंमत आलेली होती! बारा हजार पौंड म्हणजे सहज दीड लाखावर रुपये होतील.

( ११ ) मग त्या संग्रहात महाराष्ट्राच्या श्रीशिवरायादि छत्रपतींचीं हस्ताक्षरें आहेत, खुद्द श्रीसमर्थांचें स्वदस्तुरचें पत्र आहे, त्रिभुवनात दुसरीकडे कोठें नसलेली, श्रीसमर्थांनीं स्वतः लिहिलेली संपूर्ण वाल्मीकि-रामायणाची प्रत आहे, अनेक ऐतिहासिक आणि सांप्रदायिक थोर व्यक्तींचीं हस्ताक्षरें आहेत, इतिहासाचीं साधनें असणारीं दोन अडीच हजार कागदपत्रें आहेत, महाराष्ट्राच्या सहारों वर्षांच्या काळातील बहुतेक साधुसंताची थोडीफार कविता आहे, शके ११४० ते १७४० या सहाशें वर्षांच्या काळांत महाराष्ट्रातील धार्मिक विचाराचा प्रवाह कसा वहात होता, हें कळण्याचीं विपुल साधनें त्या संग्रहात आहेत, अशा या संग्रहावरून, पाश्चात्य राष्ट्राप्रमाणें प्रत्येक गोष्टीची किंमत रुपये आणे पै त न करणाऱ्या महाराष्ट्रानें आपलें सारें ऐहिक वैभव ओवाळून टाकावें, असें, कोणीं म्हटलें तर तें अगदींच वावगें होईल काय !



## (२)

## श्रीसमर्थवाग्देवतेची प्रार्थना

( लेखक— श्री चौंडे महाराज, वाई )

जय जय समर्थ सद्गुरुवर्या । प्रवर्तावें महत्कार्या ।
इच्छा पूर्ण करावी आर्या । अनाथबंधू ॥ १ ॥
असमर्थ धर्मा करणें समर्थ । तरीच म्हणवावें समर्थ ।
बालकाची इच्छा यथार्थ । पूर्ण करणें दयाळा ॥ २ ॥
श्रीसमर्थवाग्देवतामंदिर । धुळें येथें योजिलें साचार ।
पाचारिती 'देव' सत्वर । महानुभाव परिवारें घातलें ॥ ३ ॥
वाग्देवता अवतार भला । धर्मसंजीवनी मंत्र लाभला ।
राजाधिराज हा शोभला । प्रभामाजी ॥ ४ ॥
जयानें अवघें राष्ट्र चेतलें । अधर्मा पायातळीं घातलें ।
देवपक्षी लोक मातले । विजयी झाले सर्वत्र ॥ ५ ॥
दोन्हीं सामर्थ्यें एकवटलीं । कलिकाळाची छाती फाटली ।
समर्थ राज्याची दौंडी पिटली । आर्यावर्ती ॥ ६ ॥
विजयश्रीचे भगवे झेंडे । मोडलीं अधर्मांचीं पारिपत्यें ।
धर्मबुडव्यांचीं काळीं तोंडें । होवोनि गेले देशधडी ॥ ७ ॥
समर्थ शिवबाचा प्रताप । तेथचा कोणें केलें माप ।
आतां स्वधर्मावरी कोप । योग्य काय दयाळा ॥ ८ ॥
स्वधर्माकरितां केलें तप । तीर्थपर्यटनाचा केला व्याप ।
स्वधर्म अवनार्थ प्रयत्नव्याप । समर्थरायें मांडिला ॥ ९ ॥

समर्थांचा कैसा प्रताप। समर्थांचा कैसा केला व्याप।
जनास येईल आपोआप। साक्ष येथें॥ १०॥
समर्थअवतार ग्रंथरूपें। प्रगट झाला निजप्रतापें।
दर्शनमार्गे महत्पापें। विलया जावी॥ ११॥
इहपर लोकींचें भाग्य। जयास पाहिजे यथायोग्य।
तेणें धरावा सत्संग श्लाघ्य। समर्थ ग्रंथाचा॥ १२॥
समर्थवाग्देवता प्रगटली। भक्तिज्योत भडकली।
विजयश्री येवोनि पडकली। भूमंडळीं॥ १३॥
तैसें जरी पुनरपि व्हावें। तरी समर्थवाग्देवतेस जागवावें।
निजकंठीं वागवावें। राहता पैसें॥ १४॥
वाग्देवतानो प्रगट व्हावें। जनतांतरीं रिघावें।
दौर्बल्य अवघें हकलून द्यावें। ऐशा प्रसंगीं॥ १५॥
कोठें आमुचा स्वामी समर्थ। सांगाल कां जी यथार्थ।
कृपेवांचुनी आमुचा अनर्थ। चुकणार नाहीं॥ १६॥
वाग्देवतानो बोला बोला। कासया धरियला अबोला।
आमुचे अपराध पोटीं घाला। क्षमा करा सर्वस्वीं॥ १७॥
' परम अन्याय करूनि आला। आणी साष्टांग नमस्कार घातला।
तरी तो अन्यायें क्षमा केला। पाहिजे श्रेष्ठीं॥ '
ऐसें समर्थ बोलती। आधार आला माझे चित्तीं।
आतां साष्टांग नमन आपणाप्रती। अनन्य भावें अर्पितों॥ १८॥
क्षमेची येऊं द्यावी प्रचीत। समर्थ वचनासाठीं नेमस्त।
आतां जाहलों निश्चित। कृपेकारणें॥ १९॥
जयजयाजी वाग्देवते। पतितोद्धारक कृपावंते।
करुणासागर होवोनि माते। बाळकातें सांभाळी॥ २०॥
मी तो पातकांचा राशी। दाद लावा समर्थांपाशीं।
पतीतपावन या बिदाशीं। सांभाळील माझा समर्थ॥ २१॥
श्रीसमर्थवाग्देवते। परम इच्छा असे मातें।
कांहीं अर्चावें आपणातें। परी साहित्य दिसेना॥ २२॥
मोदकाचा नसतां लेश। स्नान कैसें घाऊं अंबेस।

सद्भावाच्या चंदनाचा। कोठें पाहूं दयाळे ॥ २३ ॥
सुमनाची नाहीं वार्ता। खोळंबा झाला हारकरिता।
काम क्रोध धूपा करितां। ज्ञानाग्नी तो दिसेना ॥ २४ ॥
पंचप्राणाची ज्योती। कैंची उजळावी आरती।
कैसी करूं अर्चनभक्ती। सद्गुरुमूर्ती दयाळे ॥ २५ ॥
संतोष घडतां अर्चन भक्ती। त्याची नकळे मजला युक्ती।
येथें द्रव्य भक्तिज्ञानविरक्ती। लेश नाहीं तयाचा ॥ २६ ॥
कैसें तोषवावें मन। हें मज द्यावें जी सांगोन।
कैसें ध्यान धारणा समाधीसाधन। समाधान कशाचें ॥ २७ ॥
ऐकोनिया ब्रिदाचा डंका। येथ पातलों सोडोनि शंका।
नोवासाठीं अज्ञ बालका। कृपादान कराल कीं ॥ २८ ॥
पतीतपावन नावासाठीं। समर्थें करावी कृपादृष्टि।
वृथा कासया घ्यावें कष्टी। ऐसा पतित पाहतां ॥ २९ ॥
जय हो समर्थवाग्देवते। कृपादान अर्पावें मातें।
भारतजनता एकचित्तें। निज चरणातें लावावी ॥ ३० ॥
परस्परें प्रेमबंध। जडेल ऐसा द्यावा बोध।
आपल्या कृपें शक्ती अगाध। भारतासी लाभावी ॥ ३१ ॥
कृपा करोनि सांगा वर्म। काय चुकलें जी आमुचें कर्म।
जेणें करोनि आमुचा धर्म। दुबळा झाला ॥ ३२ ॥
कोणीही यासी वडवावें। कोणीही यासी तुडवावें।
कोणी यासी बुडवावें। नि:शंकपणें ॥ ३३ ॥
पूर्वी आपल्या कृपाबळें। धर्मा भाग्य लाभलें आगळें।
समर्थशिवप्रतापबळें। स्वधर्मेल्ळे पुरविले ॥ ३४ ॥
आता होऊ नका खिन्न। धर्ममूर्ति झाली विच्छिन्न।
गायत्रीचा नुरला मान। प्राणदान मागतसे ॥ ३५ ॥
आता होवोनिया उदार। करा धर्मांचा उद्धार।
बालक आपल्या चरणावर। वारंवार लोळतसे ॥ ३६ ॥
वाग्देवता कामधेनू। 'देव' गोपाळ वरी दोहनू।
दुग्धपरमार्थ अमृतपान्। बाळाबाळांसी मिळावें ॥ ३७ ॥

# ( ३ )

## श्रीमद्भगवद्गीता व समर्थांची कविता

( लेखक— श्री. जनार्दन सखाराम करंदीकर, संपादक, केसरी, पुणें )

विरक्तें येकदेसी नसावें । विरक्तें सर्व अभ्यासावें ।
विरक्तें अवघें आणावें । ज्याचें त्यापरी ॥ दा. २-९-२९

ज्याला कर्मयोगाचें संपूर्ण व यथार्थ स्वरूप समजून घ्यावयाचें असेल त्यांनीं समर्थ रामदासस्वामींच्या काव्याकडेच धाव घ्यावी, अशा अर्थाचें विधान लो. टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत नमूद केल्यावेळेपासून समर्थांच्या कवितेंत भगवद्गीतेचें प्रतिबिंब कोठें कोठें दिसतें तें पाहण्याकडे लक्ष वेधलें अशा कांहीं स्थळांची नोंद करून ठेवीत असतां मुरादाबादचे श्री. नरदेवशास्त्री वेदतीर्थ यांचें 'गीताविमर्श' हें पुस्तक पाहण्यांत आलें. त्या पुस्तकांत नरदेवशास्त्री यांनीं १५-१६ स्थळें नमूद केलीं आहेत. त्यावरून समर्थांनीं आपल्या काव्यांत भगवद्गीतेचा अनुवाद किती भिन्न भिन्न स्थळीं आदरपूर्वक केला आहे त्याचें प्रत्यंतर आलें. पण तेवढ्यानें कांहीं मनाचें पूर्ण समाधान झालें नाहीं. याकरितां समर्थांच्या कवितेंतून आणखी कांहीं स्थळें शोधून पहावीं असें मनांत आलें. पण समर्थांचें काव्य सागरासारखें अफाट पसरलेलें, त्याचा थांग लागणें कठिण. तथापि समर्थांच्या काव्यांतील ज्या ज्या वचनांवर गीतेची छाप पडलेली स्पष्ट दिसली अशीं कांहीं स्थळें या निबंधांत निर्दिष्ट केलीं आहेत. अशा सारखींच आणखी शेंकडों स्थळें आढळतील, मात्र तीं तीं शोधून काढण्याची कामगिरी कोणीतरी कुशलतेनें व सहज विचारानें केली

पाहिजे. अशा जिज्ञासूस प्रस्तुतचा निबंध केवळ मार्गदर्शक झाला तरी मोठेंच कार्य झाल्यासारखें होईल.

समर्थांच्या काव्याचें वाचन व निरीक्षण ज्या वेळीं अगदीं प्रथमावस्थेंत होतें अशा वेळीं एका प्रसिद्ध विद्वानानें समर्थ रामदास स्वामींना संस्कृत भाषेचें ज्ञान तरी कितपत होतें असा प्रश्न उपस्थित करून त्याचें संस्कृतचें ज्ञान अगदींच तुट-पुंजें होतें, किंबहुना त्यांनीं संस्कृत भाषेचें अध्ययन मुळींच केलें नसावें असें मत प्रतिपादिलें होतें! समर्थांचें अध्ययन कोठें, कोणापाशीं, किती काल आणि कोठ-पर्यंत झालें या संबंधानें निश्चित पुरावा कोणीच देऊं शकत नाहीं. तथापि त्यांनीं दासबोधाच्या प्रारंभींच आपल्या ग्रंथाला किती ग्रंथातील वचनाचा आधार आहे तें दर्शविण्याकरितां जी ग्रंथाची नामावळी दिली आहे तींत १८ गीतांपैकीं १२ गीतांचा उल्लेख आहे. यांतील भगवद्गीतेचा मराठींत अनुवाद पूर्वींच झालेला असल्यामुळें संस्कृत न जाणणाऱ्याला देखील भगवद्गीतेचा आधार आपल्या ग्रंथांत घेतां येईल. परंतु इतर अनेक गीतांचा अनुवाद महाराष्ट्रभाषेंत त्या वेळीं तरी झालेला नसल्यामुळें ते ते ग्रंथ मूळ संस्कृतांतूनच समर्थांनीं वाचले असले पाहिजेत, हें उघड आहे. शिवाय उपनिषदांचें अध्ययन तर त्या वेळीं संस्कृतभाषेविना करतां येणें शक्यच नव्हतें. अर्थातच उपनिषदें व भागवत इत्यादि ग्रंथांतील वचनाचा आधार घेणाऱ्याला व तीं वचनें ठिकठिकाणीं उद्धृत करणाऱ्याला संस्कृत भाषेचा गंधहि नसेल असें मानणें धाष्टर्याचेंच होईल. यावरून समर्थांनीं हे सर्व ग्रंथ मूळ संस्कृतांतून पाहिले असावेत असेंच अनुमान काढणें प्राप्त आहे. आतां तर 'रामेण रामदासेन' लिखित अशी वाल्मीकिरामायणाचीच प्रत उपलब्ध झाल्यानें या मुद्द्याचा निर्णय करण्याला निराळ्या पुराव्याची गरजच राहिली नाहीं. हें सांग-ण्यातला मतलब हाच कीं, भगवद्गीतेंतील अर्थासंबंधाचें त्यांचें ज्ञान परावलंबी नव्हतें. मूळ भगवद्गीता वाचूनच त्यांनीं तो अर्थ ठरविला असला पाहिजे.

संस्कृत व प्राकृत अथवा संस्कृत व मराठी यांची तुलना करून मराठी भाषेची थोरवी समर्थांनीं दासबोधांत दशक ५ समास ६ आणि दशक ७ समास १ अशा दोन ठिकाणीं अभिमानपूर्वक गायिली आहे. " तथापी प्राकृता-करितां । संस्कृताची सार्थकता । येऱ्हवीं त्या गुप्तार्था । कोण जाणे " ( ७-१ ४२ ) असें म्हणून प्राकृताचेच संस्कृतावर उपकार झाल्याचा जो टोला त्यांनीं मारला आहे तोहि त्या वेळच्या संस्कृत-प्राकृताच्या वादावर चांगलाच प्रकाश पाडणारा आहे.

समर्थांनीं गीतेचा नुसता अनुवादच आपल्या कवितेंत केला आहे असें नाहीं; तर कित्येक स्थळीं मूळ श्लोक देऊन नंतर त्याचें विवरण केलें आहे. आणि असे उद्धृत केलेले श्लोक केवळ गीतेंतलेच नसून गीता, भागवत व इतर पुराणें यांतले आहेत. अशा प्रकारें किती श्लोक समर्थांनीं उद्धृत केले आहेत त्यांचा एकत्र संग्रह करून तो निबंधरूपानें छापल्यास समर्थांच्या कवितेचा विचार करण्यास तें एक आयतें साधन तयार होईल. असो. प्रस्तुत निबंधात भगवद्गीता आणि समर्थांची कविता यांच्यांतील विचारसरणींत असलेले साम्य व भेद दाखवावयाचे आहेत. साम्यदर्शक स्थळें अनेक आहेत. त्यांतलीं जेवढीं मला सहजासहजीं आढळलीं तेवढीं मी या निबंधास परिशिष्टरूपानें दिलीं आहेत. समर्थांच्या समग्र ग्रंथाचें सूक्ष्मदृष्टीनें अध्ययन करून असलीं सर्व स्थळें शोधून काढल्यास समर्थांच्या ग्रंथाची. थोरवी वाचकांस पटवून देण्याला तेंहि एक साधन होईल. कोणींतरी समर्थभक्तानें हें कार्य करण्याची आवश्यकता आहे.

जीं साम्यदर्शक स्थळें पुढें दिलीं आहेत, त्यात सर्वच ठिकाणीं समर्थांची वाक्यरचना आणि गीतेंतली वाक्यरचना यात तंतोतंत साम्य आहे असें नाहीं. एकच विचार अनेक लेखक आपापल्या परीनें प्रकट करीत असताना त्यात जेवढें सादृश्य दिसतें तेवढें सादृश्य जेथें दिसलें तें तें वचन परिशिष्टात दाखल केलें आहे. समर्थांची ओवी, अभंग किंवा श्लोक वाचताच जेथें जेथें गीतेंतील श्लोकाची आठवण होते तेथें तेथें विचारसाम्य आहे असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं.

विचारसरणींतील हें साम्य शोधीत असताना कित्येक ठिकाणीं समर्थांची मांडणी गीतेंतील मांडणीहून भिन्न असल्याचेंहि आढळून आलें. असलीं भिन्न स्थळें पुढील परिशिष्टात दाखल केलीं नाहींत. कारण एक तर समानार्थक वचनें एकत्र देण्यांत जसें स्वारस्य असतें तसें भिन्नार्थक वचनें देण्यांत स्वारस्य नसतें. तथापि असा मतभेद कोठें व कोणत्या बाबतींत आहे हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे, म्हणून त्याचा ओझरता उल्लेख येथें करीत आहें. हा विषय स्वतंत्र रीतीनें अभ्यासण्यासारखा असल्यानें समर्थांच्या वाङ्मयाच्या अभ्यासकांनीं हाहि एक विषय स्वतंत्र निबंधरूपानें मांडावा एवढेंच येथें सुचवून ठेवतों.

उपनिषदांतून प्रथमच वेदान्ताची स्पष्ट व स्वतंत्र अशी मांडणी झाली. तथापि उपनिषत्कालीं वेदान्त हें स्वतंत्र शास्त्र बनलें होतें. अर्थातच त्याची परिभाषा व त्याची प्रक्रिया तितकी निश्चित झाली नव्हती. उपनिषत्कालानन्तर

लवकरच भगवद्गीतेचा उदय झाला. किंबहुना जुन्यात जुनीं दशोपनिषदें किंवा फार तर १८ जुनीं उपनिषदें सोडल्यास इतर उपनिषदें गीतेच्या नंतरचींच आहेत. गीताकाळ हा इतका जुना पुराणा असल्यामुळें वेदान्ताची हल्लींची परिभाषा व मोडणी गीतेंत आढळत नाहीं. गीतेंत 'माया' हा शब्द ईश्वरी शक्ति या अर्थानें आला आहे. त्या शब्दाला साम्प्रतचा ' भ्रम ', ' मिथ्यात्व ', इत्यादि अर्थ त्या वेळीं जडलेले नव्हते. परतु समर्थांच्या वेळीं 'जगन्मिथ्यात्वा' चा वेदान्त सर्वत्र बोकाळलेला असल्यामुळें समर्थांच्या दासबोधातहि त्याचेंच प्रतिबिंब दिसून येतें.

अरे जे जालेचि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई ॥

या समर्थोक्तींत जगन्मिथ्यात्वाचा कळसच झाला आहे. असल्या ओव्यांना मूळ गीतेंत समानार्थक श्लोक सापडणें अशक्य आहे.

गीतेंत अष्टधा प्रकृतीचा उल्लेख अनेक वेळां आला आहे, परंतु ही आठाची संख्या पंचमहाभूतें आणि सत्वरजतम हे तीन गुण अशी मिळून झालेली आहे. गीतेंतील अष्टधा प्रकृतींत पंचमहाभूतें आणि मन, बुद्धि व अहंकार असे आठ घटक आहेत. यावरूनहि समर्थांच्या काव्यात गीताकालीन वेदांताची प्रक्रिया आढळत नसून उत्तरकालीन वेदांताचीच छटा त्यात दिसते हें उघड आहे. अष्टधा प्रकृती एवढ्या नामसादृश्यावरून गीतेंतलीं व दासबोधातलीं वाक्यें समानार्थक वाटतात, परतु वस्तुतः तीं तशीं नाहींत हें लक्षात ठेवणें जरूर आहे.

सगुण निर्गुण उपासनेच्या संबंधातहि गीतेंतील विवेचनात व समर्थांच्या वाङ्मयात थोडासा फरक आहे. गीतेंत निर्गुण उपासनेची क्लेशकारता वर्णिली असली तरी तिची असंभाव्यता सांगितलेली नाहीं. किंवा सगुणोपासनेचा विशेष पुरस्कार केलेला नाहीं. मध्यतरींच्या वेदांताच्या भरभराटीच्या काळात सगुणोपासनेला गौणत्व आलें. त्यानतरचे वामनपंडित व समर्थ हे सगुण उपासनेचा पुरस्कार करताना दिसतात व त्यांच्या मतें निर्गुणाची उपासनाच संभवत नाहीं. सगुणाची उपासना करून त्याच्या आधारानें निर्गुणाला पोचणें हाच त्याचा साधनमार्ग आहे. गीता ही सगुण निर्गुणाकडे समत्व दृष्टीनें पाहते. मध्यतरींचे वेदान्ती सगुण टाळून निर्गुणाचेंच प्रतिपादन करितात, तर समर्थ हे इतर सतकवींप्रमाणेंच

भक्ति सगुणाचीच घडे । निर्गुणीं भेद समूळ उडे ॥

असें टाळून सांगतात. यामुळें गीतेंतल्यापेक्षा समर्थांच्या वाङ्मयात सगुणोपासनेचा आग्रह अधिक आढळतो व तेवढ्यापुरता त्या दोहोंत मतभेद आहे. गुरुमहत्त्वाचा

सनधातहि अशाच सूक्ष्मभेद आहे. गीतेंत गुरूपासूनच ज्ञानाचा उपदेश घेतला पाहिजे असा आग्रह नाहीं. गुरूचा उपदेश हें एक ज्ञानप्राप्तीचें साधन सांगितलं आहे; पण तें एकमेव अद्वितीय साधन सांगितलेलें नाहीं. संतकालीन वाङ्मयांत गुरूवाचून ज्ञानप्राप्तीचें दुसरें साधनच मान्य केलें जात नाहीं, आणि समर्थांचें वाङ्मयहि या तत्कालीन कल्पनेस अपवाद नाहीं.

सद्गुरुविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं । ५–१–२१

सद्गुरुविण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ५ १-२४

असेंच समर्थ दासबोधात सांगतात. तरी पण इतर संतांच्या काव्यात व समर्थांच्या काव्यात एक मोठा फरक आहेच. तो असा कीं, समर्थ हे अंधश्रद्धेचे प्रतिपादक नसून आत्म प्रचीतीविना कोणतीहि गोष्ट सिद्ध मानू नये अशाविषयीं त्यांचा मोठा कटाक्ष असे.

दिवाळखोराचा मांड । पाहतां वैभव दिसे उदंड ॥
परी तें अवघें थोतांड । भंड पुढें ॥ १० ८-१५
तैसें प्रचितीवीण ज्ञान । तेथें नाहीं समाधान ॥
करून बहुतांचा अनुमान । अन्हीत केलें ॥ १६

गीतेंतहि बुद्धिवादाचाच पुरस्कार केला असून अंधश्रद्धेला तामस ठरविलें आहे व तिला थारा दिलेला नाहीं. एवढ्या बाबतींत गीता व दासबोध यांच्यात तंतोतंत साम्य आहे. पण ज्ञानप्राप्तीच्या साधनातला गीतेतील स्वावलंबीपणा संतकालीन वाङ्मयांत मुळींच राहिलेला नव्हता.

गीतेंतील आठव्या अध्यायात अर्चिरादि मार्ग व धूम्रादि मार्ग यांचें वर्णन असून:—

एकया यात्यनावृत्तिं अन्यया वर्तते पुनः ॥

असा त्या दोहोंत भेद सांगितलेला आहे. त्यावरून उत्तरायणात शुक्लपक्षात दिवा मरण आलें, तरच मोक्षप्राप्ति होते, नाहींतर, जन्ममरणाचे फेरे चुकत नाहींत, अशी सामान्य जनाची समजूत झालेली आहे. ही भोळी समजूत अर्थातच समर्थांना मान्य नाहीं. म्हणून दासबोध दशक ७ समास १० ओवी २२ यात—

जितां नाहीं भगवद्भक्ती । मेल्यां कैंची होईल मुक्ती ।
असो जे जे जैसे करिती । ते ते पावती तैसें ॥

अशा तर्कशुद्ध न्याय समर्थ सांगतात. त्याचप्रमाणें

इतुकें नलगे योगियासी। तो जीवचि मुक्त पुण्यरासी।
तिळाजुळी पापपुण्यासी। दिधली तेणे॥ ७-१०-१५

या ओवींत योगी लोकांना उत्तरायणादिकाचा सामान्य नियम लागू नाहीं असें वर्णन आलें आहे. यात समर्थांनीं गीतेवेगळें काहींतरी सांगितलें अशी मोठमोठ्या ज्ञात्याची हि समजूत झाली आहे परंतु वर उद्धृत केलेली समर्थांची ओवी

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन।
तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन॥

या गीतोक्त श्लोकाचाच अनुवाद आहे. गीतेंतील या श्लोकाच्या अर्थाविषयीं भलताच समज का व्हावा हेंच लक्षात येत नाहीं.

आता ज्या एका महत्वाच्या मुद्यासंबधानें समर्थांची व गीतेची एकवाक्यता आहे त्या मुद्याचें विवेचन करून ही तुलना संपवू. कर्मयोगाच्या संबंधातली गीतेची भूमिका समर्थांनींच यथार्थ जाणली आहे व त्यांनीं आपल्या काव्यात तिचा निरलसपणें पुरस्कार केला आहे. संन्याससांप्रदायिकांच्या मतें कर्मांचा स्वरूपतः त्याग केला पाहिजे. भक्तिमार्गी संत भक्ति हेंच एक अद्वितीय साधन मानतात, पण त्यांच्या मताप्रमाणेंहि कर्माला फाटाच मिळतो. समर्थ हे 'कर्म, उपासना व ज्ञान' हीं तयी मान्य करतात आणि त्यातील कोणतेंहि विशिष्ट साधन इतर दोहोंना बाधक आहे असें ते मानीत नाहींत. जुन्या दासबोधात प्रपंच व परमार्थ याचा विरोध असल्याचें ते लिहितात. परंतु नव्या दासबोधात प्रपंच व परमार्थ दोन्ही साधतां येतात व तसें तें साधणें हाच प्रशस्य मार्ग होय असें त्यांनीं म्हटलें आहे. यावरून पूर्वकालीन वेदान्ती शिकवणीचा परिणाम प्रारभीं जरी समर्थांच्या मनावर झाला होता तरी समर्थ हे आत्मप्रचितीला योग्य महत्त्व देणारे असल्यानें त्यांनीं अनुभवावरून आपली विचारसरणी बदलली व तिची नीट मांडणी केली असें दिसतें. सिद्ध झाला तरी त्यानें कर्ममार्ग सोडू नये, (८-९-१२)

साधन सोडीती सिद्धपण गेलें। साधनेंचि भलें सिद्धपण॥

उपदेश शतक, ३

विरक्त स्थितींतहि कर्मयोगाचें आचरण चालविलेंच पाहिजे (द. २ स. ९ ओ. ११ ते ३९), साधन प्रतिष्ठा सोडली कीं प्राणी पुन बद्धावस्थेला जातो (द. ७ स. ७ ओ. ६७–६८) असें ते जागोजागीं प्रतिपादन करितात. या बाब-तींत गीतेंतल्या पेक्षाहि जोरदार वाणीनें त्यांनीं कर्मयोगाची वकिली केली आहे

असें म्हणतां येईल. उपाधीला कंटाळूं नये, पण उपाधीपासून अलिप्त असावें हाच त्याच्या शिकवणीचा मथितार्थ आहे.

उपाधी देहेंबुधिवें वाढविते ।

हा सिद्धान्त त्याना मान्य आहे; पण त्यावर तोड म्हणून ते लगेच प्रश्न करितात की,

परी सज्जना केवि बाधूं शके ते ।। म० श्लोक १६८

सिद्धदशा प्राप्त झाल्यावर उपाधीच्या भयानें उपाधीपासून दूर दूर पळणें हें अश्लाघ्यवाणें असल्यामुळें सिद्धानीं व विरक्तानीं कर्मयोगाचरण सोडूं नये असा समर्थांचा उपदेश आहे. या संबंधांत सिद्धलक्षणें द. ८ स. ९ आणि विरक्तलक्षणें दशक २ समास ९ यांचें समर्थ सांप्रदायिकांनीं पुनः पुनः पारायण करावें. गीतेंत स्थितप्रज्ञाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत तीं सर्व लक्षणें सांगून त्याहून अधिक व्याप व आटोप करण्याचा दंडक समर्थांनीं घालून दिला आहे. समर्थांनीं सिद्ध व विरक्त हे शब्द साधकावस्थेंतल्या व्यक्तीला अनुलक्षून योजिले नसून आत्मज्ञान झालेल्यानाच अनुलक्षून योजिले आहेत.

समर्थांच्या वेळीं शाब्दिक वेदान्त इतका बोकाळला होता कीं, वेदान्ताचा आधार घेऊन नियाभ्रष्ट व क्रियाशून्य झालेल्या लोकानीं समाज मारून टाकला होता. त्यामुळें शाब्दिक ज्ञान व त्या पोपटपंचीच्या आधारावर अधिष्ठित झालेली क्रियाशून्यता याचा खरपूस समाचार घेणें समर्थांना प्राप्त होतें.

क्रियेविण शब्दज्ञान । तेंचि स्वानाचें वमन । १२–१०–३०

म्हणूनच

क्रियेवीण वाचाळता तेचि मोठी । म. श्लोक १८२

क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । म. श्लोक ११४

असें त्यानी अट्टाहासानें प्रतिपादिलें, आणि स्वतःच्या क्रियाशून्यतेला वेदान्ताचा आधार घेणाऱ्याचा त्यानी तीव्र निषेध केला.

ऐसें वैभवें भुलले । आणि आधार घेऊं लागले । तु. दा. १०–३६

कोण पुसे यापा ज्ञान हे शाब्दिक । क्रिया अलौकिक सत्य जाण

वि. वि. अभंग ८५२–११

उत्पत्ती ज्ञानाचें लक्षण सांगताना

ज्ञानाचें लक्षण क्रियासंरक्षण । वि. वि. अभंग ७२१

असें सांगितलें.

गीतेच्या उपदेशाची सगळी उभारणी जशी बुद्धिवादावर केलेली आहे त्याचीच समर्थांनी आपली शिकवण विवेक व विचार यांच्यावर आधारली आहे. विवेक व विचार हे शब्द समर्थांच्या कवितेत किती वेळां आले असतील त्याची गणतीच करवत नाहीं. वैराग्य शब्दाला देखील ते विवेक शब्दाची जोड दिल्याखेरीज राहात नाहींत. त्याना नुसतें वैराग्य नको होतें तर विवेक वैराग्य हवें होतें.

विवेकेविण वैराग्य केलें । तरी अविवेकें अनर्थीं घातलें । १२-४-६

विवेकवैराग्य तें ऐसें । नुसतें वैराग्य हेंकाडपिसें । १२-४-१९

म्हणौन विवेक आणि वैराग्य । तेचि जाणिजे महद्भाग्य । १२-४-२०

अशीं वचनें हेंच सिद्ध करतात. गीतेच्या पूर्वीच्या उपनिषदात विवेक हा शब्द क्वचितच आढळतो. छांदोग्यांत ( ६-९-२ ) तो एकदा आला आहे. कठोपनिषदांतहि एकाच ठिकाणीं आला आहे. श्रीमद्भगवद्गीतेंत विवेक हा शब्द योजला नसला तरी तोच अर्थ 'बुद्धि', 'बुद्धियोग' या शब्दांनीं दर्शविला आहे.

बुद्ध्या विशुद्धया युक्तो । ( गी. १८-५१ )

बुद्धियोगमुपाश्रित्य । ( गी. १८-५७ )

बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि । ( गी. २-३९ ).

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । ( गी. २-४९ )

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृत दुष्कृते । ( गी. २-५० )

कर्मजं बुद्धियुक्ता हि । ( गी. २-५१ )

नास्ति बुद्धिरयुक्तस्य । ( गी. २-६६ ),

एतद् बुध्वा बुद्धिमान् स्यात् कृतकृत्यश्चभारत ( गी. १५-२० )

इत्यादि वचनात बुद्धीचें म्हणजेच विवेकाचें महत्त्व मुक्तकंठानें गायिलें आहे.

दासबोधातहि समर्थांनीं

बुद्धीवीण माणुस काचें । १५-१-१५

बुद्धिपासीं कार्यसिद्धि । १५-१०-२९

असा बुद्धीचा महिमा वर्णिला आहे. पण विवेक हा शब्द त्यांचा फार आवडता दिसतो. त्याचा दासबोधांत व मनोबोधात किती ठिकाणीं उपयोग केला आहे त्याची गणतीच करवत नाहीं. तथापि त्यांतली कांहीं निवडक स्थळें पाहा:—

हें प्रचितीचें बोलणें । विवेकें प्रचित पाहाणें । ६-९-२५

विवेकें सिद्धचि मुक्त होणें । ६-९-३१

विवेक पाहिल्याविण । जो जो उपाय तो तो सीण । ८–७–६५
विचार पाहेल तो पुरुषु । विचार न पाहे तो पशु । १०–९–२८
विवेकें विचारें राजकारणें । अंतर श्रृंगारिजें ॥ १८–६–१
ऐसीं हे विवेकाचीं कामें । विवेकी जाणतील नेमें । १८–८–१४
ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होते ॥ १८–१०–४६
मुळापासून सेवटवरी । विवेकी विवेकें विवरी । २०–७–२७

असे अनेक उतारे देता येतील पण दासबोधाचा शेवट विचाराच्या प्रशंसेनेंच केला असल्यामुळे तेवढा एक उतारा देऊन हें प्रकरण संपवूं:—

ऐसीं हे विचाराचीं कामें । एगेंच भ्रमों नये भ्रमें । २०–१०–३७

या दासबोधांतील शेवटच्या ओवींत गीतेंतील

विमृश्यै तदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥

यातील बुद्धिवादाचीच भूमिका अनुसरलेली दिसते.

सारांश, गीतेंत ज्याप्रमाणें व्यवहार व वेदान्त याचा मेळ घातला आहे तसाच दासबोधात व इतर कवितेंतहि समर्थांनी प्रपंच व परमार्थ याचा मेळ घातला आहे —

परमार्थी आणि विवेकी । त्याचें करणें माने लोकीं ।

असाच समर्थांचा अनुभव व उपदेश होता. समर्थांना मिळमिळीतपणा मुळींच आवडत नसे. गीतेंत विभूतियोगात:—

यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छत्वं ममतेजोंऽश संभवम् ॥

या श्लोकात जें जें भव्य व उदात्त तें तें भगवताचें प्रतीक असें म्हटलें आहे. म्हणून समर्थहि असाच घोष करितात कीं,:—

काहीं येक उत्कटेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण । १९–६–२४
उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाकावें ।
निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥१९–६–१५

अशा प्रकारची कीर्ति संपादन करण्याचें साधन म्हणून समर्थ सांगतात.—

बुद्धि करावी स्वाधीन । मग हें मजूर आहे मन ।
हेंचि करावें सावन । दास म्हणे ॥

या उपदेशास अनुसरून आपणा सर्वांच्या बुद्धीला योग्य वळण देण्याला या समर्थ-

वाग्देवतामंदिरातला समर्थांचा काव्यसंग्रह समर्थ होईल अशी आशा प्रगट करून हा निबंध समर्थचरणीं निवेदन करितों.

## परिशिष्ट

| दासबोध | गीता |
|---|---|
| ऐसा हा सत्वगुण सात्विक। | सत्त्वात्संजायते ज्ञानम् ॥ १४-१७ |
| संसारसागरीं तारक। | |
| येणें उपजे विवेक। | |
| ज्ञानमार्गाचा ॥ २-७-८६ | |
| सद्गुरुविण ज्ञान कांहीं। | तद्विद्धि प्रणिपातेन। परिप्रश्नेन सेवया। |
| सर्वथा होणार नाहीं। | उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं। ज्ञानिनस्तत्त्व- |
| अज्ञान प्राणी प्रवाहीं। | दर्शिनः ॥ ४-३४ |
| वाहात चि गेले ॥ ५-१-२१ | |
| ब्रह्म ब्रह्मांडीं कालवलें। | मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ॥ |
| पदार्थांसी व्यापून ठेलें। | मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं |
| सर्वांमध्यें विस्तारलें। | तेष्ववस्थितः ॥ |
| अंशमात्रें ॥ ७-४-३५ | नच मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्व- |
| ब्रह्मामध्यें सृष्टि भासे। | रम् ॥ |
| सृष्टीमध्यें ब्रह्म असे। १६ | भूतभृन्नच भूतस्थो ममात्मा भूतभावनः॥ |
| पंचभूतीं असे मिश्रित। | यथाकाशस्थितो नित्य वायुः सर्वत्रगो |
| परंतु तें पंचभूतातीत। | महान् ॥ |
| पंकीं आकाश अलिप्त। | तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युप- |
| अयोनि जैसें ॥ २० | धारय ॥ ९।४ ते ६ |
| देवास भजतां देवलोक। | देवान्देवयजो यान्ति |
| पितरास भजतां पितृलोक। | पितॄन्यान्ति पितृव्रताः ॥ |
| भूतास भजतां भूतलोक। | भूतानि यान्ति भूतेज्या |
| पाविजेतो ॥ ९-१०-१० | यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ ९-२५ |
| जेणें जयास भजावें। | |
| तेणें त्या लोकासी जावें। | |

| | |
|---|---|
| निर्गुणीं भजतां व्हावें।<br>निर्गुणचि स्वयें॥ ११ | |
| म्हणोन कर्म आरंभिलें।<br>कांहीं येक सांग घडलें।<br>जेथजेथें अंतर पडिलें।<br>तेथें हरिस्मरण करावें॥ ११-९-२ | ॐ तत्सदिति निर्देशो<br>ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः॥<br>ब्राह्मणास्तेन वेदाश्च<br>यज्ञाश्च विहिताः पुरा॥ १७-२३<br>सद्भावे साधुभावे च<br>सदित्येतत्प्रयुज्यते॥<br>प्रशस्ते कर्मणि तथा<br>सच्छब्दः पार्थ युज्यते॥ १७-२६ |
| विषयजनित जें जें सुख।<br>तेंचि होतसे परम दुःख।<br>तुका. ६।६५ | ये हि संस्पर्शजा भोगा<br>दुःखयोनय एव ते॥ ६-२२ |
| परपीडेचा संतोष। निष्ठुरपणाचा हव्यास<br>२-६-२१ | मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः॥<br>परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम्॥<br>१७-१९ |
| केले गळाचे नवस। शडिबेडीचे सायास।<br>कापयंन छेदी जिव्हेस। तो तमोगुण॥<br>२-६-२९ | |
| येथें ज्या देवाचें भजन करावें।<br>तेथें ते देवलोकीं राहावें। ४-१०-२३ | यान्ति देवव्रता देवान्॥९-२५<br>यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम्॥<br>तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भाव भाविताः<br>८-६ |
| श्रवण आणी मनन। निजध्यासें समाधान।<br>शुद्ध जालें आत्मज्ञान। तो सत्वगुण॥<br>२-७-६१ | मनः प्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः॥<br>भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते॥<br>१७-१६ |
| सकळांसीं नम्र बोले। मर्यादा धरून | श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः॥ |

जन सर्व तोषविले । तो सत्वगुण ॥ ६३

चाले । अफला काङ्क्षिभिर्युक्तैः सात्विकं परिचक्षते ॥ १७-१७

जेणे जिंकिली रसना ।
तृप्त जयाची वासना ।
जयास नाहीं कामना । तो सत्वगुण ॥ ५६

आपकार्याहून जीवीं ।
परकार्यसिद्धी करावी ॥
मरोन कीर्ती उरवावी । तो सत्वगुण ॥ ६५

ऐसे मूर्ख अज्ञान जन ।
केले संकल्पें बंधन ।
शत्रु आपणासि आपण ।
होऊन ठेला ॥ ८।७।२०

आत्मैव ह्यात्मनो बंधुः
आत्मैव रिपुरात्मनः ॥ ६-५

येक जीवात्मा दुसरा शिवात्मा ।
तिसरा परमात्मा जो विश्वात्मा ।
चौथा जाणिजे निर्मळात्मा ।
ऐसे च्यारी आत्मे ॥ ८-७-४५
भेद उंच नीच भासती ।
परी च्यारी येकचि असती ।
येविषीं दृष्टान्त संमती ।
सावध ऐका ॥ ४६

द्वाविमौ पुरुषौ लोके ।
क्षरश्चाक्षर एवच ।
क्षरः सर्वाणि भूतानि
कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १५-१६
उत्तमः पुरुषस्त्वन्यः
परमात्मा उदाहृतः ॥
यो लोकत्रयमाविश्य
बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १५-१७

यस्मात्क्षरमतीतोऽहं
अक्षरादपि चोत्तमः ॥
अतोऽस्मि लोके वेदेच
प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १५-१८

जैसा भाव ज्यापाशीं ॥
तैसा देव तयाशीं ॥ जुना- ६।१३

ये यथा मा प्रपद्यन्ते
तांस्तथैव भजाम्यहम् ॥ ४।११

जैसे जयाचें भजन ॥
तैसेचि ये समाधान ॥ ६।१५

अखंड भ्रांती पडे । केला निश्चय विघडे ।
अत्यंत निद्रा आवडे । तो तमोगुण ॥
२-६-८
करूं आवडे अप्रमाद । तो तमोगुण ॥
१९

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ॥
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत॥
१४-८

बरें खावें बरें जेवावें। बरें ल्यावें बरें नेसावें ।
दुसऱ्याचें अभिळाषावें । तो रजोगुण ॥
२-५-१०
दुसऱ्याचें सर्व जावें। माझेंचि बरें असावें।
ऐसें आठवे स्वभावें । तो रजोगुण ॥१६

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ॥
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥
१४-७
लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमःस्पृहा ॥
रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥
१४-१२

जें शस्त्रें तोडिता तुटेना । जे पावकें जाळिता जळेना ।
कालविता कालवेना । आपें करूनी ॥
६-२-१६
जें वायोचेनि उडेना । जें पडेना ना झडेना ॥
जे घडेना ना दडेना। परब्रह्म तें ॥ १७

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः॥
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥
अच्छेद्योऽयमदाह्योऽयं अक्लेद्योऽशोष्य एव च ॥
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः॥
२-२३-२४

सत्वगुणें भगवद्भक्ती । रजोगुणें पुनरावृत्ती ॥
तमोगुणें अधोगती । पावति प्राणी ॥
२-५-२

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ॥
जघन्यगुणवृत्तिस्था अधोगच्छन्ति तामसाः ॥ १४-१८

नाना अवतार धरणें। दुष्टांचा संहार करणें।
धर्म स्थापाया कारणें। विष्णूस जन्म ॥
१०।४।४१

परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम्।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥
४-८

करी दुर्जनाचा संव्हार । भक्तजनासी आधार ॥

| | |
|---|---|
| ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥<br>६।७।२९ | |
| जैसे जयाचें भजन । तैसाचि देवहि आपण।<br>म्हणौन हे आवघें जाण। आपणाचि पाशीं॥<br>४।८।१४ | ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यह ॥<br>४-११ |
| या कारणें ज्ञानासमान । पवित्र उत्तम न दिसे अन्य ।<br>म्हणौन आधीं आत्मज्ञान । साधिलें पाहिजे ॥ ५।४।२२ | न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ॥<br>४-३८ |
| काया वाचा आणी मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें ।<br>कांहींतरी येका भजनें । सार्थक करावें ॥<br>२।४।११ | पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति। |
| येथें ज्या देवाचें भजन करावें । तेथें ते देवलोकीं राहावें । ४।१०।२३ | देवान् देवयजो यान्ति पितॄन्यान्ति पितृ-व्रताः ॥ |
| शुक्लपक्ष उत्तरायेण ।<br>वन्हीं दीप दिवा मरण ।<br>अंतीं राहावें स्मरण ।<br>गतीकारणें ॥ ७।१०।१४ | अग्निज्योतिरहः शुक्लः<br>षण्मासा उत्तरायणम् ।<br>तत्र प्रयाता गच्छन्ति ।<br>ब्रह्मब्रह्म विदो जनाः ॥ ८-२४ |
| उत्तरायेण तें उत्तम ।<br>दक्षिणायेन तें अधम ।<br>हा संदेहीं वसे भ्रम ।<br>साधु तो निःसंदेह ॥ १३ | धूमो रात्रिस्तथा कृष्णः<br>षण्मासा दक्षिणायनम् ॥<br>तत्र चान्द्रमसं ज्योतिः<br>योगी प्राप्य निवर्तते ॥ ८-२५ |
| इतुकें नलगे योगियासी ।<br>तो जीतचि मुक्त पुण्यरासी ।<br>तिळांजुळी पापपुण्यासी ।<br>दिधली तेणें ॥ १५ | नैते सृती पार्थ जानन्<br>योगी मुह्यति कश्चन ॥<br>तस्मात्सर्वेषु कालेषु<br>योगयुक्तो भवार्जुन ॥ ८-२७ |
| भक्त भगवंतीं अनन्य ।<br>त्यासी बुद्धि देतो आपण । | ददामि बुद्धियोगं तं<br>येनमामुपयान्ति ते ॥ १०-१० |

येदर्थी भगवद्वचन ।
सावध ऐका ॥ १०।७।३०
शुद्धि भगवताचें देणें ।
पालटेना ॥ २९
सकळ विद्येमध्यें सार । अध्यात्मविद्या विद्याना ॥ १०-३२
अध्यात्म विद्येचा विचार ।
दशमोध्याई सारगवर ।
भगवद्गीतेसि बोलिला ॥ ७।१।२७
वेवसाई जो मळिण । बहुशाखा ह्यनन्ताश्च
त्यासि न फळे निरूपण ॥ ७ १-५० बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥
त्या मूळ पुरुषाची वोळखण । कार्यकारणकर्तृत्वे
ते मूळ मायाचि आपण । हेतु प्रकृतिरुच्यते ॥ १३-२०
सकळ कांहीं कर्तेपण ।
तेयेंचि आलें ॥ ८।३।१४
तेची बीजरूप मूळ माया ।
विस्तार जाला तेथुनिया ।
तिचें स्वरूप शोधुनिया ।
बरें पाहावें ॥ १०।९।२
मूळ माया मूळ प्रकृति ।
मूळपुरुष ऐसें म्हणती ।
शिवशक्ति नामें किती ।
नाना प्रकारें ॥ १०।१०।७
दोनी पुरुष लोकीं असती । द्वाविमौ पुरुषौ लोके
क्षराक्षर बोलिजे ती । क्षरश्चाक्षर एवच ।
सर्वभूतें क्षर म्हणती । क्षर सर्वाणि भूतानि
अक्षर कूटस्त बोलिजे ॥ १०।१०।४५ कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १५ १६
उत्तम पुरुष तो आणिक । उत्तम पुरुषस्त्वन्य॰
निष्प्रपंच निष्कळंक । परमात्मेत्युदाहृत ।
निरंजन परमात्मा येक। यो लोकत्रयमाविश्य

निर्विकारी ॥ ४६

विमलत्वंय्य ईश्वरः ॥ १५-१७

मी तरुणा मी सुंदर ।
मी बलाढ्य मी चतुर ।
मी सकळामध्यें थोर ।
म्हणे तो रजोगुण ॥ २-५-१४

आढ्योऽभिजनवानस्मि ।
कोऽन्योऽस्ति सदृशो मया ॥ १६-१५

दुसऱ्याचें सर्व जावें ।
माझेंचि बरें असावें ।
ऐसें आठवे स्वभावें ।
तो रजोगुण ॥ १६

असौ मया हतः शत्रुः ।
हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहंभोगी ।
सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १६-१४

ईश्वरें मोठें सूत्र केलें ।
मनुष्यमात्र गुंतोन राहिले ।
लोभाचें गुंडाळें केलें ।
उगवेना ऐसें ॥ १७।२।३०

दैवी ह्येषागुणमयी ।
मम माया दुरत्यया ॥ ७-१४

आत्मा देहामध्यें असतो ।
नाना सुखदुखें भोगितो । १७।६।१

पुरुषः प्रकृतिस्थो हि ।
भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ॥ १३-२१

धन्य विष्णु पाळण करिती ।
येकाशें सकळ जीवासी ।
वाढविती वर्तविती ।
जाणजाणों ॥ १८।१।४

विष्टभ्याहमिदं कृत्स्नं ।
एकांशेन स्थितोजगत् ॥ १०-४२

पुढें शिवात्मा तोचि जीवात्मा ।
जन्म घेतो ॥ २०।१।२५

ममैवांशो जीवलोके ।
जीवभूतः सनातनः ॥ १५-७

विधिप्रपंच तरु वाढला ।
वाढता वाढता विस्तीर्ण झाला । २०।८।१

ऊर्ध्वमूलमधः शाखं ।
अश्वत्थं प्राहुरव्ययम् ॥ १५-१

माया उलंघाया कारणें ।
देवाशी नाना उपाय करणें ।
अध्यात्म श्रवणपंथेचि जाणें ।
प्रत्ययानें ॥ २०।९।१४

मामेव ये प्रपद्यन्ते ।
मायामेतां तरन्ति ते ॥ ७-१४

शास्त्राचा बाजार भरला ।
देवांचा गलबला जाला ।

कांक्षंतः कर्मणा सिद्धिं ।
यजन्त इह देवताः ॥ ४-१२

| | |
|---|---|
| लोक कामनेच्या मताला । | |
| झोंबोन पडती ॥ ११।२।२२ | |
| प्रकृतीमधील देव । | स्वभावोऽध्यात्ममुच्यते ॥ ८-३ |
| तो प्रकृतीचा स्वभाव । ११।२।३६ | |
| जनीं जनार्दन म्हणोनी जना । संतुष्ट करावें। | सर्वभूतस्थितं यो माम् । |
| १८।४।२५ | |
| नारायेण असे विश्वीं । | भजत्येकत्वमास्थितः ॥ |
| त्याची पूजा करीत जावी । | सर्वथा वर्तमानोऽपि |
| या कारणें तोषवावी । | स योगी मयि वर्तते ॥ ६-३१ |
| कोणीतरी काया ॥ १९।९।२९ | |
| ऐसी माझी उपासना । | |
| आणिता न ये अनुमाना । | |
| नेऊन घाली निरंजना । | |
| पैलिकडे ॥ २९ | |
| देउळें म्हणिजे नाना शरीरें । | अहमात्मा गुडाकेश |
| तेथें राहिजे जीवेश्वरें । १७।१।१२ | सर्वभूताशय स्थितः ॥ |
| तेथें चंद्र सूर्य ना पावक । | न तद्भासयते सूर्यो । |
| नव्हे काळोखें ना प्रकाश । १७।२।९ | न शशांको न पावकः ॥ १५-६ |
| मनाचे श्लोक | गीता |
| विकारें घडे हो जनीं सर्व चींची ॥ ५ | ध्यायतो विषयान्पुंसः |
| | ...बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ २-६३ |
| असे हो जया अंतरीं भाव जैसा । ३५ | ये यथा मा प्रपद्यन्ते ॥ ४-११ |
| अनन्यास रक्षीतसे चापपाणी । ३५ | अनन्याश्चिंतयन्तो मा...... ९-२२ |
| जनाकारणें देव लीलावतारी । | परित्राणाय साधूना विनाशायच दुष्कृतां |
| बहुतापरी आदरें वेषधारी । | धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे४-८ |
| तया नेणती ते जन पापरूपी । | मूढोऽयं नाभिजानाति लोको मामज- |
| दुरात्मे महा नष्ट चाडाळपापी ॥ १२६ | मव्ययम् ॥ ७-२५ |
| अविद्यागुणें मानवा उमजेना । १४३ | नाहं प्रकाशः सर्वस्य योगमाया समावृतः॥ |
| | ७।२५ |

| | |
|---|---|
| उपाधी देहेबुधिते वाढवीते ।<br>परी सज्जना केवि बाधूं शके तो॥ १६८ | आत्मवन्तं न कर्माणि । निबध्नन्ति<br>धनंजय ॥ ४-४१ |
| जयाचेनि सर्वें महादुख भंगे । २०३ | त्रायते महतो भयात् ॥ २-४० |
| नसे गर्व आर्गी सदा वीतरागी ।<br>क्षमा शांति भोगी दयादक्ष योगी ।<br>नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा ।<br>यहीं लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥ १३४ | प्रजहाति यदा कामान्<br>सर्वान्पार्थ मनोगतात् ॥ २-५५<br>वीतरागभयक्रोधः<br>स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ २-५६ |
| गुणीं गोविलें जाहलें दुख देहीं । १४० | निबध्नन्ति महाबाहो देहे<br>देहिनमव्ययम् ॥ १४-५ |
| जनीं जाणता पाय त्याचे धरावे ।<br>गुरू अजनेवीण तें आकळेना । १४१ | तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया<br>उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ॥ ४-३४ |
| रामदास कविता | गीता |
| दास म्हणे ओढाळ । आटोपीना ॥<br>तो चाहाळ ॥ वि. वि. अभंग ३८२ | चंचलंहि मनः कृष्ण ॥<br>प्रमाथि बलवद्दृढम् ॥ ६-३४ |
| मन चोरटें धरीलें निस्नेमें जंजरिलें ॥<br>वि. वि. अभंग ५०५ | असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहचलं<br>अभ्यासेन तु कौन्तेयवैराग्येणच गृह्यते ॥<br>६-३६ |
| कोणत्या उद्योगी नाही घडे पाप ॥<br>संसारी निष्पाप कोणताचि ॥<br>वि. वि. अभग २२६ | सर्वारंभा हि दोषेण<br>धूमेनाग्निरिवावृताः ॥ १८-४८ |
| कर्म करीती आवडी फलाशेची नाही<br>गोडी ॥ वि. वि. अभंग २९२ | मा कर्मफलहेतुर्भूः ॥<br>माते संगोऽस्त्व कर्मणि ॥ २-४७ |
| धन्य धन्य तोची ज्ञाता ॥<br>याचा लक्षणी पुरता ॥ | अद्वेष्टा सर्व भूताना ...अ. १२-श्लो.<br>१३-१९ |
| राखे गुरुपरंपरा । देव सगुण दुसरा ॥<br>विवेकवैराग्य सोडीना कर्मउपासना<br>सोडीना ॥ वि. वि. अभंग २९३ ते<br>३०२।७०९ | समदुःखसुखः स्वस्थः अ. १४ श्लो.<br>२४ ते २६<br>बुध्या विशुद्धया युक्तो ...अ. १८<br>श्लो ५१ ते ५३ |

## ( ४ )

# श्रीसमर्थ रामदास आणि समाजसेवा

( लेखक—श्री. नारायण गोविंद चापेकर, एलएल्. बी., बदलापूर )

अनुभवावरून असें म्हणता येतें कीं, जडसृष्टि ही जीवाच्या उपभोगाकरताच परमेश्वरानें निर्माण केली आहे. जीवाचें जीवित जड पदार्थांवर अवलंबून आहे. जीव हा ह्या अचेतन सृष्टीचा उपभोक्ता आहे. अर्थात् जडसृष्टि उपभोग्य आहे. ह्या जडसृष्टींतील एकहि पदार्थ निरुपयोगी अथवा निरर्थक निर्माण केलेला आहे असें सिद्ध करणें कठीण आहे. जीवसृष्टीमध्येंहि मनुष्यसृष्टि व मनुष्येतरसृष्टि असा भेद करणें अवश्य आहे. कारण मनुष्य हा मनुष्येतर प्राण्याला तो आपल्या जीवनासाठींच निर्माण झाला आहे असें समजतो. अनुभवहि तसाच आहे. मनुष्य हा जड पदार्थ व मनुष्येतर प्राणी ह्यांवर जगतो व मरभराटतो. ह्यामुळें त्या सर्वांना आर्थिक किंमत आहे. बाजारात त्याची खरेदीविक्री होते. पैसे देऊन आपल्या उपभोगाकरता मनुष्य जड पदार्थ व मनुष्येतर प्राणी विकत घेतो. मनुष्याचें उपभोक्तृत्व इतकें व्यापक आहे. उपभोग्य उपयुक्त असतें आणि उपयुक्ताला किंमत येते. मनुष्य हा उपभोक्ता व मनुष्येतर सर्व जडाजड सृष्टि उपभोग्य अशी वस्तुस्थिति असल्याचें आपणांस आढळून येतें. मनुष्यातहि दुर्बल माणसें सबल माणसांना उपभोग्यादासल होतात. गुलामगिरी हें ह्याचेंच फल होय. अशा माणसांना— स्त्री पुरुषांना किंमत येते. बाजारात त्यांची देवघेव होते. मालमत्तेप्रमाणें त्यांचें वाटप करण्यात येतें. आज गुलामगिरी जरी पूर्वींच्या स्वरूपात बंद असली तरी नोकराच्या स्वरूपात ती अंशरूपानें अजूनहि प्रतीत होत आहे. पैसा-

करतां आपण आपल्याला विकलें म्हणजे आपला उपभोग किंवा उपयोग आपण दुसऱ्याला करून देतों, आपण चेतनसृष्टींतून जडसृष्टींत जातों, आपण परतंत्र होतों. ह्यावरून असें दिसून येईल कीं, मनुष्यांतहि उपभोक्ते थोडेच असतात. श्रीसमर्थ ह्या उपभोक्त्याना महंत असें म्हणतात. स्वतंत्र असणें हें महंताचें मुख्य लक्षण.

परतंत्र होऊं नये । कांहीं केल्यां ॥ १४।१।२२
स्वतंत्रता मोडूं नये । निरापेक्षा तोडूं नये ।
परापेक्षा होऊं नये । क्षणक्षणा ॥ २३

आपल्या उपयोगासाठीं उपभोग्याला उपभोक्ता किंमत देतो, परंतु उपभोक्त्याला किंमत कोण देणार ? त्याला किंमत आली कीं, तो उपभोग्यांतच मोडूं लागणार. परंतु मनुष्य जर पूर्णपणें स्वतंत्र असेल, 'परापेक्षा' नसेल, तर तो दुर्लभी राक्षस बनण्याचाच संभव अधिक. तो स्वतंत्र म्हणजे स्वार्थतत्र होईल. "भोगीं मन अर्धो नये" असें समर्थ महंताचें लक्षण सांगतात. परंतु बलिष्ठ उपभोक्त्याचें मन भोगांच्या ठिकाणींच सदैव असणार हें उघड आहे.

तेथें कैचा परोपकार । केला बहुतांचा संहार ।
पापी अनर्थी अपस्मार । सर्व अवद्धी ॥ १९–३–१५

हें समर्थांचें वर्णन अशा उपभोक्त्याला लागू पडतें. उपभोक्त्याचें हें अवलक्षण मानलें, तर मनुष्य उपभोक्ता असता कामा नये, हेंच सिद्ध होत नाहीं काय ? मागें केलेल्या विवेचनावरून प्रत्येकानें उपभोग्य असावें अशीच सृष्टिकर्त्याची योजना असली पाहिजे असें अनुमान करता येतें. उपभोग्याला किंमत असते; उपभोक्त्याला नाहीं हें आपण पाहिलेंच आहे. आतां उपभोक्ता मनुष्य उपभोग्य म्हणावयाचा तर त्याचा उपभोक्ता कोण हा प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें उत्तर हें कीं, सर्वांचें उपभोक्तृत्व समाजाकडे आहे. समाज हा उपभोक्ता व जगातील प्रत्येक जड पदार्थ, प्रत्येक जंतु, प्रत्येक प्राणी, प्रत्येक मनुष्य हा उपभोग्य, अशी व्यवस्था दिसते. समर्थांची सर्व शिकवण ह्या कल्पनेस अनुसरून असल्याचें दिसून येतें. उपभोग्य म्हणजे उपयोगी. उपयुक्ततेलाच किंमत असते. समर्थ म्हणतात, समाज जो उपभोक्ता तो अशा माणसास किंमत दिल्यावांचून राहात नाहीं. त्याच्या उपयुक्ततेप्रमाणें त्याला किंमत येते.

न्याय नीति भजन मर्यादा । काळ सार्थक करी सदा ।
दरिद्रपणाची आपदा । तेथें कैंची ॥ १९।४।१४

कारण,

मग ते लोक पाठी रासती । नाना प्रकारीं ॥ १३।४।२९

स्वार्थाच्या मार्गे लागलेला मनुष्य दरिद्री होतो; समाजाच्या उपयोगी पडणारा सधन होतो. ह्या शिकवणुकींतच रामदासाचें वैशिष्ट्य आहे असें मला वाटतें.

मनुष्याला उपयोगी पडणारा उपभोग्य व समाजाला उपयोगी पडणारा उपभोग्य ह्यात महत्त्वाचा भेद आहे. समाजाला उपयुक्त होणाऱ्याला आपल्या बुद्धीचा उपयोग करावा लागतो. समाजाचा प्रत्यक्ष ताबा त्याच्यावर नसतो. परंतु मनुष्य उपभोक्त्याची गोष्ट निराळी आहे. तो पदार्थाचा अथवा प्राण्याचा उपयोग कसा करावयाचा तें आपण ठरवितो. मनुष्यामनुष्यात उपभोग्य व उपभोक्ता हें नातें असणें इष्ट नाहीं. प्रत्येक माणूस समाजोपयोगी असावा व मनुष्येतर प्राणी अगर पदार्थ मनुष्योपयोगी असावा ही स्थिति उच्च संस्कृतीची द्योतक होय. बहुजनसमाज अल्प समाजाचा उपभोगविषय बनला तर ती स्थिति समाजाच्या नाशास कारणीभूत होते. समाजोपभोग्य मनुष्यवर्गातच समाजविकासाचें माप आपणास सांपडतें. आपल्या स्वतःच्या उपयोगार्थ मनुष्यांना राबवण्याची प्रवृत्ति अत्यंत हानिकारक होय. परिणामीं ही प्रवृत्ति घातक होत असल्याकारणानें रामदासांनीं तिला दारिद्र्यकारक ठरविली आहे. रामदासाची सर्व शिकवण ह्या तत्त्वाला धरून आहे. हें कसें तें आपण आता पाहू.

आधीं प्रपंच करावा नेटका ।

हा पहिला नियम समर्थांनीं घालून दिला आहे. ह्या वचनाचा विपर्यास वारंवार केलेला आढळतो, म्हणून त्याविषयीं थोडा विस्तार करणें अवश्य आहे. रामदास प्रपंच करावयास सांगतात, तो परमार्थाकरता सांगतात, हें विसरता कामा नये.

परमार्थ साडून प्रपंच करिसी । तरी तूं येमयातना भोगिसी । १२।१।४

माझा जीव आणि दुसऱ्याचा जीव एकच आहे हें ध्यानांत ठेवून प्रपंच करील त्याच्याकडून प्रपंच व परमार्थ हे एकदम चालविले जातील. प्रपंचांत परमार्थ साधावयाचा असतो. जो आपल्यापुरतें किंवा आपल्या बायकामुलांपुरतेंच पाहतो, पराला आत्मवत् मानीत नाहीं, आपल्याच पोळीवर सर्व तूप ओढून घेतो, त्या करट्याला परमार्थ कसा होणार ? प्रपंच नेटका करावा म्हणजे इतरांना लुबाडून बायकामुलांची धन करावी आणि मग वृद्धपणीं परमार्थाकरतां ' हरि हरि ' म्हणत बसावें असा रामदासाच्या उपदेशाचा अर्थ नाहीं.

प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ १२-१-९

असें ते निक्षून सांगतात. विरक्त माणसानें संसारांत राहावें अशी त्यांची शिकवण नाहीं. ते म्हणतात—

वैराग्यें करावा त्याग । तरीच परमार्थयोग ।
प्रपंचत्यागें सर्वसांग । परमार्थ घडे ॥ १२।७।९

अविरक्त माणसानें प्रपंच केलाच पाहिजे. परंतु रामदास सांगतात, भाडवलशाहीचा तो प्रपंच नसावा. तो असा करावा कीं,

जेणेंकरितां उभय लोक । संतुष्ट होती ॥ ११।३।२

दुसऱ्याशीं आपण कसें वागतों त्यावर आपला परमार्थ अवलंबून आहे. आपण मोक्षाच्या मार्गावर आहों कीं नाहीं हें त्यावरूनच ताडता येतें. बाकी सर्व धार्मिक आचार चित्तशुद्धीच्या पलिकडे आपणास नेऊ शकत नाहींत. म्हणून सामान्य माणसानें प्रपंचात राहून तो परमार्थरूपानें चालविण्याचा उपदेश अत्यंत उपयुक्त ठरतो. ज्ञानोत्तर कर्मापेक्षा हा रामदासी उपदेश शतपटीनें बरा व शास्त्रीय म्हटला पाहिजे. परमार्थबुद्धीनें केलेला प्रपंच कमी बंधनकारक होईल परंतु त्याच्या योगानें जन्ममृत्यू टळणार नाहींत.

तैसा संसारें दुःखवला । त्रिविधतापें पोळला ।
तोचि येक अधिकारी जाला । परमार्थासी ॥ ३।६।७

संसाराचा ज्याला वीट आला तोच खऱ्या परमार्थाला अधिकारी होतो. आणि वीट आलेल्या माणसाला संसार करा म्हणून कोण सांगणार? म्हणून परमार्थाला अनधिकारी माणसानीं प्रपंच करावा, पण तो समाजाकरता करावा. समाज धनी आणि मी नोकर अशा भावनेनें करावा.

समाजोपभोग्य माणसाच्या सर्व क्रिया समाजोपयोगीच असाव्या लागतात. एवढ्याचसाठीं समर्थांच्या उपदेशात समाजहितक्रिया अधिक प्रमाणात आढळतात. लोकाना शहाणे करून सोडण्याचा आग्रह एकट्या रामदासानींच धरला आहे. महंताच्या लक्षणामध्यें

बहुत जनास शहाणे करी । नाना विद्या त्या विवरी ।
स्थूळ सूक्ष्मा ॥ ११।६।१६

असें एक लक्षण नमूद केलेलें आढळतें. ज्ञानावाचून मनुष्यामध्यें उपयुक्तता उत्पन्न होत नाहीं हा विचार रामदासाच्या सूक्ष्म व व्यापक बुद्धीची साक्ष देत

आहे.

आपणांकरितां शाहाणे होती । ते सहजचि सोये धारिती । ११।६।१७

शाहाणी झालेलीं माणसें स्वतंत्र कार्यप्रवर्तक होतात हा विचार रामदासाखेरीज इतरत्र कोठें सापडेल ! आणखी पाहा—

महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखरावे । नाना देशीं ॥ ११।१०।२५

आपण स्वतः ज्ञान संपादून दुसऱ्यास सज्ञान करीत राहावें ही घोषणा समर्थांनीं अनेक वेळा केली आहे.

तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तेंचि ज्ञान जनास सांगावें । १२।१०।२

अशा रीतीनें वागणाराची आर्थिक किंमत वाढते असें रामदासाचें सांगणें आहे.

सर्व आर्जवी तयाला । काय उणे ॥ १२।१०।१४

सर्व लोक त्याच्या भजनीं लागतात; मग त्याला कमी काय असणार ? शिक्षणावांचून ज्ञान नाहीं आणि ज्ञानाशिवाय माणसाचा उपयोग नाहीं म्हणून सकळ लोक हळू हळू पुण्यश्लोक करीत जावे असें सांगून लोकशिक्षणाची आवश्यकता त्यांनीं प्रतिपादन केली आहे, आणि

पंडित आणि घाटे पोरे । येक कैसीं ॥ १३।१०।१३

असा प्रश्न विचारून ती दृढ केली आहे. लोक सज्ञान व्हावे म्हणून आपल्याजवळील ग्रंथ दुसऱ्याना वाचावयास देण्याविषयीं समर्थ कळकळीनें उपदेश करतात.

आपण वाचीना कधीं । कोणास वाचावया नेदी ।
वांधोन ठेवी वंदीं । तो येक मूर्ख ॥ २।१।७१

दुसऱ्यास शिकवावयाचें म्हणजे आपण स्वतः शिकलें पाहिजे, हें ओघानेंच प्राप्त होतें; म्हणून समर्थांचा विद्याभ्यासावर फार कटाक्ष आहे.

विद्याअभ्यास सोडूं नये । काहीं केल्या ॥ २।२।८

इतर संताप्रमाणें समर्थ नुसत्या सात्विक वृत्तीचा उपदेश करून राहात नाहींत. सुशिक्षित होण्याचा आग्रह करतात.

नेणे आणी नायके । न ये आणी न सीके ।
न करी आणी न देखे । अभ्यास दृष्टी ॥ २।३।११

हीं शिक्षणाच्या उपयुक्ततेची जाणीव त्या काळांत असामान्यच मानली पाहिजे. विद्याहीनाला समर्थ भिकारी संबोधितात ( २।३।३४ ), अर्थात् असा उपदेशक

आपणांस येत असेल तें हळू हळू सर्वांना सांगून त्यांना शहाणे करावें असें सांगणार ह्यांत आश्चर्य तें काय! शिकवण्याचा वीट मनीं मानूं नये ( २।२।१० ) हा उपदेश रामदासांनीं वारंवार का केला ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

अद्वैताचा अंगीकार केल्याशिवाय लोकहितरतत्वाचा उपदेश करणें अशक्य आहे. द्वैतवादी वैयक्तिक गुणोत्कर्षाविषयीं दक्षता बाळगतात. मी चांगला असलों म्हणजे झालें, मला दुसऱ्याच्या भानगडींत पडण्याचें कारण नाहीं, अशी त्यांची विचारसरणी असते. परंतु समर्थ नुसत्या व्यक्तिगत गुणांना किंमत देत नाहींत. गुण संपादन करावयाचे ते लोकहितार्थ असें ते समजतात. आपण दुसऱ्याला मारूं नये एवढ्यावर त्यांचें समाधान होत नाहीं. पण दुसऱ्याला कोणी मारीत असतां आपण त्याचें निवारण केलें तरच आपण गुणी आहों असें ते मानतात.

कोणी येकास मारी । तयास जाऊन वारी ।

जीव बंधनमुक्त करी । तो सत्त्वगुण ॥ २।७।७५

त्याचप्रमाणें परोपकार करण्याचीं कारणें निरनिराळ्या धर्मोपदेशकांनीं निरनिराळीं दिलीं आहेत. परोपकार करा आणि स्वर्ग मिळवा असें कित्येक सांगतात तर आत्मा सर्वत्र एकच आहे म्हणून दुसऱ्याच्या उपयोगी पडणें म्हणजे आपल्याच उपयोगी पडणें आहे असा कोटीक्रम दुसरे करतात. रामदासांचें कारण ह्याहून भिन्न आहे. दुसऱ्यावर आपण उपकार केले तर ते आपल्या कार्यांत मदत करतात आणि अशा रीतीनें समाजकार्यक्षमता सर्वांची वाढते असें त्यांचें प्रतिपादन आहे.

आपल्या कार्यास तत्पर । लोक असती ल्हाहान थोर ।

तैसाचि करी परोपकार । मनापासुनी ॥ १९।४।२२

ही कल्पना रामदासांचीच आहे. परोपकार करणाराला सर्वांचा पाठिंबा मिळतो.

मग ते लोक पाठी राखती । नाना प्रकारीं ॥ १९।४।२९

जनतेच्या साहाय्याशिवाय आपणास कोणतेंहि लोककार्य करतां येणार नाहीं; जनतेचें साहाय्य मिळविण्यास आपण लोकांच्या उपयोगी पडलें पाहिजे. ह्या कारणास्तव रामदासांनीं परोपकारावर फार भिस्त ठेविली आहे.

परोपकारीं वेची जीव । तो सत्त्वगुण ॥ २।७।६४

आपकार्याहून जीवीं । परकार्य सिद्धी करावी । ६५

परोपकार हें साधन, चळवळ हें साध्य. कांहींतरी करीत असावें; चळवळ करावी;

चळवळीचें सामर्थ्य फार मोठें आहे; हें रामदासांच्या शिकवणुकीचें सार आहे- परोपकार हें लोकसंग्रहाचें साधन आहे.

पृथ्वीमधें जितुकीं शरीरें। तितुकीं भगवंताचीं घरें। २०।४।४

असा मनाचा निर्धार झाला म्हणजेच हातून परोपकार होतो.

रामदासाची शहाणपणाची कल्पनाहि वेगळीच आहे. केवळ विद्वत्तेला ते शहाणपण समजत नाहींत.

जो बहुतांस मानला। तो जाणावा शाहाणा जाला। १५।२।२६

लोकप्रियतेंत शाहाणपण असतें असें त्याचें म्हणणें दिसतें. ह्यासाठींच बहुताचे कष्ट करावे लागले तरी ते करून शाहाणपण मिळवावें असा त्याचा उपदेश आहे. आपण समाजाकरता झटलों, समाजाला प्रिय झालों, म्हणजे आपणास काहीं कमी पडणार नाहीं, आपली किंमत आपल्याला मिळेल, असें फळ समर्थ दर्शवितात.

जनीं शाहाण्या मनुष्याला। काये उणें। १५।३।२६

असा त्याचा निश्चयसूचक सवाल आहे. मनुष्याला संपत्ति आवडते हें जर खरें, तर त्यानें शहाणें का होऊ नये?

जीवास आवडे संपत्ति। तरी शाहाणे व्हावें॥ १५।३।२४

दुसऱ्यास सुखी करण्यात नुसती पुण्याची लालूच समर्थ दाखवीत नाहींत. दुसऱ्याला सुखी केल्यानें आपण सुखी होतों.

म्हणोन दुसऱ्यास सुखी करावें। तेणें आपण सुखी व्हावें। १४-६-२३

अशी त्याची प्रतिपादनाची विशिष्ट तऱ्हा आहे. गुणी माणसाला भाग्यश्री लाभलीच पाहिजे असा रामदासाचा दृढ विश्वास आहे.

हे सकळ गुणापासीं गती। सगुण भाग्यश्री भोगिती।
अवगुणास दरिद्रप्राप्ती। येदर्थी संदेह नाहीं॥ ९।४।४

ह्यालाच अनुसरून इतरानीं श्रीमंत असावें, इतराच्या श्रीमंतींत आपली श्रीमंती आहे हें रामदासी तत्त्वज्ञान अर्वाचीन समाजवाद्यांना पटण्यासारखें आहे. रामदासाप्रमाणें समाजसेवेचा उपदेश दुसऱ्या थोड्याच संतानीं केला असेल.



( ५ )

## श्रीसमर्थांचें काव्य

[ लेखक— प्रो. शंकर केशव कानेटकर, एम्. ए., पुणें ]

कोणत्याहि अभिजात लेखकाच्या बाबतींत त्याचे अंधानुयायी मित्र या शिष्य किंवा समग्र ग्रंथ न पाहणारे शत्रू या थोडे याजकडून जेवढी आगळीक होते तेवढी आगळीक इतराकडून सहसा होत नाहीं. अशा पारंपरिकांनीं केलेली अति स्तुति किंवा अज्ञान्यांनीं केलेलीं शुष्क विधानें या दोन्हींपासून त्या अभिजात लेखकाच्या कीर्तीस किंवा कृतीस यत्किंचित्‌हि ढळ पोचत नाहीं. परंतु त्याच्या मताचा, चंचल वृत्तीच्या नवीन पिढीचा बुद्धिभेद होण्याइतका, समाजावर परिणाम झाल्यावांचून रहात नाहीं. यात लेखकाच्या दृष्टीनें तर त्याला अन्याय होतोच, परंतु विशेष म्हणजे, राष्ट्रीय घडणीच्या दृष्टीनें समाजाचें नुकसान होतें. श्रीसमर्थांच्या बाबतींत हा अन्याय विशेषत्वानें झालेला आहे व त्याचे परिणाम समाजाला थोडे फार भोगावे लागले आहेत. शाळेंतील शिक्षकांनीं व महाविद्यालयांतील आचार्यांनीं 'रामदास हे कविच नव्हते' अशी एकसारखी घोषणा केल्यानें, 'जो कविच नाहीं त्याचें लिखाण वाचून तरी काय करावयाचें आहे,' अशी आपली साहजिकच प्रवृत्ति होते. आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ ते जेव्हां श्री. रामभाऊ जोशी, शास्त्री किंवा एखादे इतिहासाचार्य पंडित यांच्या-सारख्यांचे आधार पुढें करतात, त्या वेळीं साहजिकच मनावर विपरीत परिणाम होतात व आपण त्या वाङ्मयाला पारखे होतों. ही स्थिति नाहींशी होऊन श्री-समर्थांच्या कर्मयोगाचें व कार्याचें रहस्य नवीन पिढीला समजावून दिलें पाहिजे

व त्याची थोरवी त्याना प्रतीत केली पाहिजे. या दृष्टीनें श्रीसमर्थांच्या समग्र काव्यग्रथाची या प्रबंधात पहाणी करावयाची आहे.

कोणत्याहि अभिजात लेखकाच्या वाङ्मयाचें आलोडन करताना अभ्यासकानें त्या लेखकाच्या जीवनाचा, काळाचा, परिस्थितीचा, ध्येयाचा व कार्याचा सागोपाग विचार केला पाहिजे. त्याचप्रमाणें त्याच्या लिखाणाचें परीक्षण करताना तत्कालीन साहित्यविषयक ज्या ज्या कल्पना किंवा जे जे दडक रूढ होते त्याचाहि विचार केला पाहिजे. जुन्या वाङ्मयाकडे केवळ आधुनिक दृष्टीनें किंवा आधुनिक वाङ्मयाकडे केवळ जुन्या दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. त्यानें केव्हाहि दोघाना अन्यायच होईल. यापेक्षा, वाङ्मयप्रातात सर्वसाधारणपणें कोणतेंहि लिखाण 'अभिजात वाङ्मय' किंवा 'अभिजात काव्य' या पदवीस चढण्यास त्यात जे जे गुण अत्यावश्यक असावे लागतात, त्याचाच विचार आपण केला पाहिजे. कोणत्याहि वाङ्मयात काहींतरी स्थायी गुण असल्यासेरीज तें टिकाऊ किंवा कार्यप्रेरक होत नाहीं व त्यास अभिजाततताहि प्राप्त होत नाहीं. श्रीसमर्थांच्या काव्यग्रथात काव्य आहे कां? त्याच्यामध्ये असे कोणते गुण आहेत, कीं त्यास मराठी वाङ्मयात बहुमानाचें स्थान मिळावें? या किंवा अशाप्रकारच्या प्रश्नांची उत्तरें देण्यासाठीं त्याच्या काव्याचें परीक्षणच करावयास हवें. जुन्या सस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनीं काव्याची व्याख्या करताना रसाला पहिलें स्थान दिलें आहे. पाश्चात्य ग्रंथकारहि रस हाच काव्याचा आत्मा असें प्रतिपादीत आहेत व आधुनिक मराठी लेखकानाहि, ही रसाची उपपत्ति मान्य आहे. रसाबरोबरच त्यानीं काव्याच्या इतर अगोपागाचीहि सविस्तर चर्चा आपापल्या ग्रंथांतून केली आहे. ती सविस्तरपणें येथें देण्याचें कारण नाहीं. तथापि रसाबरोबर कलादृष्टीनें ध्वनि व बाह्यसौंदर्य दृष्टीनें भाषा, या दोन तत्त्वाचें महत्त्व त्यानीं विशेष गाइलें आहे. लेखकाची भाषाशैली ही Style is the man या दृष्टीनें महत्त्वाची असतेच. श्रीसमर्थांनीं देखील कवि व काव्य यासबधीं लिहितांना, कवींना

'अमृताचे मेघ, नवरसाचे वोघ, शब्दरत्नाचे सागर, बुद्धीचे वैरागर' अशा युक्त शब्दानीं सबोधलें आहे. त्याचप्रमाणें काव्य हें ध्येयदृष्ट्या

मृदु मंजुळ कोमळ। भव्य अद्भुत विशाळ।
गौल्य माधुर्य रसाळ। भक्तिरसें॥

अस असावें, असें त्यांनीं सांगितलें आहे. शिवाय 'उत्कट भव्य तेंचि घ्यावें' ही त्यांची विषय निवडण्याच्या बाबतींतली मनीषा आहे. या सर्वांवरून त्यांची काव्यासंबंधीची कल्पना जुन्या साहित्यशास्त्राच्या कल्पनेहून निराळी नव्हती हें दिसून येईल. इतकेंच नव्हे, तर त्यांची दृष्टि व्यापक, सर्वसंग्राहक व सहृदय होती, हेंहि त्यांच्या काव्यांतून दिसेल. त्यांच्या काव्यांत रसांचा उत्कट परिपोष झालेला व ध्वनीचा ठिकठिकाणीं आविष्कार झालेला दृष्टीस पडेल. जोरदार, ओजस्वी व समर्पक भाषा लिहिण्याच्या बाबतींत त्यांचा अधिकार किती थोर होता हें वरवर पहाणारासहि आढळून येईल. यांखेरीज प्रचीतीखेरीज लिहूं नये, अंतःकरणांत कार्याची उदंड तळमळ बाळगावी व अखंड सावधान ठेवावें, यांसारखे किती तरी ओजस्वी व कार्यप्रेरक संदेश त्यांच्या लिखाणांत ठिकठिकाणीं आढळतात. अकराव्या दशकाच्या सहाव्या समासांत लेखकानें 'लिहावें कसें' याविषयीं लिहितांना

'रंग राखोन भराव्या नाना कथा'

असें त्यांनीं म्हटलें आहे. या सर्व कसोट्या श्रीसमर्थांच्या काव्यास लावल्या तरी आपणास त्यांत ठिकठिकाणीं काव्य आढळेल.

प्रत्येक कवीनें लिहिलेली प्रत्येक ओळ काव्यमय असते असें कोणीहि धरून चालल्यास, तें हास्यास्पद ठरेल, हें आम्हासहि कबूल आहे. श्रीज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, विठ्ठल, दासोपंत, वामन किंवा मोरोपंत यांनीं लिहिलेली प्रत्येक ओळ न् ओळ काव्यमय आहे, असें कोणीहि म्हणणार नाहीं व तसें कोणी म्हणूं लागेल, तर त्याचें विधान अतिव्याप्तीनें दूषित असें होईल. श्रीसमर्थांच्या काव्यासहि टीकाकारांनीं ही सापेक्ष दृष्टि लाविली पाहिजे. त्यांच्या लिखाणांतील प्रत्येक शब्द काव्यमय आहे असें आमचेंहि म्हणणें नाहीं. पण 'ते कविच नव्हते' हेंहि म्हणणें अतिव्याप्तीचें होईल. आमच्या मतें जुन्या मराठी वाङ्मयांत काव्य आणि तत्त्वज्ञान यांची वेळोवेळीं सांगड घालण्यांत आली असल्यानें अभ्यासकांची दिशाभूल झालेली आहे. तत्त्वज्ञान म्हणजे काव्य नव्हे किंवा व्यवहाराची वा पुरुषार्थाची शिकवण म्हणजे काव्य नव्हे, हें आम्हासहि पटतें; परंतु ही शिकवण देत असतांना कवीचें अंतःकरण ज्या ठिकाणीं उत्कटतेनें तळमळतें त्या ठिकाणीं प्रसंगोचित रसांचा परिपोष होतो व तिथेंच काव्य जन्मास येतें, त्या ठिकाणीं भाषा ओजवती व अर्थवती होते, कवीची अंतःशक्ति प्रेरक व

'श्री दासबोध हा काव्यग्रंथ नाहीं' असें इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात; परंतु श्रीदासबोधांत काव्य नाहीं असें त्यांनी कोठेंहि म्हटलेलें नाहीं. दासबोधांतील काव्यमय सर्व भाग इथें उद्धृत करणें शक्य नाहीं. शिवाय तें काम श्री. शं. श्री. देव यांनीं आपल्या 'श्रीमत् दासबोधाचे कर्ते दुसरे कोण असणार' या प्रबंधांत ११ व्या पानावर केलेलें आहे. त्याचप्रमाणें प्रो. रा. द. रानडे व श्री. अनंतदास रामदासी यांनीं आपापल्या संग्रहांत त्यांचा समावेश केलेला आहे. तथापि त्यांपैकीं कांहीं अत्यंत सुंदर उतारे देण्याचा मोह आम्हांस आवरत नाहीं. अगदीं पहिल्या दशकांत गणनायकाचें वर्णन करतांना ते म्हणतात—

तुझिये कृपेचेनि बळें । वितुळती भ्रांतीचीं पडळें ।
आणी विश्वभक्षक काळें । दास्यत्व कीजे ॥ १–२–३
जयाचें आठवितां ध्यान । वाटे परम समाधान ।
नेत्रीं रिघोनियां मन । पांगुळे सर्वांगीं ॥ ७
नाना सुगंध परिमळें । थबथबा गळती गंडस्थळें ।
तेथें आलीं षट्पदकुळें । झुंकार शब्दें ॥ ११

हा सबंधच समास काव्यमय आहे. त्याचप्रमाणें 'शारदामाते'चें वर्णनहि सुंदर आहे.

जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार ।
जे शब्दाचे अभ्यांतर । उकलून दावी ॥ १–३–२
जे लावण्यस्वरूपाची शोभा । जे परब्रह्मसूर्याची प्रभा ।
जे शब्दीं वदोनि उभा । संसार नासी ॥ ९

यांत काव्य नाहीं असें कोणीहि म्हणणार नाहीं.

तिसऱ्या दशकांत त्यांनीं स्वगुणपरीक्षेचें जें सविस्तर विवेचन केलें आहे तें वाचकांनीं मूळांतूनच वाचावें म्हणजे तें किती रसभरित व सत्य आहे हें कळेल. तत्कालीन समाजाचें रेखाटलेलें चित्र आजच्याहि समाजास किती उत्तम तऱ्हेनें लागू पडतें हें पाहिलें, म्हणजे श्रीसमर्थांच्या अचाट सामर्थ्याविषयीं अचंबा वाटतो. परवां आमचे हातांतील दासबोध सहज पहावयास घेतलेल्या एका स्त्रीनें तो सहज उघडला; तों

लेकुरें उदंड जालीं । तों ते लक्ष्मी निघोनि गेली ।३-४-१

हें वचन दृष्टीस पडतांच, तिचे डोळ्यांस टचकन् पाणी आल्याचें आम्हीं पाहिलें.

या एकाच उदाहरणावरून हा दशक किती हृदयस्पर्शी आहे हें कळेल.

आपल्याला जो सिद्धांत प्रतिपादन करावयाचा आहे त्याच्या पुष्ट्यर्थ श्री-समर्थांनी ठिकठिकाणीं दृष्टांत दिले आहेत. हे सर्व दृष्टांत किती समर्पक आहेत हें खालील उताऱ्यावरून कळून येईल.

जैसीं समर्थाचीं लेकुरें । नाना आळंकारीं सुंदरें ।
मूळ पुरुषाचेनि द्वारें । तैसें करी ॥ ७–१–४
नमू ऐशिया गणेंद्रा । विद्याप्रकाशें पूर्णचंद्रा
जयाचेनि बोधसमुद्रा । भरितें दाटे वळें ॥ ५

किंवा

मुमुक्षु चातकीं सुस्वर । करुणा पाहिजे अंबर ।
बोले कृपेचा जळधर । साधकांवरी ॥ १४

या ठिकाणीं श्रीज्ञानेश्वराची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. आठव्या दशकातील नवव्या समासात

अंतरीं गेलिया अमृत । बाह्य काया लखलखित ॥
अंतर स्थिति बाणलां संत । लक्षणें कैसीं ॥ ८–९–१

किंवा नवव्या दशकातील सातव्या समासातील

वाळलें काष्ठ हिरवळेना । पडिलें फळ तें पुन्हा लागेना ।
तैसें पडिलें शरीर येना । जन्मास मागुतें ॥ ९–७–२९

किंवा चौदाव्या दशकातील ' कवित्वशब्दसुमनमाळा ' हें विवेचन अथवा विसाव्या दशकातील ' विधि प्रपंचतरु वाढला ' वगैरे वर्णन अत्यंत सरस आहे. श्रीदासबोधात काव्य आहे की नाहीं हें दाखविण्यासाठीं त्यातीलच सविस्तर अवतरणें देऊन एवढा विस्तार केला. आता श्रीसमर्थांच्या इतर ग्रंथाचें व इतर काव्यगुणाचें समालोचन करून आवरतें घेऊ.

श्रीसमर्थांच्या काव्याचा साठा फार मोठा होता. त्यांनीं रामायणातील सुंदरकांड व युद्धकांड हीं दोन प्रकरणें रसभरितपणें लिहिलेलीं आहेत. या प्रकरणातून त्यांनीं वीररसाचा उत्कृष्ट उठाव केलेला आहे. श्री. देव यांनीं 'श्रीरामदासांची कविता ' या पुस्तकाच्या प्रथम खंडास लिहिलेल्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें श्रीसमर्थांनीं रामायणाचीं हीं दोन प्रकरणें सहेतुक लिहिलीं असावींत असें आम्हांसहि वाटतें. या प्रकरणाकडे ऐहिक किंवा पारमार्थिक अशा कोणत्याहि

दृष्टीनें पाहिलें, तरी तीं कांहींतरी गूढध्वनिगर्भ वाटतात. या दृष्टीनें विचार केल्यास रामायणाचे हे भाग प्रतीकात्मक असावेत असें वाटतें. भोंवतालची परिस्थिति जनतेला जनतेच्याच भावनेनें पटवून देण्यासाठीं, त्यांनीं हींच प्रकरणें निवडण्याची जी युक्ति योजिली त्यात त्यांची चतुराई दिसून येते. 'बंधविमोचन' हें श्रीसमर्थांचें ध्येय होतें व त्यांनीं या प्रकरणाच्या द्वारा तें साधलें आहे. मराठी वाङ्मयात या दृष्टीनें लिहिलेलीं हीं प्रकरणें अपूर्व आहेत.

श्रीसमर्थांच्या स्फुट ओव्यांमध्यें जरी परमार्थाचें विवेचन असलें तरी तें श्रीरामाचे उपासक असल्यानें आपल्या उपास्यदेवतेविषयी त्याना वाटलेली तळमळ त्यात उत्कटतेनें भरून राहिली आहे.

राम आहे जनीं राम आहे वनीं ।
राम निरंजनीं सारीखाची ॥ स्फु. ओ. ८–२४

अशा त्यांचा दृढ विश्वास आहे.

जात आहे वय वेचोनीयां माझें ।
रूप रामा तुझें दिसेना कीं ॥ स्फु. ओ. ९–१३

दिसेना कीं रूप सांवळें सुंदर । कासे पीतांबर फासीयेला ॥ १४

या व येथून पुढें आलेल्या ओव्यात ( अभंगात ? ) वर्णनाचें सौंदर्य व भावनेची उत्कटता दिसून येते. या प्रकरणात आलेलीं श्रीरामाचीं विविध वर्णनें अत्यंत काव्यमय व रसाळ आहेत.

पुढील ' षड्रिपु, पंचीकरण, चतुर्थमान, मानपंचक, ' हीं प्रकरणें तत्त्वज्ञानात्मक असून, त्यात आपलें म्हणणें पटविण्यासाठीं ठिकठिकाणीं काव्याचा आश्रय करण्यात आलेला आहे. मधून मधून आपणास

कर्दळी थोर कर्पूरें । गर्भपत्रेंच केलकीं ।
गुणेंचि मान्य या वल्ली । गुण सर्वत्र पाहिजे ॥ च. मा. ४-१

अशीं गारव्याचीं स्थळें आढळतात. तथापि यात तत्त्वज्ञानाचाच भाग विशेष असलेला आढळतो. पण तें विषयाच्या दृष्टीनें युक्तच आहे.

पुढील ' स्फुट प्रकरणें ' मात्र अत्यंत सरस आहेत. वर्णनाची रेलचेल व शब्दांचें सौंदर्य या प्रकरणात आपणास उत्तम पहावयास मिळतें. त्याचप्रमाणें नादानुरूप शब्दयोजनाहि या भागात विशेषत्वानें प्रत्ययास येते.

गिरीचे मस्तकीं गंगा । तेथुनि चालली बळें ।

घवाना लोटल्या धारा । घनाचा तोये आदळे ॥ स्फु. प्र. ३२-१
गर्जतो मेघ तो सिंधु । ध्वनिकल्लोळ ऊठीला ।
कड्यासी आदळे धारा । वात-आवर्त होतसे ॥ २
तुषार उठती रेणु । दुसरें रज मातले ।
वातमिश्रीत ते रेणु । सीतमिश्रीत धुकटें ॥ ३
दराच तुटला मोठा । झाडखंडें परोपरी । ४
विश्रांती वाटतें तेथें । जावया पुण्य पाहिजे । ८
प्रचीत पाहातां मोठी । जन्म धन्याचि होतसे । ९

हा सविस्तर उतारा वाचला म्हणजे आम्ही शहरात राहणारे किती अभागी आहों हें पटतें. खरोखरीच अशा ठिकाणीं जाऊन ' प्रचीत ' घेण्यास भाग्यच ( पुण्य ) पाहिजे. उतारे देण्याचा मोह आम्हास अनावर होत आहे, परंतु वाचकांनीं हीं प्रकरणें मूळांतूनच वाचावीं असें आम्ही संयमशीलतेनें म्हणतों. या पुस्तकांतील शेवटचें ' स्फुट श्लोक ' हें प्रकरण याहून सरस आहे. विशेषतः यांत वृत्ताची व शब्दमाधुर्याची मौज आहे.

अभंग भार भंगले । कितेक वीर रंगले ।
शरीर रक्त रंगलें । विरंगलें विरंगलें ॥ स्फु. श्लो. ५८-७९
किंवा
रसाळ उत्तमा फिळा । ध्वनी कळोळ कोकिळा ।
थिरावली मनोगती । मधुर उंच कुंजती ॥ स्फु. श्लो. ५९-१२

त्याचारख्या कितीतरी हृदयंगम व मधुर ओळी आपणास आढळतात.

राहता राहिलीं श्रीसमर्थांचीं करुणाष्टकें, पदें, पदावतें वगैरे. परंतु काव्य-दृष्टीनें हीं इतकीं उत्कटभावगर्भ, करुण, व भक्तिरसानें थबथबलेलीं आहेत कीं, त्यांच्या रसवत्तेची आम्ही निराळी कैफियत मांडण्याची जरुरी नाहीं. त्यांची अलोट लोकप्रियता हीच त्यांच्या अखंड गुणाची साक्ष आहे. 'मनाच्या श्लोकांनीं' किती तरी जीवांना समाधान दिलेलें आहे. धांव रे रामराया अशी किती तरी प्रापंचिकांनीं श्रीसमर्थांच्या वाणीनें श्रीरामचंद्रप्रभूस हाक मारलेली आहे. किती तरी अनुतप्त मनांनीं

अनुदिन अनुतापें तापलों देवराया । करुणाष्टक १४७-१

अशी पळवळ्यानें आपली कहाणी सांगितली आहे. बळ कमावणाऱ्या किती तरी

उपासकांनीं भीमरूपाची श्रीसमर्थांच्या विविध स्तोत्रांनीं उपासना केलेली आहे. त्यांचीं पदें रागदारींत म्हणण्यानें मकिरस उत्पन्न होतो हें त्यांच्या गाण्यांतील पदांवरून व त्यांवर निर्दिष्ट केलेल्या रागदारीच्या चालींवरून दिसून येते. त्यांच्या आरत्या तर प्रसिद्धच आहेत. याच ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ह. भ. प. श्री. पांगारकर यांनीं निर्देशिलेले भाग खरोखरीच वाचनीय आहेत. त्यापैकीं लोकस्थिति दर्शविणारें पुढील पद प्रत्येकानें जरूर वाचावें.

जन बुडाले बुडाले। पोटेंविण गेले।
बहु कष्टले कष्टले। किती एक मेले।
विसा लोकांत लोकांत एकची साहिले।
तेणें उदंड उदंड दुःखचि साहिले॥ ध्रु० ॥...
देश नासला नासला उठे वोचि कुटी।
पिकें होतांचि होतांचि होते लुटालुटी।
काळाकारितां जिवलगा जाली तुटातुटी।
अवघ्या कुटुंबा होते फुटाफुटी॥ ३ ॥...
सुडकें पटकर पटकर न मिळे पांघराया।
शक्ति नाहीं रे नाहीं रे कोपट कराया।
घाट फुटेना फुटेना विदेशी भराया।
अवघे बैसलीं बैसलीं बैसलीं मराया॥ ८ ॥...
दास म्हणे रे भगवंता किती पाहसी सत्व।
काय वांचोनि वांचोनि ने परतें जीवित्व।
किती धरावें धरावें धरावें ममत्व।
जालीं शरीरें शरीरें शरीरें निःसत्व॥ २० ॥

या पदात श्रीसमर्थांच्या अंतःकरणाची तळमळ अत्यंत उत्कटतेनें व्यक्त झाली आहे. यांतील पुनरुक्ती किती गोड व परिणामकारी आहे! अशीं किती तरी 'पदें, पदांतरें व भारुडें' या संग्रहांत आढळतात. हें सर्व लिखाण ओजस्वी व काव्यमय आहे.

जोरदार भाषा हें समर्थांचें वैशिष्ट्य आहे. त्यांची शब्दसंपत्ति अमोघ व अपार आहे. मराठी वाङ्मयांत इतकें मराठी वळणाचें शब्दवैचित्र्य इतरांच्या ठिकाणीं क्वचितच आढळतें. याखेरीज त्यांची अनुभवसिद्धता, सांसारिक उदाहरणें

देण्याची हातोटी, व्युत्पन्नता व कार्यप्रेरकता हीं अपूर्व व लोकोत्तर आहेत. त्यांचें काव्य 'यशसेऽर्थकृते' नव्हतें. तें परमार्थाकरितां होतें व आहे; आणि त्याच्या परमार्थांतच स्वराज्याची कल्पना आहे. त्यांनीं महाराष्ट्राला पुरुषार्थाची शिकवण दिली व इथें महाराष्ट्रधर्माची स्थापना केली. यत्न, आशावाद, कर्मयोग ही त्यांची शिकवण आहे व तिच्यात, मेलेल्या किंवा मृतप्राय झालेल्या समाजाला जिवंत करण्याचें सामर्थ्य आहे; तिच्यात अखंड दळमळ आहे. अशा त्याच्या काव्याला नव्या पिढीनें पारखें होता कामा नये. आज जिकडे तिकडे बेकारी, किंकर्तव्यमूढता पसरली आहे; जनतेच्या मनावर निराशेचें वातावरण पसरलें आहे; लोक दिङ्मूढ होत चालले आहेत, जिकडे पहावें तिकडे ध्येयशून्य अवकळा पसरली आहे; मनें निस्तेज व दुर्बळ झालीं आहेत; अशा वेळीं समर्थांचा ओजस्वी संदेश मिळण्याची जरुरी आहे. सज्जनगड व जांब येथून तो यापूर्वीच आलेला आहे व यापुढें तो समर्थ वाग्देवता मंदिरातून बाहेर येऊन अखिल भारताला

घर्धिरा धीर्धरा तकवा। हडबडूं गडबडूं नका।

काळ देखोनि वर्तावें। सांडावें भय पोटींचें॥ स्फु. प्र. ४५-२

हीं धीर-वचनें देणार आहे; तीं ऐकून तरुण पिढी जागृत होवो व त्याच्या काव्यानें कार्यप्रवण होवो असें आम्ही या मंगलप्रसंगीं म्हणतों.

सोलापूर, ता. २१ मे १९३५



( ६ )

# नवविधा भक्ति

[ लेखक— श्री. द. गो. काळे, बी. ए., पुणें ]

आपल्या सनातन धर्माच्या तत्वाप्रमाणें मानवानें आपलें ईश्वरत्व ओळखणें व स्वानुभवानें जाणणें, हें त्याचें अंतिम ध्येय समजलें आहे. सर्व सृष्टिरचना, सर्व सृष्टिनियम या तत्त्वास परिपोषक असेच विधात्यानें बनविले आहेत, असें आपलें तत्त्वज्ञान प्रतिपादन करितें. जगातील वस्तुजात त्या मूलाधार तत्त्वापासून सदा अभिन्न आहे अशी शास्त्राची शिकवण आहे. परंतु प्रत्यक्ष जें आज आपल्या पंचेंद्रियांच्या साहाय्यानें सृष्टीचें निरीक्षण आपणास करता येतें व मनाच्या चिकित्सावृत्तीच्या साहाय्यानें त्या निरीक्षणातून जो बाह्य सृष्टीच्या व्यवहाराचा बोध आपण घेऊं शकतों, त्यावरून प्रत्यक्ष प्रत्यय तर असा येतो कीं, या सृष्टि-रचनेंत भिन्नत्व हेंच वस्तुजाताचें वैशिष्ट्य आहे. ही प्रत्यक्ष आणि तात्त्विक यांतील विसंगति समजावून सांगणारे असें प्रतिपादन करितात कीं, आपणा सर्वांचें मूळ जरी एकरूपत्वात, अभिन्नत्वात असलें, तरी तें आपलें सर्वगुणत्व जगाच्या रहा-टींत प्रकट होतांना जितकीं अधिक जडावरणें धारण करितें तितकी त्याची सर्व-गुणत्व प्रकट करण्याची शक्ति कमी कमी होऊन वैशिष्ट्य वाढतें. म्हणजे एका अर्थानें या जड सृष्टींत प्रत्ययास येणारें भिन्नत्वच सर्वांच्या एकत्वाचें प्रत्यंतर होय. प्रत्येकजण आपापल्या वैशिष्ट्याची उपासना करून जसजसा पूर्णत्वास जात जातो, तसतसें त्याला इतरांच्या वैशिष्ट्यातील महत्त्व पटूं लागतें व शेवटीं अशी स्थिति येते कीं,

तो गे तो चि तो राम सर्वत्र पाहे ॥ २००

अशा स्वप्रत्यय मागण्याचा त्याला अधिकार येतो.

प्रकृतिभिन्नत्वानें ही आत्मप्रतीति अनुभवण्याचे मार्गेहि अनेक आहेत. अनिर्वाच्य ब्रह्म जेव्हां सृष्टिसंकल्पानें स्वतः स मर्यादित करून घेतें, तेव्हां तें सत्, चित् व आनंद या तीन तत्त्वांनीं आकलनीय होतें. त्यापासून उद्भवण्यास प्रत्येक जीवात्माही या तिन्ही धर्मांनींच सजीव व्यक्त होऊं शकतो. इतकेंच नव्हे, तर या तिन्ही धर्मांपैकीं सर्वच समतोल राखणें हा जसा एक मार्ग तसेंच यापैकीं प्रत्येकाचें कमीअधिक प्रमाणामुळें मानवी विकासाचे आणखी सहा प्रकार संभवतात. व्यवहारात हें सच्चिदानंदत्व इच्छा, ज्ञान व क्रिया या तीन शक्तिद्वारें प्रकट होत असताना मनुष्ययोनींत तें पुढील स्वभावधर्मांत आढळतें—

| अंतिम वृत्ति | स्वभाव व धर्म | मार्ग | प्रधान शक्ति | दुय्यम शक्ति | गौण शक्ति |
|---|---|---|---|---|---|
| संगत्याग | राजा | कर्म | इच्छा | ज्ञान | क्रिया |
| निवेदन | ज्ञाता | उपासना | ज्ञान | इच्छा | क्रिया |
| विदेही | लोकसंग्रही | ज्ञान | क्रिया | ज्ञान | इच्छा |
| सहल | शास्त्रज्ञ | सिद्धांत | ज्ञान | क्रिया | इच्छा |
| उन्मति | भक्त | भक्ति | क्रिया | इच्छा | ज्ञान |
| विज्ञान | विधानज्ञ | वैराग्य | इच्छा | क्रिया | ज्ञान |
| अलिप्त | कलावंत | योग | तिन्ही धर्मांना समतोल ठेवणारा. | | |

सर्व सृष्टींत प्रत्ययास येणारें सततविधत्व याच तत्त्वावर आधारलें आहे. हें तत्त्व समजून जर जगाचा कोलाहल आपण पाहूं लागलों तर त्यात सुसंगति कशी आहे हें आपणास कळूं शकेल. प्रत्येकाचा दृष्टिकोन भिन्न असूनही बरोबर कसा असूं शकेल याची कल्पना येईल. सर्वांचें एकत्व पाहण्याचा मार्ग सोपा होईल.

तूर्त आपणांस या सात मार्गांपैकीं एकाच मार्गाचा विचार करावयाचा आहे. तो म्हणजे भक्तिमार्ग होय. भक्त स्वभावतः क्रियाप्रधान होय. बाह्य सृष्टींतील ईशतत्त्व शोधून त्याशीं अभिन्नपणें एकरूप होणें हें त्याचें अंतिम साध्य असतें. समर्थांच्या मतें हा सोपा मार्ग आहे. तत्पर्पा, आत्मयज्ञ, तत्त्वज्ञानसंपादन, यज्ञविधि इत्यादि आत्मप्रातीचे जे अन्य मार्ग आहेत, ते बहुजनसमाजास अवघड पडणें समजनीय आहे. तसा हा नाहीं. श्रीसमर्थांनीं भक्ताची व्याख्याही नकारदर्शी केली आहे ती जोरदार आहे. 'जो ईश्वराहून विभक्त नव्हे तो भक्त'

अशी ती आहे. संपूर्णपणें ईश्वरानुवर्ती ईश्वररूप होणें हें ते मानवी जीविताचें सार्थक म्हणून प्रतिपादतात, आणि त्याचा मार्ग म्हणून नवविधा भक्ति कशी आचरावी तें दासबोधाच्या ४ थ्या दशकात विशद करितात.

तथापि त्यांचे भक्तिमहात्म्यासंबंधींचे सर्व विचार त्यांत समाविष्ट नाहींत; तो ग्रंथ सामान्य माणसाला आकलन होईल, सन्मार्गाची गोडी लागेल या हेतूनेंच लिहिला आहे, असें त्याच ग्रंथातील कांहीं वचनावरून दिसतें. त्रिविध तापें पोळून जो विवेकवैराग्याच्या कासेस लागला त्या अधिकाऱ्याला याच नवविधा भक्तीसंबंधीं कांहीं निराळेंच सांगणें आहे; पण तें संतसंगातच कळतें, कोठें कोणीं असलें ज्ञान लिखाणांत ठेवीत नाहीं, त्यात आत्मप्रचीतीचा भाग विशेष आहे, असा उल्लेख दासबोधातच चवथ्या दशकात चवथी भक्ति वर्णन करताना समर्थ करतात, व पुढें पत्येक समासांत अशाच प्रकारें सद्‌गुरुभक्ति करावी असा मोघम उल्लेख करतात. या लेखांत या मोघम उल्लेखाचेंच तेवढें विशदीकरण यथामति करावें असा मानस आहे.

( १ ) श्रवणभक्ति

समर्थांनीं या भक्तिमार्गाशिवाय (१) कर्ममार्ग, (२) उपासनामार्ग, (३) ज्ञानमार्ग, (४) सिद्धांतमार्ग, (५) योगमार्ग व (६) वैराग्यमार्ग असे सहा मार्ग सांगितले ( द. ४ स. १ ओ. ८ ). श्रवणभक्तींत ज्या ज्या प्रकारांनीं मनुष्यजन्माचें सार्थक करता येतें असें जगातील अनुभव्यांचें म्हणणें आहे तें सर्व ऐकणें, माहितीचा संग्रह करणें, मनाचें विचारभांडार समृद्ध करणें हें प्रमुख कार्य प्रथम करावें, असें समर्थांचें म्हणणें आहे. आजकाल पुस्तकांच्या काळांत ही श्रवणभक्ति अधिकच सुलभ झाली आहे. अधिकारी वक्ते आपण म्हणूं तेव्हा आपले वेंचक विचार आपणांपुढें मांडण्यास पुस्तकरूपानें सदा हात जोडून तयार असतात, व आपणांस नकोसे वाटताच त्यांना बाजूस सारलें तरी त्याचा विषाद न मानता पुन्हा आपल्या आज्ञेची वाट पहात उभेहि राहतात. आपली जिज्ञासा किती तीव्र असेल, आपण या सज्जनांना आपल्या आयुष्यांतील किती काल देऊं हें सर्वस्वीं आपणा स्वतःवर अवलंबून आहे.

अशा अभ्यासाचा हेतु केवळ माहितीचा संग्रह नसून

विभक्ती सांडून भक्तीचें। मूळ शोधावें ॥ ४।१।२३

हा असावा असें समर्थ बजावतात. केवळ माहितीचा संग्रह पुरेसा नाहीं. त्या

माहितीतून

सार शोधून घ्यावें । असार तें जाणोनि त्यागावें । २९

अशा सारासार विवेक करून आपल्या मार्गाचा निश्चय करणें हें प्रथमा भक्तीचें प्रमुख कार्य आहे. अशा पायावर, तर्कशुद्ध विचारावर, उभारलेली भक्ति डोळस असते. या विवेकाच्या मजबुतीशिवाय उभारलेली भक्तिमंदिरें कोसळण्याचा संभव असतो, चिरंतन सत्याचें ओझें संभाळण्यास तीं असमर्थ होतात. म्हणून प्रथम पायरी ही कीं, श्रवणानें म्हणजे संग्रहानें, मननानें व विवेकानें आपला मार्ग निश्चित करणें. या निश्चयाच्या दृढीतूनच, बळांतूनच दुसरी पायरी दिसूं लागते.

## ( २ ) कीर्तनभक्ति

श्राव्य विषयाशीं एकरूप होऊन, व त्यातील निरनिराळ्या विषयांचें सार वेंवडें चित्तांत ठेवून ज्यानें जगातील सर्व माहात्म्याचें म्हणणें ऐकलें, त्याला स्वतःच्या निश्चयानें ईश्वरी संकेत उमजूं लागतो. इतकेंच नव्हे, तर या संकेताचा त्याच्या विचारावरहि परिणाम होऊन त्या संकेताचें सत्यत्व इतरांसहि पटावें, त्याप्रमाणें वागण्याचें इतरानांहि आवडूं लागावें, अशा तऱ्हेनें तो शक्य तेव्हां व शक्य तेथें आपले विचार इतरापुढें मांडण्यांत औचित्य मानतो. ती कीर्तनभक्ति होय.

आपुलिया सुखस्वार्थी । केलीच करावी हरिकिया । ४-२-४

अशी त्याची वृत्ति होते. त्याला

मनापासून आवडी । जीवापासून अत्यंत गोडी ।

लागून

सदा सर्वदा तांतडी । हरिकीर्तनाची । ४-२-६

तो धरतो. त्या कीर्तनाचा हेतु

येश कीर्ति प्रताप महिमा । आवडीं वर्णाया परमात्मा । ४-२-९

निर्गुण प्रसंगें वाढवावी । अध्यात्मविद्या ॥ ४-२-१७

करावें वैराग्यरक्षण । रक्षावें ज्ञानाचें लक्षण ॥ ४-२-२१

अशा प्रकारचा असतो.

कीर्तन ऐकतां संदेह पडे । सत्यसमाधान तें उडे ।

नीति न्यायसाधन मोडे । ऐसें न बोलावें ॥ ४-२-२२

ही मर्यादा पाळणें त्यास मनापासून आवडतें. समर्थ म्हणतात, अशा कीर्तनानें वाचा पवित्र होते, प्राणी सुशील बनतो, अल्पमता जाते, जीवितकार्याचा निश्चय

सापडतो, संदेह नाहींसे होतात. आधुनिक यांत्रिक काळात ही कीर्तनभक्ति अनेक साधनांनीं करता येऊं लागली आहे लेख, पुस्तकें, प्रवचनें, व्याख्यानें, रेडिओ-टॉक्स् वगैरे अनेक प्रकार या भक्तीच्या सेवेस हजर आहेत.

भक्ताला श्रवणभक्तींत आपल्या मनाचें सुकाणू गवसलें, कीर्तनभक्तींत त्या सुकाणूच्या साहाय्यानें आपली जीवितनौका कोणत्या धोरणानें हाकारणें श्रेयस्कर आहे, हा स्वत केलेला निश्चय इतरांपुढें मांडता मांडता त्या निश्चयाचा निदिध्यास त्याचें आचरण बदलूं लागला आणि त्या आचरणात पहिला फरक म्हणजे विष्णुस्मरण हा होय.

## ( ३ ) विष्णुस्मरणभक्ति

जगाला कोणी चालक आहे, तो सच्चिदानंदरूप आहे, जगाच्या राहटींत त्याची प्रतीति सर्वत्र घेता येते, असा श्रवणभक्तीनें पटलेला सिद्धांत, कीर्तनात प्रतिपादलेला सिद्धांत, आचरणात आणताना त्या जगच्चालक ब्रह्माचें, विष्णूचें, आधीं मुद्दाम केलेलें स्मरणच शेवटीं सवईनें निरंतर स्मरणात परिणत होतें तिसऱ्या भक्तीचें निरूपण करतांना हें स्मरण म्हणजे नामस्मरण, नामजप, अशा अर्थाचें विवरण समर्थांनीं ३ ऱ्या समासात केलें आहे.

नामस्मरणें पावावें । समाधान ॥ ४–३–७
नामस्मरण सर्वकाळीं । करीत जावें ॥ ४–३–३–२
नामस्मरणें पाविजेती । उत्तम पदें ॥ ४–३–११
नाम स्मरता पुण्यश्लोक । होईजे स्वयें ॥ ४–३–२०

असा नाममहिमा श्रीसमर्थांनीं गाइला आहे.

कित्येकाचा याला आक्षेप असा कीं, नुसतें देवाचें नाव घेण्यानें मनुष्यात सर्व प्रकारची सुधारणा होईल, हें शास्त्रशुद्ध नाहीं, तर्कशुद्ध नाहीं व अनुभवसिद्ध तर नाहींच नाहीं. पण कोणत्याहि बाबतींत अतिरेक होऊं न देतां जर आपण या प्रश्नाकडे पाहूं लागलों तर आपणास असें दिसून येईल कीं शब्द, नाद व त्यापासून उद्भवणाऱ्या लहरी यांचें महत्त्व कमी नसतें. सृष्टीची रचना शब्दब्रह्मापासून, नादब्रह्मापासून उद्भवली असें प्रतिपादणारा जसा एक पुराण मार्ग आहे, तसाच आधुनिक शास्त्रही या स्थूल जगाची उत्पत्ति आंदोलनमय आहे असें प्रतिपादन करतो. नामजपानें, विशेषत ईश्वराचा आपणास पूज्य वाटणारा विशिष्ट गुण दर्शविणाऱ्या नामाच्या जपानें जी आंदोलनें आपण उत्पन्न करतों त्यायोगें

स्वतः आपणांवर व आपणाभोंवतींच्या बाह्म सृष्टीवर असा परिणाम होत असतो कीं, तो गुण प्रकट करण्यास आपल्याला अधिकाधिक सोपें जातें. याच नामजपाच्या जोडीला जर नामस्मरणाच्या मानसिक शक्तीची जोड आपण दिली, तर ॐ नमः शिवाय ! ॐ नमो भगवते वासुदेवाय ! तत्त्वऽमसि । इत्यादि महावाक्यांचें मनन आपल्या श्रवण व कीर्तन भक्तीनें बाणलेल्या वृत्तीला जोम आणतें. ही तिसरी भक्ति स्मरणात्मक आहे. आपल्या आचरणात शरीरभावना आणि मन यांच्या आधीन होऊन आपण आपलें विवेकानें व विचारानें ठरविलेलें ध्येय विसरून वारंवार जें बालिश वर्तन करतों, त्या सर्वंई सुटून विष्णुकार्य हेंच सदा आपल्या हातून घडावें याकरिता वारंवार स्मरण करणें व राखणें हीच खरी तिसरी भक्ति होय.

हें विष्णुकार्याचें स्मरण आरंभीं आरंभीं मिथ्याचरण झाल्यानंतर आपणास होतें, पण आपल्या चिकाटीनें स्मरणाचा अभ्यास सोडला नाहीं तर हें स्मरण मिथ्याचरण सुरू झाल्यावर परंतु संपण्यापूर्वी आपणास जागें करूं लागेल. त्यापुढील पायरी म्हणजे मिथ्याचारास आरंभ करण्यापूर्वीच विष्णुकार्याविरुद्ध हें वर्तन न करावें असें आपणास स्मरण होऊन आपण मिथ्याचार घडूं देत नाहीं, व शेवटीं सदा विष्णुकार्य करण्याचीच सवय आपणास जडते. असें विष्णुकार्य करण्याची पहिली पायरी तेंच

(४) पादसेवनभक्ति

होय.

कायावाचामनोभावें । सद्गुरूचे पाय सेवावे ।
सद्गतिकारणें ॥ ४–४–२

ही पादसेवनभक्ति.

सकळ कांहीं पादसेवनें । उमजों लागे ॥ ४–४–९
चौथे भक्तीचे प्रसंगें । गौप्य तें प्रगटे ॥ ४–४–११

हा या भक्तीचा महिमा समर्थ गातात. येथपर्यंत येणारानें स्वप्रयत्न पुष्कळ केला, अभ्यास पुष्कळ केला, पण

अभ्यासें कांहीं गुरुगम्यास । पाविजेत नाहीं ॥ ४–४–१९

परंतु या समासांतील २४ व्या ओवींत समर्थ स्पष्ट म्हणतात कीं,

हें प्रवृत्तीचें बोलणें । बोलिलें रक्षाया कारणें ।

परंतु सद्गुरुपाय सेवणें । या नांव पादसेवन ॥

यापुढील तिन्ही पायऱ्यांचें वर्णन करतानाहि समर्थ हें प्रवृत्तीचेंच बोलणें दासबोधात ग्रथित करीत आहेत, असें आग्रहास वाटतें.

ऐसेंचि सद्गुरूचें भजन । करून असावें अनन्य । ४-५-३०

जेथें दिसती विशेष गुण । ते सद्गुरूचे अधिष्ठान । ४-६-९

अंतरें निवती सकळांचीं । ऐसें वदावें ॥ ४-७-२६

ऐसें दास्य करावे देवाचें । येणेंचि प्रकारें सद्गुरूचें ।

प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें । करित जावें ॥ ४-७-२८

इत्यादि उल्लेखावरून दासबोधात उपलब्ध असलेली या नवविधा भक्तीची मांडणी प्रवृत्तिपथावरल्याकरिता असून निवृत्तीकडे वळलेल्याकरितां याहून उच्च दर्जाची शिकवण दिली जात असे, असें दिसतें.

आज आपले जगात प्रवृत्तिमार्गावर जितके जीव आहेत, त्यांशीं निवृत्तिमार्गावरील जीवांची तुलना केल्यास "समुद्रात खसखस" म्हणतात तसें तें प्रमाण दिसेल. सर्वच जीव जरी ईश्वररूप असले तरी स्वत च्या ईश्वरत्वाचें ज्ञान प्रत्यक्षानुभवांत यावयासारखी त्यांची दशा येण्यास कित्येक युगें जावयास पाहिजेत. तदनंतर कदाचित् गुरुगम्य म्हणून निराळें उरणार नाहीं. परंतु तोंपर्यंत प्रवृत्तिमार्गी बहुजनास झेपेल असें ज्ञान प्रकट रीतीनें देणें व निवृत्तिमार्गी अल्पसंख्येस आपलें ध्येय गाठण्यास सोपें जावें अशा रीतीनें ज्ञान गुप्त विद्या म्हणून देणें अशी दुहेरी पद्धत जगातील ज्ञानी पाडीत आले आहेत, अशा सर्वत्र पुरावा मिळतो. हीच पद्धत श्रीसमर्थांनीं बहुजनांकरिता दासबोध लिहून व अधिकाऱ्याकरितां गुरुपरंपरा चालवून अमलात आणली असें दिसतें.

समर्थांसारख्या सद्गुरूंना दुसऱ्यांकडून पादसेवन, अर्चन, वंदन किंवा दास्य म्हणजे स्वत ची शरीरसेवा करून घेण्याची हौसहि नसते व सवडहि नसते जगाच्या धारणपोषणास, जगाच्या ज्ञानविकासास त्यांनीं स्वत स वाहून घेतलेलें असतें. ईश्वरेच्छेनुरूप जगाची उत्क्रांति व्हावी हीच त्यांची सदा खटपट असते. सर्वांना खऱ्या शाश्वत आनंदाचा लाभ व्हावा, हीच त्याना तळमळ लागलेली असते. तेव्हा ज्ञानपरंपरा, विवेकपरंपरा, इंद्रियनिग्रहपरंपरा, जीवैक्य प्रतीतिपरंपरा चालू ठेवण्याच्या त्यांच्या मतास जे सहाय्यक होतात, तेच आपले भक्त असें त्यांस वाटतें, आणि त्यांच्या या सत्कार्यांत यथाशक्ति भाग घेण्याची पराकाष्ठा

करणें हीच त्यांना प्रिय वाटणारी सेवा होय. *त्यांनीं अंगिकारलेलें सत्कार्य समजावून घेणें* हेंच त्यांचें पादसेवन, त्या कार्यांतील एखाद्या भागास कायावाचामनोभावें वाहून घेणें हेंच त्यांचें अर्चन, तें कार्य त्यांच्याप्रमाणेंच निर्हेतुकपणें करतां येणें हेंच त्यांचें वंदन, अशा निरिच्छ वृत्तीनें ज्याला त्यांच्या कार्याच्या गोडीची ओढ लागली असें पाहून ते स्वतः आपल्या कार्यांतील एखादा भाग सोंपविण्याचा बहुमान देतात, तें पार पाडणें हेंच त्यांचें दास्य. *या दृष्टीनें मोक्षगुरूचा* महिमा श्रीसमर्थांनीं वर्णिला आहे. तो शिष्याला जें हातीं धरतो तें त्याला मुक्त करण्याकरितां, आपल्या योग्यतेचें करण्याकरितां, त्यांतील हीनत्वभाव नाहींसा करण्याकरितां, त्याचा पूर्ण विकास होण्याकरितां. या दृष्टीनें गुरूचें, म्हणजेच ईश्वराचें पादसेवन, अर्चन व वंदन करण्याची पद्धत कशी असावी तें आपण पाहूं.

लक्षें जयासि लक्षावें । ध्यानें जयासि ध्यावें ।
तें गे तेंचि आपण व्हावें ।

अशी त्रिविधा प्रतीति आपणेस आरंभ पादसेवनापासून करावयाचा. जगचालनाचें तत्त्व जसें आपण श्रवणभक्तीनें आकलन केलें, कीर्तनभक्तीनें प्रतिपादलें, व विष्णुस्मरणानें आचरण्याची तयारी केली त्याचे पुढें जाऊन आतां या तत्त्वाचें सूत्र जगाच्या सर्व घडामोडींत ओळखतां येणें, त्याच्या पुरस्कारास पुढें येण्याचें सामर्थ्य कमविणें, तें जेथें दिसेल तेथें जगाच्या विरुद्ध मताची, जगाच्या तिरस्काराची, जगाच्या छळाची देखील पर्वा न करतां त्याचें स्वागत करण्यास तयार राहणें याला भगवंताचें पादसेवन म्हणणें शोभेल. त्याचा जगाविषयींचा संकल्प परिपूर्ण करण्यास त्याचें कार्य करणारीं माणसें निर्भयपणें पुढें आलीं पाहिजेत. पुष्कळांना हा संकल्प कळण्याइतकी त्यांची वाढ झाली नसल्यानें बहुजनसमाज अशा स्वाभाविक वळणाचा नसतो. आपल्या हेतूंचा विपर्यास करणारे आपल्यावरून जग पारखणारे आपले धाकटे भाऊच आपल्या निःस्वार्थीपणाला लबाडी समजत असतात. आपलाहि स्वार्थीपणा आपण पूर्ण जिंकलेला नसतो. त्यांच्यापेक्षां तो कमी असतो इतकेंच. परहितार्थ कार्य करावयास म्हणून निघावें तर तेंच स्वतःच्या संसाराइतकें आपणाला आपलेपणाच्या भावनेनें बांधून टाकतें व तें सोडणें, लोकहितास्तव सोडणें देखील, आपणास जड जाऊं लागतें. आपल्या चांगूलपणाचा नेहमीं जयच झाला पाहिजे या सर्वसामान्य विधानाची बजावणी करतांना आपण कार्यकारणभावाची वेडीवांकडी अदलाबदल करण्याचा

संभव असतो. खरें बोलणारा सत्यदर्शी होईल; पण तो उदार असल्याशिवाय, त्यानें आपल्या औदार्यानें सृष्टीच्या स्थूल सुरात भर घातली असल्याशिवाय, त्याला सृष्टिवैभवाचा हक्क पोंचावा असें वाटणें चुकीचें नव्हे काय? आपण आता ईश्वर कार्यानुवर्ती झालों, आतां आपणास कांहीं कमी पडूं नये अशी आपली अपेक्षा होते.

परंतु आपण आपलें लक्ष जर चळूं दिलें नाहीं, सर्व संसाराचें लक्ष तरी काय आहे याचा शोध सतत चालू ठेवला, ज्यांना या मार्गाचा अधिक अनुभव आहे अशांशीं परिचय वाढविला, तर आपणास असें कळूं लागतें कीं, ईश्वराशीं ऐक्य होण्यास, ईशकार्याशीं एकरूप होण्यास, सर्वांशीं एकरूप होता येणें अवश्य आहे. कोणाबद्दलही 'शत्रुबुद्धि' बाळगण्याचें कारण नाहीं; कोणत्याही गोष्टीचा अहंभाव, अल्पपणा धरणें चुकीचें आहे; अशा विचारसरणींतूनच अर्चनभक्ति उदय पावते.

## (५) अर्चनभक्ति

श्रीसमर्थांनीं दासबोधांतील दशक ४ समास ५ मध्यें जें अर्चनाचें वर्णन केलें आहे, तें खरें प्रवृत्तिपर आहे. तथापि त्यांतील २९ वी व ३० वी ओवी मननीय आहे—

काया वाचा आणी मनें । चित्तें वित्तें जीवें प्राणें ।
सद्भावें भगवंत अर्चनें । .........
करूनि असावें अनन्य । या नांव भगवद्भजन ।
पांचवी भक्ति ॥ ४-५-३०

निवृत्तिमार्गाचें अर्चन अंतर्यामाचें प्रामुख्यानें असतें. त्याचे संकल्प, त्याच्या आकांक्षा, त्याचें कार्य हीं यापुढें भगवंताचें अर्चन म्हणून, भगवंताच्या प्रेमास्तव भगवच्छंदानुवर्ती तो ठेवतो. चांगलें हें चांगल्याच्या आवडीकरितां तो करण्यास शिकतो. यथायथानें तो कमी डगमगू लागतो. सर्वभूतीं वसणाऱ्या परमेश्वराला अवनीतलावर प्रकट होण्यास अवसर मिळावा म्हणून तो आपल्या सर्व शक्ति जनहिताच्या कामास वाहून जनताजनार्दनाचें अर्चन करूं लागतो. त्यामुळें सर्वांतच वसणारें देवत्व हळू हळू त्याच्या प्रत्ययास अधिकाधिक येऊं लागतें. अर्थातच त्यामुळें त्यास

## (६) वंदनभक्ति

रचूं लागते. त्यास अतर्विकासानें सूक्ष्म शरीरांचेंही ज्ञान होऊं लागतें. देवदेव

त्याच्या धातुपाषाणमूर्तींच नव्हे तर प्रत्यक्ष चैतन्यमूर्तींचीही ओळख होते. सृष्टि ही अवचित संयोग पावणाऱ्या शक्तींच्या लहरी आधारावर चालली नसून तिच्यातील प्रत्येक नियमाची बजावणी करण्यास दृश्य व अदृश्य सृष्टींत किती तरी व्यक्ति अनेक योनींच्या व निरनिराळ्या सामर्थ्यांच्या, त्या एकाच ईश्वरी शक्तीनें चेतन पावल्यामुळें आधीं आपल्या स्वतःच्या व्यक्तिसुखार्थ व पुढें उन्नत झाल्यावर समष्टीच्या सुखार्थ सदा झटतांना त्यास दिसूं लागतात. त्या सर्व कार्याबद्दल आदर वाटूं लागतो. त्याचें वंदन प्रिय होतें. कारण या अनेकांचें वंदन तेंच त्या एकाचें वंदन असेंहि प्रत्ययास येतें.

पहिल्या तीन भक्तिपदांनीं सनिश्चय दृढ झाला, पुढील तीन पदांनीं सद्भाव उपजला, शेवटच्या तीन पदांनीं आपलेपणाशीं एकरूप व्हावयाचें. त्यांतील पहिल्या म्हणजे

## (७) दास्यभक्ती

विषयीं कांहीं सांगणें तेवढें लेखकाच्या कल्पनाशक्तीच्या तरी बळावर करता येण्यासारखें आहे, परंतु सख्य आणि आत्मनिवेदन हीं कशीं असू शकतील याची खरी कल्पनाही त्याला नाहीं, परंतु त्या दोन्ही भक्तींबद्दल श्रीसमर्थांनीं अधिक स्पष्ट खुलासा ८ व्या व ९ व्या समासात केला असल्यानें तें काम हलकें झालें आहे. ७ व्या समासात जें दास्य सांगितलें आहे तेंहि व्यावहारिक होय. निवृत्तिमार्गगामी भक्त

जें जें कांहीं पाहिजे । तें तें तत्कालचि देजे । ४–७–२०

आपलें असें निराळें कांहीं ठेवतच नाहीं.

अंतरें निवती सकळांचीं । ४–७–२६

असें बोलणें तो शिकलेला असतो. त्याला सर्वांची अंतरें कळूं लागलीं असतात म्हणूनच तीं दुखविणें त्याला शक्य उरत नाहीं. असें दास्य प्रत्यक्ष न घडलें तर मानसपूजेनें करावें असेंही श्रीसमर्थ प्रतिपादितात. कारण मानसानें केलेलें चिंतन हेंहि इतरांना सन्मार्गगामी करण्याचें एक उत्कृष्ट साधन आहे हें त्यांना गायत्रीपुरश्चरणानें प्रत्ययास आलें असेल. एकांतात तपश्चर्या करणाऱ्या विभूतींनीं जें विचारसामर्थ्य उत्पन्न करावें, त्याचे बळावर राजांचा कारभार व प्रजेचें स्वास्थ्य आणि चारित्र्य सुखकर होतात असा पूर्वीच्या राजांचाहि अनुभव अनेक ग्रंथांत नमूद आहे. तेंहि ईश्वराचें दास्य करणेंच होय. ईश्वरी कार्यांत प्रत्यक्ष साहाय्य करण्याची पात्रता येऊन सुरू झाली. त्यामुळेंच देवाशीं सख्य कर-

ण्याची योग्यता आली.

### ( ८ ) सख्यभक्ति

करावयास काय करावें तें समर्थ पुढील शब्दात सांगतात —

प्रेम प्रीतीनें बाधावें । ४-८-२
देवास जयाची अत्यंत प्रीती । आपण वर्तावें तेणें रीतीं । ४-८-३
देवाच्या सख्यत्वाकारणें । आपलें सौख्य सोडून देणें ।
अनन्य भावें जीवें प्राणें । शरीर तेंहि वेचावें ॥ ४-८-६
देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसीं तुटी ।
सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तोंहि वेचावा ॥ ४-८-८

हें सख्य म्हणजे आपल्या वर्तनाचा पडसाद आहे, तें सर्व आपणा हातीं आहे हें यांतील रहस्य आहे.

देवाचें जें मनोगत । तेंचि आपुलें उचित । ४-८-२२
देवाचे इच्छेनें वर्तावें । देव करील तें मानावें । ४-८-२३

अशा रीतीनें केलेलें

सख्य देवाचें तुटेना । प्रीती देवाची विटेना । ४-८-३०

एवढेंच नव्हे, तर तीच आपली ओळख आपणांस पटवून देते. त्यालाच

### ( ९ ) आत्मनिवेदन

म्हणतात. आतापर्यंत देव तो निराळा व मी निराळा एवढा भाव राहिला होता, तोही नाहींसा झाला पाहिजे. पचतत्त्वाची सृष्टि व त्याच्या तत्त्वांचे कोश धारण करून जो प्रयत्न केला, त्यामुळें भिन्नत्व बळावलें व हळू हळू एकेक तत्त्वावर व एकेक देहावर जसजसा ताबा मिळवितां आला तसतसें तें कमी कमीही होत गेलें, अंतःकरणाच्या मार्गानें आपण कोण याचा शोध घेता येऊ लागला. मी कोण याचा विचार करता करता सर्व तत्त्वें, देह हीं आवरणें आहेत, असें कळू लागलें व त्याचा निरास करताच प्राणी आत्मरूप होतो, त्याचा दुजाभाव हरपतो,

आपण मिथ्या साच देव । देव भक्त अनन्यभाव । ४-९-२२

हा प्रत्यय येतो. त्यानंतर या जगात शिकण्यासारखें कांहीं उरत नाहीं, जन्ममरणाचा फेरा सपतो.

सत्कार्य सपतें असें मात्र नव्हे. तें अधिकाधिकच वाढतें ! म्हणून आपणांस हा मार्ग पटल्यास श्रवणभक्तीपासून आरंभ करावा.

॥ श्रीसमर्थार्पणमस्तु । ॥

## ( ७ )

# श्रीसमर्थ रामदास व श्रीशिवछत्रपति

( लेखक— श्री. नरसिंह चिंतामण केळकर, पुणें )

आमचे धुळ्याचे मित्र नानासाहेब देव यांनीं आज तीस पस्तीस वर्षे जो श्रीसमर्थसेवारूपी यज्ञ अखंड चालविला आहे त्याचें अवभृतस्नान पुढील आठ-पधरा दिवसात धुळें येथें व्हावयाचें आहे. त्या प्रसंगीं प्रसिद्ध करण्यात येणाऱ्या लेखसंग्रहात एखादा लेख मीहि लिहावा अशी त्यांनीं आग्रहपूर्वक मागणी केली. ती अमान्य करणें अशक्य आहे. एक तर ते करतात हें सत्कार्य तर आहेच; परंतु त्यांनीं आपल्या कार्याविषयीं इतकी निष्ठा आजवर प्रगट केली आहे कीं, त्यांच्या कार्याकरिता त्यांनीं एखादा लेख लिहून मागण्यासारखी विनंति केल्यास ती मज-सारखा मनुष्य अमान्य करू शकणारच नाहीं, इतकी बलवत्तम पात्रता त्यांनीं आपल्या निष्ठेनें प्राप्त करून घेतली आहे. आपला लौकिकव्यवहार संभाळून त्या-बरोबरच एखादें ध्येय डोळ्यापुढें ठेवून त्याची उपासना इतक्या निरलसपणें केल्याचीं उदाहरणें फारशीं दाखविता येणें शक्य नाहीं. असो. मी जो लेख लिहि-णार त्यात "श्रीसमर्थ रामदास व श्रीशिवछत्रपति" याच्यासंबंधानें कोणताहि नवीन ऐतिहासिक असा शोध नाहीं, तर महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासाच्या पार्श्वभागीं प्रचंड पर्वतशिखराप्रमाणें शोभणाऱ्या वरील दोन व्यक्तींच्या संबंधा-विषयीं एक मुद्दा होय. मुद्दा म्हटला म्हणजे त्यात 'अस्ति' असें म्हणणारा व 'नास्ति' असें म्हणणारा असे दोन प्रतिपक्षी डोळ्यापुढें सहजच येतात. परंतु तो मुद्दा शानीत अगर नाशाचीत करण्यासाठीं पुढें आणलेल्या किंवा आणता

येण्यासारख्या पुराव्याची चर्चा मी करणार नाहीं. तशी चर्चा पूर्वी पुष्कळ झालेली आहे. तींतहि मी फारशी विशेष भाग घेतला नाहीं. तथापि कोणत्याहि पक्षाचा अभिमान न धरला तरी तो मुद्दा स्वतंत्र रीतीनें महत्त्वाचा ठरतो. म्हणून त्याविषयीं केवळ साराधार विचार दृष्टीनें काय म्हणता येईल तेवढेंच व तेंहि फार थोड्या शब्दांत मांडण्याचा प्रयत्न मी या लेखांत करणार आहें.

हा मुद्दा असा: 'श्रीसमर्थ रामदास व श्री शिवछत्रपति' हे दोन महापुरुष समकालीन होते, हिंदु धर्माभिमानी होते, महाराष्ट्राभिमानी होते व लहानशा महाराष्ट्र देशातच वावरत होते ही गोष्ट सिद्ध आहे. परंतु त्यांचे परस्परसंबंध कशा प्रकारचे होते असा मुद्याचा प्रश्न कोणाहि विचारी मनुष्यास सुचणारा आहे. तथापि या मुद्याच्या चर्चेच्या क्षेत्रात श्रीसमर्थाभिमानी लोकांकडूनच प्रथम पदन्यास होऊन 'अस्तिपक्षी' सिद्धांत मांडण्यात आला. त्याचा आशय जवळ जवळ असा कीं, श्रीसमर्थ रामदास हे श्रीशिवछत्रपतींचे शेवटीं शेवटीं दीक्षागुरु झाले, इतकेंच नव्हे, तर अगदीं प्रथमपासून त्यांचीच शिकवण व प्रेरणा शिवछत्रपतींना लाभली होती, त्याप्रमाणेंच त्यांचे हातून पुढें कार्य झालें, अर्थात् त्या कार्याचें श्रेय इस्तक या नात्यानें छत्रपतींकडे असलें तरी चालक या नात्यानें म्हणजे श्रेष्ठ प्रतीचें श्रेय श्रीसमर्थांकडेच येतें. हा सिद्धांत श्रीशिवछत्रपतींच्या अभिमानी लोकांना न खपून त्यांनीं अशी बाजू उलट मांडली कीं, या उभय विभूतींची गांठ प्रत्यक्ष एखाद दुसरा वेळच पडली, त्यातून जी प्रथम पडली ती शिवाजी महाराजांनीं आपलें कार्य पुष्कळसें सिद्ध व हातावेगळें केल्यावरच पडली, यामुळें त्यांचें श्रेय समर्थ रामदासांना देणें योग्य नाहीं, तें बहुतेक सर्वच्या सर्व शिवाजी महाराजांनाच देणें न्यायाचें होईल.

या दोन बाजूंच्या विधानात वरील मुद्यामध्यें वादग्रस्तता कशाविषयीं आहे हें सहज दिसून येईल, व त्या वादांत उपलब्ध असलेल्या सर्व ऐतिहासिक कागदपत्रांचा वसून उपयोग करण्यात आलेला आहे; काहीं बाकी राहिलेली नाहीं. पण एका बाजूनें या उभयतांची भेट शक्य तितक्या आधींच्या काळीं ओढणें व दुसऱ्या बाजूनें ती भेट शक्य तितक्या उशीराच्या काळाकडे रेचणें यावरच बहुतेक तर्कचातुर्य खर्च झालें आहे. जसें कांहीं एक भेट यावीत झाली म्हणजे लगेच त्या भेटीवरून बाकी सर्व गोष्टी एकदम सिद्ध होतात किंवा ती भेट झाली नाहीं असें यावीत झाल्यानें प्रतिपक्षाचीं इतर सर्व विधानें ढासळून पडतात.

केवळ या भेटीचा कालनिर्णयच ठरवावयाचा तर मलाहि पुढें आलेल्या कागदो-पत्रीं पुराव्यावरून कांहीं निश्चित मत बनविता येईल. पण तें मत त्या भेटीच्या कालाच्या विषयापुरतेंच असेल. परंतु माझी विचारसरणी या दोन विभूतींच्या परस्परसंबंधाविषयीं अगदीं स्वतंत्र आहे, ती इतिहास-संशोधनाची नाहीं. लौकिक व्यवहार, जगाची रीत, मनुष्यस्वभाव, इतर अनुभव व सारासार विचार यांवरच ती आधारलेली आहे. म्हणून ती भेट फार आधीं झाली कीं फार उशीरां झाली याचें महत्त्वच मला वाटत नाहीं. म्हणून माझें म्हणणें काय तें थोडक्यात मांडतों.

प्रथम या वादाविषयीं मला म्हणावयाचें तें असें कीं, जगात कोत्या दृष्टीचे लोक एक चूक नेहमीं करितात ती अशी कीं, ते कार्यकारणभाव हा अगदीं नेहमीं एकेरी असतो असें मानितात. कोणतेंहि कार्य घेतलें तर त्याचें कारण कोणतें तरी एकच म्हणजे एखाद्या सुईचें टोंक ठेवून दर्शविता येण्या सारखें असतें असें ते घेऊन चालतात. पण त्या कार्याचीं कारणें अनेक व विविध असून एकाच काळीं फलद्रूप किंवा प्रभावी होऊं शकतात. हा दुसरा सिद्धांत स्वतः मानिल्यास कार्याच्या श्रेयाची वाटणी करावयाची तर त्या श्रेयाचे अनेक व लहान मोठे भाग यथाप्रमाण करावे लागतात पण तेंच कार्याचें कारण एकच अद्वितीय असें म्हटलें म्हणजे त्याचें श्रेय मुळींच न विभाग करितां सर्वच्या सर्व एकालाच देणें क्रमप्राप्त होतें. जणू कांहीं हें श्रेय विभाज्य किंवा अविभाज्य म्हणून मांडणें ती एखादी संसारोपयोगी मिळकत म्हणून! पण कित्येक वेळां व्यावहारिक स्वार्थापेक्षांहि तात्त्विक स्वार्थ अधिकच दुर्दम ठरतो, व त्या दुर्दम पणानें तत्त्वाची म्हणजे सत्याची हानि होते

शिवाजी महाराज व समर्थ रामदास यांचें समग्र निरनिराळें चरित्र स्वतंत्र रीतीनें लक्षात घेऊनच त्यांच्या संबंधाविषयीं मत बनविणें हें कोणत्याहि एखाद्या कागदपत्राच्या आधारें मत बनविण्यापेक्षां अधिक सत्याकडे नेणारें होईल. शिवाजी महाराजांनीं लौकिकस्वराज्य स्थापिलें. त्यांत त्यांच्या अनेक हेतूंपैकीं स्वधर्म रक्षण हा एक हेतु होता. समर्थ रामदास यांनीं स्वतंत्र महाराष्ट्रधर्माला उत्तेजन देऊन उन्नति प्राप्त केली, व स्वतःचा एक पंथ, संप्रदाय व दीक्षाधर्म निर्माण केला. त्यात उदयोन्मुख स्वराज्याची मदत झाली. स्वराज्याची मदत घ्यावी असा एक वर्धिष्णु हेतु होता. आणि शेवटीं ईश्वरकृपेनें या दोघांचेहि हेतु सफल झाले हें पाहण्याचें सुख दोघांनाहि जिवन्तपणीं मिळालें व एकदरीनें महाराष्ट्रमात्राला

त्या दोघांच्या उद्योगांचा पुष्कळच फायदा झाला. एवढ्या स्थूल विचारानें आमचें समाधान होण्याला काय हरकत ? पण व्यक्तिविषयक अहंकारानें जसें एखाद्या क्षुल्लक गोष्टीचेंहि सर्व श्रेय आम्ही आपल्याकडे ओढू पहातों त्याचप्रमाणें गतकाळच्या एका मोठ्या म्हणजे स्वराज्यस्थापनेच्या पराक्रमाचें श्रेय आम्हांला विशेष प्रिय असणाऱ्या विभूतीला म्हणजे एकट्या रामदासाला किंवा एकट्या शिवाजीला मिळण्याची आकांक्षा धरून आम्ही अप्रत्यक्षरीत्या आमचा व्यक्तिगत अहंकार उजवूं पाहातों. पण या तात्त्विक भाडणांत विद्यमान कालातील कांहीं व्यावहारिक गोष्टींची हानि होते इकडे लक्ष जात नाहीं. एकच मर्माची गोष्ट सांगावयाची तर समर्थ, समर्थदीक्षा, शिवाजी, स्वराज्य असल्या मोठ्या गोष्टी बाजूला पडून या वादाला कित्येक ठिकाणीं व प्रसंगीं ब्राह्मण ब्राह्मणेतर वादाचेंहि क्षुद्र स्वरूप प्राप्त झाल्याचें आढळून आलें नाहीं काय ?

असो. माझी स्वतंत्र भूमिका दोन सिद्धांतांवर आधारलेली आहे. जगात सकृद्दर्शनीं एक व्यक्ति अनेक उद्योग करीत असलेली दिसली तरी खास स्वतः-चा तिचा अंश म्हणजे ज्यामोंवतीं त्याचें सर्व जीवित, मन, भावना, उद्योग घिरट्या घालीत असतात असा कोणता तरी एकच उद्योग खरा असतो. आणि दुसरा सिद्धांत हा कीं, मुख्य ध्येयाच्या उपासनेनें मनुष्य आपलें व्यक्तिकार्य साधीत असला तरी त्याच्या गौण, दुय्यम व आपाततः घडणाऱ्या उद्योगानीं तद्वतच दुसऱ्या ध्येयवादी व्यक्तींच्या उपासनेला मदत होत असते. पण तिचेंहि महत्त्व इतकें असतें कीं, अशी अवांतर मदत मिळाल्याशिवाय कोणाहि ध्येयवादी माणसाचें कार्य केवळ स्वतःच्या प्रयत्नानें सफळ होणारच नाहीं. या विषयीं कदाचित् असें समीकरणहि बांधता येईल.

" त्याची मूळ कल्पना व ध्येय त्याचा मुख्य उद्योग + इतरांची सक्रिय सहानुभूति व त्या रीतीनें मिळणारें अवांतर साहाय्य = कार्यसिद्धि. "

या समीकरणानेंच जगांतील कोणत्याहि महत्कार्याच्या सिद्धीचा प्रश्न सोडविता येतो. हें समीकरण सतराव्या शतकांतील पुनरुज्जीवित महाराष्ट्राला लाविलें असता स्वराज्यसिद्धीच्या दृष्टीनें शिवाजी मुख्य व रामदास अमुख्य व धर्मजागृती-च्या दृष्टीनें रामदास मुख्य व शिवाजी अमुख्य असेंच ठरेल. म्हणून शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेच्या महत्पराक्रमाचें श्रेय स्थूलपणें त्याचें त्यालाच देऊन टाकून मोकळें न होतां शिवाजीला स्फूर्ति रामदासाकडून मिळाली म्हणून त्या पराक्र-

माचें श्रेय मुख्यंत रामदासाला असें ठरवू पाहाण्यांत केवळ हास्यास्पदता पदरीं येते. आता धर्म हा राज्यापेक्षां श्रेष्ठ कीं राज्य हें धर्मापेक्षा श्रेष्ठ? असा स्वतंत्र वाद कोणास घालावयाचा असल्यास त्यानें खुशाल घालावा. परंतु त्यामुळें कोणा एकाचें श्रेय काढून दुसऱ्यास द्यावें लागत नाहीं. स्वराज्य नसतें तरी रामदासांनीं केवळ आपल्या निष्ठेनें धर्म पुन पायावर उभा केला असता असें वाटेल तर म्हणावें. ह्याला मी नाहीं म्हणणार नाहीं. पण स्वराज्यसिद्धीविषयीं शिवाजीचें श्रेय काढून समर्थांना त्याचा इत्यादि बाबतींत गुरु व आद्य प्रेरक ठरवून सर्व श्रेय रामदासाच्या पदरीं घालणें मला अन्यायाचें वाटतें. शिवाजीपेक्षां रामदास श्रेष्ठ हें ठरविल्यानें ज्याच्या मनाचें समाधान होणारें आहे त्याला तें इतर रीतीनें मी प्राप्त करून देऊं शकेन म्हणजे उदाहरणार्थ प्रथम रावणाचें सर्वस्वीं उज्ज्वल वर्णन करून अशा रावणाला रामानें मारलें या एका वाक्यानें जसें रामाचें श्रेष्ठपण दर्शविता येतें त्याप्रमाणें शिवाजीला स्वराज्यस्थापनेचें सर्व श्रेय देऊन एवढ्या मोठ्या हिंदवी स्वराज्यसंस्थापकानें शेवटीं समर्थांची औपचारीक का होईना पण साम्प्रदायिक दीक्षा घेतली असें म्हटल्यानें रामदास हवे तितके श्रेष्ठ ठरत नाहींत काय? तें ठरविण्याला स्वराज्यविषयक शिवाजीच्या लौकिक उद्योगात रामदासाच्या प्रेरणेची व आशीर्वादाची जुडयुड सिद्ध करण्याचा आग्रहच कशाला धरावयाला पाहिजे! यहिपेक्षा अधिक तात्त्विक बनून अशी कोटी करावी कीं, रामदास हे 'श्री' होते व शिवाजी हे फार तर 'राजश्री' होते, म्हणजे समर्थांची 'श्री' निरुपाधिक तर शिवाजीची 'श्री' उपाधियुक्त मग ती उपाधि स्वराज्याची का असेना! नि श्रेयसापुढें लौकिक अभ्युदय हा गौणच ठरणार, आणि खरी गोष्ट ही अशीच होती कीं, धर्मविषयीं रामदास व शिवाजी हे एकाच मताचे होते तो धर्म चातुर्वर्ण्यात्मक व सनातन वैदिक होय त्या धर्माच्या दृष्टीनें सतराव्या शतकात ब्राह्मणाला क्षत्रिय वर्ग गुरु मानीत होते, व रामदासाची योग्यता म्हणजे ब्रह्मचर्य व स्वार्थरहितत्व पाहून रामदास हे गुरु करण्याला योग्य असें शिवाजीलाहि वाटलें म्हणून शिवाजीनें त्यांची दीक्षा घेतली व आपण तल्वारीनें मिळविलेलें राज्य टिकण्यास व यशाला येण्यास अशा गुरुचा आशीर्वाद उपयोगी पडेल अशी त्यांची भावना होती पण "तू स्वराज्य मिळविण्याचा उद्योग केलास व तडीस नेलास तो कोणत्या आधारावर?" असें शिवाजीला कोणीं विचारलें असतें तर त्यांनीं कोणा ब्राह्मणाच्या आशीर्वादाकडे बोट दाखविलें नसतें, तर

आपल्या छातीकडे तें दाखविलें असतें. किंवा कोणी म्हणेल कीं, शिवाजी इतका अविनयी नव्हता, याचा अर्थ तो स्वतःकडे बोट न दाखविता भवानी देवीकडे दाखविता. पण हें ग्राह्य मानलें तरी स्वराज्यविषयक उद्योगाच्या प्रेरणेचें श्रेय शिवाजी रामदासाकडे खचित न देता, यांत मला बिलकूल शंका वाटत नाहीं. एकाचा अन्यायानें अपहार करून, त्याचा भार दुसऱ्याच्या शिरावर लादू पाहणारे हे आम्हीच म्हणजे संकुचित दृष्टीचे लोक. शिवाजी व रामदास या दोघांनाहि हें माहीत होतें कीं, ज्याचा उद्योग त्यानें करावा. आणि ते दोघेहि तसेच स्वतंत्र बुद्धीनें करीत होते. म्हणजे प्रत्यहीं उठल्याबरोबर किंवा शेवटीं झोपीं जाता रामदासाचे विचार धर्म व संप्रदाय याच्या प्रसाराविषयींचे व शिवाजीचे विचार स्वराज्यसाधन व रक्षण याविषयींचेच असणार. रामदासानें तलवारीला मान दिला असला तर तो ल्हानशा कुबडींत गुप्त रीतीनें ठेवण्यापुरता. शिवाजी महाराजानेंहि सनातन वैदिक धर्माला राजकारणांत मान दिला असला तर तो मी मिळवितों हें राज्य देवाब्राह्मणाकरितां असें मधून मधून म्हणण्यापुरताच. मठांत शिवाजी व रामदास यांची प्रत्यक्ष भेट झाल्यास रामदास उच्चासनावर बसून शिवाजी जमिनीवर गुडघे मोडून बसलेला दिसला असता; पण राजधानींतील दरबारांत याचें उलटें दिसल्याशिवाय राहिलें नसतें. म्हणजे तेथें सिंहासनावर शिवाजीच बसला असता व रामदासाला स्वतंत्र आसन मांडलें असलें तरी सिंहासनापेक्षा चार अगळें तरी खचित् खालीं मांडण्यांत आलें असतें. संप्रदायदीक्षेंत जपाच्या माळेलाच प्रामाण्य हें शिवाजीनें मान्य केलें असतें, पण सनदापत्रें यावर किंवा राजकारणी हुकुमावर शिक्कामोर्तब यालाच खरें प्रामाण्य हें रामदासानींहि कबूल केलें असतें. तात्पर्य, स्वतः 'श्री' व 'राज्यश्री' या दोन्ही आपआपला व्यवहार सरळ व स्वतंत्र दोन्ही प्रकारचा सुरळीत निभावून नेण्याला समर्थ होत्या, त्या इतक्या कीं, मिळविलेल्या सगळ्या राज्याची सनद गुरु म्हणून समर्थांच्या झोळींत घा व कशी टाकावी हें शिवाजी पूर्णपणें जाणून होता. व उलट रामदासहि जाणून होता कीं, झोळींत पडलेली संपूर्ण स्वराज्याची सनद दडपून न बसता, ती शिवाजीला का परत करावी व दिली घेतलेले परत करावी. राजपदाप्रमाणें गुरुपदालाहि मान आहे. तसेंच राजपदालाहि गुरुपदाप्रमाणें मान आहे. पण ते दोन्ही वेगवेगळ्या कामाकरितां स्वतंत्र आहेत, हें जाणणारे जाणत होते. शिवाजीनें सनातनधर्मसमजुतीप्रमाणें ब्राह्मणाला धर्मगुरु मानलें तरी आपल्या घरच्या स्वैपाक्याला

त्याने कधीं नमस्कार केला नाहीं रामदासानेंहि क्षात्रश्रीचा परामर्ष अशाच विवेचक बुद्धीनें घेतला असेल, म्हणुन जो मान तो शिवाजीला देई तो त्याच्या दुजऱ्याला त्याने दिला नसता. मग तो केवळाहि शुद्ध कुळींतला क्षत्रिय असेना का! आपणांहि ही विवेकबुद्धि चालविली तर आपणालाहि हें कबूल करावें लागेल कीं, राजकारणातली शिवाजीचीं धोरणें शिवाजीच समाळता व चालविता, तीं रामदासाला चालविता आलीं नसतीं आणि गुप्त मंडळ्या स्थापून धर्मबुद्धि जाग्रत करण्याचें महत्कार्य रामदासांनीं ज्या तडानें व धोरणानें केलें असतें तें शिवाजीला साधलें नसतें एकीकडे सतेज ब्रह्मचर्य तर दुसरीकडे घाशतीर्थांवर स्नान करणारा तितकाच सतेज क्षत्रिय वीर यात कमी अधिक प्रत लावण्याची कारवाई कृपण बुद्धीच्या चाडाळाशिवाय दुसऱ्या कोणालाहि सुचणार नाहीं पण कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर एकेरीच असलें पाहिजे, अनेकविध असत नाहीं, किंवा कोणत्याहि पराक्रमाचें कर्तृत्व एकेरीच असतें, अनेकविध असत नाहीं, कोणत्याहि साध्याचें साधन एकच असलें पाहिजे, अनेकविध असू शकणार नाहीं, किंवा कोणत्याहि मोक्षाचा मार्ग एकच असणार, अनेकविध असू शकणार नाहीं असें मानणारी कृपण अव्यवहारी बुद्धि ही सनातन असून युगा युगा प्रमाणें आज नव्या युगातहि आपणाला दिसून येत नाहीं काय!

शिवाजी व रामदास याचे संबंध कसे व काय होते याविषयीं आपणांला जवळ जवळ अनुमानांवरच भिस्त ठेवावी लागेल, इतका थोडा कागदोपत्रीं पुरावा आहे. परंतु आपल्या हिंदु समाजाची व सर्वसामान्यरीत्या मनुष्यस्वभावाचीहि ठेवण लक्षात घेता, या दोघांचेंहि कार्य स्वतंत्र रीतीनें चाललें असावें व त्यांनीं एकमेकांविषयीं मनानें शुभचिंतन सतत ठेवलें असलें तरी एकमेकांच्या सल्ला मसलतीवर किंवा प्रत्यक्ष मदतीवर आपलें कोठलेंहि कार्य अवलंबून ठेविलें नव्हतें असें मला वाटतें किंचित् यत्नेनें म्हणावयाचें तर असें म्हणता येईल कीं, दोघेहि एकमेकाला नमस्कार करीत, इतकेंच नव्हे तर करू इच्छितहि, पण तो नमस्कार दुरून 'दुरून नमस्कार' याचा अर्थ निंदात्मक घ्यावयाचा नाहीं पण त्या दुरूनचा अर्थ असा असा कीं, अनेक कार्यांचें अंतिम ध्येय कचित् एकच असलें तरी त्यांतील प्रत्येक कार्याचें उपध्येय, म्हणजे तात्कालीक ध्येय, वेगवेगळें असतें या शिवाय प्रत्येक कार्याचे मनतंत्र, नियम, विधि, निषेध, आचार—या सर्व गोष्टी फार एकमेकांशीं न जुळणाऱ्या व कदाचित् अडचण उत्पन्न करणाऱ्याहि असू शकतात.

सिवाय, प्रत्येक कार्यकर्त्या माणसाची मनोरचनाहि अशी कांहीं वेगवेगळी बनून जाते, कीं तशा दोन मनोवृत्ति एकात एक सोयीनें घसून कार्य प्रभावी होऊं शकत नाहीं. म्हणून ज्याचें काम त्यानेंच करावें. त्यापुरतें दुसऱ्याला परका मानून दूर ठेवावें व फार तर दुरून त्याविषयीं आदर दर्शवून आशीर्वाद द्यावा, इतकेंच घडतें व तेवढेंच श्रेयस्कर ठरतें. अंतिम स्थितींत अनेक कार्यांच्या परिणामांचा फायदा किंवा लाभ अदृश्य रूपानें मुख्य ध्येयाला होत असतोच.

मीं जें हें अनुमान म्हणून वर सांगितलें त्याला तुमच्या आमच्या पिढींतील राजकारणी पुरुष व साधुसंत किंवा धार्मिक सत्पुरुष यांच्या संबंधाचा दाखला मदतच करू शकेल. हिंदुस्थान देश इग्रजांच्या हीन स्थितींतून वर येऊन त्याला सत्ता व स्वातंत्र्य मिळावें ही गोष्ट लोकमान्य टिळकांसारख्या राजकीय पुढाऱ्यांना जितकी इष्ट वाटत होती तितकीच ती या एक दोन पिढ्यांतील अनेक धार्मिक सत्पुरुषांनाहि इष्ट वाटत होती यात संशय कसला ! पण टिळक व त्यांचे समकालीन धार्मिक सत्पुरुष यांचे संबंध कितपत आले व जे आले त्याचें स्वरूप काय होतें याची मला थोडीबहुत माहिती आहे असें मीं म्हटलें तर यात विशेष बढाई करितों असें सहसा कोणी म्हणणार नाहीं. ही माझी माहिती मी सोदाहरणहि सागू शकेन, परंतु ती सांगण्याला खाजगी व्यक्तींचा व गोष्टींचा उल्लेख करावा लागेल म्हणून मी ती गोष्ट करीत नाहीं. परंतु त्या माझ्या माहितीवरून मी निश्चयात्मक सांगूं शकतों कीं, राजकीय पुढारी या नात्यानें जशी कोणाहि धार्मिक सत्पुरुषाकडून स्फूर्ति टिळकांना मिळाली नाहीं किंवा मिळण्याची अपेक्षा त्यांनीं केली नाहीं, त्याचप्रमाणें हिंदुधर्मरक्षण हें टिळकांना इष्ट होतें तरी आपल्या उद्योगानें आपण कोणा धार्मिक सत्पुरुषाला स्फूर्तिकार, प्रेरणामूल होऊं शकू असेंहि त्यांना कधीं वाटलें नाहीं. एकाच वेळीं टिळक व असे सत्पुरुष ह्यात असतां त्यांच्या परस्परभेटी किती थोड्या झाल्या आणि झाल्या त्यात औपचारिक सभ्यता व आदरबुद्धि यांच्या प्रदर्शनाचाच प्रकार बहुतेक सर्व कशा होता याविषयींची माहिती मनोरंजक होईल, पण ती देता येत नाहीं. माझें म्हणणें इतकेंच कीं, शिवाजी व रामदास यांच्या परस्परसंबंधाविषयींचें जें मत मीं वर मांडलें आहे त्याविरुद्ध ऐतिहासिक कागदपत्री पुरावा नाहींच, पण त्रिकालाबाधित सारासार विचार म्हणजे स्थूल तारतम्य, इतकेंच नव्हे तर विद्यमान कालांतील माझा प्रत्यक्ष अनुभवहि त्या मताला अनुकूल

असाच आहे.

रामदास व शिवाजी यांच्यासंबधाचें खरें स्वरूप काय मानावें याची चिकित्सा याहून अधिक करण्याचें कारण नाहीं. व ही चिकित्सा करण्याची संधि मिळवून दिल्याबद्दल मी रा. देव यांचा आभारी आहें.



## ( ८ )

# महाराष्ट्रीय संतपरंपरा
आणि
# श्री समर्थ रामदास

[ लेखक— प्रो. माधव दामोदर अळतेकर, एम्. ए.,
मराठी भाषेचे अध्यापक, विल्सन कॉलेज, मुंबई ]

श्रीसमर्थ रामदास यांचा पंथ महाराष्ट्रीय संतपरंपरेहून निराळा होता, किंवा रामदासी शिकवणींत त्याहून भिन्न अशा काहीं विशेष गोष्टी होत्या; किंवा, हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, महाराष्ट्रसंतमंडळीच्या शिकवणींत रामदासाच्या मानानें कांहीं महत्त्वाची कमतरता होती अशा तऱ्हेचा अभिप्राय पुष्कळांनीं ऐकलेला आहे, आणि असा अभिप्राय देणाऱ्यांपैकीं कित्येकांनीं रामदासाच्या समर्थ या नावावरून ज्ञानेश्वरादि संतांना पंगु म्हणण्यापर्यंत मजल पोंचविली आहे हें सर्वश्रुत आहे. रामदास खरोखर महाराष्ट्रीय संतांहून भिन्न होते कीं काय आणि ज्ञानेश्वरादि संत पंगु होते कीं काय, हे प्रश्न निदान सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें विचारणीय आहेत आणि रामदासांना महाराष्ट्रीय संतमंडळींत स्थान नसून आधुनिक राजकारणांतील एके काळीं महत्त्वास चढलेल्या पण आतां बहुतेक लुप्तप्राय झालेल्या एका पंथांत ते बसण्यासारखे आहेत कीं काय, हा प्रश्नहि वरील विषयाच्या विवेचनांतच अंतर्भूत होतो. रामदासाचें महत्त्व वर्णन करण्यासाठीं ज्ञानेश्वरादि विभूतींना पंगु आणि संताळे ठरविण्याचा अट्टाहास सत्यान्वेषणबुद्धीचा द्योतक नसून मूढता आणि अहंकार यांचा द्योतक आहे ही गोष्ट ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत,

तुकारामाचे अभंग आणि दासबोध या चारहि ग्रंथांचें जाणपणानें यन करणाऱ्यांना पटण्यासारखी आहे. त्याचप्रमाणें रामदासाच्या शिकव भूमिका, ज्याला परमार्थ असें नांव आहे आणि ज्यासंबंधीं पुष्कळांचा अर्धज्ञ घोंटाळा झालेला दिसतो, त्या विषयाची नसून रोजचा व्यवहारांतील शठंप्रति श आणि म्हणून सर्वप्रति शाठ्यम् अशा प्रकारची आहे की काय, हें रामदास कीर्तीच्या व महत्त्वाच्या दृष्टीनेंहि निश्चितपणें कळणें आवश्यक आहे. दासबोध वीस दशकांत आणि दोनशें समासांत पुनरुक्ति कोठें आहे, मूळचा ग्रंथ कोण दशकाबरोबर खरोखर समाप्त झाला असावा, कांहीं प्रसंग चिरंतन बोधाचे कांहीं तात्कालिक परिस्थितीमुळें सुचलेले आहेत काय; तसेंच त्यांतील कांहीं सम केवळ मुलांच्या उपयोगी पडावेत म्हणून लिहिले आहेत कीं काय वगैरे प्रश्न त तूर्त बाजूला ठेविले तरी या विस्तृत ग्रंथांत ज्याला राजकारण असें अभिध आहे असे समास दोन तीनहून अधिक नसून "राजकारण" या शब्दाच अर्थ संपूर्ण दासबोधांत "व्यवहारशास्त्र" हा आहे, आधुनिक अर्था Politics हा नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. या दोन तीन समासांच्या जोरावर आणि राजकारण या शब्दावर भर देऊन रामदासांना महाराष्ट्रीय संतमंडळी तून बहिष्कृत करण्याचा व जी गोष्ट—म्हणजे ज्ञानेश्वरादि संतांना पंगुत्वाच आहेर करणें समर्थांच्या ध्यानीं मनीं स्वप्नीं सुद्धा आली नव्हती—तिची घोषण करण्याचा अव्यापारेषु व्यापार कित्येकांनीं केला आहे तो हास्यास्पद आहे आणि स्वमताचें प्रतिबिंब रामदासी शिकवणींत पाहण्याचा नाद ज्यांना नाहीं अशा सर्व समर्थभक्तांना तो दुःखदायक वाटतो.

वास्तविक दासबोधाच्या पहिल्या दशकाचा पहिला समास प्रस्तावनारूप आहे आणि त्यांत ग्रंथाचें प्रयोजन स्पष्ट दिलेलें आहे. त्यावरून समर्थांचा अंतर्भाव महाराष्ट्रीय संतपरंपरेंतच होतो ही गोष्ट स्पष्ट आहे. दुसऱ्याच ओवींत

येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥

म्हणून म्हटलें आहे. आणि तिसऱ्या ओवींत

बहुधा अध्यात्मनिरोपण । निरोपिलें ॥

म्हणून निश्चितपणें सांगितलें आहे. आतां पहिल्या समासांतील पुढील ओव्या पहा—

आतां श्रवण केलियाचें फळ । क्रिया पालटे तत्काळ ।

तुटे संशयाचें मूळ । येकसरां ॥ २८
मार्ग सांपडे सुगम । नलगे साधन दुर्गम ।
सायोज्यमुक्तीचें वर्म । ठाईं पडे ॥ २९
नासे अज्ञान दुःखभ्रांती । शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती ।
ऐसी आहे फळश्रुती । ईये ग्रंथीं ॥ ३०
योगियांचें परम भाग्य । आंगीं बाणे तें वैराग्य ।
चातुर्य कळे यथायोग्य । विवेकेंसहित ॥ ३१

अर्थात् इतकी श्रेष्ठ स्थिति जेथें प्राप्त होण्याचा मार्ग सांगितला तेथें

भ्रांत अवगुणी अवलक्षण । तेचि होती सुलक्षण । ३२

किंवा

आळसी तेचि साक्षपी होती । पापी तेचि प्रस्तावती ।
निंदक तेचि वंदूं लागती । भक्तिमार्गासी ॥ ३३

यात काहीं नवल नाहीं. पण ग्रंथाचें प्रयोजन अज्ञाननिरास, ज्ञानप्राप्ति, वैराग्यप्राप्ति विवेकप्राप्ति, भक्तिमार्गाचें योग्य ज्ञान, " देहबुद्धीचे धोके " नाहींसे करणें, "संदेहाचे कित " निवारणें, " संसाराचे उद्वेग " नासणें आणि

मनास होय विश्रांति । समाधान ॥ ३७

असें करणें हें आहे, याबद्दल मुळींच संशय नाहीं. म्हणजे ज्ञानदेव आणि एकनाथ यांच्या ग्रंथनिर्मितीचें जें प्रयोजन तेंच दासबोधाचें प्रयोजन आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. ज्ञानेश्वरीच्या सुरवातीस आत्मरूप आद्य [illegible] हेंच गणेश करपून त्याला वंदन केलें आहे. तदनंतर क्रमानें पण [illegible] शारदावदन, सद्गुरुवंदन, आणि संतसज्जनवंदन असा प्रकार आहे. [illegible] पहिल्या दशकात पहिला समास प्रस्तावनारूप, दुसऱ्यात गणेशस्तवन, [illegible] शारदावंदन, चौथ्यात सद्गुरुवदन, हें ज्ञानेश्वरींतील क्रमाप्रमाणेंच [illegible] पाच आणि सहा यात अनुक्रमें संतसज्जनवंदन व श्रोतृवंदन याचें [illegible] मध्यें सभावंदन आहे. हे तीन समास ज्ञानेश्वरींतील सज्जनवंदनाच्या ( [illegible] ओव्या ६२-६६ ) कल्पनेला धरून आहेत. समास [illegible] तर ज्ञानेश्वरींत व्यासाचें मधुर वर्णन आढळतें. [illegible] आहे व परमार्थाला साधन जो नरदेह त्याचें [illegible] ज्ञानेश्वरींत गीताप्रशंसा ( अध्याय १ ओव्या [illegible] ) [illegible]

परमार्थवर्णन आलें आहे. नरदेहाबद्दलहि उल्लेख ज्ञानेश्वरींत विषयानुरोधानें आले आहेत. पहिल्या दशकातील वदनाचा प्रकार एकच आहे ही बाह्य गोष्ट म्हणता येईल, पण प्रतिपाद्य विषय ज्ञानेश्वरीचा आणि दासबोधाचा एकच आहे व तो परमार्थ आहे आणि परमार्थ म्हणजे पशुता हें जसें ज्ञानेश्वरास संमत नव्हतें तसेंच रामदासानाहि संमत नव्हतें आणि व्यावहारिक स्वार्थप्रवणतेचा उपदेश रामदासानीं केला आहे असें म्हणणें म्हणजे समर्थांच्या शिकवणीचा विपर्यास करणें होय.

ज्ञानेश्वरींतील अज्ञानवर्णन (अध्याय १३ ओव्या ६५७-८६०) वाचून मग दासबोधातील मूर्खलक्षण (२-१), कुविद्यालक्षण (२ ३), पढतमूर्ख-लक्षण (२-१०), वगैरे पहावेत म्हणजे ज्या व्यावहारिक कल्पना दासबोधात आहेत त्या संक्षेपानें व बहुतेक ठिकाणीं फार आकर्षक आणि सुंदर भाषेंत ज्ञानेश्वरींत आहेत असें आपणास आढळून येईल. दासबोधाच्या तिसऱ्या दशकात एका संसारी माणसाचें संपूर्ण चरित्र वर्णिलेलें आहे व संसारात साधारणपणें काय काय लचाडें उत्पन्न होतात त्याची त्यात हकीकत असून संसारापासून परावृत्त करणें व मुमुक्षु होऊन ज्ञानभक्तिमार्गाला लागणें हा उपदेश करण्याचाच हेतु हा वृत्तात देण्यात आहे. चवथ्या दशकात नवविधाभक्तीचें सामग्र्यानें वर्णन आहे व वाचकांना बहुश्रुत करणें हा समर्थांचा हेतु असल्यानें माहितीनें भरलेले समास दासबोधात पुष्कळ आहेत. दशक सहा ते दहा असेच जुन्या माहितीनें भरलेले आहेत व्यवहाराच्या दृष्टीनें महत्त्वाचा भाग दशक अकरा, अठरा आणि एकोणीस यात आहे. या दशकातून राजकारणाचा उल्लेख आहे, महंतलक्षणें सांगितलीं आहेत, निस्पृह कसा असावा याची चर्चा केली आहे, जनस्वभावाचें विवेचन केलें आहे, सुंदर कसें लिहावें हें सांगितलें आहे, यत्नवादाचें विवरण केलें आहे, दैवाचीं आणि करंटाचीं लक्षणें सांगितलीं आहेत आणि अशा प्रकारें हे दशक संसारी माणसांना आपल्या भूमिकेवरचे वाटतात. पण संसारी माणसाची केवळ व्यवहारमय भूमिका ही दासबोधाची भूमिका नव्हती हें वर सांगितलेंच आहे आणि या दशकांतून आलेला बराचसा मजकूर ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत यांच्यात शब्दार्थानें सर्वत्र नसला तरी लक्षणेनें व ध्वनीनें पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे तो या तीन्ही ग्रंथांचें अध्ययन करणाऱ्यांच्या लक्षात आल्याशिवाय रहात नाहीं. अठराव्या दशकांत तिसऱ्या समासांत

प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठांतर करावें ।
येथानशक्ति आठवावें । सर्वोत्तमासी ॥ १५
मुखमार्जन प्रातःस्नान । संध्यातर्पण देवतार्चन ।
पुढें वैश्वदेव उपासन । येथासांग ॥ १७
कांहीं फळाहार घ्यावा । मग संसारधंदा करावा ।
सुशब्दें राजी राखावा । सकळ लोक ॥ १८
पुढें भोजन जालियावरी । कांहीं वार्चा चर्चा करी ।
येकांतीं जाऊन विवरी । नाना ग्रंथ ॥ २२

इत्यादि सर्वोपयोगी बहुमोल उपदेश आहे व आजकाल शनिवारीं संध्याकाळीं पत्त्याचा डाव उभा करून सोमवार सकाळपर्यंत राजाराणीचीं लग्नें लावणाऱ्या कर्तृत्वशून्य आचरटांनीं तो वाचून लक्षात ठेविला तर चांगलेंच होईल. अशा तऱ्हेचा उपदेश श्रीकृष्णानें अर्जुनाला निदान भगवद्गीतेंत केला नाहीं म्हणून तो ज्ञानेश्वरींत आला नाहीं, पण उपमालंकाराच्या व लक्षणा आणि ध्वनि यांच्या साहाय्यानें आळशी लोकांवर, उद्योगशून्य लोकांवर, ज्ञानेश्वरींतहि तडाखे कांहीं कमी नाहींत आणि " कर्म धुंगारुनि करावें " या ज्ञानदेवीय ओवीच्या चरणात "खबरदारपणा" व "सावधानपणा" यांचें सार आलें आहे. " भोळ्या भावा"नें देव मिळत नाहीं, त्याला ज्ञानयुक्त भक्ति लागते, हें ज्ञानदेव व एकनाथ यांनीं वरचेवर स्पष्ट केलें आहे व "सावधानपणा"चें लोण हें ज्ञानेश्वर-मुकुंदराजापासून पुढें आलेलें आहे हें विसरून चालणार नाहीं.

ज्ञानेश्वरींतील कांहीं ओव्या या ठिकाणीं देतों म्हणजे उपरोक्त विधानाची यथार्थता पटेल.

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता ।
तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसारदुःखां ॥ २-३३८
म्हणौनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें ।
एयाकारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥ २-३४७
म्हणौनि संग जंव प्रकृतिचा । तंव त्यागु न घडे कर्माचा ।
एथ करूं म्हणति तेयांचा । आग्रहोचि उरे ॥ ३-६३

ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात ज्ञान अज्ञानवर्णनामिषानें व्यवहारज्ञान -व उत्तमलक्षण आणि मूर्खलक्षण हे सर्व विषय आले आहेत.

" बाहेरून दिसण्यांत बावळा पण आंत नाना कळा " असें समर्थांनीं महंताचें वर्णन केलें आहे. त्याचा कित्येक समर्थभक्तांनीं विपरीत अर्थ करून समर्थ हे व्यवहारी लफंग्याचे पाठीराखे होते असा भ्रम उत्पन्न केला आहे.

वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा । १५-१-३

ही शब्दयोजना थोडीशी चमत्कारिक असली तरी त्यामुळें दासबोधाच्या अभ्यासकाची दिशाभूल होण्याचें कारण नाहीं. याच प्रकारची ज्ञानेश्वरींतील ओवी पहा—

वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ।
परी वेडिवेमाजी दडे । महिमे भेणें ॥ १३-१९१

वर वेळच्या वेळीं काम करण्याबद्दलच्या रामदासी ओव्यांचा संदर्भ आला आहे. ज्ञानदेव म्हणतात—

कर्माचा वेळ चुके । का नित्यनैमित्तिक ठाके ।
तें जया न दुखे । जीवामाजीं ॥ १३-६८२
कुळेंसी जो पाठमोरा । वेदाज्ञेसी दुऱ्हा ।
कृत्याकृत्यव्यापारा । निवाड नेणे ॥ १३-६९७
तैसा सद्गुणीं मत्सरु । व्युत्पत्ती अहंकारु ।
तपोज्ञानें अपारु । ताठा चढे ॥ १३-७२४
आणि आंगीं वृद्धतेची । संज्ञा ये मरणाची ।
परी जया तारुण्याची । भुली न फिटे ॥ १३-७६२
रिघे जेथ न रिघावें । मागे तें न घ्यावें ।
स्पर्शे जेथ न लागावें । आंग मन ॥ १३-७७५
न धरावा तो संगु । न लगावे तेथ लागु ।
नाचरावा तो मार्गु । आचरे जो ॥ १३-७७६
नायकावें तें आइकें । न बोलावें तें बकें ।
परी दोष होतील हें न देखें । प्रवर्ततां ॥ १३-७७७
परी पाप मज होईल । का नरकयातना येइल ।
हें कांहींचि पुढील । देखेना जो ॥ १३-७७९

[ज्ञा]नेश्वरींत व्यवहारज्ञान आहे कीं नाहीं याची फक्त कल्पना यावी म्हणून [य]ा ओव्या दिल्या आहेत. या व्यवहारज्ञानालाच " राजकारण " हें नांव दास-

बोधात आहे याबद्दल शंका वाटत नाहीं. जसा धर्म हा शब्द Religion या अर्थी संस्कृत भाषेंत उपयोजिलेला नाहीं त्याचप्रमाणें राजकारण हा शब्द Politics या अर्थी दासबोधात उपयोजिलेला नाहीं. आणि व्यवहारशास्त्र या अर्थानें दासबोधातच राजकारण प्रथम आलें ही समजूत अर्थात् चुकीची आहे. रामदासांनीं स्वत च म्हटलें आहे कीं, आपल्या ग्रंथात "गौल्य" (गौल्य हा शब्द "गोडी" या अर्थी ज्ञानेश्वरींत आलेला आहे व मधुराक्षरयोजना याच अर्थानें तो रामदासांनीं योजिलेला आहे) नाहीं. पण ज्ञानदेवींचें गौल्य रामदासांतच काय पण कोणातहि नाहीं. तथापि गौल्य नसलें तरी ज्ञानदेवी तत्त्वाचाच प्रसार व पुरस्कार करण्यासाठीं दासबोध अवतरला यात संदेह नाहीं. ज्ञानदेवी तत्त्वांना दूषण देणाऱ्यापैकीं बहुतेक ज्ञानेश्वरी वाचून समजून घेतल्याशिवाय, किंबहुना वाचल्याशिवाय, "बाबावाक्य प्रमाणम्" या न्यायाला अनुसरलेले दिसतात, ही गोष्ट आश्चर्यकारक नसली तरी दु खदायक आहे.

आता आपण दासबोध दशक ११ समास पाच इकडे वळू. हा सर्वच समास मोठा वाचनीय आणि उद्बोधक आहे. यात समर्थ म्हणतात—

मुख्य हरिकथानिरूपण। दुसरें तें राजकारण।
तिसरें तें सावधपण। सर्वविषईं॥ ४
चौथा अत्यंत साक्षेप।

साक्षेप म्हणजे प्रयत्न. तेव्हा समर्थांच्या शिकवणींत पहिली प्रत हरिभजनाला व दुसरी व्यवहारज्ञानाला अथवा राजकारणाला होती व त्याचीच फोड सावधपण आणि साक्षेप या दोन शब्दांनीं केली आहे.

दुसऱ्याचें अभिष्ट जाणावें। बहुताच बहुत सोसावें।
न सोसे तरी जावें। दिगांतराप्रती॥ १३

चढाईच्या राजकारणाला (आजच्या अर्थानें) हा उपदेश मानवण्यासारखा नाहीं हें उघड आहे. आणि हा उपदेश राज्यतंत्रातला नसून व्यवहारतंत्रातला आहे हें त्यामुळें आपोआप सिद्ध होतें आत

करणें असेल अपाये। तरी बोलोन दाखऊं नये।
परस्परेंचि प्रत्यये। आंचितीस आणावा॥ १७

अशासारख्या कांहीं ओव्या दासबोधात आहेत आणि त्यांच्यावर तर्कट रचून कित्येक रामदासांना दूषण देतात व कित्येक ते लबाडीचा पुरस्कार करणारे होते

असें मोठ्या अभिमानानें सागतात. अशा ओव्या सपूर्ण दासबोधात फार थोड्या आहेत. त्यातील अभिप्राय सदर्भाला धरून समजावून घेतला पाहिजे व अशल्या ओव्यातून उत्पन्न होणारा वाच्यार्थ ही रामदासाची मुख्य शिकवण नसून मुख्य शिकवण परमार्थाची, वैराग्याची, हरिकथानिरूपणाची होती हें लक्षात ठेविलें पाहिजे. याच्या पुढच्या म्हणजे एकादश दशकातील सहाव्या समासातहि राजकारणाचा उल्लेख आहे.

हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ।
वर्तायाचें लक्षण । तेंहि असावें ॥ ४

—यापुढील ओव्या पाहा—

•पुसों जाणें सागों जाणें । अर्थांतर करूं जाणें ।
सकळिकाचे रासों जाणें । समाधान ॥ ५
दीर्घसूचना आधीं कळे । सावधपणें तर्क प्रबळे ।
जाणजाणोनि निवळे । येथायोग्य ॥ ६
जो येकातास तत्पर । आधीं करी पाठातर ।
अथवा शोधी अर्थांतर । ग्रथगर्भीचें ॥ ९
आधींच सिकोन जो सिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ।
गुतल्या लोकास उगवी । विवेकबळें ॥ १०
अक्षर सुदर वाचणें सुदर । बोलणें सुदर चालणें सुंदर ।
भक्ति ज्ञान वैराग्य सुदर । करून दावी ॥ ११

तेव्हा "राजकारण" या रामदासी शब्दावर जो त्या शब्दाच्या आधुनिक अर्थाचा भार लादतात तो प्रकार यथार्थ नाहीं हें उघड होतें हा शब्द व्यवहार, व्यवहारज्ञान आणि कधीं कधीं तारतम्य (common sense) या अर्थानें दासबोधात आलेला आहे तेव्हा या एका शब्दाच्या रूपदर्शनानें रामदासाना इतर सतमडळींतून वेगळे काढण्याची आवश्यकता नाहीं, आणि विशेषत या शब्दाच्या बाह्य रूपावर भर देऊन ज्ञानेश्वरादि कवींना व सताना दूषण देण्याची प्रथा अनुचित आहे हें स्पष्ट होतें. आणि हा प्रकार बरेच वेळा समर्थभक्तांच्या नांवाखालीं होत असल्यामुळें विशेष खचक आणि शोचनीय आहे.

यानतर आपण अठराव्या दशकाकडे वळूं. यातहि राजकारणाचें विवेचन आहे. या दशकाच्या पहिल्या समासाच्या सुरवातीला गणपति, सरस्वती, शकर

पासून वनशंकरी, खडोरा, तुळजाभवानी, पांडुरंगापर्यंत सर्वांचें वंदन आहे. हा दशक मूळ ग्रंथ समाप्त झाल्यावर नवीन लिहिला का सर्वथा किंवा अंशतः प्रक्षिप्त आहे हा वाद मी येथें उपस्थित करूं इच्छित नाहीं. पण ही सुरवात लक्षात ठेवण्यासारखी आहे, येवढें मात्र म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. दुसऱ्या समासात "नेमस्त"पणाचा महिमा वर्णन केला आहे. रामदासाच्या महाराष्ट्रीय भक्तांपैकीं एका विशिष्ट शाखेला हा शब्द काहीं वर्षांपूर्वी किती अप्रिय होता हें नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. जाणत्याजवळ शिकावें हा या समासाचा मथितार्थ आहे, आणि तो अर्थ सर्वांनीं ध्यानात ठेवावा. यातील काहीं ओंव्या दिल्यावाचून राहवत नाहीं.

जाणत्याचा साक्षेप घ्यावा । जाणत्याचा तर्क जाणावा ।
जाणत्याचा उद्देश समजावा । न बोलताचि ॥ १८-२-१३
जाणत्याचें धूर्तपण । जाणत्याचें राजकारण । ,
जाणत्याचें निरूपण । ऐकत जावें ॥ १४
जाणत्याचें पाहावें ज्ञान । जाणत्याचें सिकावें ध्यान ।
जाणत्याचें सूक्ष्म चिन्ह । समजोन घ्यावें ॥ २१
जाणत्याचें अलिप्तपण । जाणत्याचें विदेहलक्षण ।
जाणत्याचें ब्रह्मविवरण । समजोन घ्यावें ॥ २२
परमेश्वराचे गुण नुवाद । अखंड करावा संवाद ।
तेणेंकरितां आनंद । उदंड होतो ॥ २४
उपासनेचे सेवटीं । देवा भक्ता अखंड भेटी ।
अनुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥ ३०

हा समास समर्थांच्या "राजकारणा"चाच भाग आहे व त्यावरून त्यांच्या राजकारणाचें मूळ कशांत होतें हें समजेल. त्यांच्या राजकारणाचा विपरीत अर्थ ज्यांना प्रत्ययाची गोष्ट कळली नाहीं अशा अननुभाव्यांनीं केला हा दोष समर्थांचा नाहीं. हा दोष आपल्या स्वतःच्या मनोरचनेचें प्रतिबिंब समर्थांच्या राजकारणात पहाणाऱ्या मूढ आणि उद्धट अशा काहीं लोकांचा आहे. अशाच ल काना उद्देशून पुढचा म्हणजे तिसरा समास लिहिला आहे असें वाटतें. या त मातील बिस्येक ओंव्या अत्यंत मननीय आहेत.

बोलतां येना बैसतां येना । प्रसंग काहींच कळेना ।

शरीर मन हें वळेना । अभ्यासाकडे ॥ १८-२ ७
लिहिणें नाहीं वाचणें नाहीं । पुसणें नाहीं सांगणें नाहीं ।
नेमस्तपणाचा अभ्यास नाहीं । वाप्कळपणें ॥ ८
आपणास काहींच येना । आणी सिकवलेंहि मानेना ।
आपण वेडा आणी सज्जना । बोल ठेवी ॥ ९

चौथ्या समासात मनुष्यदेहदुर्लभतेचें वर्णन आहे पाचव्या व सहाव्या समासात अनुक्रमें करंट व उत्तम पुरुषाचीं लक्षणें दिलीं आहेत या सहाव्या समासात तेव्हाच्या राज्यपरिस्थितीचा प्रत्यक्ष निर्देश आहे व त्यात शिवाजी महाराजांचेंच उत्तम पुरुष म्हणून वर्णन आहे असें वाटतें या समासाला " राजकारण " असें नाव नाहीं. नवव्या समासात झोपाळू ओत्याचें मोठें हास्यरसप्रचुर वर्णन आहे व दहाव्या समासात ओत्याचे दोष सांगितले आहेत. एकोणिसाव्या दशकाच्या नवव्या समासात राजकारणनिरूपण आहे. या आणि पुढील म्हणजे दहाव्या समासाचें थोडेंसें निरीक्षण करणें आवश्यक आहे कारण कित्येकांच्या मतें समर्थांची खरी शिकवण येथेंच आहे, बाकीचा सगळा दासबोध फुकट आहे.

विचार करून पाहिलें तर हा नववा आणि दहावा समास दासबोधाचा आवर भाग न दिसतां वरून चिकटवलेला भाग दिसतो, आणि दासबोधाच्या विषयाशीं त्याचें तादात्म्य दिसत नाहीं. यासंबंधीं पुष्कळ चर्चा करता येण्यासारखी आहे. परंतु दोनशें समासांपैकीं दोन तीन समासांना अतिरिक्त महत्त्व देणें, त्यात समर्थांची सर्व शिकवण साठविली आहे असें म्हणणें, हें सयुक्तिक नाहीं साधारण पुढाकार घेऊन विविध घटना घडवून आणणाऱ्या माणसानें कसें वागावें त्यासंबंधीं नवव्या समासात उपदेश आहे यातीहि व्यवहारज्ञानच बहुतेक आहे. पण पुढारी माणसाला, कार्य अंगीकृत करून तें शेवटास नेण्याचा इच्छा असणाऱ्या माणसाला, फार उपयुक्त सूचना केलेल्या आहेत व त्यात काहीं ओंव्या एकांतिक नीतिवाद्यांना चिंतनीय वाटणार आहेत उदाहरणार्थ,

मत्तासी मत्त योजावें । वाचाळासी वाचाळ आणावें ।
आपणावरी विकल्पाच गोवे । पडोंच नेदी ॥ १९-९ ११
काटीनें काटी झाडावी । झाडावी परी हे कळों नेदावी ।
कळकटेपणाची पदवी । असों द्यावी ॥ १२

या ओंव्याबद्दल कोणी काहीं म्हणोत, त्या दासबोधात " तत्र श्लोकचतुष्टयम् "

या योग्यतेच्या आहेत असें म्हणणें केवळ धाष्टर्य होईल. मग " कांद्यानें फाडिलात काय वर्म " म्हणणारा मोरोपंत आणि " अधमासी तो अधम " म्हणणारा तुकाराम हेहि मोठे राजकारणपटु ग्रंथकार किंवा कवि ठरतील. नवव्या समासात व्यवहाराच्या किंवा सार्वजनिक कार्य करणारांच्या बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी आहेत, पण त्यात लबाडीच्या धोरणाचा पुरस्कार आहे हें मत आणि हा पुरस्कार ही दासबोधाची मुख्य शिकवण आहे, हें मत आणि असा उपदेश करणारे ते समर्थ व न करणारे ते पशु ही जी मतपरंपरा ज्यांनी प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केलेला आहे, त्यांनी श्रीसमर्थ रामदासांच्यावर भलत्याच कल्पना लादल्या, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. शिवछत्रपतींशीं परिचय झाल्यामुळें आणि राज्यतंत्राशीं प्रत्यक्ष संबंध आल्यामुळें संस्कृत भाषेंत ज्याला नीति म्हणतात आणि जिला नृपनीति असें नांव भर्तृहरीनें दिलें आहे व जी राजनीति म्हणून मराठींत प्रसिद्ध आहे, तिच्यासंबंधीं दासबोधात दोन चार समास यावेत यात कांहींच नवल नाहीं. ते अधिक आले नाहींत हें नवल आहे; परंतु राजनीति शिकविणें हा समर्थांच्या शिकवणीचा प्रधान हेतु होता, हें म्हणणें साफ खोटें. परमार्थ शिकविणें, वैराग्य शिकविणें, भक्ति शिकविणें, हरिकथानिरूपणाचा फैलाव करणें हाच त्याचा प्रधान हेतु होता, आणि म्हणून ज्ञानदेवप्रभृति संतांच्या परंपरेंतच त्यांची गणना केली पाहिजे. ज्ञानेश्वर, एकनाथ आणि तुकाराम यांच्या ग्रंथांचें सूक्ष्मावलोकन करणाऱ्यांना, तत्कालीन लोकांना उद्योगतत्पर, क्रियावान् , धीट, निर्भय करण्याचा प्रयत्न या महंतांनीं केला होता, ही गोष्ट सहज लक्षात येईल. किंबहुना ज्ञानदेवादि संतांनीं चारशें वर्षें महाराष्ट्रांत जें नवचैतन्य भरलें त्याचेंच फळ शिवछत्रपतींच्या स्वराज्यसंस्थापनेंत आलें हा महादेव गोविंद रानडे यांनीं तर्कशुद्ध पद्धतीनें प्रस्थापित केलेला सिद्धांत त्यांना मान्य होईल.

एकोणिसाव्या दशकाच्या शेवटच्या म्हणजे दहाव्या समासातहि असाच व्यवहारोपयोगी उपदेश आहे.

उपाधींत सांपडों नये । उपाधीस कंटाळों नये । १९-१०-२०

ही ओवी भगवद्गीतेंतील निष्कामकर्मांचें प्रतिपादन करते आणि परमार्थबुद्धि हें दासबोधाचें मूळ आहे, म्हणून तर व्यवहारानें भरलेल्या या समासात पुढें स्पष्ट सांगितलें आहे;

संसार मुळींच नासका । विवेकें करावा नेटका ।

नेटका करिता फिका । होत जातो ॥ २८

आणि विवेकयुक्त वैराग्य व तें प्राप्त करून घेऊन यथोचित कर्म करणें आणि तें निर्भयत्वानें करणें या स्पष्ट शिकवणीचा धडा ज्ञानदेवांनीं महाराष्ट्राला दिला. तेव्हा रामदासाच्या स्वकालीन कार्याचा योग्य गौरव करतानासुद्धा हे सत पगु नव्हते, टाळकुटे नव्हते, हें लक्षात ठेविलें पाहिजे. या सताचे आजचे अनुयायी टाळकुटे असतील आणि समर्थांचे आजचे अनुयायी दुसरे तसेच काहीं असतील म्हणून संताच्या किंवा समर्थांच्या कार्यावद्दल गैरसमज करून घेण्याचें प्रयोजन नाहीं.

ज्ञानेश्वरीच्या शेवटच्या अध्यायात अर्जुन म्हणतो—

जें मजतुम्हा आड । होतें भेदाचे कवाड ।
तें फेडोनी केलें गोड । सेवासुख ॥ १५७४
तरी आता तुम्ही आज्ञा । सकळदेवाधिदेवराज्ञा ।
करीन देईं अनुज्ञा । भलतियेविपर्यी ॥ १५७५

गतसदेह होऊन अर्जुन प्राप्त युद्धाला उल्हासानें उभा राहिला त्याप्रमाणें महाराष्ट्रानें व्हावें हा उपदेश भगवान् ज्ञानदेवांनीं केला आणि पुढें चारशें वर्षांनीं तोच उपदेश गुरुशिष्यसवादरूपानें समर्थांनीं केला आणि

नाना किंत निवारिले । नाना संशयो छेदिले ।
नाना आशका फेडिले । नाना प्रश्न ॥ १ १ १२

ज्ञानदेवाचा भर विवेकावर तसाच रामदासाचा ज्ञानदेवांनीं निष्कामकर्माची द्वारी पिरविली तशीच रामदासांनीं. ज्ञानदेवांनीं अज्ञानाचा निरास केला आणि

मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळी ।
तें योगिया पाहे दिवाळी । निरतर ॥ ज्ञा ४ ५४

असा उपकार जगावर केला. रामदासानींहि अज्ञानी आणि मूर्ख व पढतमूर्ख यांच्यावर झोड उठवून शहाणपणा व सावधानपणा महाराष्ट्राला पुन शिकविला ज्ञानदेव हा कविराजराजेश्वर, रामदास हा सामान्य जनाना सहज लोकमान्य गद्य घडे देणारा, पण त्याचा मार्ग एकच होता विवेकावर दोघाचा अत्त भर आणि मावळेपणाचा दोषानादि वटाळा रामदासांनीं मावळेपणा शिकविला नाहींच, पण ज्ञानदेवादिकाना मावळेपणाचे, भोळ्या भावाचे, गुरुत्वें म्हणविणाऱ्यांनीं पुढील स्वरचीत ओवी फटगत कराची.

तैसी वैराग्याची शीव न देखती ।
जे विवेकाची भाषा नेणती ।
ते मूर्ख केवी पावती । मज ईश्वरातें ॥ ज्ञा. ४-२५

म्हणजे असले आरोप करतांना ते दहा वेळां विचार करतील. असो. या विषयाची नुसती प्रस्तावना करण्यासाठीं हा लहानसा लेख लिहिला आहे. ज्ञानदेवांच्या परंपरेंतील श्रीसमर्थ रामदास होते आणि ही परंपरा अपूर्व कर्तृत्वाची होती, तिचें पूर्ण स्वरूप कळण्यासाठीं या मंडळीचे ग्रंथ पुनः पुनः मननपूर्वक व विचारपूर्वक वाचावेत, अशी विनंति वाचकांना करून येथें थांबतों.



## ( ९ )

# श्रीसमर्थ व शिवाजीचा अंतकाळ

( लेखक— श्री. गो. स. सरदेसाई, रियासतकार )

गेल्या चैत्र शु. १५ स रायगडावर शिवाजीमहाराजाचा निधनोत्सव साजरा करण्यात आला, त्या प्रसंगीं भाषण करण्याचें आमंत्रण मला आलें असल्यामुळें मी तोच निधनप्रसंग व्याख्यानासाठीं पसंत केला आणि त्या प्रसंगाचे उपलब्ध तपशील जमा करितांना समर्थांचें वाकेनिशी टिपण जरा बारकाईनें वाचलें त्यावरून शिवाजी समर्थांच्या संबंधानें जे कांहीं नवीन विचार मला सुचले, ते या लेखाच्या द्वारें प्रसिद्ध करण्याचा माझा उद्देश आहे. निरनिराळ्या बखरींतून शिवाजीच्या मृत्यूसंबंधीं कित्येक तपशील नजरेस आले तेहि मी या लेखांत जमेस धरले आहेत.

वाकेनिसी टिपण श्रीसांप्रदायिक विविध विषय खंड १ ला यांतील ले. २१ वर छापलेलें असून त्यावर कै. राजवाड्यांनीं एक लेख लिहून शिवाजीला समर्थांनीं अनुग्रहच दिल्याचा काळ वैशाख शु. ९ गुरुवार शके १५७१ ( इं० ता. १२ ४ १६४९ ) निश्चित केला आहे. या मुद्यावरहि आक्षेप घेण्यात आले असून वर सांगितलेलें वाकेनिशी टिपण कितपत विश्वसनीय मानावें याबद्दल पुष्कळसा मतभेद जाहीर झालेला आहे. खुद्द शिवाजीनें समर्थांचे मठास उत्पन्नें करून दिलेली सनद विश्वसनीय नाहीं, असेंहि कित्येकांचें म्हणणें आहे. तथापि हे कागद विश्वासार्ह आहेत असें मी मानतों, आणि त्यावरून जो निष्कर्ष माझे मतांत उतरला तो पुढें स्पष्ट करितों.

या टिपणांत समर्थांच्या चरित्रातील मुख्य प्रसंगांची व त्यांनी केलेल्या चमत्कारांची यादी दिलेली असून, ती समर्थांच्या निधनानंतर चारच दिवसांनी केलेली असल्यामुळें तींत दाखल असलेल्या हकीकती तत्कालीन समजुतीप्रमाणें विश्वसनीय मानल्या पाहिजेत. 'समजुतीप्रमाणें' असें म्हणण्याचें कारण, चमत्कारांचा हा विषय बहुधा ज्याच्या त्याच्या श्रद्धेवर अवलंबून असणार, म्हणून त्यांची तपासणी अश्रद्धेच्या दृष्टीनें होऊंच शकणार नाहीं. टिपणात लहान मोठीं ३९ कलमें आहेत, आणि समर्थांच्या वडिलांपासून तों त्यांच्या अंतापर्यंतची एकंदर हकीकत त्यांत आली आहे. ही हकीकत शुद्ध समर्थ व त्यांचे वडील बंधु श्रेष्ठ या दोघांची आहे. या ३९ नोंदींचें वर्गीकरण केल्यास असें दिसेल कीं, जन्ममृत्युविवाहादि कौटुंबीय प्रसंगाच्या १३, अघटित चमत्काराच्या १२, आणि देवतांची स्थापना, भेटी, अनुग्रह अशा गुरुत्वप्रकाशनाच्या १४ नोंदी आहेत. त्यांतील राजकारणी वर्तनाचे प्रसंग या शेवटच्या सदरात समजता येतील. कलम २ व ३ यात एकनाथांनीं श्रेष्ठ व समर्थ यांच्या बालपणीं त्यांच्या भेटी घेऊन आदर दाखविला असें वर्णन आहे तें चूक होय. कारण एकनाथाचा मृत्यु शके १५२१ त झाल्यानंतर सहा वर्षांनीं शके १५२७ त श्रेष्ठाचा व त्याच्यामागून तीन वर्षांनीं समर्थांचा जन्म झाला. भक्तमंडळींनीं लिहून ठेविलेल्या आधारावर टिपणाची रचना असल्यामुळें असा थोडा कालविपर्यास होणें अशक्य नाहीं. तूर्त आपण या टिपणावरून शिवाजी-समर्थसंबंधावर काय प्रकाश पडतो तो पाहूं.

टिपणातील कलमें १२, १८, २६, ३४, ३७ व ३८ या पाचातच समर्थांचा संबंध शिवाजीशीं आल्याचें दाखल आहे. तंजावरास जाऊन एकोजीराजास अनुग्रह केल्याचा उल्लेख २६ व ३७ या दोन कलमात, आणि संभाजीनें समर्थांचें दर्शन राज्यारोहणापूर्वी घेतल्याचा उल्लेख ३९ व्या कलमात आहे. पैकीं शिवाजीच्यापुरतेंच पाहणें तर अनुग्रह दिल्याचें कलम १८, व ३८ व्या कलमातील अखेरची भेट हे दोनच प्रसंग महत्त्वाचे गणता येतील. पैकीं शेवटच्या भेटीचा प्रसंग शिवाजीच्या मृत्यूला अनुलक्षून असल्यामुळें त्याचें विवेचन प्रथम करितों.

पुत्राच्या दुराचारामुळें शिवाजीचे अखेरचे दिवस अत्यंत दुःखात गेले. थोर पराक्रमाबरोबर थोर दुःखेंहि वाहून ठेवलेलीं असतात हें अकबर, नेपोलियन, शिवाजी यांच्या उदाहरणावरून उघड दिसतें. कोणा एका ब्राह्मण सुनेबरोबर अया-

चार केल्याचा बोभाटा शिवाजीचे कानावर आल्यावरून त्यानें स. १६७८ त संभाजीस पन्हाळ्यावर कैदेदाखल बंदोबस्तांत ठेविलें. यावरून तो अर्थात्‌च बापावर अत्यंत चिडून गेला आणि भीमेच्या काठीं बहादूरगड येथें औरंगजेबाचा सरदार दिलीरखान होता त्याच्याशीं आगाऊ संधान बांधून ता. १३ डिसेंबर स. १६७८ रोजीं संभाजी बायको येसूबाईस बरोबर घेऊन पन्हाळ्यावरून निसटला आणि करकव येथें जाऊन दिलीरखानास भेटला. याबद्दल खानास अत्यानंद झाला हें सांगणें नकोच. त्याला वाटलें आता दक्षिण देश जिंकण्याचें आपलें काम खास पक्कें झालें. मोठ्या सन्मानानें संभाजीस मुक्कामावर आणून खानानें त्याचा सत्कार केला आणि ही आनंदाची वार्ता त्यानें तावडतोब बादशहास दिल्ली येथें लिहून कळविली.

प्रथम त्या दोघानीं विजापुरचें राज्य हस्तगत करण्याचा विचार ठरवून त्या दिशेनें मोहीम सुरू केली. विजापुरास त्या वेळीं विशेष बंदाधुंदी माजून तें राज्य अगदीं डबघाईस आलें होतें. तें हस्तगत केल्यास आपणास शिवाजीवर दाब बसविता येईल असें त्या दोघानीं अनुमान बांधिलें, तें फारसें गैर नव्हतें. आपली सर्व सिद्धता करून त्यानीं बहादुरगडाहून दक्षिणेस कूच केलें. शिवाजीच्या कारभाराची अंतर्गत व्यवस्था संभाजीस पूर्ण माहीत असल्यामुळें दिलीरखानानें त्याचा उत्कृष्ट उपयोग करून घेतला. सातारच्या पूर्वेस भूपाळगड किल्ला अगदीं एका बाजुस आहे. त्या किल्ल्यावर अनेक मराठे कुटुंबातील बायकामुलें सुरक्षित जागा म्हणून ठेवलेलीं होतीं. शिवाजीचे सेनानी बहुधा मोहिमेवर असत, त्यानीं आपले कबिले या गडावर ठेविले होते. तसेंच पुष्कळ रुपये व जडजवाहीर शिवाजीनें या किल्ल्यावर कोणाचे हातीं लागू नये म्हणून ठेविलें होतें. या गोष्टी संभाजीस माहीत होत्या आणि भूपाळगड काबीज केला कीं शिवाजीचें नाक चांगलें ठेचलें जाईल अशा विचारानें त्यानीं त्या किल्ल्यावर हल्ला केला. तेथील बंदोबस्तास शिवाजीचा भरवशाचा सरदार फिरंगोजी नरसाळा होता. संभाजी चालून आला असतां त्याजवर आनून गोळा टाकण्याची छाती फिरंगोजीस झाली नाहीं. त्यानें लढाईचा प्रसंग न करितां किल्ला स्वाधीन करून दिला, याबद्दल पुढें शिवाजीनें फिरंगोजीस ठपका दिला. ता २४ १६७९ रोजीं किल्ला खानाचे ताब्यात आला आणि नंतर त्यानीं विजापुराकडे चाल केली.

हें अरिष्ट आलेलें पाहून विजापुरच्या वजिरानें शिवाजीकडे मदत मागि

रखी आणि वगैरेहि करून आमचा बचाव करा अशी कळकळीची विनंति केली. शिवाजीलाहि मुलाचा उपद्व्याप बंद पाडावयाचा असल्यामुळें त्यानें आपल्या सैनिकांस योग्य ताकीद देऊन पन्हाळ्यावरून विजापुराचे बचावास फौज रवाना केली. या फौजेनें स. १६७९ च्या ऑगस्टांत दिलीरखानाचा पराभव करून त्यास व संभाजीस विजापुरावरून माघारें फिरविलें. संभाजीकडे हेर पाठवून त्याचें मन वळविण्याचा शिवाजीचा प्रयत्न चालूच होता. दिलीरखान व संभाजी परत फिरले, त्यांनीं पन्हाळा हस्तगत करण्याचा बेत ठरविला. शिवाजीची फौज बाहेर होती व पन्हाळ्याची बंदस्ती संभाजीला चांगली अवगत असल्यामुळें तो किल्ला हस्तगत केला कीं शिवाजीचें दक्षिणचें राज्य संपलें असा हा योग होता. शिवाजीवर हा प्रसंग किती आणीबाणीचा आला होता, याची वाचकांस कल्पना होईल.

दिलीरखानानें बादशहाकडे शिफारस केली होती कीं, संभाजीला मोठी मनसबदारी देऊन आपल्या नोकरींत ठेवून घ्यावें, म्हणजे मराठ्यांचा जोर सर्व नाहींसा होईल. पण ही शिफारस बादशहानें मंजूर केली नाहीं. त्याला वाटलें संभाजी कदाचित् मुद्दाम बापाचे शिकवणीनें फितुरी करून आपणास फसविण्या-साठींच आला असेल. तर त्यास पकडून कैदेंत ठेवला म्हणजे शिवाजीवर शह बसेल, असें मनांत आणून बादशहानें दिलीरखानास हुकूम पाठविला कीं, संभाजीस तावडतोब दिल्लीस बंदोबस्तानें पाठवून द्यावा.

हा हुकूम आल्यावर दिलीरखानास मोठी पंचाईत उत्पन्न झाली; आणि बादशहाच्या हुकुमाची थोडीबहुत कुणकुण संभाजीचे कानावर जाऊन तोहि भय-भीत झाला. इकडे शिवाजीचे हस्तक येऊन त्यास अंतस्थरूपें भेटत होते आणि 'तुम्ही परत आल्यास शिवाजी तुम्हास सर्व अपराधाची क्षमा करून पाहिजे तें देईल,' अशा प्रकारें त्याची समजूत घालीत होते. विजापुर सोडून खान व संभाजी तिकोट्यास आले. तेथें दिलीरखानानें नाहक लोकांची भयंकर लूट करविली. त्या प्रसंगीं अब्रू बचावण्यासाठीं पुष्कळ हिंदुमुसलमान स्त्रियांनीं विहिरींत जीव दिले. हा प्रकार संभाजीस अत्यंत दुःसह वाटला. ता. १८-११-१६७९ रोजीं तिकोटें सोडून पुढें पन्हाळ्याकडे येतां त्याचा मुक्काम अथणीवर झाला. अथणीची पेठ समृद्ध होती ती खानानें लुटून सर्व हिंदूस पकडिलें आणि त्यांची विक्री करायची असा पुकारा केला. संभाजीनें खानास कळविलें, 'अशा प्रकारें हिंदु प्रजाजनांस पकडून त्यांची विक्री करणें आम्हास बिलकूल पसंत नाहीं.'

यावरून उभयतांमध्यें सडकून भांडण झालें. संभाजीला धास्ती पडली कीं, आतां खान आपणांस पकडून कैद करील. त्याबरोबर ता. २१ नोव्हेंबर रोजीं रात्रीं संभाजी एकाएकीं पळून परत विजापुरास गेला. लगेच खानानें त्यास पकडून आणण्यासाठीं आपलीं माणसें मागोमाग पाठविलीं. संभाजीला ही वार्ता कळताच ता. ३० नोव्हेंबर रोजीं तो विजापुरांतून गुप्तरूपानें पळून बाहेर शिवाजीकडून माणसें आलीं होतीं त्यांस जाऊन मिळाला आणि घोड्यावर बसून त्वरेनें पन्हाळ्यास पोंचला. ता. ४-१२-१६७९ रोजीं त्याचा मुक्काम पन्हाळ्यास असल्याचा उल्लेख सांपडतो. मिळून जवळ जवळ एक वर्ष संभाजी बाहेर होता.

संभाजी परत आल्याची बातमी शिवाजीस पोंचून तोहि लगोलग त्याचे भेटीस पन्हाळ्यास गेला. तेथें बापलेकाचें वास्तव्य एक महिना झालें. शिवाजीनें परोपरीनें त्याची समजूत घातली. 'औरंगजेबाचा कावा तुला दगा करावयाचा होता. श्रीनें कृपा करून सोडवून आणिलें. मोठें संकट टळलें. तू ज्येष्ठ पुत्र तुझ्या चित्तीं स्वतंत्र राज्यकर्तव्य आहे असें मला कळलें तर या सर्व राज्याचे दोन विभाग करून एक भाग तुला व एक राजारामास देतों.' मग पितापुत्र बसून दोघांनीं सर्व दौलतीची गणती केली. खजिना, कारखाने, गडकोट, जिन्नस, सुलूप, नाना प्रकारचा जिन्नस, जडजवाहीर, सुवर्ण चांदी नाणेवार, कापड, धान्य या सर्वांची समक्ष मोजदाद केली.* सरदार शिलेदार हशम, जुने नवे किल्ले वगैरे सर्वांच्या यादी करून पुढील व्यवस्थेबद्दल पुत्राची समजूत केली. पण पाहतां अर्थ नजरेस येईना. नाना प्रकारें बोध शिकविला, पण अर्थी उपतिष्ठा झाली नाहीं. तेव्हां अत्यंत खिन्न मनानें शिवाजीमहाराज पन्हाळ्याहून सज्जन गडावर समर्थांचे भेटीस गेले, त्या भेटीचें वर्णन बाकेनिसी टिपणांत आहे तें असें—

'शके १६०१ सिद्धार्थी संवत्सरीं पौष शु. ९ स शिवाजीमहाराज समर्थांचे भेटीस आले, ते माघ शु. १५ पर्यंत होते. नित्य नित्य समारंभही त्या काळा बहुत केला. समर्थ निरोप देत समयीं अनेक प्रकारच्या राजधानीसमर्थे सांगोन अध्यात्मपर विषयही श्रींनीं सांगितला. तीन दिवस समाधि लागोन राजश्री बसले होते. नंतर समाधि उत्थापन करून पुनः अनेक प्रकारच्या गोष्टी होऊन त्यांत महाराज परधामास जाणार हें समर्थांनीं सुचविलें. माघ शु. १५ स

*टीप—या मोजदादीचे कागद आतां छापलेले आहेत

राजश्री आज्ञा घेऊन रायगडास गेले. तेथें शके १६०२ रौद्र संवत्सरीं चैत्र शुद्ध पूर्णिमा रविवारीं परंधामाप्रति गेले. '

शिवाजीचा अंतसमय पुष्कळ बखरकारांनीं अत्यंत करुण वाणीनें वर्णिला असून, त्यांत सवा महिनापावेतों शिवाजीनें समर्थांचा सहवास केला या गोष्टीची भर पडल्यानें तें कारुण्य जास्तच उठावदार दिसतें. संभाजीच्या पळण्यापासून शेवटच्या वर्ष सहा महिन्यांतील हे तपशील कितिकांनीं जुळवून लक्षांत आणिले आहेत तें मला माहीत नाहीं. मीं ही जुळवणी केली तिजवरून जे प्रकार ठळक-पणें मनांत उतरतात ते असे—

स. १६७८ च्या गुढी पाडव्यास शिवाजीमहाराज कर्नाटक स्वारीचें भारी यश संपादून पन्हाळ्यास दाखल झाले, तेव्हांपासूनच त्याचा भाग्यरवि त्वरेनें अस्तास चालला. त्या सालीं त्यांची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत चालली. त्यांत मानी पुरुषाच्या मनास अत्यंत झोंबणारा असा पुत्राच्या फितुरीचा प्रकार कसा घडून आला त्याचें वर्णन वर केलें आहे. स. १६७९ च्या डिसेंबरांत मुलाची समजूत काढून राज्याची निरवानिरव करण्यासाठीं शिवाजीमहाराज मुद्दाम पन्हाळ्यास गेले. तेथें संभाजीच्या देखत त्यांनीं आपल्या हयातींत कमावलेल्या समस्त संपत्तीची तपशीलवार मोजदाद करून एका पराक्रमी पुरुषास लहानशा हयातींत काय करितां येतें याचें सप्रमाण प्रदर्शन पुत्रास दाखविलें आणि त्याच्या अंतः-करणांत भावी आशेला अंकुर फोडण्याचा निदान्त प्रयत्न करून पाहिला. राज्याचे दोन विभाग करून दोघा पुत्रांस द्यावे ही योजना मनांत आणून ती त्यांनीं संभा-जीस समजावून दिली. परंतु त्यानें ती मान्य केली नाहीं. तेव्हां जनार्दन नारायण हणमंते, सोनाजी नाईक बंकी वगैरे मंडळींस संभाजीवर पाहरा करण्यास म्हणून ठेवून आणि राजारामाचें लग्न करून परत येतों असें त्यास सांगून, पुढील विचार ठरविण्यासाठीं ते सज्जनगडास समर्थांकडे आले. पौष शु. ९ पासून माघ शु. १५ पर्यंत म्हणजे ३१ डिसेंबर १६७९पासून ४ फेब्रुवारी स. १६८० पर्यंतचा दीर्घ काळ त्यांनीं समर्थांशीं वाटाघाट करण्यांत घालविला. आतां याचा अवतार संपत आला असें समर्थांनीं ताडिलें, त्याचे उल्लेख वाकेनिशी टिपणांत आहेत. एवढी उद्विग्नता यावज्जन्म शिवाजीमहाराजांनीं कधीं प्रगट केली नाहीं. तीन दिवस तर त्यांचें देहभानहि सुटलें होतें. अशा या भेटींतहि मनास शांति उत्पन्न न होतां किंवा पुढील राज्यकारभाराचा विचार कायम ठरविल्याशिवाय ते माघांत रायगडास आले. तेथें

राजारामाचें लग्न केलें. नंतर कांहीं दिवसांनीं ज्वराची व्यथा झाली. विचार पाहता आयुष्याची मर्यादा झाली असें कळून चुकलें. दोघा पुत्रांस राज्य वाटून देण्याची कल्पना संभाजी राजांस मान्य झाली नाहीं. चाळीस हजार होनांची पुण्याची जागीर होती त्याचें एक कोटि होनांचें राज्य पैदा केलें तें सरक्षण करील किंवा वृद्धीतें पाववील ऐसा पुत्र नाहीं अशा खेदजनक विचारांत भागीरथीचें उदक प्राशन करून मायान्तःउमर्यी देह ठेविला. सभासदानें वर्णिलेल्या या थोर पुरुषाच्या अंतकाळचा हा प्रकार प्रत्येक अभ्यासूनें लक्षपूर्वक वाचावा अशी माझी विशेष सूचना आहे. यानंतर चौदा वर्षांनीं राजारामाचे माहितीसाठीं तो प्रसंग सभासदानें प्रत्यक्ष पाहिलेला होता तसाच वर्णिला आहे. त्यांत कोणतीहि तफावत मानण्याचें कारण नाहीं. सर्व प्रकार यथास्थित लक्षात यावा म्हणून निरनिराळ्या ठिकाणच्या हकीकती एकत्र जुळवून मुद्दाम अंमळ विस्तार पत्करूनच वर नमूद केल्या आहेत.

शिवाजी-समर्थांची वरील भेट शेवटचीच होती. आपली प्रकृति क्षीण होत चाललेली, संभाजीचा प्रकार हा असा, राज्याचा फापटपसारा तर दृष्टीसमोर उभा, दाराशीं शत्रु टपून बसलेले, अशा विवंचनांनीं अत्यंत गांगरून जाऊन उपाय-चिंतनासाठीं म्हणून मुद्दाम शिवाजी दीर्घ काल समर्थांचे आश्रयास जाऊन राहिला. एकंदर आयुष्यांत सबंद सवा महिना कांहीं हालचाल न करता एकाच ठिकाणीं वसून घालविला असा दुसरा प्रकार शिवाजीसंबंधानें आढळत नाहीं. शिवाजीची मनोभावना प्रेमळ व श्रद्धापूर्ण होती. अडचण किंवा संकट आलें कीं परमेश्वरा-वर श्रद्धा ठेवून सत्पुरुषाचा समागम करण्याचा त्याचा क्रम नेहमींचाच होता. तज्ज्ञ मंडळींची व स्वतःच्या मनाची सल्ला, वडील मंडळींचे आशीर्वाद, सत्-मंडळींचा कृपाप्रसाद व परमेश्वरावर हवाला या साधनचतुष्टयाच्या आश्रयावरच त्यानें अनेक दुर्धर प्रसंग निभावून अलौकिक पराक्रमाचीं कृत्यें करून दाखविलीं. मातुःश्रीचा आशीर्वाद व तुळजाभवानीचा कौल घेतल्याशिवाय त्यानें पाऊल टाकिलें नाहीं. त्यानें वंद्य मानलेल्या साधु पुरुषांचीं निदान पांच पंचवीस नांवें ठिक ठिकाणीं आढळतात. त्यांत शेवटीं शेवटीं त्याचा जिव्हाळा समर्थांकडे विशेष ओढ-वला. कारण शिवाजीची एकंदर गृहस्थिति व त्याचें उद्योगाचें रहस्य समर्था इतकें दुसऱ्या कोणास विदित नव्हतें. म्हणून स. १६७९ च्या अखेरीस अत्यंत वैतागून शिवाजी मन शांतीच्या व उपायचिन्तनाच्या उद्देशानें समर्थांचे आश्रयास

गेला. समर्थांनाहि त्याच्या कष्टमय स्थितीची पूर्ण करुणा उत्पन्न झाली. पण सत्पुरुष झाले म्हणून भवितव्यतेला थोडाच आळा घालूं शकणार! 'राजनीति व अध्यात्मपर विषय' समर्थांनीं शिवाजीस सांगितला. म्हणजे राज्याची पुढील व्यवस्था काय करावी यासंबंधीं त्यांचें बोलणें झालें, पण सरदार व प्रधान यांस व पुत्रास एकत्र आणून सर्वांच्या देखत विशिष्ट अशी एखादी योजना ठरवून ती जाहीर करण्यांत आली नाहीं. शिवाजीस चैन पडेना. तीन दिवसपर्यंत बेहोष राहून त्यानें अन्नपाणीसुद्धा ग्रहण केलें नाहीं. समर्थांनीं या संसाराची निःसारता त्याचे नजरेस आणून मन शांत ठेवण्याचा उपदेश केला. मिळून राजकारणाची तड म्हणून कांहीं लागलीच नाहीं. समर्थ हे राजकारणी पुरुष असते तर मराठ्याचे राज्याची कांहीं तरी टिकाऊ व्यवस्था ठरविण्याची ही संधि त्यांना अत्यंत निकडीची होती यांत संशय नाहीं.

शिवाजी-समर्थ यांच्या भेटीचे जे दुसरे प्रसंग घडले त्यांत सुद्धा समर्थांची अध्यात्मवृत्तिच जास्त निदर्शनास आली. शिंगणवाडी येथें ता. १२-४-१६४९ रोजीं शिवाजीस समर्थांनीं त्रयोदशाक्षरी 'श्रीराम जयराम जयजय राम' या मंत्रोपदेशाचा अनुग्रह दिला. हाहि प्रसंग शिवाजीला मोठ्या अडचणीचा उपस्थित झाला होता. त्याच्या मंडाळीमुळें आदिलशाहानें त्याचे बापास शिंजीस पकडून स. १६४९ च्या फाल्गुन महिन्यात विजापुरास आणिलें आणि त्यास देहान्त शासन करण्याचा धाक घातला. सिंहगड परत देऊन केलेल्या संपूर्ण उद्योगावर पाणी सोडावें किंवा बापाच्या मृत्यूचें पाप माथा घ्यावें अशा दुहेरी कैचींत अडकला जाऊन शिवाजीनें समर्थांचा आश्रय केला. तेथें वैशाख शुद्ध नवमीस त्यानें समर्थांकडून मंत्रोपदेश घेतला आणि बरोबर सवा महिन्यानें ज्येष्ठ पूर्णिमेस शहाजीची सुटका झाली. अर्थात् गुरुकृपेनें आपलें संकटनिवारण झालें असेंच प्रचीति शिवाजीला आली असावी.

या दोन थोर व्यक्तींच्या भेटीचा आणखी एक प्रसंग बाकेनिशी टिपणात नमूद आहे, पण तो संकटाचा नसून आनंदाचा आहे. आनंद संवत्सरीं ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस म्हणजे स. १६७४ च्या सुमारास रायगडावरील राज्याभिषेकसमारंभ आटपल्यावर 'महाराज सज्जनगडीं येऊन दीडमास श्रीपाशीं समागम झाला. ब्राह्मणभोजनादि समारंभ बहुत झाले.' गुरुशिष्यास या समयीं अपूर्व आनंदाचें भरतें येऊन सर्व मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणे वाटलें, असा हा प्रसंग महाराष्ट्राचे

इतिहासात विशेष संस्मरणीय मानला पाहिजे. या समयीं या दोन व्यक्तींच्या गत-कालीन अद्भुत चरित्राची भरपूर उजळणी झाली असावी असें समजण्यास हरकत नाहीं. समर्थ राजकारणात पडणारे असोत वा नसोत, त्यांच्या कृपाप्रसादानें आपले मनोरथ सिद्धीस जातात अशी शिवाजीची भावना दिसते. सन १६७८ च्या 'भाद्रपदमासीं पन्हाळ्यास जाताना छत्रपति सज्जनगडास आले. आश्विन शु. १० चे दिवशीं (ता. १५-९-१६७८) पत्र करून स्वामीपाशीं ठेविलें' असा मजकूर ३७ व्या कलमात आहे. हें पत्र म्हणजे रामदासी मठास कायमचें उत्पन्न करून दिलेली सुप्रसिद्ध सनद होय. ही सनद पारसनिसांनीं 'कैफीयती व यादी' या पुस्तकात पृ. २१६ वर छापली आहे, तिच्या खरेपणाविषयीं संशय घेण्यास मला कांहीं कारण दिसत नाहीं. त्या सनदेची भाषा औपचारिक किती व वस्तु-स्थितिदर्शक किती हें ठरविणें ज्याच्या त्याच्या भावनेवर अवलंबून राहील, पण ती सनदच बनावट म्हणता येत नाहीं. देवब्राह्मणाच्या व साधुसंताच्या आशिर्वादानें आपले मनोरथ सिद्धीस जातात अशी ज्या शिवाजीची अढळ समजूत, त्यानें रामदासी मठास वरील सनद करून देणें बिल्कूल अप्रयोजक नाहीं. अशा सनदा त्यानें इतरासहि पुष्कळ करून दिलेल्या असून 'स्वामीच्या अनुष्ठानबळें राज्यास अधिकारी झालों आणि सकळ मनोरथ चिंतिले पावलों' अशा प्रकारचे त्याचे लेख अन्यनहि आढळतात. शिवाजीनें कुलोपाध्ये सिद्धेश्वर भट ब्रह्मे यास स. १६५३ त लिहिलेला मजकूर असाच आहे.

समर्थ जर शिवाजीला राजकारणी सल्ला देणारे मुत्सद्दी स्वरूपाचे असते तर मृत्युपूर्वीच्या त्या उभयतांच्या भेटींत राज्याची भावी व्यवस्था त्यास ठरविता आली असती. संभाजीला राज्य सांभाळण्याची अक्कल नाहीं ही गोष्ट सर्वांनाच पटल्यासारखी होती. मनुष्यस्वभाव व परिस्थिति ओळखून तदनुसार आगाऊ योजना ठरविणें हेंच राजकारणाचें मुख्य इंगित. शिवाजी सवा महिना समर्थांजवळ राहिला, त्याचा दुसरा हेतु कांहीं एक असणें शक्य नाहीं. राज्याची व्यवस्था काय करायची याचाच त्याला घोर लागला होता. समर्थांना राजकारणांत पडण्याची इच्छा असती तर त्यानीं शिवाजी, त्याचे पुत्र व मुत्सद्दी यास जवळ आणून सर्वांच्या विचारें एखादी व्यवस्था जाहीर केली असती तर पुढील अनर्थ टळले असते. शिवाजीनें मरणापूर्वी निश्चित योजना अशी कांहींच ठरविली नाहीं किंवा जाहीर केली नाहीं. थोर पुरुषांच्या मरणसमयीं मुख्य काळजी घ्यावयाची ती हीच

असते. संभाजीला दूर सारून राजारामास गादीवर बसवायचा हा जो प्रयत्न पुढें झाला, तोच जर आगाऊ जाहीर झाला असता तर संभाजीचे उपद्व्याप बिलकूल सिद्धीस गेले नसते. समर्थांना अशी तर्तूद सुचली नाहीं किंवा ठरविता आली नाहीं, यावरून उघड म्हणावें लागतें कीं, समर्थ हे राजकारणी पुरुष नव्हते. निदान वरील प्रसंगाचा दुसरा अर्थच निघत नाहीं.

एवंच या विषयाचा मुख्य कयास माझ्या मनास पटतो तो असा. समर्थ रामदास हे शिवाजीचे गुरु होते, त्यानें त्यांचा मंत्रोपदेश घेतला, तेव्हां म्हणजे स. १६४९ त त्यांची भेट झाली, तदुपरांत तशींच कांहीं संकटें आलें म्हणजे मनःशांतीसाठीं शिवाजी त्यांचा समागम करी, आणि त्याचे मनांत समर्थांविषयीं परम आदर होता, इतक्या गोष्टींसंबंधानें सामान्यतः संशय मानण्यास जागा नाहीं. राजकारण हा शब्द इतका मोघम व विस्तृत अर्थाचा वाचक आहे, कीं राजकारणी व्यवहार संपतो कोठें आणि आध्यात्मिक सुरू होतो कोठें याची स्पष्ट मर्यादा ठरविणें अशक्य आहे. तथापि समर्थांनीं प्रत्यक्ष राजकारणांत पडून एखादी विशिष्ट सल्लामसलत किंवा शत्रूस जिंकण्याची स्वतःची युक्ति शिवाजीस सांगितल्याचा दाखला एवढ्या प्रचंड वाङ्मयांत उपलब्ध होत नाहीं. शिवाजीनें मात्र संकटसमयीं त्यांचा आश्रय केलेला आढळतो, पण अशा समागमांत त्या उभयतांचा काय विचार ठरला तो त्या दोघांव्यतिरिक्त बाहेरच्यास कधीं कळला नाहीं, म्हणून समर्थांच्या सल्ल्यानें अमुक एक विशिष्ट प्रकार शिवाजीनें केला याचा पुरावा मिळत नाहीं. उलट 'संसार असार आहे, तू कोणताहि अहपणा धारण करूं नको, जगाच्या प्रचंड घडामोडींत तुझ्यासारख्या एका व्यक्तीचा पाड काय !' अशा प्रकारचा मामुली वेदान्त समर्थांनीं शिवाजीस शिकवून प्रत्येक प्रसंगीं त्याची परत रवानगी केली असेंच सर्व प्रसंग बोलतात. पण यामुळें समर्थांच्या थोरपणास वैगुण्य येतें असें मात्र मी मानीत नाहीं. दोघेहि आपापल्यापरी थोर पुरुष होते असेंच मला वाटतें.

ता. १७-५-१९३५

( १० )

## श्रीसमर्थांचा संदेश

( लेखक— श्री. लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए., एल्एल्. बी., पुणें)

श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या उद्घाटनसमारंभासारख्या मंगल व पवित्र प्रसंगीं समारंभाच्या चालकांनीं माझ्यासारख्या एका सामान्य इसमास श्रीसमर्थांचा संदेश या विषयावर आपले विचार व्यक्त करण्याची संधि दिली, याबद्दल मी त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

प्रथम मी हें प्रांजलपणानें कबूल करतों कीं, मी एखादा सर्वसंगपरित्याग केलेला असा रामदासी सांप्रदायिक नाहीं, किंवा श्रीसमर्थांच्या वाङ्मयाचा बारकाव्यानें अभ्यास केलेला अगर करीत असलेला असा अभ्यासू हि नाहीं. तथापि, याबरोबरच हेंहि सांगितलें असता औचित्याचा भंग होईलसें मला वाटत नाहीं कीं, श्रीसमर्थांबद्दलच्या अभिमानाचीं, किंबहुना कडव्या अभिमानाचीं, जीं बीजें माझ्या मातोश्रीनें माझ्या बालमनात रुजवून ठेविलेलीं होतीं, तीं कालगतीनें कांहीं अंशीं समर्थवाङ्मयाच्या थोड्याशा अभ्यासामुळें व कांहीं अंशीं इतरत्रेय मिळणाऱ्या अनुभवामुळें माझ्या मनात बऱ्याच खोलवर पाळेंमुळें करून बसलेलीं आहेत. विद्वानांच्या या सभेंत हा निबंध वाचण्यास मला जर कोणता एखादा हक्क प्राप्त होत असेल, तर तो हाच होय. याशिवाय दुसरा एखादा हक्क निदान माझ्या आढळांत तरी येत नाहीं.

श्रीसमर्थांचें चरित्र व चारित्र्य, त्यांनीं केलेली बहुविध व बहुमोल कामगिरी, त्यांच्या कार्याचा व्याप, त्यांची अवाढव्य ग्रंथनिर्मिति, अर्वाचीन महा-

असल्या या आत्मघातकी प्रवृत्तीचा कडेलोट आठव्या ते सतराव्या शतकापर्यंतच्या कालात घडून आला! त्यापूर्वीच्या कालात हिंदुस्थानावर अनेक परचक्रें येऊन कोसळलीं, तीं हां हां म्हणता यशस्वीहि झालीं, परतु तीं आपलीं कायमचीं ठाणीं येथें देऊन न बसल्यामुळें वावटळी प्रमाणें त्यानीं कांहीं काल समाजाची नासधूस केली खरी, पण त्याचा कायमचा उपसर्ग लोकाना पोहोंचला नाहीं. नवव्या शतकापासून मात्र जीं परचक्रें आलीं, त्याचा उपसर्ग आर्यसमाजास कायमचा होऊं लागला हिमालयापलीकडील वाळवटातील टोळधाडी आर्यावर्तावर यशस्वीपणानें येऊन आदळू लागल्या एक टोळधाड सिंध प्रातावर आदळून तिनें जवळ जवळ तो सर्व प्रातच्या प्रात यवनमय करून सोडला, गझनीच्या महमुदानें हिंदुस्थानावर स्वाऱ्यावर स्वाऱ्या करून येथून अपार सपत्ति लुटून परत केली, जुलूमजबरदस्तीनें पजाबातील असख्य लोकाना धर्मांतर करण्यास भाग पाडलें, व शवटीं सोरटी सोमनाथाचा विध्वस करून जणू काय आर्यसस्कृतीच्या गाभ्यावरच घाव घातला, आणि आपल्या मूठभर सैनिकाना घेऊन बावर खैवर घाटातून दीन दीन करीत दिल्लीच्या रोखानें जो खालीं उतरला, तो थेट दिल्लीस पोहोंचून सरळ दिल्लीच्या तख्तावर आरूढ झाला व तेव्हापासून तों पुढें अवरजेबाच्या अतकाळपर्यंत इस्लामी सस्कृतीनें सर्व हिंदुस्थानभर जो हाहा:कार उडवून दिला त्याचें वर्णन इतिहासानें नमूद करून ठेविलेलेंच आहे हिंदूचें वित्त, जीवित व अब्रू हीं इस्लामधर्मियाच्या केवळ नि श्वासावर अवलबून राहू लागलीं! हिंदु सिंहासनें नष्ट करण्यात येऊन त्या ठिकाणीं इस्लामी तख्तें उभारण्यात आलीं हिंदु मदिराच्या ठिकाणीं इस्लामी मशिदी स्थापण्यात आल्या, असख्य ब्राह्मणी व गुजरिणी भ्रष्ट करण्यात येऊन त्याना इस्लामी जनानखान्यात खेंचण्यात आलें फार काय सागावें, तर सर्व हिंदूना अत्यत पूज्य असलेल्या श्रीकाशीविश्वेश्वराच्या देवालयाचा विध्वस करून त्या जागीं एक टोलेजग मशीद उभारण्यात आली! आणि या पराक्रमाची स्मृति हिंदु मनाला सतत दश करीत राहावी म्हणून की काय, मूळ देवालयाची एक भिंत तशीच कायम ठेवण्यात आली, व ती अद्यापहि तशीच कायम आहे! सारांश, या कालांत इस्लामी सस्कृतीनें आर्य सस्कृतीवर अनिर्वाच्य असे नाना अत्याचार व अनाचार केले असताहि, तिच्या या धांगडधिंग्यास म्हणण्यासारखा आळा आर्यसस्कृतीस घालता आला नाहीं!

या कालात हिंदु संस्कृतीचे अनुयायी अल्पसंख्याक होते काय? त्यांच्या ठायीं शौर्यवीर्यादि गुण लुप्त झालेले होते काय? आपला धर्मावरचा व संस्कृतीवरचा त्याचा विश्वास नष्ट झाला होता काय? याचें उत्तर एकच, व तें "नाहीं" हेंच होय. तर मग, इस्लामी संस्कृतीपुढें शूराचें शौर्य म्याद का बनलें? मुत्सद्यांची मुत्सद्देगिरी बेवकुफ कां ठरली? विचारवंतांचे विचार अविचारी कां झाले? या कालात आचार्यांचीं आचार्यपीठें गजबजलेलीं होतीं, तत्त्वशास्त्र्यांचे शाब्दिक काथ्याकूट अव्याहत चाललेले होते, आणि साधुसंतांचें पीक तर मनमुराद आलेलें होतें. तरी पण, हिंदु संस्कृति मृतप्राय होत चाललेली अशी का दिसत होती? इंद्रप्रस्थाचें तक्त हक्कानें हिंदूंचें असताना तें इस्लामी बादशहाचें कां बनून गेलें, इतकेंच नव्हे, तर त्या तक्ताविषयीं ज्वाज्वल्य अभिमान हिंदु राजे व महाराजेच का बाळगूं लागले? 'विटेवरी उभा कटेवरी हात' अशा पंढरीच्या विठोबास परोपरीनें आळविणारे त्याचे भक्तगण त्याच विठोबावर प्रसंग गुदरला असता त्याचें संरक्षण माणुसकीला धरून करण्याऐवजीं त्याला पळवून नेण्यांतच धन्यता का मानूं लागले? बेदरच्या बादशहाचा तगादा लागल्यावर पंढरीच्या विठोबानें दामाजीपंतासारख्या आपल्या निःसीम भक्तासाठीं त्या बादशाहीवर आपल्या परमेश्वरी सत्तेचा वरवंटा फिरविण्याऐवजीं विठ्या महाराचें सोंग घेऊन तो तगादा का भागविला? एकनाथाचे गुरु जनार्दनस्वामी हे हिंदुधर्मबुडव्या अशा बादशहाचे किल्लेदार राहूनच्या राहून समाजात साधुसंताची प्रतिष्ठा कसे मिरवूं शकले? स्वप्नांत दिलेलें राज्य खरोखरच व्यवहारात देणाऱ्या हरिश्चंद्राचीं, व अतिथीनें मागणी करताच आपल्या प्रिय अर्भकाचें शीर कुटणाऱ्या मातोश्रींचीं स्तुतिस्तोत्रें ज्या समाजात भक्तिभावानें गायलीं जाऊं लागलीं, त्या समाजात वरीलप्रमाणें उरफाट्या काळिजाचे व माणुसकीला काळिमा लावणारे प्रकार जर मान्यता पावूं लागले, तर त्यात आश्चर्य तें कोणतें?

श्रीसमर्थांपूर्वीच्या दीड दोन हजार वर्षांतील घातकी शिकवणीमुळें हिंदुसमाजाचा दृष्टिकोन व विचारकोन विपर्यस्त होऊन त्याची बुद्धि जी भ्रष्ट झालेली होती, ती पुनरपि पूर्वस्थलावर आणण्याचें अत्यंत श्रेष्ठ व पवित्र कार्य श्रीसमर्थांनीं आपल्या शिरावर घेतलें! या कालातील तत्त्वशास्त्र्यांनीं, बुद्धिमंतांनीं व साधुसंतांनीं धर्म व समाजधारणा या बाबतींत जें पाखंड माजविलेलें होतें, तें निर्मूल करण्याची जोखमीची व धाडसाची कामगिरी त्यांनीं आपल्या बालपणापासूनच पत्करली, आणि त्याच्या

व महाराष्ट्राच्या सद्भाग्यानें ती बहुतांशानीं पारहि पडली !

या महत्कार्याची स्फूर्ति परमेश्वरी कृपेनें त्यांच्या ठायीं त्यांच्या बालपणाच निर्माण झाली ! मोडकळीस आलेल्या हिंदुसमाजास एक दिव्य संदेश देण्यासाठींच परमेश्वरानें त्यांना जन्मास घातलें, व त्यांची पूर्तता झाल्यावरच परमेश्वरानें त्यांची अवतारसमाप्ति केली ! घटपटादींच्या वादविवादांत शाब्दिक कसरती करून प्रतिस्पर्ध्यांची बुद्धि स्तंभित करून टाकणारा असा त्यांचा बुद्धिमंतांसाठीं संदेश नव्हता ! किंवा एकीकडे संसाराची यथेच्छ टवाळी करणाऱ्या व दुसरीकडे त्याच संसाराचें सुखोपभोग आकंठ सेवन करूनच्या करून वर विरक्तपणाचा आव आणणाऱ्या दांभिक साधुसंतासाठींहि त्यांचा संदेश नव्हता ! तर त्यांचा संदेश सर्वसाधारण मनुष्यासाठीं ( average man ) ऐहिक जीवनाचा व माणुसकीचा असा होता ! तो हृदयाचा संदेश होता, तो बुद्धीचा संदेश नव्हता ! तो संसाराचा संदेश होता, संसारत्यागाचा संदेश नव्हता ! तो मृतांना जिवंत करणारा संदेश होता, तो जिवंतांना मृत बनविण्याचा संदेश नव्हता ! तो पर-आक्रमाचा संदेश होता, तो पर-आक्रम सहन करण्याचा संदेश नव्हता ! तो एकीकडे प्रेमाचा, तर दुसरीकडे प्रतिकाराचा संदेश होता ! तो स्वराज्य स्थापण्याचा व तसाच परराज्य बुडविण्याचाहि संदेश होता ! तो जयिष्णुतेचा संदेश होता, तो सहिष्णुतेचा संदेश नव्हता ! तो अभिमानाचा, किंबहुना दुरभिमानाचा संदेश होता, निरभिमानाचा संदेश नव्हता ! हा दैवी संदेश घरोघर व दारोदार पोहोंचविण्याचें अवतारकार्य करण्यासाठींच परमेश्वरानें गुरु गोविंदसिंग यांना उत्तरेंत व श्रीसमर्थ यांना दक्षिणेंत नियोजित केलेलें होतें. आणि एकानें शीख धर्माची, तर दुसऱ्यानें महाराष्ट्रधर्माची प्रस्थापना करून या दोन तेजस्वी धर्मांच्या कचाटींत मोंगली सत्ता पार धुळीस मिळवून दिली !

एकीकडे स्वतः विवाहबद्ध होऊन, एवढेंच नव्हे तर पहिल्या पत्नीच्या सरणावरच दुसऱ्या विवाहाचें बाशिंग बांधून संसाराचें यथेच्छ सेवन करणाऱ्या आणि दुसरीकडे " ब्रह्म सत्य जगन्मिथ्या, " " प्राण्या, संसार हा असार आहे, मायेचा बाजार आहे, मोहाचा पसारा आहे, हीं तुझीं बायकामुलें तुझे शत्रु होत, " अशा प्रकारें जनतेस वाग्बळ उपदेश करून तिची बुद्धि भ्रष्ट व कर्तृत्व राखी करणाऱ्या तोतया वेदान्त्यांच्या व साधुसंतांच्या विरुद्ध उघड बंड पुकारून श्रीसमर्थांनीं महाराष्ट्राच्या जनतेसमोर अशी जाहीर घोषणा केली कीं,

आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका । १२-१-१
त्यांनीं स्वतः संसाराचा त्याग करून महाराष्ट्राला उपदेशिलें कीं, प्रपंच कर. इतर साधुसंतांप्रमाणें स्वतः संसाराचा स्वीकार करून दुसऱ्यांना मात्र संसारत्याग करण्याविषयींचा उरफाटा उपदेश त्यांनीं केला नाहीं. त्यांनीं महाराष्ट्राला प्रपंच कर म्हणूनच उपदेशिलें नाहीं, तर करशील तो प्रपंच नेटका कर, असें उपदेशिलें. प्रपंच हा सार आहे, निःसार नाहीं; या प्रपंचात परमेश्वरानें निर्माण केलेल्या उपभोग्य वस्तूंचा त्याग करणें म्हणजे परमेश्वरी योजनेचा अवमान करणें होय; प्रत्येकानें प्रपंच अवश्य करावा, व तो जिवंतपणानें करावा; असा सत्य व उपयुक्त उपदेश त्यांनीं महाराष्ट्रजनतेला व तद्वारा अखिल हिंदु जनतेला केला !

पुढें त्यांनीं असा उपदेश केला कीं, प्रपंच नेटका, जिवंत, करावयाचा असल्यास

मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण । ११-५-४

या उद्दिष्टाच्या सिद्धयर्थंच तो करण्यात आला पाहिजे ! प्रपंचाचा, मग तो वैयक्तिक असो वा राष्ट्रीय असो, खरा आधार हरिकथानिरूपण, संस्कृतीचें संरक्षण व संगोपन, हाच होय ! संस्कृतिविना जो प्रपंच, स्वधर्माविना जें स्वराज्य, तो प्रपंच नव्हे किंवा तें स्वराज्यहि नव्हे ! इस्लामी संस्कृति दिवसादवळ्या हिंदु संस्कृतीवर घाले घालीत असताना, महाराष्ट्र, आर्यावर्त, हिंदूंचे प्रपंच, हिंदूंचीं सिंहासनें कवडीमोल होत, ते मेलेल्यांचे प्रपंच व मेलेल्यांचीं सिंहासनें होत. याहि-पुढें जाऊन श्रीसमर्थांनीं असा टाहो फोडला कीं,

देव मस्तकीं धरावा । अवघा हल्लकल्लोळ करावा ।
मुलुख सर्व बुडवावा । धर्मस्थापनेसाठीं ॥
धर्मासाठीं मरावें । मरोनि अवघ्यांस मारावें ।
मारतां मारतां घ्यावें । राज्य आपुलें ॥

त्यांनीं हिंदु जनतेला असें स्वच्छ बजाविलें कीं, इस्लामी संस्कृतीस पायबंद घालावयाचा असल्यास, ज्या मार्गानें ती संस्कृति प्रसार पावत आहे, त्याच मार्गाचा हिंदूंनीहि अवलंब करावयास हवा ! वेदांती, तत्त्वज्ञानी व साधुसंत काहींहि म्हणोत, या विश्वांत "जशास तसें" या तत्त्वाशिवाय कोणाचीहि सुटका नाहीं ! आर्य धर्माची पताका हातांत घेऊन, आर्य लोकहो, एकच हल्लकल्लोळ उडवून द्या, मुलुख बुडवा, धर्मासाठीं मरा, म्हणजे तुमच्या मरणांतूनच जिवंत स्वराज्याचा

उदय होईल ! तुमची संस्कृति जिवंत ठेवावयाची असल्यास, तुमच्या आया बहिणींची अब्रू राखावयाची असल्यास, इतर संस्कृतींच्या लोकांना जरबेत ठेवा. अशा प्रकारें सर्वसाधारण माणसास समजेल व उमजेल, त्याची माणुसकी जाग्रत करील, व त्याच्या भावनांचें उद्दीपन होईल, असा सरळ उपदेश श्रीसमर्थांनीं सर्वांना केला !

हा वाञ्छित हेतु तडीस न्यावयाचा असल्यास हिंदूंची संघटना झाली पाहिजे. त्यांनीं शेवटीं असाच उपदेश केला कीं, मराठा तितुका मिळवावा। मराठा म्हणजे जातिवाचक अगर प्रांतवाचक मराठा नव्हे, तर वरील विचारांनीं प्रस्फुरित झालेला असा हिंदु होय ! केवळ हिंदुधर्मांत जन्मलेल्याची संघटना कुचकामी होय, तर ती वर निर्दिष्ट केलेल्या विचार विकारांनीं भारलेल्या हिंदूंचीच संघटना केली पाहिजे, तरच ती उद्दिष्ट कार्य पार पाडू शकेल, एरव्हीं नाहीं !

ही संघटना करण्यासाठीं त्यांनीं जागजागीं उपदेशकाचे मठ स्थापन केले, " विटेवरी उभा कटेवरी हात " अशा निष्क्रियतादर्शक अगर मोहिनीचें सोंग घेणाऱ्या अशा जनानी देवतेच्या ऐवजीं धनुर्धारी राम या मर्दानी, युयुत्सु व जयिष्णु देवतेचे आपण दास आहोंत असें सांगून, तिच्या आराधनेचा प्रसार सुरू केला, आणि जागजागीं आखाडे स्थापन करून त्यामधून हनुमानाची प्राणप्रतिष्ठा केली ! यातहि श्रीसमर्थांची योजकता उत्कृष्टपणानें दिसून येते. कपटानें हरण करून नेलेल्या सीतेची पुन प्राप्ति करून घेण्यासाठीं प्रभु रामचंद्रांनीं केवळ परमेश्वराचा धावा करीत स्वस्थ हातपाय जोडून बसण्याऐवजीं अगर खोट्या तत्त्वज्ञानाच्या भिक्षा मारण्याऐवजीं माणुसकीला अनुसरून हातीं धनुष्य धारण करून रावणावर चाल केली, आणि श्रीहनुमानासारख्या त्याच्या अनन्य भक्तानें हिंसा-अहिंसा, ब्रह्म माया इत्यादींच्या घोंटाळ्यांत न पडतां आपल्या हेतुसिद्धीच्या आड येणाराचा निःपात केला, लंकादहन करून हलकल्लोळ उडवून दिला, व रावणी मुलूख बेचिराख करून उद्ध्वस्त करून टाकला, यांत सूचित झालेल्या मार्गाचा अवलंब होण्यासाठीं श्रीसमर्थांनीं या दोन मर्दांनी देवता जनतेसमोर प्रामुख्यानें मांडल्या ! प्रसंग पडेल तेव्हा कपट किंवा मारपीट न केल्यास कोणासहि यशाची आशा धरावयास नको ! कारण,

व्रजन्ति से मूढधियः पराभवम् । भवन्ति मायाविषु ये न मायिनः ॥

यातील त्यांचा सांगण्याचा मतलब असा कीं, कोणत्याहि धर्माचे प्रत्या-

परु हे कदाचित् पुरुषोत्तम असले, तरी त्याचे प्रचारक अगर संरक्षक हे बहुधा गुंडपुंडच असतात! धर्माचा गाडी हा सामान्यतः दिलानें जरी वाजी असतो, तरी प्रसंगविशेषीं पाजी बनण्याची पात्रताहि त्याच्या ठायीं असावी लागते! धर्माचें व संस्कृतीचें संरक्षण होण्यास सद्गुणांइतकीच दुर्गुणाचीहि आवश्यकता असते; किंबहुना पहिल्यापेक्षा दुसऱ्याचीच आवश्यकता जास्त भासते! सद्गुण दुर्गुण, नीति-अनीति, हीं देशकालपरिस्थित्यनुरूप ठरणारीं द्वंद्वें होत! या द्वंद्वावरच विश्वाची उभारणी करण्यात आलेली आहे, व त्यावरच मानवी व्यवहाराचीहि उभारणी व्हावयास पाहिजे! तरच तो व्यवहार व्यक्तीच्या काय अगर समाजाच्या काय, अंगीं लागून ती व्यक्ति अगर तो समाज तेजस्वी व वर्धिष्णु असा होईल! सामान्यतः या जगांत मनुष्यप्राणि मनुष्यनिर्मित अशा कृत्रिम बंधनांनीं व उपाधींनीं अवगुंठित झालेला असतो; परंतु हा त्याचा वास्तव स्वभाव अगर स्वरूप नव्हे. या कृत्रिम बंधनांना व उपाधींना कोठें तरी मर्यादा व मुरड घालावयासच हवी. ही मर्यादा घालून जन्मजात अशा मूळ स्वरूपास व स्वभावाच परत फिरणें म्हणजेच माणुसकी होय! आणि हा मूळ स्वभाव, ही माणुसकी, म्हणजेच जग्रास सर्वे! केवळ विचारशक्तीच्या आहारीं जाऊन या मूळ स्वभावास विसरणें म्हणजे माणुसकीला आचविणें होय! विचारशक्ति सांगते कीं,

दिधलें दु:ख परानें उसनें फेडूं नयेचि, सोसावें,

तर माणुसकी सांगते कीं,

दिधलें दु:ख परानें उसनें ठेवूं नयेचि, फेडावें!

श्रीरामप्रभु व श्रीहनुमान् या देवता हेंच तत्त्व प्रतीत करीत आहेत!

थोडक्यात सांगावयाचें म्हणजे एक प्रेमाची तर दुसरी प्रतिकाराची धार असलेल्या अशा दुधारी, व त्याचप्रमाणें सकाम व जयिष्णु कर्मयोगाची शिकवण हाच श्रीसमर्थांचा दिव्य संदेश होय!

हा संदेश कानीं पडताच महाराष्ट्र खडबडून जागा होऊन त्यानें अचाट पराक्रम केले; याच संदेशानें बुडालेली देवगिरी रायगडीं स्थापन केली; याच संदेशानें भाऊसाहेब पेशव्याकरवीं दिल्लीच्या तख्ताचे तुकडे न् तुकडे उडविले; याच संदेशानें खैबर घाटाला आडसर घातला, याच संदेशानें श्रीसंभाजी-महाराजांना धर्मासाठीं तीळ तीळ मरण्यास प्रोत्साहित केलें; ज्ञानवापीजवळील मशीद म्हणजे श्रीकाशीविश्वेश्वराच्या देवळावर उभारलेली मशीद जमीनदोस्त

करून तेथें पुन्हा विश्वेश्वराचें मंदिर उभारू या, अशी पेशव्याना विनंति करण्यास याच संदेशानें मल्हारराव होळकराना प्रेरणा केली; हिंदूंचें दुर्भाग्य की, पेशव्यानीं या प्रेरणेस योग्य ती हाक दिली नाहीं! याच संदेशानें श्रीराजाराम-महाराजाच्या कारकीर्दीत महाराष्ट्रांतील तरुणाना अवरंगजेबास दे माय धरणी ठाय करण्यास समर्थ बनविलें, याच संदेशानें मरारलेल्या भिमथडीच्या तट्टानीं अटकेवर आपली तृषा भागविली, आणि याच संदेशानें उत्तरेकडल्या मुसलमानी घरींदारीं मराठ्याच्या नावाची धडकी भरवून दिली.

हिंदुस्थानच्या इतिहासात असा एक काळ होता कीं, तेव्हा मराठे म्हणतील तें करू शकले असते. मराठ्यानीं श्रीसमर्थांच्या या संदेशाचें एक स्वरूप अंमलात आणलें खरें; परंतु त्याबरोबरच जर दुसरें स्वरूप त्यानीं अमलांत आणलें असतें, तर हिंदुस्थानच्या इतिहासास व त्याबरोबरच हिंदु जनतेच्या मनास कितीतरी इष्ट वळण लागलें असतें! पण आता हळहळण्यात अर्थ काय! असो.

महाराष्ट्राच्या पुण्याईनें सतराव्या शतकात श्रीसमर्थ व श्रीशिवाजीमहाराज या अशा दोन विभूति अवतीर्ण झाल्या कीं, ज्याना अखिल मानवजातीच्या इतिहासात तोड सापडत नाहीं! या नर-नारायणाला स्मरून जर हिंदु जनता आपला मार्ग चोखाळू लागली, तर ती पुन्हा आपलें पूर्ववैभव संपादन केल्याशिवाय खचित रहाणार नाहीं!



## ( ११ )

# भगवंताचें अधिष्ठान

( लेखक— प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., नागपुर )

सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील तयाचें।
परंतु येथें भगवंताचे। अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६

श्रीसमर्थ रामदास यांनीं दासबोधात चिरकालीन महत्वाचे असे जे अनेक सिद्धान्त प्रतिपादिले आहेत, त्यापैकीं वरील ओवींत ग्रथित केलेला सिद्धान्त हा अर्थपूर्ण असल्यामुळें मननीय आहे. "चळवळ" या शब्दाचा उपयोग "राजकीय आन्दोलन" अशा अर्थी अलिकडे आपण करीत असल्यामुळें, वरील ओवींतील "चळवळ" शब्दहि राजकीय चळवळींना उद्देशूनच असला पाहिजे, अशी पुष्कळांची समजूत असते. तसेंच चळवळ यशस्वी व्हावयाची असेल तर तिला भगवताचें अधिष्ठान पाहिजे म्हणजे परमेश्वराची भक्ति केली पाहिजे, तपश्चर्या केली पाहिजे, परमेश्वराचा वरप्रसाद मिळविला पाहिजे, असाहि अर्थ करण्याची प्रथा आहे, पण या ओवीचा संदर्भ पाहिला असता वरील दोन्हीं समजुती निराधार आहेत हें लक्षात येतें.

ही ओवी दासबोधाच्या विसाव्या दशकाच्या चौथ्या समासात आली आहे व या समासाचें नाव "आत्मनिरूपण" आहे. अर्थात् या समासात राजकीय चळवळीचें प्रतिपादन नसून अध्यात्माचें प्रतिपादन आहे, हें उघड आहे. पण त्याबरोबरच एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, आत्मिक निरूपणाच्या ओघात वरील ओवी जरी आली असली तरी तिच्यांत सांगितलेला सिद्धान्त

मुद्दाम संकुचित रीतीनें मांडला नसून व्यापक असा मांडला आहे. त्यामुळें तो आध्यात्मिक चळवळींना जितका लागू पडेल तितकाच ऐहिक चळवळींनाहि लागू पडणारा आहे. सिद्धांताची व्यापकता कमी होऊं नये म्हणून मुद्दामच या ओवींतील "चळवळ" या शब्दाला "आध्यात्मिक" असें विशेषण देण्याचें टाळलें आहे. त्यामुळें "चळवळ", मग ती कोणतीहि वस्तु साध्य करण्याकरितां असो, आत्मवस्तु साध्य करण्याकरिता असो किंवा ऐहिक वस्तु साध्य करण्याकरिता असो, तिला भगवताचें अधिष्ठान पाहिजे, असा व्यापक सिद्धान्त या ओवींतून निघतो, किंबहुना "अर्थान्तरन्यास" या अलंकाराचा, सामान्य सिद्धांतानें विशेष गोष्टीचें समर्थन, हा एक विशेष आहे.

आता "भगवताचें अधिष्ठान" या शब्दद्वयाचा या ठिकाणीं कोणता अर्थ अपेक्षित आहे, तें पुढील ओवीवरून लक्षात येईल.

कर्ता जगदीश हें तों खरें । परी विभाग आला पृथक्‌कारें ।
तेथें अहंतेचें काविरें । बाधिजेना ॥ २० ४-२७

देहाच्या पृथक् उपाधीमुळें माझ्या विभागाला आलेलें कर्म मी करितों असें वाटलें, तरी खरोखर कर्ता करविता परमेश्वरच आहे अशी बुद्धि चळवळ करणाऱ्यांनीं ठेवावी, म्हणजे त्यांना अहंकाराची बाधा होणार नाहीं, असा या ओवीचा अर्थ आहे, तो लक्षात घेतला म्हणजे "भगवताचें अधिष्ठान" या शब्दद्वयाच्या अर्थावर पूर्ण प्रकाश पडतो. कर्ता करविता परमेश्वर आहे, परमेश्वराच्या प्रेरणेनें व परमेश्वराकरिता मी ही चळवळ करीत आहें अशी बुद्धि ठेवून "अहंकारा"ला स्थान न देणें म्हणजेच "भगवताचें अधिष्ठान" होय, व हें अधिष्ठान ज्या चळवळींना मिळतें त्या सामर्थ्ययुक्त असल्यामुळें यशस्वी होतात, असा वरील ओवीचा अर्थ होतो.

आत्मप्राप्तीकरितां केलेल्या चळवळीला किंवा प्रयत्नांना अहंकार हा ज्या बाधक आहे, त्याचप्रमाणें तो ऐहिक चळवळींनाहि बाधक आहे. ऐहिक चळवळी यशस्वी न होण्याचीं कारणें शोधूं गेल्यास तीं शेवटीं चळवळ करणाऱ्या लोकांच्या अहंकारांतच सापडतात. ऐहिक चळवळी या सामुदायिक हिताकरितां असतात, ही गोष्ट विसरून चळवळींचे पुढारी ज्या वेळेस स्वहिताकडे लक्ष देऊं लागतात, स्वार्थ साधण्याकरितां जेव्हां चळवळींचा उपयोग करितात, तेव्हां त्या सामुदायिक हित साधण्याच्या दृष्टीनें निरुपयोगी होऊन बसतात. चळवळींचा

हा ' अहं ' किंवा ' स्व ' चळवळींत नाना रीतीनें धुमाकूळ घालीत असतो. कोणाला या चळवळीचें श्रेय मलाच मिळालें पाहिजे असें वाटत असतें, कोणाला पुढारीपण स्वत कडेच असलें पाहिजे असें वाटतें, कोणाला प्रतिष्ठेची, प्रसिद्धीची लालसा असल्यामुळेंच ते चळवळींत पडतात. कोणाला द्रव्य पाहिजे असतें, तर कोणाला त्याकरिता अधिकार पाहिजे असतो. पुढें पुढें हा " अहं " इतका वाढतो कीं, अमुक एक सत्य व हितकारक गोष्ट दुसऱ्यानें सांगितली, मी सांगितली नाहीं, एवढ्याचकरिता तिचा पाडाव करण्याची खटपट होते. शेवटीं सत्य व परार्थ बाजूला पडून स्वहिताला प्राधान्य येतें. स्वहित साधणाऱ्या लोकांचे गट बनतात. त्यांना पक्ष असें म्हणतात. या पक्षांना निरनिराळीं नावें दिलीं जातात. परार्थ किंवा सामुदायिक हित एकीकडे राहून हे पक्ष एकमेकांना शिवीगाळ करीत असतात. वर्षानुवर्षे हा प्रकार चालला म्हणजे हाडवैरें उत्पन्न होतात, एकमेकाचीं तोंडें पाहू नयेत, एका बैठकींत येऊं नये, अशी रुचि उत्पन्न होते. आणि ही कोणामध्यें, तर सामुदायिक हित करण्याकरितां निघालेल्या दोन व्यक्तींमध्यें किंवा दोन पक्षांमध्यें ! ! सामुदायिक हितापेक्षा "अहंकारा"ला, "स्व" ला चळवळीमध्यें जास्त प्राधान्य आल्यामुळेंच या सर्व गोष्टी घडतात, हें उघड आहे. चळवळीमागून चळवळी होतात, कांहींना प्रतिष्ठा व प्रसिद्धि मिळते, कांहींना अधिकार व द्रव्यप्राप्ति होते. चळवळी चढावतात व शेवटीं ज्या जनतेच्या हिताकरिता, ज्या जनतेच्या नावानें या सर्व चळवळी केल्या जातात, त्या जनतेची दु स्थिति व हालअपेष्टा पन्नास पन्नास वर्षें झालीं तरी कमी होत नाहींतच, पण उलट वाढलेल्या आहेत असें आढळून येतें. असें जेथें होतें तेथें चळवळ करणाऱ्यांत, सामुदायिक हितापेक्षा " स्व "कडे जास्त लक्ष देणारे अहंकारी लोकच जास्त होते, असें अनुमान काढावें लागतें. चळवळ करणाऱ्यांत खरे तत्त्वनिष्ठ, परार्थी, स्वार्थत्यागी असे कांहीं लोक नि सशय असतात, किंबहुना चळवळींना कांहीं काळ जो जोर किंवा सामर्थ्य येतें तें याच लोकांमुळें. पण हे लोक इतके थोडे असतात कीं, त्यांना इतर स्वार्थी लोक पचवून टाकतात व त्यांच्या स्वार्थत्यागाचा उपयोग स्वत च्या अर्थसाधनाकडे ते मोठ्या धूर्तपणानें करून घेतात. हा सारा अहंकाराचा खेळ आहे. चळवळींना ' भगवंताचें अधिष्ठान ' पाहिजे या म्हणण्यात समर्थांनीं दोन गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांपैकीं एक निषेधात्मक व दुसरी विधेयात्मक आहे. एकीनें अहंकाराचा निषेध

केला असून दुसरीनें कर्ता करविता परमेश्वर आहे, अशी नम्र बुद्धि ठेवण्यास सांगितलें आहे. चळवळीच्या धुरीणामध्यें व्यक्तिगत अहंकार व स्वार्थ असतां कामा नयेत. पैशाची, प्रतिष्ठेची, प्रसिद्धीची, अधिकाराची, पुढारीपणाची लालसा व त्याकरिता धडपड त्यांनीं बिलकूल करितां कामा नये. हृदयस्थ परमेश्वराचा संतोष झाला, अंतरात्मा तृप्त झाला, परार्थामध्यें, जनतेच्या सुखामध्यें, समाधान वाटूं लागलें कीं, त्याचें काम झालें, म्हणजे त्यानें त्याचें कर्तव्य नीट बजावलें. अहंकाराचा, सुखाचा, सर्वस्वाचा त्याग करून, कर्ता करविता परमेश्वर आहे, ही बुद्धि ठेवून, अंतरात्म्याच्या समाधानातच संतोष मानून जनताजनार्दनाची सेवा केल्यानें अमृतत्व मिळतें, मोक्ष मिळतो व चळवळी यशस्वी होतात.

" आधीं केलें मग सांगितलें " असा समर्थांचा दंडक असल्यामुळें, विसाव्या दशकातील वरील ओवींत त्यांनीं आपला अनुभवच ग्रथित केलेला दिसतो. समर्थांनीं स्वतः जी प्रचण्ड चळवळ केली तिला हें " भगवंताचें अधिष्ठान " त्यांनीं मिळवून दिलें होतें. प्रथमतः महाराष्ट्रांतील ब्राह्मण आणि क्षत्रिय याना, अहंकार व तज्जन्य स्वार्थ व लोभ सोडण्याचा त्यांनीं उपदेश केला. बुद्धिमान् लोकात द्रव्याचा व अधिकाराचा लोभ उत्पन्न झाला व शक्तिसंपन्न आणि पराक्रमी लोकात जीविताचा लोभ उत्पन्न झाला, तर त्यामुळें राष्ट्राचा अधःपात होतो. बुद्धिमान् लोक स्वार्थसंपादनाकरिता आपल्या बुद्धिमत्तेचा दुरुपयोग करितात, वाटेल तीं नीच कारस्थानें करतात, एवढेंच नव्हे तर स्वधर्म, स्वदेश, स्वाभिमान याची मुद्रा विक्री करण्यास तयार होतात. शक्तिसंपन्न लोक जीविताच्या भयानें राष्ट्राचें संरक्षण करण्याचें कार्य सोडून देतात व परक्यांच्या पदरीं तुकडे मोडीत बसतात; म्हणून या दोन्हीं प्रकारच्या लोकाना रामदासांनीं केलेला उपदेश लक्षात घेण्यासारखा आहे.

समर्थांच्या काळीं बहुतेक ब्राह्मण बुद्धिजीवी व बहुतेक क्षत्रिय आयुधजीवी होते. ब्राह्मणाना लढता येत नव्हतें किंवा क्षत्रियाना बुद्धि नव्हती, असा याचा अर्थ नव्हे. प्रत्येक वर्णांतील बहुसंख्य लोकांचें जगण्याचें साधन लक्षात घेऊन " प्राधान्येन व्यपदेशः " या न्यायानें वरील विधान केलें आहे. स्वधर्मस्थापनेकरिता समर्थांनीं जी प्रचंड चळवळ केली तिच्या प्रसाराची जबाबदारी त्यांनीं ब्राह्मणावर टाकली व इतका त्याग करावयास लावला कीं, सर्वस्वाचा होम करून चरितार्थाकरिता त्याना भिक्षाहि मागावी लागली.

ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागितली पाहिजे भिक्षा ।
ॐ भवति या पक्षा । रक्षिले पाहिजे ॥ १४ २ १

ब्राह्मणबटूचें उपनयन झालें त्या वेळीच त्याला ही "ॐ भवति भिक्षा देहि" या मन्त्रानें भिक्षेची दीक्षा देण्यात येते, तिची आठवण देऊन समर्थांनी या कार्यकर्त्यांना धर्मस्थापनेच्या कार्याकरिता भीक मागावयास लावलें व अशी भिक्षा मागण्यास लाजू नये असेंहि सांगितलें

भिक्षेविषीं लाजों नये । बहुत भिक्षा घेऊं नये ।
पुसता हि देऊं नये । वोळखी आपली ॥ १४ १ ८
कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घराचीं घरें ।
भिक्षामिसें लाहान थोरें । परीक्षून सोडावीं ॥ १५ ६ २४

भिक्षेकरी बनून हें परीक्षणाचें कार्य करावें, आपली ओळख कोणास देऊं नये व भिकाऱ्यासारखें रहावें

उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।
तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ १५-२ २१

महाराष्ट्रातील ब्राह्मणाना त्याच्या भिक्षेच्या दीक्षेची आठवण देण्यांत समर्थांचा एक महत्वाचा हेतु होता चळवळ करणाऱ्या लोकांत जीं भांडणें होतात तीं सत्ता व संपत्ति याची वाटणी मिळविण्याच्या बाबतींत मुख्यत होतात. समर्थांनीं ब्राह्मणाना सांगितलें कीं, सत्ता व संपत्ति याचा लोभ तुम्हाला सोडला पाहिजे व प्रसंगीं भिक्षाहि मागण्यास तयार झालें पाहिजे कारण, ब्राह्मण वर्णाचें हें धर्मप्राप्त कर्तव्य आहे. बुद्धिजीवी अशा या महत्वाच्या समाजानें सत्ता व संपत्ति याच्या अभिलाषेचा त्याग केल्यामुळें भांडणाचें एक मोठेंच मूळ नाहींसें झालें.

क्षत्रियाना त्यानीं सांगितलें कीं, देशाची सत्ता व संपत्ति तुमची आहे, पण ती जर तुम्हांला पाहिजे असेल, तर स्वधर्मस्थापनेसाठीं लढण्याला व प्रसंगीं प्राणत्याग करण्यालाहि तुमची तयारी पाहिजे, कारण, हें तुमचेंहि धर्मप्राप्त कर्तव्य आहे

देवमात्र उच्छेदिला । जित्यापरिस मृत्यू आला ।
आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें जालें ॥ क्षात्रधर्म १२
मरणहाक तो चुकेना । देह वाचविता वाचेना ।
विवेकी होउन समजाना । काये करावें ॥ १४

देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते।
देवदास पावती फत्ते। येदर्थी संशय नाहीं॥ १७

आपला देव धर्म बुडविणाऱ्या लोकाना

मारतां मारतां मरावें। तेणें गतीस पावावें। क्षात्रधर्म ४

धर्मरक्षणाकरिता आलेला मृत्यु तुम्हाला सद्गति देईल. आणि जर विजयी होऊन रणागणातून परत याल तर सत्ता व संपत्तीचें महद्भाग्य भोगाल.

ब्राह्मणीं सोडिला आचार। क्षेत्रीं सोडिला विचार।

अशी ज्या ब्राह्मण-क्षत्रियांची स्थिति झाली होती, त्याना अहंकारमूलक स्वार्थ सोडावयास लावून, समर्थांनीं, सुखाचा व प्राणाचाहि त्याग भगवंताकरिता करण्यास उद्युक्त केलें. या त्यागाला समर्थांनीं सत्वगुणात स्थान दिलें आहे;

येका भगवंताकारणें। सर्व सुख सोडिलें जेणें।
केलें देहाचें सांडणें। तो सत्वगुण॥ २-७ ५८

ब्राह्मणानीं राजसत्तेचा व संपत्ति मिळविण्याचा अधिकार सोडला व तो क्षत्रियाचा आहे असें मान्य केलें व जन्मभर दरिद्री रहाण्याची तयारी केली. या त्यागाचा परिणाम असा झाला कीं, स्वत:च्या सामर्थ्यानें मिळविलेलें राज्य " हें देवाब्राह्मणाचें राज्य आहे " असें क्षत्रिय म्हणूं लागले. ब्राह्मणानीं हें राज्य क्षत्रियाचें आहे असें म्हणावें व क्षत्रियानीं हें राज्य देवाब्राह्मणाचें आहे, असें म्हणावें, शिवाजी महाराजानीं राज्य रामदासाना अर्पण करावें, व रामदासानीं तें शिवाजीला परत करावें हा देखावा किती हृदयस्पर्शी आहे !! किती अर्थपूर्ण आहे !! त्यापासून आजच्या महाराष्ट्राला काहींच बोध घेता येणार नाहीं काय ? व्यक्ति किंवा जाति याचा ' अहंकार ' ज्या वेळेस इतक्या थराला पोंचतो कीं, स्वत:ची प्रतिष्ठा व स्वार्थ याच्यापुढें देश धर्माचें हित दिसेनासें होतें, त्या वेळीं या अमर्याद अहंकाराला आळा घालण्याकरितां " अध्यात्मा "ची आवश्यकता असते. समर्थ व इतर साधुसंतांनीं अध्यात्माचा उपदेश करून अहंकाराची क्षुद्रता लोकाच्या प्रत्ययाला आणून दिली. विषयापासून मिळणाऱ्या सुखापेक्षा अनंतपटीनें श्रेष्ठ असणाऱ्या आत्मिक सुखाची कल्पना येणें जागतिक शांततेच्या दृष्टीनें आवश्यक असल्यामुळें, समर्थांनीं या अध्यात्माचें सविस्तर विवरण करून व्यक्ति व जाति यांनीं आपला अहंकार, आपलें व्यक्तित्व परमात्म्यांत विलीन करून सामुदायिक हितांतच आपलें हित पाहिलें पाहिजे, समुदायाच्या आनंदांतच आपला आनंद मानला पाहिजे, हें लोकांना

शिकविलें व हा परमात्माच कर्ता करविता आहे, आपण निमित्तमात्र आहों, अशी बुद्धि निर्माण करून अहंकार कमी केला आणि अशा रीतीनें आपल्या चळवळीला " भगवंताचें अधिष्ठान " निर्माण केलें

समर्थांच्या चळवळीचें महत्त्व लोकाच्या अजून पूर्णपणें लक्षांत आलें नाहीं. कोणतीहि सामुदायिक उठावणी ही चळवळीवाचून होत नाहीं. कोणत्या तरी मोठ्या कल्पनेनें लोकाचीं मनें काबीज करावीं लागतात व त्याकरिताहि चळवळ करावी लागते. शिवकालीन इतिहास पाहिला तर धर्मस्थापनेच्या कल्पनेचा पगडा लोकांवर बसलेला दिसतो. शिवाजीमहाराज कैदेंत असताना, किंवा ते मृत्यु पावल्यानंतर, संभाजीराजांचा वध झाल्यावर, राजारामानें दूरपारी पळ काढिली असतांनाहि स्वराज्यरक्षणाकरिता संपूर्ण महाराष्ट्रानें अनेक वर्षें लढा चालविला यावरून असें दिसतें कीं, व्यक्तीपेक्षां स्वधर्म व स्वराज्यस्थापनेच्या भव्य कल्पनेनेंच महाराष्ट्रांतील अखिल जनतेचीं मनें भारावून गेलीं होतीं ही कल्पना समर्थांनीं महाराष्ट्रांत पसरविली व ही कल्पना प्रत्यक्ष सृष्टींत आणण्याकरिता जो त्याग करावा लागतो त्या त्यागाकरिता लोकाची तयारी केली अहंकाराचा, स्वार्थाचा, प्रतिष्ठेचा त्याग केल्याशिवाय भगवंताचें अधिष्ठान चळवळींना मिळत नाहीं व त्या यशस्वी होत नाहींत, असें समर्थांचें सांगणें आहे. समर्थकालीन चळवळींना हें अधिष्ठान मिळालें होतें आजचा महाराष्ट्र हें अधिष्ठान मिळविण्याचा प्रयत्न करील काय ? तसा प्रयत्न करण्याची प्रेरणा समर्थांनीं महाराष्ट्राच्या मनात उत्पन्न करावी, असें प्रार्थून हें निवेदन संपवितों.



( १२ )

श्री

# श्रीसमर्थांचा ' उत्तम पुरुष '

( लेखक— श्री. राजारामबुवा, पिंपळनेर )

श्रीसमर्थांनीं सामान्य जनांना प्रपंच व परमार्थविषयक उभयसाधनांचा विचार पुष्कळ सांगितला आहे. इंद्रियदमनशील व जितात्मे यांची गोष्ट निराळी व निश्चयशक्तिहीन कामक्रोधादियुक्तांची गोष्ट वेगळी. कारण दुसऱ्या प्रतीच्या लोकांना मानत मानतच शिकविलें पाहिजे, असा समर्थांचा दंडक आहे. अधिकारपरत्वें कार्य सांगणें व प्रत्येकाची उन्नति करणें, हा समर्थांचा विशेष होय. अशाच कार्यकुशलतेनें श्रीसमर्थांनीं अनेक सामान्य लोकांना ईश्वरनिष्ठासंपन्न महंत बनविलें व त्यांच्याकडून तेजस्वी विचारप्रवाह व त्याबरोबरच दैवी संपत्तीचे गुण जनतेंत उत्पन्न केले आणि यवनांच्या हल्ल्यापासून आर्यधर्म रक्षिला.

### प्रत्येक व्यक्तीची उन्नति

समाज व राष्ट्र व्यक्तींचेंच बनलेलें असतें. त्यातील एकेक व्यक्ति श्रेष्ठ होऊं लागली म्हणजे राष्ट्र उन्नत दशेला पोहोंचतें. याकरितां व्यक्तीपुढें श्रेष्ठ विचार मांडून प्रत्यक्ष आचरणाचा मार्ग त्यांना दर्शविला पाहिजे. ध्येय हें विचारांनीं निश्चित होतें व साधनमार्गाचें आक्रमण केल्यानें तें साध्य होतें. आपणांस आपल्या आर्य धर्मानें धर्म, अर्थ, काम, मोक्ष, अथवा समर्थांच्या शब्दांत 'प्रपंच परमार्थ, अरत्र परत्र,' अभ्युदय निःश्रेयस साधणें हें ध्येय निश्चित करून दिलें आहे. आणि या ध्येयसिद्ध व्यक्तीसच समर्थ उत्तम पुरुष म्हणतात. उत्तमपुरुषनिरूपणाचा

समास समर्थांनीं दासबोधांत बाराव्या दशकाच्या शेवटीं लिहिला आहे. तो प्रत्ये-कानें अवश्य वाचून मनन केला पाहिजे.

## साधनपरंपरा

ह्या समासांत समर्थांनीं सांगितलेलीं साधनें केल्यास, सर्वांना प्रपंच व पर-मार्थ साधण्याकरितां लागणारे गुण अवश्य प्राप्त होतील. समर्थ म्हणतात —

( १ ) आपण स्वतः ज्ञानानें तृप्त व्हावें.

( २ ) तें ज्ञान दुसऱ्यांस द्यावें.

( ३ ) कोणतीहि गोष्ट स्वतः करावी व मग दुसऱ्यांस सांगावी.

( ४ ) हरिकथा, स्नान, संध्या, देवार्चन, एकाग्र जपध्यान, इत्यादि कर्म-मार्ग व भक्तिमार्ग सोडूं नये; तो अवश्य आचरण करावा.

( ५ ) काया परोपकारीं झिजवावी.

( ६ ) वाचा मृदु व गोड असावी.

( ७ ) मन मोठें करून दुसऱ्याचे अन्याय क्षमा करावे. मनाच्या ठिकाणीं क्रोध, मत्सर इत्यादि नसावे.

( ८ ) आळस तर मुळींच नसावा.

( ९ ) प्रयत्न मात्र सतत करीत रहावा.

(१०) संसार सावधपणानें करावा.

(११) कोणास दुखवूं नये.

(१२) सर्व आचरण नेमकेपणाचें असावें.

अशा ज्ञानविज्ञानानें, सारासारविचारानें, विवेकवैराग्यानें, शुद्ध कायावाचामनानें व इंद्रियनिग्रहानें वागणारा मनुष्य ' उत्तम पुरुष ' ह्या संज्ञेस प्राप्त होतो. आणि खरोखर या गुणाविरहित मनुष्यास मनुष्य न म्हणतां पशुच म्हटलें पाहिजे.

ऐसा उत्तम गुणी विशेष । तयास म्हणावें पुरुष ।
जयाच्या भजनें जगदीश । तृप्त होये ॥ १२-१०-१५
जो उत्तम गुणें शोभला । तोचि पुरुष माहा भला ।
कित्येक लोक तयाला । शोधीत फिरती ॥ १२-१०-२९

इतकें महत्त्व समर्थांनीं उत्तम पुरुषाचें ठायीं ठायीं वर्णिलें आहे.

## पण सगळा भर प्रयत्नावर

समर्थांचा सगळा भर प्रयत्नावर आहे. कोणतेंहि कार्य केल्यावाचून होत

-नाहीं व करणें न करणें हीं गोष्ट आपल्या स्वाधीनची असते. म्हणून उन्नतीच्या मार्गांत यशापयशाची जबाबदारी समर्थ दुसऱ्यावर न टाकता स्वतःवरच टाकितात.

केल्यानें होत आहेरे। आधीं केलेंचि पाहिजे।
येत्न तो देव जाणावा।

इत्यादि समर्थांचीं वचनें म्हणजे केवळ आपल्या कानाशीं व मनाशीं गर्जना करणारी दैवी वाणीच होय.

आळसाचा कडक निषेध

प्रयत्न व अभ्यास शिथिल करून कार्याची हानि करणारा आळस समर्थ हाकलून लावण्यास सांगतात.

आळसाचें फळ रोकडें। जांभया देऊन निद्रा पडे।
सुख म्हणौन आवडे। आळसी लोकां॥ ११-३-१०

अशा रीतीनें आळस प्रयत्नाला हाणून पाडतो व ध्येयसिद्धि होऊं देत नाहीं, म्हणून समर्थ अत्यंत कडक शब्दानीं त्याचा निषेध करतात. सतत प्रयत्नानेंच कार्य सिद्ध होईल, असें त्याचें निश्चित म्हणणें आहे.

गीता तरी हेंच सांगते

भगवद्गीतेंतील दैवी व आसुरी संपत्तीची विभागणी भगवंतानीं अर्जुनास करून दाखविली व *आसुरी गुणाचा प्रथम त्याग आणि दैवी गुणाचा परिपोष* केला पाहिजे असें सांगितलें. समर्थांच्या उपदेशांत अवगुणाचा त्याग व सद्गुणाचें ग्रहण करावें, हें वेळोवेळीं कळकळीनें सांगितलेलें आढळतें. ज्याप्रमाणें गीतेंत भगवंतानीं ज्ञानी, भक्त, योगारूढ, गुणातीत, स्थितप्रज्ञ, इत्यादि निरनिराळीं नावें देऊन उत्तम पुरुषाचें वर्णन केलें आहे, त्याचप्रमाणें समर्थांनीं सुद्धा उत्तम, निस्पृह, महंत, सदेव, सिद्ध, सद्विद्यावान्, इत्यादि नावें देऊन पूर्ण पुरुषाचें वर्णन केलें आहे. स्वावलंबन, इंद्रियनिग्रह व प्रयत्नपूर्वक अभ्यास ह्या साधन-त्रयींचें गीतेंतील विवरण जितकें जोरदार आहे, त्यापेक्षां समर्थांनीं दासबोधांत केलेलें विवरण अधिक जोरदार, व्यवहारातील उदाहरणांनीं स्पष्ट केलेलें, मनावर ठसणारें व मनुष्यास तात्काळच साधनप्रवृत्त करणारें आहे.

अशा अर्थाचे दासबोधांतील समास

*श्रीदासबोधांतील विषयापैकीं बरेचसे समास समर्थांनीं अवगुणत्यागार्थ व सद्गुणग्रहणार्थ लिहिलेले सहज दृष्टींत भरतात, हें खालील यादीवरून दिसून येईल.*

मूर्खलक्षण, उत्तम लक्षण, कुविद्यालक्षण, सद्विद्यानिरूपण, विरक्तलक्षण, पढतमूर्खलक्षण, बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध यांचें वर्णन; शिष्य, उपदेश व गुरु यांचीं लक्षणें; शिकवण, राजकारण, महंत, उपदेश, निस्पृह, यत्न, उत्तम पुरुष, पुन्हा शिक्वण, निस्पृह, भिक्षा, कीर्तन, हरिकथा, चातुर्य, निस्पृह व्याप, निस्पृह शिकवण, करंटपरीक्षा, उत्तम पुरुष, जनस्वभाव, श्रोताअवलक्षण, लेखनक्रिया, करंटलक्षण, सदेव लक्षण, यत्ननिरूपण, राजकारण, विवेक-लक्षण, इत्यादि पृथक् पृथक् समास त्या त्या विषयावर जोरदार भाषेत सांगितले आहेत. याशिवाय समुचयद्वारा श्रवण, मनन, नवविधाभक्ति, त्रिविध ताप, गुण-त्रय, स्वगुणपरीक्षा, इत्यादि विषय असे वर्णिलेले आहेत कीं, वाचणारास स्वतःचे अवगुण कळून यावे, त्यानें आत्मनिरीक्षण करावें व तावडतोब साधनास लागावें. वरील सर्व विवेचनात सांगितलेली दक्षता व प्रयत्न, प्रपंच व परमार्थ या उभय-तांत आवश्यक असतात. श्रीदासबोधात वेदान्त, सृष्टीची उभारणी संहारणी, आत्मा 'अनात्मा, माया ब्रह्म, सगुण निर्गुण इत्यादिकांचाहि विचार भरपूर केलेला आहेच. तथापि सामान्य लोकास वरील विषय समजण्यास कठीण आहेत. समर्थांचें मुलाख्या चालीनें चालणें, बोलणें, व मानत मानत शिकविणें जर कोणास पहावयाचें असेल तर त्यानीं वर दिलेल्या समासाच्या यादींतील कांहीं समास अवश्य घ्यावे, अथवा निदान आपली दिनचर्या कशी असावी इत्यादि विषय तरी शोधून वाचावे. यत्न, पात्र, स्वच्छता, टापटीप, दक्षता, इत्यादि साध्या गोष्टींपासून समर्थांना लोकाची कळकळ व काळजी ! खरोखर केवढें हें दयाळु अंतःकरण ! कोणत्या वेळीं कसें वागावें अथवा वागू नये, हें शिकावयाचें असेल तर समर्थांचा व्यवहारज्ञानपूर्ण व परमार्थसाधनपूर्ण असा दासबोधच पहावा.

## कार्यप्रसारक महंत

समर्थांनीं महंताना वर अमुक एक बाबतींत सूचना केली नाहीं, असें नाहींच. कारण त्यांच्या द्वारा त्याना आसेतुहिमाचल राष्ट्र जागृत करावयाचें होतें. सर्वांचा स्वाभिमान प्रज्वलित करून हिंदुधर्मपरंपरा त्याना राखावयाची होती. त्याकरितां निस्पृहता, चातुर्य, संयम, वक्तृत्व, लेखन, निष्ठा, ज्ञान, वैराग्य, भक्ति, गायन, कीर्तन, नृत्य, रसभरित कथा सांगणें, इत्यादि प्रचारकाच्या आंगीं अवश्य लागणाऱ्या गुणाचें उपपादन त्यानीं कितीतरी वेळा आपल्या ग्रंथात केलें आहे. समर्थांना आपल्या शिष्यवरांत असे उत्तमपुरुषलक्षणयुक्त महंत तयार करा-

वयाचे होते व ते त्यांनीं केले आणि म्हणूनच महाराष्ट्रधर्म, परंपरा व स्वातंत्र्य त्या धामधुमीच्या काळांत टिकलें.

भगवताचें अधिष्ठान व चळवळीचें सामर्थ्य

समर्थ या उत्तम पुरुषांना स्वस्थ बसून रहावयास सांगत नाहींत. ते म्हणतात,

ऐसा जो माहानुभाव। तेणें करावा समुदाव।
भक्तियोगें देवाधिदेव। आपुला करावा॥ १२-१० ३२
आपण आवचितें मरोन जावें। मग भजन कोणें करावें।
याकारणें भजनास लावावें। बहुत लोक॥ ३३

ह्या उत्तम पुरुषानें लोकसंग्रह केला पाहिजे, त्यानें जनास उपदेशानें व शुद्ध आचरणानें धडा घालून देऊन कुमार्गापासून पराङ्मुख केलें पाहिजे त्या करितां लागणारी प्रबोधशक्ति महतानें आपल्या आंगीं आणली पाहिजे. भगवंतानें ज्याप्रमाणें लोककल्याणार्थ अवतार धारण केले व धर्मसंस्थापना वेळो वेळीं केली, त्याप्रमाणें ह्या धर्मसंस्थापनेच्या नरांनीं केलें पाहिजे धर्मसंस्थापना हें कार्य व प्रसंगानुरूप गुप्तपणें राजकारण हें तिचें साधन होय एरवीं केवळ पारमार्थिक ध्येय डोळ्यासमोर ठेवून प्रापंचिक व राष्ट्रीय गोष्टींकडे दुर्लक्ष करणें समर्थांस पटलें नाहीं आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या महंतांनीं समुदाव करावा, अशी आज्ञा दिली आहे. उत्तम पुरुषांच्या चळवळीच प्रभावशाली व यशस्वी होऊं शकतात. इंद्रियसुखलोलुप मनुष्यांकडून स्वार्थत्याग होणें शक्य नाहीं. विषयभोगेच्छेनें व आसक्तीनें राष्ट्राचा शक्तिपात होऊन तें धुळीस मिळेल व आसुरी संपत्तीचा प्रतिकार करण्याचें धैर्य त्यांत येऊं शकणार नाहीं

उत्तम पुरुषाचा जयजयकार

म्हणून प्रत्येकानें विवेकवैराग्याचें साधन निश्चयपूर्वक करून आपणांस उत्तम पुरुष बनवावें श्रीदासबोधांतील समर्थउपदेशाप्रमाणें आचारविचार राष्ट्रांतील तरुण जर ठेवतील तर पुढें होणारें भयंकर अधःपतन टळेल व राष्ट्र आत्मतेजानें युक्त होऊन विजयी होईल

## ( १३ )

## प्रचित आणि परिपाठ

( लेखक—श्री. रामचंद्र हरि देवधर, वकील, रामगाव )

प्रचित पाहाता निकट । उडोन जाती परिपाठ ।
म्हणोनि हे खटपट । करणे लागे ॥
परिपाठें चि जरी बोलिलें । तरी प्रचितसमाधान बुडालें ।
प्रचितसमाधान राखिलें । तरी परिपाठ उडे ॥
ऐसी साकडी दोहींकडे । म्हणौन बोलिले चि घोलणे घडे ।
दोनी राखोनिया कोडे । उकलून दाऊं ॥
परिपाठ आणी प्रचित प्रमाण । दोनी राखोन निरूपण ।
श्रोते परम विचक्षण । विवरोत पुढे ॥

( दा. १० ८ ३१ ते ३४ )

लोकधाटी शास्त्रनिर्णये । येथें बहुधा निश्चये ।
म्हणोनिया येक प्रत्यये । येणार नाहीं ॥
आता शास्त्राची भीड धरावी । तरी सुटेना हे गथागोवी ।
गथागोवी हे उगवावी । तरी शास्त्रभेद दिसे ॥
शास्त्र रक्षून प्रत्यये आणिला । पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत पाहिला ।
शाहाणा मूर्ख समजाविला । येका वचने ॥
शास्त्रींच पूर्वपक्ष बोलिला । पूर्वपक्ष म्हणावे लटक्याला ।
विचार पाहाता आम्हांला । शब्द नाहीं ॥

तथापि बोलों कांहींयेक। शास्त्र रक्षून कौतुक।
श्रोतीं सादर विवेक। केला पाहिजे ॥

(दा. १०-२-२१ ते २५)

आजपर्यंत जगांत जे साधु, संत, सत्पुरुष होऊन गेले, त्यांनीं जगांतील सर्व लोकांना न्याय, नीति व मर्यादा याच्या मार्गावर आणण्याचाच प्रयत्न केला आहे, किंबहुना सामान्य लोकांना त्याच मार्गानें नेऊन त्यांना आत्यंतिक सुख व समाधान प्राप्त करून देणें, हेंच त्या सत्पुरुषांच्या आयुष्याचें ध्येय होतें. जगदुद्धार हाच त्यांच्या आयुष्यातील ध्रुवतारा होय. ध्येय एकच असलें तरी साधनें भिन्न असतात. कांहीं सत्य, न्याय, नीति व आत्यंतिक समाधान यांचा उपदेश करून लोकांना असें बजावितात कीं, "बाबांनो, मी हा सत्याचा व समाधानाचा मार्ग दाखवीत आहें. या मार्गानें जाल तर सुखी व्हाल व समाधान पावाल, अन्य व विपरीत मार्गानें जाल, तर तुमच्यापुढें दुःख ठेविलेलें आहे त्याचे भागी व्हाल. पहिल्या मार्गानें जाल, तर तुमची संसारयात्रा सुखाची होईल, व दुसऱ्या मार्गानें जाल, तर संकटांच्या सङ्कटात पडाल व मरेपर्यंत दुःखातच सर्व काल कंठाल. बाबांनो, वाटेल तो मार्ग पत्करा; आम्ही आपलें कर्तव्य करीत आहों, तुम्ही आपलें कर्तव्य करा." यापेक्षा ते जास्त भानगडींत पडत नाहींत. दुसरे कांहीं सत्पुरुष जगदुद्धारार्थ उपदेश वरीलप्रमाणेंच करतात. पण तेवढ्यावरच न थांबता लोकांना आपल्याजवळ करून व त्यांच्या अंतःकरणांत शिरून, त्यांचें मनोगत जाणून, त्यांच्या अधिकारानुरूप वारंवार उपदेश करून, त्यांना अज्ञान गर्तेतून वर काढण्याचा सतत प्रयत्न करतात. पहिल्या वर्गांतील संत, लोकांना जरी दूर लोटीत नसले, तरी त्यांना विशेष जवळ करण्याचाहि प्रयत्न करीत नाहींत. हाच या दोन वर्गांतील साधनमार्गांतील विशेष आहे. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे पहिल्या वर्गांतील संत लोकसंग्रह किंवा लोकसमुदाय करण्याकडे विशेष लक्ष देत नाहींत, व दुसऱ्या वर्गांतील संत लोकसंग्रहावरच आपल्या कार्याची विशेष भिस्त ठेवतात व लोकसंग्रह ज्या साधनांनीं शक्य होईल, त्या साधनांवर नेहमीं लक्ष ठेवून ते काम करीत असतात. पहिल्या वर्गांत महाराष्ट्रसंत शिरोमणी तुकाराममहाराज हे येतात, व दुसऱ्या वर्गांत श्रीसमर्थ रामदासस्वामी हे येतात. या साधनमार्गांतील भेदामुळें दोन्हीं वर्गांतील साधूमध्यें खालची वरची प्रत लावण्याचा प्रयत्न करणें हें केव्हांहि असमंजस व अयोग्यच ठरेल. कारण,

साधु दिसती वेगळाले। परी ते स्वरूपीं मिळाले।
अवघे मिळोन येक चि जाले। देहातीत वस्तु॥ ७-२-३१

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें समर्थांना लोकसंग्रह करावयाचा होता, व आचार-विचार-धर्म राज्य भ्रष्ट लोकांना त्यांच्या अज्ञानांतून, दारिद्र्यांतून व परदास्यांतून मुक्त करावयाचें होतें. लोकांच्या त्या वेळच्या रूढ कल्पना, त्याचे दंडक, त्याची परिपाठी व त्यांच्या समजुतीप्रमाणें ते मानीत असलेलें शास्त्र यावर प्रत्यक्ष हल्ले चढविल्यानें व आघात केल्यानें आपलें उद्दिष्ट सफल होणार नाहीं, ही गोष्ट समर्थांनीं आपल्या मनात निश्चित करून ठेवली होती.

मुलाचे चालीनें चालावें। मुलाच्या मनोगतें घोलावें।
तैसें जनास सिकवावें। हळुहळु॥ १३-१०-२४
वेड्यास वेडे म्हणों नये। वर्म कदापि बोलों नये।
तरी च घडे दिग्विजये। निस्पृहासी॥ २६
मनोगत राखोन जाता। परस्परें होये अवस्ता।
मनोगत तोडिता वेवस्ता। यरी नाहीं॥ २८
याकारणें मनोगत। राखेल तो मोठा महंत।
मनोगत राखता समस्त। वोढोन येती॥ २९

या चार ओव्यात समर्थांनीं लोकसंग्रह करणाऱ्या महंतानें लोकोद्धारार्थ उपदेश कोणत्या रीतीनें करावा याबद्दलचा योग्य दंडक घालून दिला आहे. समर्थ हे अद्वितीय विचारप्रवर्तक होते. त्यांना त्यांच्या कार्यांत जें पुढें यश आलें, तें लोकांत घडून आलेल्या या विचारक्रांतीचेंच फळ होय. ही विचारक्रान्ति घडवून आणीत असताना आपल्या मार्गांत ज्या मुख्य अडचणी दिसून आल्या, त्यांचा उल्लेख समर्थांनीं या लेखाच्या आरंभीं दिलेल्या ओव्यात स्पष्टपणें केला आहे. व त्या अडचणींतून—सांकडींतून—बाहेर कसें निघावें याबद्दलहि त्याच ओव्यात स्पष्ट खुलासा केला आहे. वरील ओव्यात दर्शविलेली पहिली अडचण म्हणजे पुष्कळ वेळा शास्त्र म्हणून समजल्या जाणाऱ्या गोष्टी व प्रत्यक्ष प्रत्यय यामधील विरोध, व दुसरी अडचण म्हणजे परिपाठ व प्रचीति यामधील विरोध ही होय. प्रत्यय किंवा प्रचीति याच्याविरुद्ध असलेलें शास्त्र किंवा प्रत्यय किंवा प्रचीति याच्याविरुद्ध असलेले परिपाठ व दंडक हे समर्थांना कधींहि मान्य होण्यासारखे नव्हते. शास्त्रावबोधानें लोकांच्या भलत्याच कल्पना झालेल्या होत्या व त्यांच्यामध्यें

कोणत्याहि कारणानें एकदा रूढ झालेले दडक व परिपाठ हेच पूर्णपणें सत्य आहेत, अशी त्यांची कल्पना झालेली होती. ह्या दोन्ही भ्रममूलक भावना त्यांच्या मनातून काढून टाकून त्यांच्या ठिकाणीं सत्य, प्रचीति किंवा अनुभवाला पटणारें ज्ञान यांची स्थापना करावयाची, हें खडतर काम समर्थांनीं आपल्या शिरावर घेतलें होतें. प्रचीतीला समर्थ किती महत्त्व देत असत, हें त्यांनीं दासबोधाच्या दहाव्या दशकाच्या आठव्या समासांत उत्तम व जोरदार रीतीनें दाखविलें आहे. त्यांतील कांहीं ओव्या खालीं देत आहें:

तुरंग शस्त्र दमून पाहिले । बरें पाहतां प्रचितीस आलें ।
तरी मग पाहिजे घेतलें । जाणते पुरुषीं ॥ १०-८-३
बीज उगवेलसें पाहावें । तरी मग द्रव्य घालून घ्यावें ।
प्रचित आलिया ऐकावें । निरूपण ॥ ४
परमेश्वरास वोळखिलें । आपण कोणसें कळलें ।
आत्मनिवेदन जालें । म्हणिजे बरें ॥ २२
ब्रह्मांड कोणें केलें । कासयाचें उभारलें ।
मुख्य कर्त्यास वोळखिलें । म्हणिजे बरें ॥ २३
येथें अनुमान राहिला । तरी परमार्थ केला तो वाया गेला ।
प्राणी संशईं बुडाला । प्रचितीविण ॥ २४
हें परमार्थाचें वर्म । लटिकें बोले तो अधम ।
लटिकें मानी तो अधमोद्धम । येथार्थ जाणावा ॥ २५
येथें बोलण्याची जाली सीमा । नेणतां न कळे परमात्मा ।
असत्य नाहीं सर्वोत्तमा । तू जाणसी ॥ २६
माझे उपासनेचा वडिवार । ज्ञान सांगावें साचार ।
मिथ्या वोलतां उत्तर । प्रभूस लागे ॥ २७

यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, समर्थांना प्रचीतीला विरुद्ध म्हणजे विचाराला न तगणाऱ्या रूढी व शास्त्राधार यांचें पूर्णपणें उच्चाटन करावयाचें होतें. वेड्याला वेडें म्हणून, मूर्खाला मूर्ख म्हणून, हें कार्य साधण्यासारखें नव्हतें, म्हणून शास्त्र व परिपाठ यांच्या विवरणाबरोबरच आपले प्रचीतीचे सिद्धांत समर्थांनीं आपल्या विषयनिरूपणांत जागोजागीं मोठ्या खुबीनें गोंवून ठेविले आहेत. ते विवेकी व परमार्थदक्ष अशा श्रोत्यांनीं व वाचकांनीं शोधून काढण्याचा

प्रयत्न केला पाहिजे. व अशाच प्रकारच्या श्रोत्यांना व वाचकांना ते सापडणें शक्य आहे, इतरांना नाहीं, ही गोष्ट शिरोभागीं उद्धृत केलेल्या चवथ्या व नवव्या ओवींतील "दोनी राखून निरूपण," "परम विचक्षण," "विवरोत," "शास्त्र रक्षून कौतुक," "विवेक" या शब्द व शब्दसमुच्चयावरून स्पष्ट होण्यासारखी आहे. ग्रथराज दासबोध वाचताना आढळणारे प्रत्यय विरुद्ध शास्त्र व प्रत्यय विरुद्ध दंडक हे वेगळे काढून प्रत्ययाला पटणारे सिद्धांत कोणते याची विचार-पूर्वक निवडानिवड करणें, हाच ग्रथराज नीटपणें समजून घेण्याचा खरा मार्ग आहे.

वरील विवेचनाला अनुसरून व वरील उद्देश लक्षांत ठेवून मी खालील विषय विवरणाकरिता घेत आहें. (१) देवदेवता-देवतें भुतें, (२) गुरु, (३) पुनर्जन्म व मृत्यूनतरच्या यातना, व (४) मुक्ति. या गोष्टींबद्दलचें माझें विवरण कदाचित् आपणाला पटणार नाहीं, व तें अगदीं चुकीचेंहि असण्याचा संभव आहे, हें मी जाणून आहें आपल्यासारख्या समर्थभक्तांचें लक्ष या गोष्टींकडे वेधावें हा माझा मूळ उद्देश आहे माझें म्हणणें चुकीचें ठरल्यास व माझी तशी खात्री झाल्यास मी तें केव्हांहि सोडून देण्यास व समर्थग्रथाचा खरा अर्थ व आशय स्वीकारण्यास तयार आहे व तयार राहीन समर्थांच्या वाणीचा अर्थ बरोबर न समजला तरी समर्थांच्या थोरपणाबद्दल व अद्वितीय कर्तृत्वाबद्दल माझा आदर कमी होणें हें केव्हांहि शक्य होणार नाहीं, हें लक्षात घेऊन आपण माझ्या खालील विचारसरणी-कडे कृपालु दृष्टीनें पहावें, एवढीच माझी आपल्यापाशीं प्रेमाची याचना आहे.

(१) देवदेवता-देवतें-भुतें— देव एक आहे. तो निर्गुण, निराकार, अनत, अपार, नित्य, निरतर असा आहे, तो सर्वांना व्यापक असून अनेकांच्या ठिकाणीं एकच आहे, त्यानें सर्व चराचर केलें, सर्व सृष्टयादि व्यापार केले, तो सर्व कर्ता आहे, तोच अखिल जगाचा अतरात्मा आहे, हीच समर्थांची देवा बद्दलची कल्पना होती. हाच त्यांचा प्रत्यय, हाच त्यांचा अनुभव होता या अनुभवाला धरून नसणाऱ्या ज्या देवदेवतासबधीं गोष्टी दासबोधात वर्णिल्या आहेत, त्या परिपाठ या सदरांत पडण्यासारख्या आहेत. देव्हाऱ्यांतील देव व पार्थिवपूजा याकडे समर्थ कोणत्या दृष्टीनें पहात असत हें खालील ओव्यावरून स्पष्ट होईल

देव्हाराचा उठोनि देव। करू नेणे सर्व जीव।
दयाचेनि ब्रह्मकटाव। निर्मिला न वचे ॥ ८ १-२२

मृत्तिकापूजन करावें। आणी सवें चि विसर्जावें।
हें मानेना स्वभावें। अंतःकर्णासी ॥ २०-९-१
देव पूजावा आणी टाकावा। हें प्रशस्त न वटे जीवा।
याचा विचार पाहावा। अंतर्यामीं ॥ २
देव करिजे ऐसा नाहीं। देव टाकिजे ऐसा नाहीं।
म्हणोनि याचा कांहीं। विचार पाहावा ॥ ३

*वरील चार ओव्या समर्थांचें प्रचीतिविद्ध मत दर्शवितात.* पण त्या-पुढीलच ओवी अशी आहे :

देव नाना शरीरें धरितो। धरुनी मागुती सोडितो।
तरी तो देव कैसा आहे तो। विवेकें वोळखावा ॥ २०-९-४

·या ओवींतील पहिला भाग समर्थांचा सिद्धांत दर्शवीत नसून केवळ परिपाठीला किंवा शास्त्रधाटीला अनुसरून लिहिलेला आहे असें दिसतें; त्याचप्रमाणें

तैसें देव देवता देवतें भूतें। मिथ्या म्हणों नये त्यांतें।
आपलाल्या सामर्थ्यें ते। सृष्टीमधें फिरती ॥ १०-९-२०
सदा विचरती वायोस्वरूपें। स्वइच्छा पालटिती रूपें।
अज्ञान प्राणी भ्रमें संकल्पें। त्यास बाधिती ॥ २१

या ओव्या वर वर पहाणाराला असें वाटेल कीं, देव, देवता, देवतें, भूतें यांच्यावर समर्थांचा पूर्ण विश्वास होता. पण वास्तविक स्थिति त्याच्या उलट दिसते. देव, देवता, भूतें हीं सत्य आहेत, असें समर्थांनीं म्हटलेलें नाहीं. त्याना मिथ्या म्हणूं नका, म्हणजे लोकांच्या सर्व प्रचलित कल्पना वेड्या किंवा मूर्ख-पणाच्या आहेत असें म्हणून त्यांचा बुद्धिभेद करूं नका, असा समर्थांनीं आपल्या महंताना इशारा दिला आहे. देवदेवताबद्दलचें वरील ओव्यांत दिलेलें वर्णन हें परिपाठीला व प्रचलित शास्त्रकल्पनेला अनुसरून होतें. त्याबद्दलचें समर्थांचें खरें मत शेवटल्या ओवीवरून स्पष्ट दिसून येतें. शेवटल्या ओवींत समर्थ म्हणतात, " देव देवता देवतें भूतें हा अज्ञान प्राण्यांच्या कल्पनेचा खेळ आहे, तो एक भ्रम आहे. " त्या भ्रमाचा ज्या लोकांवर पगडा बसत नाहीं, त्यांना त्या भूतादिकां-पासून कोणत्याहि प्रकारची बाधा होत नाहीं.

ब्रह्मा, विष्णु, महेश—

मायाब्रह्मीं जो समीर। त्यांत जाणता तो ईश्वर।

ईश्वर आणी सर्वेश्वर। तयासी च योलिजे॥ १०-४-१६
तोचि ईश्वर गुणासी आला। त्याचा त्रिगुण भेद जाला।
ब्रह्मा विष्णु महेश उपजला। तये ठाईं॥ १७

ईश्वरापासून त्रिगुण झाले व त्या त्रिगुणापासून ब्रह्मा, विष्णु व महेश या तीन देवता झाल्या. सत्वापासून विष्णु, रजोगुणापासून ब्रह्मदेव व तमोगुणापासून शंकर. सदहू तीन गुणांच्या ठिकाणीं कर्तृत्वशक्ति व देहधारित्व यांचा आरोप करण्यात आला व तेव्हांपासून त्या देहधारी देवता मानण्यांत येऊं लागल्या, हा सदहू तीन देवतासंबंधीं समर्थांचा सिद्धांत दिसतो; पण याशिवाय त्या देवतांसंबंधीं जें वर्णन दासबोधांत दशक १० समास ४ यांत आलें आहे, तें परिपाठी किंवा शास्त्रघाटी या सदरांत घालण्यास हरकत दिसत नाहीं. ह्या देवता देहधारी कशा झाल्या, ह्या शंकेला उत्तर देतांना समर्थ म्हणतात :

मनुष्यें धरिती शरीरवेष। नाना परकाया प्रवेश।
मा तो परमात्मा जगदीश। कैसा न धरी। १०-४-२७

हें समर्थांचें उत्तरहि त्याच्या श्रोत्याच्या मनावर परंपरागत जे संस्कार झालेले होते त्याना धरूनच, केवळ त्यांचें समाधान व्हावें येवढ्याच उद्देशानें, दिलेलें होतें; तत्त्वनिर्णयाच्या दृष्टीनें दिलेलें नव्हतें.

कल्पून निर्मिले मंत्र। देव ते कल्पनामात्र।
देव नाहीं स्वतन्त्र। मंत्राधेन॥ ९-५-२१
जयास जैसें भासलें। तेणें तैसें कवित्व केलें।
परी हे पाहिजे निवडिले। प्रचितीनें॥ २३

व "कवि देवांचे रूपकर्ते" (१-७-२०) ह्या समर्थांच्या अन्यत्र आढळेल्या उक्तीवरून वरील माझ्या म्हणण्याला पुष्टि येते. तसेंच

नातुडे मुख्य परमात्मा। म्हणोनि करावी लागे प्रतिमा।

या वाक्यावरून समर्थ मूर्तिपूजेकडे किंवा प्रतिमापूजेकडे कोणत्या दृष्टीनें पहात असत, हें स्पष्ट होतें. समर्थांचे वेळीं (आजहि बहुतांशीं तीच स्थिति आहे) देवांचा एकप्रकारें बाजारच भरला होता. देव्हाऱ्यांत वाटेल तितके देव ठेवून त्यांची नाममात्र पूजा करावी. एखादी मूर्ति कोणी दुष्टानें भ्रष्ट केली किंवा पाण्यांत टाकून दिली, तर रडत बसावें वा आपल्या नशिबाला दोष द्यावा, येवढेंच लोकांचें काम होऊन बसलें होतें. ही केविलवाणी व नामर्दपणाची स्थिति समर्थांना मुळींच पसंत

नव्हती. ते लोकांना सांगत असत कीं, "हे तुमचे देव सोनार, पाथरवट इत्यादिकांनीं बनविलेले आहेत, हे प्रत्यक्ष देव नसून देवाचीं कल्पित रूपें केवळ ध्यानाकरितां तुमच्यापुढें ठेवलेलीं आहेत, हें लक्षात ठेवा. ज्या देवाच्या त्या प्रतिमा आहेत त्या देवाला ओळखा. उगाच देव भ्रष्टविला गेला किंवा पाण्यात बुडविला गेला म्हणून रडत बसूं नका. तुमच्याच अंगात शक्ति नसल्यामुळें हे अत्याचार घडून आले, याचा विचार करून सावध व्हा. तुम्ही मानलेले हे देव खरे कीं खोटे, याचा विचार करा व पुढील कार्याला लागा." या विचारसरणीवरून समाजात त्या वेळीं चालू असलेल्या मूर्तिपूजेबद्दल व दंडकध्यानाबद्दल समर्थांना काय वाटत होतें, हें स्पष्ट दिसून येतें. मूर्तिपूजेसंबंधीं समर्थांनीं जागोजागीं काढलेले उद्गार हे एका दृष्टीनें परिपाठीलाच अनुसरून असावे असें दिसतें.

( २ ) गुरु—ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं व सद्गुरुशिवाय ज्ञान नाहीं, म्हणून सद्गुरुशिवाय मुक्ति नाहीं हें म्हणणें सामान्यतः सिद्धांत म्हणून बरोबर आहे. पण तेवढ्यावरून प्रत्येक मुमुक्षूनें कोणीतरी चालता बोलता देहधारी मानव गुरु केला पाहिजे व तसें न केल्यास त्याला मुक्ति मिळणार नाहीं, अशी जी हल्लीं सर्वत्र कल्पना रूढ झालेली आहे, ती समर्थांना मान्य होती असें दिसत नाहीं. स्वतः समर्थांनीं अशा प्रकारचा कोणी गुरु केल्याचें दिसत नाहीं. नवविधाभक्तींपैकीं चवथी भक्ति हिचें वर्णन समर्थांनीं एका स्फुट प्रकरणात असें केलें आहे :

उद्धरले संत सज्जन शोधितां। हेचि जाण आतां चौथी भक्ति ॥
भक्ति सज्जनाची हे वाट मुक्तिची। येथें संदेहाची उरी नाहीं ॥
उरी नाहीं दोषां सज्जन सेवितां। भक्ति सायोज्यता पाठीं लागे ॥
पाठीं लागे मुक्ति संताचे संगतीं। उद्धरले किती सांगो आतां ॥

अनंतदासकृत श्रीसमर्थांचा गाथा—
पान १४७ ओव्या २८-३१

या चारहि ओव्यात सद्गुरु शब्द कोठेंहि आलेला नाहीं. परंतु दासबोधात पादसेवनभक्तीचें जें वर्णन केलें आहे, त्यांत सद्गुरूच्या पादसेवनावरच विशेष भर दिलेला आहे. पुढील ओव्या पहा—

पादसेवन तेंचि जाणावें। कायावाचामनोभावें।
सद्गुरूचे पाय सेवावे। सद्गतिकारणें ॥ ४-४-२

या नाव पादसेवन । सद्गुरुपदीं अनन्यपण ।
निरसावया जन्ममरण । यातायाती ॥ ३
सद्गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाव तों नाहीं ।
याकारणें लवलाहीं । सद्गुरुपाय सेवावे ॥ ४
सेवावे सद्गुरूचे चरण । या नाव पादसेवन ।
चौथे भक्तीचे लक्षण । तें हें निरोपिलें ॥ २२

यावरून संतसज्जनांची सेवा म्हणजेच पादसेवन अशी जी समर्थांची पूर्वीची कल्पना तीच त्यांनी दासबोधात सद्गुरुसेवा या शब्दांनी प्रदर्शित केली आहे. म्हणजे संत, साधु, सज्जन व सद्गुरु हा सर्वांना ते एकरूपच मानीत असत. कदाचित् तत्कालीन परिपाठीला अनुसरून समर्थांनी सद्गुरु या शब्दावर चवथ्या भक्तीचें वर्णन करीत असताना विशेष जोर दिला असावा. या ठिकाणीं शास्त्रपाटी व प्रचीति यातील विरोधाचें याच सदरात येणारें एक उदाहरण येथें देण्यास हरकत दिसत नाहीं. महावाक्याचा विचार करण्याचा अधिकार एका सन्याशा लाच आहे अशी शास्त्रपाटी आहे. पण समर्थ म्हणतात कीं, ज्याच्यावर देवाची विशेष कृपा आहे, तो शास्त्राप्रमाणें सन्यासी नसला तरी महावाक्याचें विवरण करून ब्रह्मसाक्षात्कार करून घेऊं शकतो. विचारी पुरुष जे आहेत ते खरोखर सन्यासीच होत. ते आपल्या विचाराच्या जोरावर ब्रह्मप्राप्ति करून घेऊं शकतात. समर्थ म्हणतात—

माहावाक्याचा विचारु । तेथें सन्याशास अधिकारु ।
दैवी कृपेचा जो नरु । तो हि विवरोन पाहे ॥ १५-१०-१५
संन्यासी म्हणिजे श्डन्यासी । विचारवंत सर्वे संन्यासी ।
आपली करणी आपणासी । निश्चयेंसी ॥ १६

यावरून परिपाठीच्या दास्यातून लोकाना हळू हळू वर काढण्याचा समर्थांचा हेतु स्पष्टपणें दिसत आहे.

( ३ ) पुनर्जन्म व मृत्यूनंतरच्या परलोकातील यातना—पुनर्जन्माचा सिद्धांत आर्यावर्तात पूर्वी होऊन गेलेल्या थोर थोर लोकांप्रमाणें समर्थांनीं मान्य केलेला आहे. परंतु मृत्यूनंतर परलोकामध्यें अमुक एक विशिष्ट प्रकारचें सुख किंवा दुःख होतें, ही गोष्ट समर्थांनीं मान्य केलेली दिसत नाहीं. परलोकींच्या सुखदु:खा-बद्दल जें कांहीं समर्थांनीं लिहिलें आहे, तें शास्त्रपाटी किंवा परिपाठ याना अनु-

सरूनच लिहिलेलें आहे. दासबोध दशक तीन समास आठ यात आदिदैविक तापाचें वर्णन आलेलें आहे. त्यात नाना प्रकारच्या काल्पनिक यमयातना वर्णन केल्या आहेत. त्या प्रत्ययाला धरून आहेत असें दिसत नाहीं, तथापि शास्त्रामध्यें वर्णन केल्या असल्यामुळें समर्थांनीं लोकाना पापापासून निवृत्त करण्याकरिता परिपाठीला अनुसरून त्या आपल्या ग्रंथामध्यें वर्णिल्या आहेत. पुढल्या जन्मावर विसंबून राहूं नका, याच जन्मात जें काय करायचें तें करा, तुम्हाला हा नरदेह प्राप्त झालेला आहे, तरी याच जन्मात ज्ञान प्राप्त करून घ्या व जन्ममरणापासून मुक्त व्हा, याच जन्मात होणारा व्यवहार हा रोकडा व्यवहार आहे, व पुढच्या जन्मांतील गोष्टी हा सर्व उधारीचा व्यवहार होय; तात्पर्य पुढच्या जन्माबद्दल किंवा मेल्यानंतरच्या स्थितीबद्दल उगाच काथ्याकूट करीत बसूं नका, मेल्यानतर तुम्हाला पुन्हा नरदेह प्राप्त होईल याबद्दलची शाश्वति काय आहे, असा उपदेश समर्थ वारवार करीत आहेत. समर्थ म्हणतात—

हा नरदेह पडतां । तो चि पाविजे मागुता ।
ऐसा विश्वास धरितां । लाभ नाहीं ॥ ८-७-२८
कोण पुण्याचा संग्रहो । जे पुन्हा पाविजे नरदेहो ।
दुराशा धरिली पाहो । पुढिलिया जन्माची ॥ २९
ऐसे मूर्ख अज्ञान जन । केले संकल्पें बंधन ।
श त्रु आपणासि आपण । होऊन ठेला ॥ ३०

ही घर सागितलेली कर्मप्रवृत्तीपर शिकवण प्रचीतीला धरून आहे व प्रमाणसिद्धहि आहे.

( ४ ) मुक्ति—मुक्ति चार प्रकारच्या आहेत असें शास्त्रांत सागितलें आहे. पहिली स्वलोकता, दुसरी समीपता, तिसरी स्वरूपता व चवथी सायोज्यता. या चार मुक्तींपैकीं सायोज्यमुक्ति हीच समर्थांना मान्य होती. पहिल्या तीन मुक्तींचें वर्णन समर्थांनीं शास्त्राला किंवा परिपाठीला अनुसरून केलें आहे व चवथ्या मुक्तीचें वर्णन अनुभवसिद्ध व प्रमाणसिद्ध आहे. पहिल्या तीन मुक्ति नाशिवत आहेत व चवथी अविनाश आहे. म्हणून पहिल्या तीन मुक्तींना समर्थ कोठेंच महत्त्व देत नाहींत व चवथी मुक्ति हीच खरी मुक्ति होय व तिचीच प्राप्ति करून घेण्याचा प्रत्येकानें प्रयत्न करावा हा समर्थांचा सिद्धांत होय. पहिल्या तीन मुक्तींचें वर्णन हें

जयास जैसें भासले । तेणे तैसे कवित्व केलें

या सदरात येतें. त्याचप्रमाणें दशक चार समास दहा मध्यें जें स्वर्गभुवनाचें वर्णन केलें आहे, तेंहि परंपरागत परिपाठीलाच अनुसरून आहे.

येथें ज्या देवाचें भजन करावें । तेथे तें देवलोकीं राहावें ।
स्वलोकता मुक्तीचें जाणावे । लक्षण ऐसें ॥ ४-१०-२३
लोकीं राहावें ते स्वलोकता । समीप असावें ते समीपता ।
स्वरूप चि व्हावें ते स्वरूपता । तिसरी मुक्ती ॥ २४
देहस्वरूप जाला देही । श्रीवत्स कौस्तुभ लक्ष्मी नाहीं ।
स्वरूपतेचें लक्षण पाहीं । ऐसें असे ॥ २५
सुकृत आहे तों भोगिती । सुकृत सरतांच ढकलून देती ।
आपण देव ते असती । जैसे तैसे ॥ २६

मरणानंतरच्या मुक्तीला समर्थ मुळींच महत्त्व देत नसत. समर्थ म्हणतात :

म्हणोनी चोलता चालतां । निचेष्टित पडिलें नस्ता ।
मुक्ति लाभे सायोज्यता । सद्गुरुबोधें ॥ ७ ६-४४

निर्गुणीं अनन्य असतां । तेणें होय सायोज्यता ।
सायोज्यता म्हणिजे स्वरूपता । निर्गुण भक्ती ॥ ४ १० ३०

संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधी न सांडितां ।
जनामध्यें सार्थकता । विचारें चि होये ॥ ६ ९ २४
हें प्रचितीचें बोलणें । विवेकें प्रचित पाहाणे ।
प्रचित पाहे तें शाहाणे । अन्यथा नव्हे ॥ २५
सप्रचित आणी अनुमान । उधार आणी रोकडें धन ।
मानसपूजा प्रत्यक्ष दर्शन । यास महदांतर ॥ २६
पुढें जन्मांतरीं होणार । हा तो अवघाच उधार ।
तैसा नव्हे सारासार । तत्काळ लाभे ॥ २७
याचि जन्में येणें चि काळें । संसार होइजे निराळें ।
मोक्ष पाविजे निश्चळे । स्वरूपाकारें ॥ २९
ये गोष्टीस करी अनुमान । तो सिद्धचि पावेल पतन ।
मिथ्या वदे त्यास आण । उपासनेची ॥ ३०

यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, मनुष्याला जो हा नरदेह प्राप्त झाला आहे, त्याचाच त्यानें पूर्ण उपयोग करून घ्यावा, व शास्त्रघाटी, तर्क व अनुमान यावर भिस्त न ठेवितां, विवेक व विचार याचा आश्रय करून याच जन्मात संसार सुखाचा करून, व असें करीत असतां, सर्व प्रपंचउपाधींना कामास लावून आपलें आत्यंतिक समाधान करून घ्यावें, हाच समर्थांचा महाराष्ट्रजनतेला—किंबहुना आर्य मात्राला—कळकळीचा उपदेश आहे.

येणेंप्रमाणें प्रचित आणि परिपाठ यामध्यें दिसून येणाऱ्या भेदाचीं कांहीं उदाहरणें वर दाखविलीं आहेत. असाच फरक, पिंडब्रह्मांडैक्य व पिंडांतील चार देह व ब्रह्मांडातील चार देह पुरुषप्रकृति व मूळ देहाची उत्पत्ति कशी झाली, यासंबधीं समर्थांनीं जें कांहीं लिहिलें आहे, त्यात वर वर पहाणारालाहि सहज दिसून येण्यासारखा आहे सरतेशेवटीं आपणाला आग्रहपूर्वक माझी येवढीच विनंति आहे कीं, दासबोध ग्रंथ वाचीत असतां प्रचीतीच्या गोष्टी कोणत्या व परिपाठाच्या गोष्टी कोणत्या याची निवडानिवड करून समर्थांचें हृद्गत समजून घेण्याचा प्रयत्न करा या दृष्टीनें पाहिल्यास दासबोधात एकहि वचन अपवादाहं सापडणार नाहीं, असा मला भरवसा आहे आपणांसारख्या विद्वान्, विचक्षण, चतुर व दक्ष अशा समर्थभक्तापुढें माझे हे मोडके तोडके चार शब्द मांडण्याची आज संधि मिळाली याबद्दल मी श्रीयुत नानासाहेब देव याचा आभारी आहे, व आपण ते ऐकून घेतले याबद्दल आपणा सर्वांचा आभारी आहे शेवटीं

ऐसा नव्हे माझा राम । सकळ जीवांचा विश्राम ॥
नव्हे गणेश गणपाळू । लाडू मोदकाचा काळू ॥
नव्हे चंडी मुंडी शक्ती । मद्य मांसाते मागती ।
नव्हे भैरव खंडेराव । रोटी भरितासाठीं देव ॥
नव्हे जाखाई जोखाई । पीडिताती ठायीं ठायीं ॥
नव्हे भूत नव्हे खेत । निंब नारळ मागत ॥
रामदासी पूर्ण काम । सर्वांभूतीं सर्वोत्तम ॥

येवढेंच समर्थांच्या शब्दात सांगून मी आपली रजा घेतों

रामगांव—ता १२ ६ १९३५



( १४ )

श्रीरामसमर्थ

## भाग्यप्राप्तीचा श्रीसमर्थोपदिष्ट मार्ग

( लेखक— श्री. अनंतदास रामदासी, मठाधिपति, गिरड )

देव पुजावा विमळहस्तीं । तेणे भाग्य पाविजे समस्तीं ।
मूर्ख अभक्त वेस्तीं । दरिद्र भोगिजे ॥ १४ ८ २

'अकिंचन वरेण्य' असून जे 'समर्थ' पदवीला प्राप्त झाले, 'आधीं केलें मग सांगितलें' ही ज्याची प्रतिज्ञा, राजराजेन्द्र पायीं लागतील असें भाग्य ज्यांना लाभलें, आणि स्वत.बरोबर आपल्या समाजाला व राष्ट्राला ज्यांनीं भाग्यवैभव संपन्न बनविलें, त्या महाराष्ट्रगुरु समर्थ रामदासस्वामींनीं ज्यायोगें सर्वांना भाग्य मिळेल असा मार्ग वरील वचनांत सांगितला आहे. तो मार्ग हा—

देव पुजावा विमळहस्तीं ।

या वाक्याचा उत्तानार्थ फार सोपा आहे, तथापि महापुरुषाच्या 'स्वैरालापीं श्रुत्यर्थ विचारिजेति सुज्ञानीं ।' असें असल्यामुळें श्रुतिशास्त्रादिकांचा समन्वय करून अज्ञानी जड जीवाचा मार्ग सुगम करणाऱ्या ग्रंथराजांतील या साध्या दिसणाऱ्या वचनाचा अधिक विचार करावयास पाहिजे.

हें वचन कोणास उद्देशून लिहिलें आहे तें प्रथम पाहू. १४ व्या दशकाच्या ७ व्या समासांतील युगधर्मनिरूपणांत 'सर्वांचें मूळ' व 'सकळामध्यें उत्तमोत्तम' अशा गृहस्थाश्रमाची आचारभ्रष्टी व अनाचारी लोकांमुळें कशी अधोगति चालली आहे आणि वर्णश्रेष्ठ

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले। १४-७ ३१
व ग्रामणीनें त्यांची अज्ञानदशा कशी झाली याचें वर्णन आहे. नंतर ही परिस्थिति पालटण्याला काय करावें याविषयीं सांगताना पुढील म्हणजे आठव्या समासाच्या आरंभींच श्रीसमर्थ म्हणतात—

बरें ऐसा प्रसंग जाला। जाला तो होऊन गेला।
आतां तरी ब्राह्मणीं आपणाला। शाहाणे करावें॥

झाल्या गेल्या गोष्टी पुन्हा परत येत नाहींत; कोणाच्या दोषामुळें अशी अवनतगत झाली, याचा काथ्याकूट करून आता उपयोग काय? दोष कोणाचाहि असो, पण त्याचे परिणाम मात्र तुम्हा आम्हास भोगावे लागत आहेत!

प्राणीमात्र जाले दु:खी। पाहातां कोण्ही नाहीं सुखी।

फार काय, कोणासहि

अन्न मिळेना ऐसें जालें। १४-७-२९

हें

तुम्हा बहुतांचे प्रचितीस आलें। किंवा नाहीं॥ २९

ही स्थिति पालटावयाची असेल तर

आतां तरी ब्राह्मणीं आपणाला। शाहाणे करावें॥ १४-८-१

ब्राह्मणानीं स्वतः शाहाणे व्हावें, आणि करावें काय? तर

देव पुजावा विमळहस्तीं।

व त्याचें फळ

तेणें भाग्य पाविजे समस्तीं।

ब्राह्मणांनीं विमल हस्तानीं देवपूजा केल्यास त्यायोगें सर्वांना—सर्व जनतेला—भाग्य लाभेल. असा भाग्यप्राप्तीचा सुलभ उपाय श्रीसमर्थांनीं सांगितला आहे.

साम्प्रतच्या मतांमतांच्या गलबल्यात या उपायासबंधानें एक आक्षेप उत्पन्न होण्याचा संभव आहे, त्याचा विचार अगोदर करू; कारण, शंकेची मळमळ पोटात असतांना विवेचनाचें भोजन हितावह होणार नाहीं. आक्षेप असा—"रामदासस्वामी स्वतः ब्राह्मण होते आणि त्यांनीं स्वजातीचें हित व्हावें म्हणून—किंबहुना इतर वर्णांवर आपल्या ब्राह्मण जातीच्या वर्चस्वाचा पगडा कायम रहावा म्हणून—अशी योजना सुचविली." थोडासा विचार केल्यास हा आक्षेप पोल आहे असें दिसून येईल. श्रीसमर्थ रामदासस्वामींसारख्या ब्रह्मनिष्ठावर असला क्षुद्र आरोप

करणें म्हणजे आपलाच मूर्खपणा प्रकट करणें होय.

जरी ब्राह्मण जाला भ्रष्ट । तरी तिहीं लोकीं श्रेष्ठ ।

असे भ्रष्ट ब्राह्मणाविषयीं उदारतेचे उद्गार काढणारे तुकोबाराय ब्राह्मण होते ? का भ्रष्ट ब्राह्मणांनीं त्यांना कांहीं लाचलुचपत दिली म्हणून त्यांनीं इतर जातींची अशी दिशाभूल केली ? कीं हें वचन प्रक्षिप्त आहे ? अभंग तुकोबारायांचाच आहे, प्रक्षिप्त नाहीं, त्या सत्पुरुषानें कोणाची दिशाभूलहि केली नाहीं; योग्य तेंच सांगि-तलें. शेंदोनशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या एखाद्या स्वराज्यसंस्थापकाच्या आजच्या वंशजाचे आंगीं त्या मूळ पुरुषाचे शौर्य, धैर्य, साहस, न्यायप्रियता, राजकारणपटुत्व इत्यादि सद्गुण नसले तरी सुद्धा ' थोराचा वंश ' म्हणून जनता त्यास मान देते, तो वंशज सत्ताधिष्ठित असेल तर त्यास मान देणें आवश्यकच असतें, त्याच न्यायानें वसिष्ठवामदेवादि महर्षींच्या आजच्या वंशजांचा—त्यांच्या पूर्वजांच्या थोर सद्गुणांकडे लक्ष देऊन—गौरव करण्यास तुकोबारायांनीं सांगितलें तर त्यांत बिघडलें कोठें ? परंतु हा सरळ विचार द्वेषमत्सरादिकांनीं झपाटलेल्या मनास पटणार नाहीं. जाति-पाति, कुलगोत्र, देशभाषा इत्यादि विकारांनीं संकुचित होऊन लोककल्याणाच्या नांवाखालीं जनतेला बहकावण्याचें किंवा भटेल त्या आडमार्गांत नेण्याचें पापकर्म ' सर्वभूतहितरत ' अशा समर्थतुकोबांसारख्या महापुरुषांच्या हातून स्वप्नांतहि व्हावयाचें नाहीं. तें काम स्वार्थलोलुपांनीं करावें. सत्याच्या अनुभवासाठीं या सत्पुरुषांनीं आपलें सर्वस्व वेंचलें आणि

सत्याचा जो साभिमान । तोचि जाणावा निराभिमान ।

असा उपदेश त्यांनीं इतरांसहि केला. तेव्हां शिरोवतरणांत केलेला उपदेश श्रीसम-र्थांनीं स्वजातीचे अभिमानानें केला नसून राष्ट्राच्या रोगाचें निदान करून त्यांना जो योग्य उपाय दिसला तोच त्यांनीं सांगितला.

करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।
ते चि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ ६-४-२४

ब्राह्मणु ब्रह्मवेत्ता तो । ब्राह्मणु ब्रह्मनिश्चई ।
ब्राह्मणु ब्रह्मस्थितीचा । ब्राह्मणु म्हणिजे गती ॥ स्फु. प्र. १७-१०

असें ब्राह्मणाचें लक्षण श्रीसमर्थांनीं ठिकठिकाणीं सांगितलें आहे. परंतु हें लक्षण सर्वांनाच सुसाध्य नाहीं. ब्रह्मप्राप्ति ज्यांना साधतां येत नसेल त्यांनीं

करावें आलोड्य वेद आणि शास्त्रें ।

मंत्र स्तुति स्तोत्रें नाना परी ॥ १
तपें पुरश्चरणें ध्यानस्थ बैसावें ।
सांग संपादावें देवार्चन ॥ २
धरणीं पारणीं नित्य उपोषणें ।
तेणें होती क्षीण महादोष ॥ ३
दया दान धर्म करावा स्वधर्म ।
धुकयावें वर्म संसाराचें ॥ ४
उपासना कर्म हें आधीं पाळावें ।
मग सांभाळावें ब्रह्मज्ञान ॥ ५

अशा प्रकारें साधनांमध्यें आपलें आयुष्य वेंचावें. प्राचीन पद्धतीप्रमाणें अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह हीं ब्राह्मणाचीं षट्कर्मे होत. या सर्वांचा व्यापल्यानें विचार केल्यास असें दिसून येईल कीं, स्वतः अनेक विद्यांचें ज्ञान संपादन करून जिज्ञासूंना तें निरपेक्षतेनें देणें, स्वतः सन्मार्गानें व सदाचारानें वागून इतरास तसें वागण्यास शिकविणें, आपण स्वधर्मकर्माचें परिपालन करून दुसऱ्याकडून करविणें याची जबाबदारी मुख्यतः ब्राह्मणांवर आहे. अर्थात् ब्राह्मण म्हणजे राष्ट्रांतील ज्ञानशक्ति होय. मोटार किंवा आगगाडी चालवितांना इंजिन-ड्रायव्हरला अथवा आगबोटीमध्यें सुकाणूवाल्याला जें महत्त्व आहे, तेंच महत्त्व समाजाच्या व राष्ट्राच्या प्रगतिपथांत या ज्ञानशक्तीचें—ब्राह्मणाचें—आहे. ते ब्राह्मण जर

बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।

आणि स्वधर्मकर्म सोडून दावलमल्क व पीर यांचें भजनपूजन करूं लागले अगर स्वेच्छेनें परधर्म स्वीकारूं लागले, तर त्यांच्या अनुयायी समाजाला मार्ग दाखवावा कोणी ? म्हणून त्या ब्राह्मणांना ताळ्यावर आणण्यासाठीं श्रीसमर्थ सांगतात कीं,

आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शहाणे करावें ॥

आणि

देव पुजावा विमळहस्तीं ।

देवपूजा म्हणजे गंधपुष्पादि उपचार प्रतिमेला अर्पण करणें एवढाच रूढार्थ मानल्यास वरील आक्षेपांत कांहीं तरी तथ्य आहे असें म्हणतां येईल. परंतु श्रीसमर्थांनींच

पहिला देव तो बद्धाचा। दुसरा देव तो मुमुक्षाचा।
तिसरा देव तो साधकाचा। चवथा देव तो वेगळा।
अगम्य त्याची लीळा॥ गाथा ९४८-१

या पदात म्हटल्याप्रमाणें, त्याचा देव वेगळा व त्या देवाची पूजाहि वेगळीच. देव न ओळखताच देवाची पूजा करण्याचा मार्ग रूढ आहे. पण, श्रीसमर्थ म्हणतात—

नाना देवाच्या नाना प्रतिमा। लोक पूजिती धरून प्रेमा।
ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा। कैसा आहे॥ ११-९-६
ऐसें वोळखिले पाहिजे। वोळखोन भजन कीजे।
जैसा साहेब नमस्कारिजे। वोळखिल्याउपरी॥ ७

देव कोणता, तो कसा आहे, कोठें रहातो, त्याची पूजा करायची म्हणजे काय करायचें हें अगोदर ओळखा–शिका, आणि मग त्या देवाचें भजन पूजन करा प्रत्येक हिंदूच्या घरात देवाची एखादी तरी प्रतिमा असतेच. प्रतिमा कोणाची बनविली? तर क्षेत्रात जो देव, खरें म्हटलें म्हणजे देवाची प्रतिमा पाहिली तिची प्रतिकृति होय, आणि क्षेत्रातील देव म्हणजे

थोर लोक मरोनि जाती। त्याच्या मुरता करूनी पाहाती।
२०-९-९

अशांतला प्रकार आहे. क्षेत्रांतील देव प्रतिमा म्हणजे पूर्वीच्या अवतारांचीं प्रतीकें होत. प्रतिमादेव, क्षेत्रदेव, किंवा अवतार या

सकळ देवाचें मूळ। तो हा अंतरात्मा चि केवळ।
भूमंडळीं भोग सकळ। त्यासीच घडे॥ १८-१-१६

ज्या अंतरात्म्यापासून सगळे अवतार झाले, त्यालाच आत्मा, परमात्मा, देव, जगदीश, विश्वंभर, भगवान्, इत्यादि नावें आहेत. प्रतिमादेवाच्या पूजेहून आत्मदेवाची पूजा वेगळी कोणत्याहि देवाची पूजा करायची तर तो देव ज्या देवघरांत किंवा देवालयांत असेल तेथें जावें लागतें. आत्मदेवाला पहावयाचें म्हणजे

देहेदेवाळयामधें। पाहाणें देव तो बरा। स्फु. प्र. ६८-१

आणि त्याची पूजा करावयाची म्हणजे

पुजीता सर्व देवाल्यें। तेणें तो तृप्त होतसे। स्फु. प्र. ६८-८

× × ×

देहास वरे करावें। ते आत्मयास पावें ॥

× × ×

देहामधें आत्मा असतो। देहे पूजितां आत्मा तोषतो।
देहे पीडितां आत्मा क्षोमतो। प्रत्यक्ष आतां ॥ १८-४-३४
देहावेगळी पूजा पावेना। देहाविण पूजा फावेना।
जनीं जनार्दन म्हणोनी जना। संतुष्ट करावें ॥ ३५

तेव्हा 'देव पुजावा विमळदृष्टी।' यांतील 'देव पुजावा' या शब्दांचा अर्थ जनीजनार्दनाचा संतोष करावा असा झाला. हा संतोष उत्पन्न करण्याचे मार्ग अनेक आहेत, त्याचें सामान्य निरूपण श्रीसमर्थांनी पुढीलप्रमाणें केलें आहे.

दुःख जाणे पराव्याचें। ऐसा तो विरुळा गुणी।
ऐकतां ऐकतां ऐके। तेणेंची आवडी दुणी ॥ मा. पं. ५-३
दुःख वांटून तें घ्यावें। काढावें ऐसीयापरी।
देहेदुखें रोगव्याधी। औषधें परतें करी ॥ ५
सद्बुधी सांगणें लोकां। जेणें ते सुख पावती।
प्रसग राखणे आधीं। सोसावें बहुतांपरी ॥ ६
न्याय अन्याय सोसावा। सोसीलाहि विटों नये।
न्युन्य पैशुन्य झाकावें। तेणे तें प्रस्तावा पडे ॥ ७

× × ×

भंगलें चीत्त जाणावें। रक्षावें बहुतांपरी ॥ स्फु. प्र. ४२-२
अंतरीं प्रीती राखावी। शब्दाशब्दीं परोपरीं। ३

× × ×

सर्वेहि पेरणें विद्या। लोकामधें हलु हलु।
नेणते जाणते कर्णें। कथानीरूपणें सदा ॥ स्फु. प्र. ५४-६
सर्वांसी राखणें राजी। सर्वकाळ मृदोत्तरें। १५
सर्वांस सुख होवाहे। ज्याचे त्याचे परी सदा। १६

दुसऱ्याचें दुःख जाणावें, ऐकून तें वाटून घ्यावें, औषधोपचारानें शारीरिक दुःखें दूर करावीं, हितपरिणामी अशी सद्बुद्धि सागून मानसिक व्यथा घालवावी, लोकांचे न्यायान्याय सोसावे, कोणाचाहि उणेपणा किंवा दुष्टपणा प्रकट करूं नये, अडीअडचणींचा प्रसंग सामाळावा, त्यासाठीं स्वतःस झीज सोसण्याची

पाळी आली तरी सोसावी, कोणाचें मन दुखवलें गेलें असल्यास तें जाणून घेऊन मृदु मधुर भाषणानें त्याचें समाधान करावें, दुसऱ्याचे अंतःकरणात आपणाविषयीं प्रेम वाटेल असें वागावें, कथानिरूपणद्वारा लोकास विद्यादान करून नेणत्यास जाणते करावे, नम्र वाणीनें सर्वांना सर्व काळ राजी राखण्याचा यत्न करावा. अशा प्रकारें वागलें असता सर्व जण आपापल्यापरी सुखी होतील.

एके ठिकाणीं देव दैत्यांचीं लक्षणें श्रीसमर्थांनीं पुढीलप्रमाणें दिलीं आहेत.

आचुक येत्न तो देवो । चुकणे दैत्य जाणिजे ।
न्याय तो देव जाणावा । अन्याय राक्षसी क्रिया ॥ स्फु. प्र. ३०-५
सावधु देव जाणावा । उन्मतु दैत्य बोलिजे । ६
साक्षपी अंश देवाचे । आळसी अंश दानवी । ७
देव सर्वांस सांभाळी । तदांश जाणिजे तसा ।
दैत्य ते पीडिती लोकां । तदांश त्याचसारिखे ॥ ८

यातहि साक्षेपानें, सावधानतेनें व न्याय्य मार्गानें अचूक यत्न करणारा व सर्वांना सांभाळणारा तो देव होय आणि त्याचा अंश किंवा भक्त म्हणविणारांहि तसाच पाहिजे असें देवा-भक्तांचें लक्षण सांगितलें आहे, तेंहि लक्षात ठेवण्यासारखें आहे. तात्पर्य,

संतोषो जनयेत्प्राज्ञस्तदेवेश्वरपूजनम् ।

अथवा

सकळांसी राखणे राजी । हे मुख्य भक्ती जाणिजे ॥ स्फु. प्र. ४२-५

ही खरी देवपूजा होय, हीच मुख्य भक्ति आहे. मात्र ही देवपूजा करताना

न्याय अन्याय तो जाणे । अन्याय न करी कदा ।
नीती न्यायें मिळों जाणे । तोची तो लोकसंग्रही ॥ मा. प. ५-११

× × ×

सन्मार्गें जगास मिळाला । म्हणिजे जगदीश बोळला ।

अन्याय कदापि करावयाचा नाहीं, सन्मार्गानें पण नम्रतेनें वागून जगाच्या अंतरगांत मिळून जावयाचें. कोणाचाहि संतोष करण्यासाठीं अनाचार, अनीति, दुष्टपणा लेशमात्र करावयाचा नाहीं एवढें पक्कें ध्यानात ठेविलें पाहिजे.

याप्रमाणें "देव पुजावा" म्हणजे जनीजनार्दनाचा संतोष न्यायनीतीनें करावा, लोकसेवा—दरिद्री नारायणाची सेवा—स्वधर्म सांभाळून करावी असा अर्थ निष्पन्न झाला. आतां ती पूजा 'विमळहरतीं' करावयाची म्हणजे काय करावयाचें तें पाहूं.

'विमळ हरतीं' म्हणजे निर्मळ हातानें—ज्या हातास बाह्यतः कोणताहि मळ लागला नाहीं, जो अगदीं स्वच्छ आहे आणि कसल्याहि प्रकारच्या पापकर्मानें जो हात मळलेला नाहीं असे दोन अर्थ तर उघड आहेतच. याशिवाय अध्यात्म-दृष्टया आणखी एक अर्थ आहे. 'यत्करोषि यदश्नासि॰ तत्कुरुष्व मदर्पणम्' या श्लोकाचें विवरण करतांना ज्ञानेश्वरीमध्यें म्हटलें आहे कीं,

पारे सर्वथा आपुलां जिवीं। केलेयाचीं से काहीं नुरावी।
ऐसीं धूनि कर्मे देयावीं। माझां हातीं॥ ३९७॥ अ. ९

जें जें कर्म हातून घडेल तें तें सर्व करतांना भगवत्प्रीत्यर्थ करून पुन्हां घडल्याची आठवणहि मनात राहतां उपयोगी नाहीं. ही हातवटी ज्याला साधली त्याला कर्माच्या पापपुण्याचा लेप लागावयाचा नाहीं. त्यासाठीं मनातील कर्तेपणाचा अहंभाव सर्वस्वीं नाहींसा झाला पाहिजे. म्हणून

आहे तितुकें देवाचें। ऐसें वर्तणें निश्चयाचें।
मूळ तुटे उद्वेगाचें। येणें रितीं॥

सर्वच देवाचें आहे अशी निश्चयाची भावना मनात सदैव असावयास हवी. सर्वच देवाचें तर त्या सगळ्याचा अथवा सर्वप्रीत्यर्थ होणाऱ्या कर्माचा कर्ताहि देवच, आपण नव्हे.

कर्ता आपण ऐसें म्हणावें। तरी आपलें इच्छेसारिखें व्हावें।
इच्छेसारिखें न होतां मानावें। अवघें च वाव॥ १२ ६-२६
म्हणोन कर्ता नव्हे कि आपण। तेथें भोक्ता कैंचा कोण। २७

सगळ्याच गोष्टी आपल्या इच्छेप्रमाणें घडत नसतात, या उघड प्रमाणावरूनच कर्ता आपण नव्हे हें ज्याचें त्याला पटेल. कर्ताच आपण नव्हे तर भोक्ताहि आपण नाहींच. मग कर्ता कोण? कर्ता देव.

कर्ता राम मी नव्हे आपण। ६-७-३४

अशी निश्चयाची वृत्ति सखंड मनात राहणें याचेंच नाव निवेदन, त्यालाच अलिप्तपणा अशी दुसरी संज्ञा आहे. 'विमळ हरत' या शब्दानीं श्रीसमर्थांना

हाच अर्थ अभिप्रेत आहे. कोणत्याहि कार्यात यश, कीर्ति, प्रताप मिळवणें असेल तर हीच निवेदनाची अथवा अलिप्तपणाची वृत्ति बळावली पाहिजे.

रघुनाथ स्मरोनि कार्य करावें। तें तत्काळ चि सिद्धी पावे।
कर्ता राम हें असावें। अभ्यांतरीं ॥ ६-७-३३
मी कर्ता ऐसें म्हणतां। कांहीं च घडेना सर्वथा।
प्रचित पाहासी तरी आतां। सीघ्र चि पाहे ॥ ३५
मी कर्ता ऐसें म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी।
राम कर्ता म्हणतां पावसी। येश कीर्ती प्रताप ॥ ३६

कार्यारंभीं रामाचें स्मरण करावें व कार्य करीत असतां कर्ता राम आहे अशी भावना ठेवावी, म्हणजे तें कार्य तत्काळ सिद्धीस जातें. मी कर्ता असें म्हटल्यानें आपले इच्छेप्रमाणें काहींच घडत नाहीं. याचा अनुभव पाहिजे असेल तर तेव्हाच येईल. 'मी कर्ता' म्हटल्यानें कष्ट भोगावे लागतात आणि 'राम कर्ता' म्हटल्यानें यश, कीर्ति व प्रताप यांचा लाभ होतो; आणि याला मोठे आयास पडतात असें नाहीं, नुसत्या भावनेनें कार्यभाग होतो.

येके भावनेसाठीं। देवासीं पडे तुटी।
का ते होये कृपादृष्टी। देव कर्ता भावितां ॥ ६-७-३७

मी कर्ता हीहि भावना आणि देव कर्ता ही पण भावनाच आहे, परंतु 'मी कर्ता' या भावनेनें देवाची कृपा दुरावते आणि देव कर्ता या भावनेनें त्याच्या कृपेचा लाभ होतो. 'देव कर्ता' म्हटलें कीं लगेच सर्व प्रयत्न सोडून देऊन स्वस्थ बसावयाचें असा मात्र अर्थ नव्हे. 'देव कर्ता' या अंतरंगाच्या भावने-इतकीच बाह्य प्रयत्नाचीहि आवश्यकता आहे.

भाग्यासी काय उणें रे। येत्नावांचुनि राहिलें। स्फु. प्र. २-१

* * * *

येत्नाचा लोक भाग्याचा। येत्नेंवीण दरीद्रता। स्फु. प्र. १-१

* * * *

फार काय

येत्न तो देव जाणावा। अंतरीं धरितां बरें॥ स्फु. प्र. ३०-४

कर्ता करविता देव म्हणून जो स्वस्थ बसेल त्याला देवकृपेचें साह्य मिळत नाहीं.

राम बोळे तयाला। यत्न बहुत जयाला॥

एकदर विवेचनाचें तात्पर्य असें कीं, शाटोशाट प्रयत्न करून, पण निरहंकारतेनें, लोकसेवा सन्मार्गानें व सदाचारानें करावी, म्हणजे जनीजनार्दनाला संतोष होईल, ही खरी देवपूजा होय. ही पूजा विशेषत ब्राह्मणांनीं करावी त्यायोगें ते भाग्यसंपन्न होतील आणि त्यांचें अनुकरण करून इतर वर्णहि उत्कर्ष पावतील.

आता तरी ब्राह्मणीं आपणाला । शाहाणे करावे ॥

देव पुजावा विमळहस्तीं । तेणें भाग्य पाविजे समस्तीं ।

या श्रीसमर्थवचनाचा प्रत्यय ब्राह्मणादि चारहि वर्णांना घेतां येण्याजोगा आहे.



( १५ )

ॐ

श्री

# समर्थांचा देव

( लेखक—श्री. सदाशिव रंडो अळतेकर, एल्एल्. बी., कन्हाड )

श्रीसमर्थ रामदासस्वामींचें मूळचें अगर पाळण्यातलें नाव नारायण होतें. हनुमंतस्वामींच्या बखरीत समर्थांच्या मातोश्री व त्यांचे बंधु गंगाधरस्वामी लहानपणीं समर्थांना " नारबा " म्हणत असल्याचे उल्लेख आहेत. समर्थ पुढें " रामाची " उपासना करू लागले म्हणून पुढें लोक त्यांना " रामदास " म्हणूं लागले. समर्थ स्वतः आपणास आपल्या कवितेंत अनेक वेळा " रामदास " असें म्हणवात. लोक समर्थांना ' रामदास ' असें केव्हां म्हणू लागले हें नक्की सांगता येत नाहीं, परंतु नाशिकजवळ टाकळी येथें तपश्चर्या करीत असता त्यांना रामदास म्हणूं लागले असावेत असें दिसतें. समर्थांनीं बहुतेक करुणाष्टकें या तपश्चर्येच्या काळात केलीं, असें तीं सूक्ष्म रीतीनें वाचलीं असता दिसून येतें. त्यातहि " बुद्धि दे रघुनायका " हें करुणाष्टक अगदींच प्रथमारंभीं लिहिलें असें त्यातील मजकुरा-वरून दिसतें. त्या अष्टकाच्या शेवटीं

रामदास म्हणे माझा । संसार तुज लागला ।
संशयो वाटतो पोटीं । बुधी दे रघुनायका ॥ स्फु. प्र. २३-२०

असें आहे. तेव्हा गोदातटीं जनस्थानीं असतांना समर्थ आपणास कवितेंत "रामदास" म्हणवू लागले व त्याच वेळीं त्यांचीं करुणाष्टकें वाचून लोकहि त्यांना "रामदास" म्हणू लागले असावेत.

जनीं बोलती दास या राघवाचा। करुणा. १०१-२

असें "रामावर भार" या करुणाष्टकात म्हटलें आहे, यावरून वरील विधानास पुष्टि मिळते.

समर्थांना प्रत्यक्ष श्रीरामचंद्राचा अनुग्रह झाला होता असा सांप्रदायिक चरित्रामध्यें स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हा समर्थांचा देव "श्रीरामचंद्र" होतें हें सिद्ध होतें. "रविकुलटिळक" या करुणाष्टकात समर्थ म्हणतात—

बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो।
सकळ तजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो।
विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी।
विमळ हृदय होता उघरे पूर्वकोटी॥ करुणा. १४६-१

तेव्हां समर्थांचें 'दैवत' "राम" होतें याविषयीं शंकाच राहत नाहीं ते स्वत. आपल्या कवितेंत त्याविषयीं ग्वाही देत आहेत

तेव्हा 'रविकुलटिळक', 'विमळगुणशील', 'धारिरूपें अगाध', 'भवभय अपहारी', 'सकळ भुवन तारी', 'लीळावतारी' व 'कोदंडधारी' राम हाच समर्थांचा देव असताना समर्थांचा देव हा विषय का घेतला असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे

परंतु समर्थांचें वाङ्मय सूक्ष्म रीतीनें वाचल्यास अनुग्रह देणाऱ्या कोदंड धारी रामाशिवाय समर्थांचा दुसराहि एक "देव" होता व त्याची आराधना करण्यास समर्थांनीं महाराष्ट्रजनतेस आपल्या वाङ्मयात जागोजागीं आळविलें आहे.

स्फुट कवितेंत समर्थ म्हणतात—

केल्यानें होत आहे रे। आधीं केले ची पाहिजे।
येत्न तो देव जाणावा। अंतरीं धरिता बरें॥ स्फु प्र ३०४

समर्थकालीं महाराष्ट्राचीच नव्हे तर सर्व हिंदुस्थान देशाची अत्यंत हीन स्थिति झाली होती धर्मावर परकीयांचे हल्ले चालले होते. देवदेवालयाचा उच्छेद होत होता.

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।
गुरुत्व साडून जाले । शिष्य शिष्याचे ॥ १४ ७ ३१
कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरास भजती ।
कित्येक तुरुक होती । आपले इच्छेनें ॥ ३२

दासबोधांतील १४ व्या दशकांतील ७ व्या समासांतील या ओव्यांत समर्थांनी तत्कालीन धार्मिक व सामाजिक स्थितीचें यथार्थ वर्णन दिलें आहे. राजकीय स्थिति ही अत्यंत हीन होती स्वातंत्र्य नष्ट करणाऱ्या परधर्मी व परदेशी राजे बादशहांच्या मनसबदारी करून ऐषआराम करण्यातच सरदार, जहागिरदार धन्यता मानीत होते* अशा वेळीं समर्थ रामदासस्वामी व छत्रपति शिवाजीमहाराज यांनीं महाराष्ट्रास योग्य मार्ग दाखविला व धर्माचें रक्षण करून स्वराज्य मिळविलें. लोक कर्तव्यमूढ झाले होते, दैववादी झाले होते, त्याना

केल्यानें होत आहे रे । आधीं केलें ची पाहिजे ।

अशी आरोळी ठोकून समर्थांनीं जागें केलें व यत्न हाच देव मानून त्या देवाची आराधना करण्यास सांगितलें. यत्नदेवाची आराधना केल्याशिवाय स्वस्थ बसून धर्मरक्षण व स्वराज्यप्राप्ति होणार नाहीं, ही गोष्ट अंतःकरणात नीट रीतीनें बाळगून त्याप्रमाणें वर्तन करण्यास सांगितलें * समर्थ फार धूर्त व दूरदर्शी होते नुसता आळस सोडून यत्न केल्यानें कार्यसिद्धि लवकर होणार नाहीं काहीं लोक आळस टाकून यत्न करतील, पण परिस्थिति पाहून आपल्या बलाबलाचा योग्य विचार केल्याशिवाय काहीं तरी करतील म्हणून लागलीच पुढच्या ओवींत समर्थ म्हणतात—

आचुक येत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे । स्फु प्र ३० ५

समर्थांचें लागलीच थोडीशी दुरुस्ती करून केलेलें हें विधान पाहून योगवासिष्ठातील मोक्षाच्या व्याख्येची आठवण होते प्रथमत योगवासिष्ठकार म्हणतात—

वासनातानव राम मोक्ष इत्युच्यते बुधै ॥

हे रामा ! वासना-इच्छा कमी करणें—अगदीं कमी करणें—म्हणजेच मोक्ष होय. पण पुढें लागलीच योगवासिष्ठकार म्हणतात—

अशेषेण वासनात्यागो मोक्ष ॥

वासनांचा सर्वस्वीं त्याग करणें म्हणजेच मोक्ष होय त्याप्रमाणें समर्थ प्रथम

* सत्कार्यार्थ प्रयत्न करणारे सर्व देवाचे अश असें समर्थ म्हणतात—
साक्षपी अश देवाचे । आळसी वोस दानवी । स्फु प्र. ३० ५

" येत्न तो देव जाणावा " असें म्हणतात. परंतु मूर्ख लोक योग्य परिस्थितीचा विचार केल्याशिवाय दैत्याप्रमाणें—राक्षसाप्रमाणें—कांही तरी वेडेपणाचा प्रयत्न करतील म्हणून समर्थ लागलीच म्हणतात—

आचुक येत्न तो देवो। चुकणें दैत्य जाणिजे। स्फु. प्र. ३०-५

समर्थवाङ्मयाचा सूक्ष्म रीतीनें अभ्यास करणाऱ्यास समर्थांच्या मनात महाराष्ट्रास ' प्रयत्नवाद ' शिकविण्याचा मुख्य हेतु होता असें दिसतें.

मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण।
तिसरें तें सावधपण। सर्व विषईं ॥ ११-५-४
चौथा अत्यंत साक्षेप। ५

दासबोधांतील या सुप्रसिद्ध चतुःसूत्रीमध्यें समर्थांनीं अत्यंत साक्षेपाचा म्हणजे अत्यंत प्रयत्नाचा उल्लेख केला आहे. यत्नाला जसें समर्थांनीं अचुक हें विशेषण लावलें आहे, तसेंच त्यांनी साक्षेपाला—प्रयत्नाला—अत्यंत हें विशेषण लावलें आहे. असें करण्यात समर्थांचा धूर्तपणा व दूरदर्शित्व दिसून येतात. कित्येक लोक प्रारंभीं प्रयत्न करण्याचा मोठा आव घालतात, परंतु हातीं घेतलेल्या कामात संकटें आलीं कीं, तें काम सोडून देतात. इष्ट प्राप्तीशिवाय संकटें आल्यावर आरंभिलेलें काम मध्येंच सोडणारे लोक—हीन दर्जाचे—मध्यम प्रतीचे लोक—होत.

प्रारभ्य विघ्नविहता विरमंति मध्याः।

या भर्तृहरीच्या टीकेस ते लोक प्राप्त होतात. संकटपरंपरा येत असता संकटास न जुमानता इष्ट हेतु प्राप्त होईपर्यंत जे लोक प्रयत्न करतात त्यांच्या प्रयत्नाची किंमत विशेष आहे. एडमंड बर्कनेंहि म्हटलें आहे—

The greater the difficulty the greater the honour

विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमाना ।
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥

असें भर्तृहरि म्हणतो. सुधाविना न विसुर्देवा । अमृतप्राप्ति होईपर्यंत देवानीं संकटास न जुमानता अत्यंत प्रयत्न केले. अशा प्रयत्नास—साक्षेपास—समर्थांच्या चतुःसूत्रींतील 'अत्यंत साक्षेप' ही पदवी यथार्थत्वानें देता येईल.

प्रयत्नवादाची महती वर्णन करण्याकरिता दासबोधात समर्थांनीं दोन स्वतंत्र समास दिले आहेत. " येत्नसिकवण " ( १२ ९ ) व " येत्ननिरूपण " ( १९-७ ). इतर दशकातहि प्रसंगोपात् प्रयत्न-वादाचें महत्त्व वर्णिलें आहे.

ऐक सदेवपणाचें लक्षण। रिकामा जाऊं नेदी येक क्षण।
प्रपंचवेवसायाचें ज्ञान। बरें पाहे ॥ ११-३-२४
कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं।
केल्याविण होत नाहीं। साध्य जनीं ॥ १८-७-३
लाहानथोर काम कांहीं। केल्यावेगळें होत नाहीं।
करंट्या सावध पाहीं। सदेव होसी ॥ १२-९-६
प्रेत्नेवीण कार्य जालें। जेविल्यावीण पोट भरलें।
ज्ञानेवीण मुक्त जालें। हें तों घडेना ॥ ९-७-३३
अचुक येत्न करवेना। म्हणौन केलें तें सजेना।
आपला अवगुण जाणवेना। कांहीं केल्यां ॥ १२-२-६
जेहीं उदंड कष्ट केले। ते भाग्य भोगून ठेले।
येर ते चोलत चि राहिले। करंटे जन ॥ १८-७-१६
आधीं कष्टाचें दुःख सोसिती। ते पुढें सुखाचें फळ भोगिती।
आधीं आळसें सुखावती। त्यासी पुढें दुःख ॥ १८-७-५
अंतरीं नाहीं सावधानता। येत्न ठाकेना पुरता।
सुखसंतोषाची वार्ता। तेथे कैंची ॥ १२-९-७
म्हणोन आळस सोडावा। येत्न साक्षेपें जोडावा।
दुश्चितपणाचा मोडावा। थारा बळें ॥ १२-९-८
आळसें कार्यभाग नासतो। साक्षेप होत होत होतो।
दिसते गोष्टी कळेना तो। शाहाणा कैसा ॥ १४-६-२७
व्याप आटोप करिती। धके चपेटे सोसिती।
तेणें प्राणी सदेव होती। देखत देखता ॥ १५-३ ७
कीर्ति पाहातां सुख नाहीं। सुख पाहातां कीर्ति नाहीं।
केल्याविण कांहीं च नाहीं। कोठे वऱ्हीं ॥ १९-१०-२५

विस्तारभयास्तव अधिक उतारे देत नाहीं.

नुसत्या प्रयत्नानें कार्यसिद्धि होणार नाहीं म्हणून समर्थांनीं प्रयत्नवादाश्च विवेक वैराग्याची जोड दिली आहे. विवेक वैराग्यावर दासबोधात स्वतंत्र समास आहेत ( १९-१०, २-९ व ३ १० ) व बाराव्या दशकाचें नावच विवेक-वैराग्यलक्षण असें आहे. परंतु नुसत्या प्रयत्नानें किंवा नुसत्या विवेक-वैराग्यानें,

किंबहुना विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्नानेंहि कार्यसिद्धि होणार नाहीं, म्हणून समर्थ म्हणतात—

सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।
परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६

विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्न केला तरी त्यास धर्माची—परमेश्वरनिष्ठेची—जोड असल्याशिवाय इष्ट कार्यसिद्धि होणार नाहीं, म्हणून जगचालक सच्चिदानंद परमेश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवून विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्न करा म्हणजे तुमच्या राष्ट्रोद्धारार्थ चळवळीस यश येईल, असा समर्थांनी आपल्या अधिकारयुक्त वाणीनें तत्कालीन महाराष्ट्रियास उपदेश केला. म्हणजे धर्ममूलक विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्नवाद हेंच दासबोधाचें अगर समर्थ-वाङ्मयाचें रहस्य होय अगर हाच समर्थांचा देव होय असें म्हणता येईल. समर्थकालीन महाराष्ट्रजनतेनें समर्थांच्या देवाची म्हणजे धर्ममूलक विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्नवादाची भक्तिभावानें, एकनिष्ठेनें, धर्मबुद्धीनें अहर्निश आराधना केली म्हणून शिवसमर्थांच्या हयातींतच महाराष्ट्रास स्वराज्य मिळून स्वातंत्र्यसुखाचा आस्वाद घेता आला. हल्लींहि हिमालयापासून रामेश्वरापर्यंत व कलकत्यापासून कराचीपर्यंत सर्व लोक—श्रीमंत गरीब, वृद्ध तरुण, सुशिक्षित अशिक्षित, स्त्री पुरुष—स्वराज्याकरितां निरनिराळ्या मार्गांनें प्रयत्न करीत आहेत. परंतु त्यांना अद्याप यश येत नाहीं, याचें कारण ते समर्थांच्या देवाची म्हणजे धर्ममूलक विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्नाची अहर्निश आराधना करीत नाहींत हेंच होय.

मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला ।
जो जे मतीं सांपडला । तयासीं ते चि थोर ॥

अशी सामान्य लोकांचीच नव्हे तर पुढाऱ्यांची—लोकनायकांचीहि—स्थिति झाली आहे. समर्थांच्या देवाची अहर्निश धर्मभावनेनें आराधना केल्याशिवाय स्वराज्य प्राप्त होणें दुरापास्त आहे हें पूर्ण लक्षात ठेवून जनतेनें व लोकनायकांनीं वागावें म्हणजे स्वराज्य एक पिढीच्या हयातींत सहज मिळेल.

प्रयत्न—अचूक प्रयत्न—अत्यंत प्रयत्न ज्याप्रमाणें समर्थांचा देव होता त्याप्रमाणें समर्थांचे आणखीहि कांहीं देव होते. त्या देवाची आराधना करण्यासहि समर्थांनीं आपल्या कवितेंत अनेकदा उपदेश केला आहे.

आचुक येत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे । स्फु. प्र.३०-५

याच्या उत्तरार्धात पुढें लागलीच समर्थ म्हणतात—

न्याय तो देव जाणावा । अन्याय राक्षसी क्रिया ॥
सावधु देव जाणावा । उन्मतु दैत्य बोलिजे ।
होरट्या दैत्य जाणावा । देव तो सौख्यदायकु ॥ स्फु. प्र. ३०-६
साक्षपी अंश देवाचे । आळसी यौश दानवी ।
राक्षसी दैत्य तो मोठा । अन्यायें दैत्य जाहला ॥ ७

पुढें एके ठिकाणीं समर्थ म्हणतात—

प्रपंच नेणतो वेडा । जाणता देव बोलिजे । स्फु. प्र. ४०-१

स्वधर्मरक्षणार्थ व स्वराज्यप्राप्त्यर्थ धर्ममूलक विवेकवैराग्ययुक्त यत्न-देवाची अहर्निश पूजा करण्याचा समर्थांनी महाराष्ट्रजनतेस उपदेश केला, त्या यत्न-महादेवाच्या साहाय्यार्थ इतर कांहीं देवांसहि बोलावण्यास समर्थांनीं बहुजनसमाजास उपदेश केला आहे, हें वर दिलेल्या स्फुट कवितेतील उताऱ्यांवरून सिद्ध होतें. हल्लीं पाश्चात्य व जपानसारख्या पौर्वात्य राष्ट्रांत सुद्धां राष्ट्राचें वैभव वाढण्याकरितां जे प्रयत्न चालले आहेत ते पाहिले असतां न्यायदेवतेची सदहू राष्ट्रें कशी आराधना करितात हें दिसून येतें. पाश्चात्य राष्ट्रांतील मुत्सद्दी व त्या राष्ट्रांचें अनुकरण करणारे जपानचे मुत्सद्दी न्यायदेवतेचे कसे धिंडवडे काढीत आहेत, हें वर्तमानपत्रांच्या वाचकांना अवगत आहेच. राष्ट्रोद्धारार्थ यत्नदेवाची पूजा करण्यास सांगणारे समर्थ न्यायदेवतेच्या तत्त्वास अनुसरून प्रयत्न करण्यास सांगतात यावरून समर्थांचें राज-कारण किती श्रेष्ठ दर्जाचें होतें हें दिसून येतें.

त्याचप्रमाणें न्यायदेवाची पूजा करण्यास सांगतांना ‘ सावधानता ’ देवतेस योग्य मान देण्यास सांगतात. यत्न म्हणजे देव, न्याय म्हणजे देव, त्याप्रमाणें सावधानताहि देव मानून या देवतेची योग्य पूजा करण्यास समर्थ ठिकठिकाणीं सांगतात. “ सावधपण सर्वविषयीं ” हें समर्थांच्या सुप्रसिद्ध चतुःसूत्रींतील तिसरें सूत्र आहे. इष्ट कार्यसिद्धीकरितां प्रयत्न करतांना जे गैरसावधपणानें—उन्मत्तपणानें—वागतात त्यांना समर्थ दैत्य म्हणतात.



## ( १६ )

# श्रीसमर्थांची देवपूजा

( लेखक—धेनुदास शंकरराव ढोळे, गोरक्षण संस्था, पुणें )

नारायेण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।
याकारणें तोषवावी । कोणीतरी काया ॥ १५-९-२५

' कोण्याहि कष्टी कायेचा संतोष कराल तरच खरी देवपूजा घडेल ' अशी ही श्रीसमर्थांची शिकवण आहे. ती आपल्या अंतःकरणात ठसावी म्हणून तिच्या संबंधीं या लेखांत थोडासा विचार करावयाचा आहे

देवपूजा करणाऱ्याला देव कोण, तो कोठें रहातो, त्याचें देऊळ कोणतें, त्याच्या पूजेचें विधिविधान काय, इत्यादि गोष्टींचें निश्चित ज्ञान असलें पाहिजे. त्यावांचून त्याची पूजा कोणासच करता यावयाची नाहीं.

श्रीसमर्थांचा देव असा आहे—

जेणें केलें चराचर । केले सृष्टयादि व्यापार ।
सर्वकर्ता निरंतर । नाम ज्याचें ॥ ८ १ १७
तेणें केल्या मेघमाळा । चंद्रबिंबीं अमृतकळा ।
तेज दिधलें रविमंडळा । जया देवें ॥ १८
ज्याची मर्यादा सागरा । जेणें स्थापिलें फणिवरा ।
जयाचेनि गुणें तारा । अंतरिक्ष ॥ १९
च्यारी खाणी च्यारी वाणी । चौऱ्यासि लक्ष जीवयोनी ।
जेणें निर्मिले लोक तिनी । त्या नाव देव ॥ २०

ब्रह्मा विष्णु आणि हर। हे जयाचे अवतार।
तो चि देव हा निर्धार। निश्चयेसीं ॥ २१

नाहीं तर काय! 'जितुके गाव तितुके देव' जगाकारणें आहेतच. यांच्या देवाकडे लक्ष आहे कोणाचें? सारेच कल्पनेचा गोंधळ. एखाद्या वस्तूच्या ठिकाणीं देवाची कल्पना करावी, त्या देवावर दृढ भाव ठेवावा आणि शेवटीं त्या देवालाच काहीं अपाय झाला कीं रडत बसावें!

पाषाणाचा केलेला देव भंगला, हरवला, चोरीला गेला, एखाद्या दुराचाऱ्यानें फोडून टाकला, पाण्यांत बुडवला अथवा पायांत गाडून टाकला कीं, या भक्ताची गडबड उडालीच. 'देवाचें सत्व कुठें गेलें' म्हणून तो लागलाच ऊर बडवून घ्यायला. घोडून चालुन सोनार, ओतारी किंवा पाथरवट यांनीं बनवलेले हे देव. नर्मदा गंडिकातीरीं तर अशा देवाची तुफान गर्दी! त्याची गणना कोण करणार? यापैकीं कोणताच देव उपयोगी पडेना, म्हणून रेशमाचा देव केला, पण तोहि तुटोन गेला! आता शेवटीं मृत्तिकेचा देव करण्याचा नवा नेम धरला, पण सगळ्यांचेंच सत्व गेलेलें आढळलें. अशा तऱ्हेनें देवासाठीं हा भक्त वेडा झाला; पण या वेड्याला खरा देव कुठें आहे, हें शेवटपर्यंत कळलेंच नाहीं. श्रीसमर्थ म्हणतात—

धातु पाषाण मृत्तिका। चित्रलेप काष्ठ देखा।
तेथे देव कैंचा मूर्खा। भ्रांति पडली ॥ ६-६-४४

केवळ धातुपाषाणमृत्तिकादि सृष्ट पदार्थांनाच देव मानणें हा मूर्खपणा आहे.

सृष्टीपूर्वीं सृष्टि चालता। सृष्टि अवघी संव्हारतां।
शाश्वत देव तत्वता। आदिअंतीं ॥ ४८

आहेच आहे. तो

तुटेना फुटेना कदा देवराणा।
चळेना ढळेना कदा दैन्यवाणा।
कळेना कळेना कदा लोचनासी।
वसेना दिसेना जगीं मीपणासी ॥ १७७

देवाच्या या असल्या दिव्य स्वरूपाचें मानवानें दर्शन घेतलें तरच त्याच्या जन्माचें सार्थक.

ब्रह्मा विष्णु आणि हर। त्यासी निर्मिता तो चि थोर।

तो वोळखावा परमेश्वर । नाना येत्नें ॥ ६-१-१२
तो देव ठाईं पडेना । तरी येमयातना चुकेना ।
ब्रह्मांडनायेक चोजवेना । हें बरें नव्हे ॥ १३

या ब्रह्माडनायकाला शोधून काढला पाहिजे व मग त्याचें पूजन केलें पाहिजे. *नाना देवाच्या नाना प्रतिमा पुजूंच नयेत असें श्रीसमर्थांचें म्हणणें नाहीं.* श्रीसमर्थ प्रतिमापूजेच्या विरुद्ध नाहींत. त्याचें इतकेंच सागणें कीं, ज्याची प्रतिमा तो परमात्मा आधीं ओळखा व मग त्याची पूजा करा.

नाना देवांच्या नाना प्रतिमा । लोक पूजिती धरून प्रेमा ।
ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा । कैसा आहे ॥ ११-९-६
ऐसें वोळखिलें पाहिजे । वोळखोन भजन कीजे ।
जैसा साहेव नमस्कारिजे । वोळखिल्याउपरी ॥ ७

ज्याची प्रतिमा तो मुख्य परमात्मा कळलाच नाहीं, तर जन्मभर त्या प्रतिमेची पूजा करून तरी काय उपयोग ? प्रतिमेचें मूळ स्वरूप ध्यानीं येईल तर प्रतिमापूजनाचा आदर द्विगुणितच होईल. श्रीशिवाजीमहाराज किंवा लोकमान्य टिळक यांचें माहात्म्य ज्याना पूर्णपणें अवगत आहे त्यांचें प्रेम त्याच्या पुतळ्यावर निःसंशय अधिकच बसेल. इतरापेक्षा ते जास्त आदरानें त्या पुतळ्याची पूजा करतील. यासाठीं प्रतिमेचें मूळ स्वरूप शोधून तिचें पूजन करण्याची प्रवृत्ति वाढली पाहिजे. पण अशा प्रकारें देवशोधनाची प्रवृत्ति फारच थोड्यांची.

जया मानला देव तो पूजिताहे ।
परी देव शोधूनि कोण्ही न पाहे ।
जगीं पाहतां देव कोट्यानकोटी ।
जया मानली भक्ति जे तेचि मोठी ॥ १७८

असा देव आपण शोधूच लागलों तर ब्रह्मदेवास *निर्माण* करणारा, *विष्णूचें* प्रतिपालन करणारा, व शंकराचा संहार करणारा देवाधिदेव कोठें दूर नसून आपल्या देहातच नांदतो आहे, अशी आपणांस प्रचीत यईल. देह हें देवाचें देऊळ आहे. केवळ आपला देहच नव्हे तर *'जितुकीं शरीरें' 'तितुकीं'* या देवाचींच 'मंदिरें' आहेत.

श्रीसमर्थ म्हणतात—

देहेदेवाळ्यामधें । पाहाणें देव तो वरा ।

आनंत कोटि देवाल्ये। त्यामधें येकुला प्रभु।
दीपानें दिसेना नाहिं। त्यानें त्यास ची पाह्मणें॥ ६
दिसेना लोचनाला रे। घाला रे मन त्यामधें। ५
कदा हातासी लागेना। सर्वथा पुजीतां नये। ७

असा हा अनंतकोटि देवालयात नांदणारा 'एकी एक' देव आहे. खेचर, भूचर आणि जलचर अशा सर्व प्राण्यांची शरीरें हीं सर्व त्या देवाचीं देवळें आहेत. या देवाची प्रत्यक्ष पूजा कशी करावयाची? तो चर्मचक्षूला दिसत नाहीं, हाताला लागत नाहीं व म्हणून प्रत्यक्ष पूजिता येत नाहीं. त्याची पूजा करावयाची असेल तर कोणत्या तरी देवळाचीच पूजा केली पाहिजे.

पुजीतां सर्व देवाल्यें। तेणें तो तृप्त होतसे। ८

असा श्रीसमर्थांनीं सिद्धांत सांगितला आहे.

देवालयावांचून म्हणजे देहावांचून हा देव पूजवाच यावयाचा नाहीं.
देह्यावेगळी पूजा पावेना। देह्याविण पूजा फावेना।
जनीं जनार्दन म्हणोनी जना। संतुष्ट करावे॥ १८-४-३५

यावरून जनताजनार्दनाला, किंबहुना सर्व प्राणिमात्राला, संतुष्ट करणें हीच श्रीसमर्थांची देवपूजा होय, ही गोष्ट आपल्या स्पष्ट ध्यानीं येईल.

श्रीसमर्थांनीं अशी देवपूजा केली. आपणहि अशा प्रकारच्या देवपूजेस लागलें पाहिजे. जगाच्या कल्याणासाठीं साधुसंत अखंड खटपट करतात, ती या देवपूजेच्याच भावनेनें. संताचा खरा परमार्थ हाच. परमार्थ म्हणजे परोपकार. कशी काया संतुष्ट करणें, प्राणिमात्राला संकटापासून सोडवणें, त्याला अभय देणें, हेंच परमार्थाचें वर्म.

जे कां रंजले गांजले। त्यासि म्हणे जो आपले॥ १
तो चि साधु ओळखावा। देव तेथें चि जाणावा॥ २

अशी श्रीतुकाराम महाराजांनीं साधूची व्याख्याच केलेली आहे.

सर्वांभूतीं दया। संत म्हणावें ऐसिया।

असें श्रीएकनाथमहाराज सांगताहेत. ज्याला देवाची 'याद' आहे त्याच्या चित्तात 'दया' असलीच पाहिजे. भूतदयेनें प्रेरित होऊन आपण कशी काया तुष्ट केली कीं, आत्मारामाचा संतोष होतो; आपल्या हातून देवाची खरी पूजा घडते.

देह्यासि बरें करावें। तें आत्मयास पावे।

असा सिद्धांत आहे.

देहामधें आत्मा असतो । देहे पूजितां आत्मा तोषतो ।
देहे पीडितां आत्मा क्षोभतो । प्रत्यक्ष आतां ॥ १८·४·३४

देहाचें 'पूजन' म्हणजे 'संतोष' केला कीं, आत्माराम संतुष्ट होतो.

सान्या स्वानुभवी संताची हीच देवपूजा. राष्ट्राची दुर्दशा पाहून श्रीसमर्थांचें चित्त हळहळलें. ते सान्या देवपूजेला लागले. त्याचे वेळीं देशाची कशी दुर्दशा झाली होती पहा—

पदार्थ मात्र तितुका गेला । नुसता देश चि उरला ।
येणें करितां बहुतांला । संकट जालें ॥ १
माणसा खावया अन्न नाहीं । आंथरूण पांघरूण तें ही नाहीं ।
घर कराया सामग्री नाहीं । काय करिती ॥ २
कितेक अनाचारीं पडिलीं । कितेक यातिभ्रष्ट जालीं ।
कितेक ते आक्रंदलीं । मुलेंबाळें ॥ ३
अद्यापी दुश्चिन्हें दिसती । दुष्ट ग्रह आडळती ।
पुढें ही वाईट सांगती । कितीयेक ॥ ४
कांहींच पाहतां घड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।
अखंड चिंतेच्या प्रवाहीं । पडले लोक ॥ ५
येक म्हणती कोठें जावें । येक म्हणती काय करावें ।
विदेशा जाऊनी काय खावें । वेंच नाहीं ॥ ६
प्राणिमात्र जाले दुःखी । पाहतां कोण्ही नाहीं सुखी ।
कठिण काळें येोळखी । धरीनात कोण्ही ॥ ७

उतारा थोडासा मोठा झाला खरा, पण श्रीसमर्थांची देवपूजा ध्यानीं येण्यासाठीं तो येथें देणें अपरिहार्य आहे. जनताजनार्दनाची, नाना देहीं नांदणाऱ्या देवाची, अशी दुर्दशा पाहून त्या महापुरुषाच्या चित्ताची कालवाकालव झाली. त्यांनीं आपली सर्व तपस्या खर्ची घातली. त्यांना सर्वांतरंग चैन पडेना. श्रीरामरायाला त्यांनीं विनविलें—

हुजुर ! दम निघेना अंतरीं कोंड नाना ।
तिळभरि स्थळ कोठें पाहतांही दिसेना ।
बहुत विषम काळें दाटणी थोर जाली ।

म्हणउनि चरणाब्जीं वृत्ति गुंतोनि ठेली ॥ १
बहुत चि सुकुमारा ! स्वस्थ नाहीं शरीरा।
निशिदिनिं जनचिंता लागलीसे उदारा।
सकळजन सुखावे तो कसा काळ फावे।
भजन जन उकावे सर्व आनंद पावे ॥ २

सकळजन सुखी करण्यासाठीं श्रीसमर्थांनीं अखंड कष्ट केले, काया चंदनाप्रमाणें झिजविली आणि महाराष्ट्राचें आनंदवनभुवन केलें. आपण त्यांचे म्हणवितों. आपल्या हातूनहि अशा प्रकारची अखंडस्वरूप देवपूजा घडली पाहिजे. जनताजनार्दनाच्या सेवेंत तनमनधन वेंचण्याची आपली तयारी असली पाहिजे. नाना देहीं नांदणाऱ्या अंतरात्म्याला सुखी करण्यासाठीं सतत प्रयत्न केला पाहिजे.

सध्याचे काळीं आर्यावर्तांत चाललेल्या नानाविध चळवळी या देवपूजेचींच विविध स्वरूपें आहेत. गोरक्षणाची चळवळ त्यापैकींच आहे. या चळवळीनें गोदेवीचा अंतरात्मा संतुष्ट होईल, इतकेंच नव्हे तर त्याचबरोबर लाखों जीवात्मे सुखी होतील. गोदेवीच्या पूजकाला अशा प्रकारें देवपूजेचें दुहेरी पुण्य मिळेल.

आपल्या राष्ट्राचा व धर्माचा प्राण गाय आहे. तिच्या रक्षणावर राष्ट्राचें व धर्माचें रक्षण अवलंबून आहे. गोहत्येनें राष्ट्राचा सत्यानाश झालेला आहे. गोहत्येमुळें शेतीची माती झाली. जमिनी निकस झाल्या. सताचा भयंकर दुष्काळ पडला. जमिनीची मेहनत मशागत करण्यास बैल मिळेनातसे झाले. मानवी जीवनास मुख्य आधार असें जें इहलोकचें अमृत–गोदुग्ध–त्याचें दर्शनहि दुर्मीळ झालें. आरोग्यास जबरदस्त धक्का बसला. आयुष्यमान कमी झालें. राष्ट्र मृत्युपथास लागलें. अशा रीतीनें राष्ट्राच्या सर्वस्वाचा नाश करणारी गोहत्या बंद करण्यासाठीं आपण तनमनधनेंकरून झटूं, तर गाईचें व मानवजातीचें संरक्षण होऊन आपणास देवाची महापूजा खचित घडेल. श्रीसमर्थांना ती मान्य होईल.

अर्चनभक्तीच्या समासात 'इति महानुभाव गाइनीपूजन' करण्याची आपणास श्रीसमर्थांनीं आज्ञा केली आहेच. 'गाइनीपूजन' म्हणजे 'गोमातेची पूजा' ही परमेश्वराची अर्चनभक्ति आहे, असें आपणांस श्रीसमर्थ सांगत आहेत.

अन्न गंध पत्र पुष्प। फल तांबोल धूप दीप।

या साधनानें आपण पूजा करतों व ती करावीच करावी. पण पूजा शब्दाचा खरा अर्थ संतोष. गाईची पूजा म्हणजे तिचा संतोष. प्राण संकटातून मुक्त

झाल्याशिवाय तिचा खरा संतोष कदापि व्हावयाचा नाहीं. तिची काया सध्या अत्यंत कष्टी आहे, आणि कष्टी कायेचा संतोष करणें ही देवपूजा श्रीसमर्थांनीं आपणांस शिकविलेली आहे. यासाठींच आपण गोरक्षणकार्य हातीं घेतलें पाहिजे. धर्मप्रद गोजननीला संकटापासून सोडविलें पाहिजे.

देव-धर्म-गो-ब्राह्मण । करावया संरक्षण ।
हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥

ही ओवी आपल्या लाडक्या शिवबाला लिहिलेल्या पत्रांत नमूद करून श्रीसमर्थांनीं गोरक्षणकार्याचें महत्त्व सार्‍या जगाला पटवून दिलें आहे देवाच्या बरोबरीला गोमातेला बसवून तिचा श्रीसमर्थांनीं जयजयकार केला आहे. श्रीशिव-छत्रपतींनीं श्रीसमर्थांची आज्ञा शिरसावंद्य मानली आणि गोमातेला अभय दिलें, गोजाति प्राणसंकटापासून मुक्त केली, 'गोब्राह्मणप्रतिपालक' ही यथार्थ पदवी मिळविली आणि श्रीसमर्थांच्या इच्छेनुरूप देवपूजा केली श्रीरामप्रभूसारखा शिव रायाच्या कीर्तीचा डंका त्रिखंड गाजला !

आपत्कालीं गोरक्षण करणारा भक्तच देवाला प्रिय असतो. श्रीनाथभागव-तांत श्रीकृष्ण परमात्मा उद्धवाला सांगतात—

आपत्कालीं गोरक्षण । करी तो मज पढियंता जाण ।
तयासवें मी आपण । गोरक्षण करीतसें ॥

गाईवर सध्या आपत्काल किती आहे, हें काय सांगावयास पाहिजे ? आपल्या आर्यावर्तांत प्रत्यहीं त्याचा लाखांनीं संहार होत आहे. अशा वेळीं त्याच्या संरक्षणार्थ आपल्या पंचप्राणाची पूर्णाहुति देण्यास सदैव सिद्ध असणें हीच त्या गोदेवतेची, किंबहुना देवाधिदेवाची, महापूजा होय. श्रीसमर्थ आपणा सर्वांस अशा प्रकारच्या देवपूजेची सुबुद्धि देवोत. गोरक्षणकार्याचें हें महत्त्व जाणूनच श्रीसमर्थभक्त शंकर श्रीकृष्ण देव यांनीं 'श्रीरामदास आणि रामदासी' मासिकांत पुढीलप्रमाणें अभिप्राय प्रकट केलेला आहे

'गोरक्षण हें अत्यंत पवित्र कार्य आहे. आमच्या धर्माचें तें एक प्रमुख अंग आहे. गोरक्षण न होतां स्वराज्य मिळालें किंवा स्वराज्य मिळूनहि गोरक्षण न झालें तर त्या स्वराज्याची आम्हांस मातब्बरी नाहीं इतर कोणा परधर्मीयाची समजूत पाडण्यासाठीं गोरक्षणाच्या व्यावहारिक उपयुक्ततेविषयीं वाटल्यास बोलावें, पण विचाराची ही दिशा आम्हांस पसंत नाहीं. वधाविषयीं बोलतांना दुभती गाय

-व माकड गाय असा भेद हिंदूनें केलेला पाहून आमच्या अंगावर शहारे येतात.'

हा अभिप्राय ध्यानीं घेऊन व श्रीसमर्थांचें हें आवडतें कार्य जाणून नारायणाच्या पूजेला सर्व सज्जन सज्ज होवोत, एवढेंच श्रीसमर्थचरणीं मागणें आहे.



## ( १७ )

# देव आणि देवालय

( लेखक—श्री. गोपाळ रावजी गोगटे, एल्‌एल्. बी., मुंबावळ )

'देव' व 'देवालय' हे सगुण उपासनेच्या प्रांतातले शब्द आहेत. सगुण उपासनेच्या मुख्य साध्याकडे दुर्लक्ष झाल्यास देव व देवालय या शब्दांनाहि भलतेच अर्थ प्राप्त होतात व त्यामुळें आपण उपासनेच्या अथवा भक्तीच्या मार्गानें जात आहोंत, अशा समजुतीनें समाज भलत्याच चुकीच्या मार्गाला लागतो व आत्मघात करून घेतो. या चुकीच्या मार्गावरून समाजाला सरळ मार्गावर आणण्यास तसाच अधिकारी पुरुष लागतो, व तरच समाज त्याचें म्हणणें ऐकतो. समर्थांच्या काळीं असा प्रकार झाला असता त्यांनीं हिंदु समाजाची अधोगति थांबविली. त्यांनीं यासंबंधीं केलेला बहुमोल उपदेश आजहि त्यांचे ग्रंथात आपणास पहावयास सापडतो. आपल्या हल्लींच्या स्थितींत तो उपदेश समजून घेणें आपल्या हिताचें आहे. तरी तो समजून घेण्याचा प्रयत्न करू

### ब्रह्मात्मैक्य ज्ञानाची सर्वश्रेष्ठता

ब्रह्मात्मैक्य ज्ञानाइतकें पवित्र व श्रेष्ठ ज्ञान दुसरें जगांत नाहीं.

ब्रह्मविदाप्नोति परम् ( तै. २ १ ) तरतिशोकमात्मवित् ( छां. ७ १-३ )

अशी ज्याची उपनिषदांनीं महती सांगितली,

यज्ज्ञानान्नापरं ज्ञानम् ( आत्मबोध आचार्यकृत )

म्हणून शंकराचार्य ज्याची स्तुति करतात,

याकारणें ज्ञानासमान । पवित्र उत्तम न दिसे अन्न । ५-४-३२

असें ज्याच्याबद्दल समर्थ म्हणतात, तें ज्ञान या मनुष्यलोकांत येऊन प्रत्येकानें प्राप्त करून घेणें हें त्याचें आद्य कर्तव्य होय.

यो वा एतदक्षरं, विदित्वा गार्ग्यऽस्माल्लोकात्प्रैति स कृपण ।बृ. ३।८।१०
य एतदक्षरं विदित्वा अस्माल्लोकात्प्रैति स ब्राह्मण ।

हें ज्ञान प्राप्त न होताच हें जग सोडणाऱ्याला आत्महत्यारा म्हणतात, व येवढ्याचकरिता

आत्मा वा आरे द्रष्टव्य श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य.
(बृ. २।४।५, ४।५।६)

आधीं आत्मज्ञान । साधिलें पाहिजे । ५-४-२७

असें सर्वश्रेष्ठ सत्पुरुषाचें सांगणें आहे असें हें सर्वश्रेष्ठ ज्ञान होऊन

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या । जीवो ब्रह्मैव नापर ।

हें पटून सर्वत्र एकमेवाद्वितीय ब्रह्म भरलें आहे, असें प्रत्ययास आलें म्हणजे प्राणि मुक्त होतो.

ब्रह्म अगर ब्रह्मस्वरूप समजण्याची अडचण

वरील प्रकारचें ज्ञान होऊन आत्यन्तिक सुख मिळविण्याची प्रत्येकाचीच इच्छा असणार, परंतु यात मोठी अडचण आहे ती, हें ब्रह्म म्हणजे काय हें समजण्याची.

जें ब्रह्म समजावयाचें त्याची समजूत देण्याकरिता सांगितलें जातें कीं, तें अचिन्त्य, अनिर्देश्य, निर्विकल्प, असें असून

अतद्व्यावृत्तिरूपेण वेदान्तैर्लक्ष्यते स्वयम् (आत्मबोध)
न तत्र चक्षुर्गच्छति । यतो वाचो निवर्तते ।

असें असून "हेतु दृष्टांतवर्जित" आहे,

कल्पू जाता न ये कल्पनेच्या हाता ।
मनबुद्धि अगोचर न चले तर्कांचा विचार ॥

व

आहे तितुकें नाहीं जालें । नाहीं नाहींपणे निमालें ।
आहे नाहीं जाऊन उरलें । नसोन कांहीं ॥ ६-१०-३८

अशा प्रकारचें (ब्रह्म व ब्रह्मस्वरूप) आहे.

हीं व असलीं अनेक वचनें श्रवण करून सामान्य बुद्धीचा मनुष्य भांबावून जातो. नवव्या दशकांतील पहिल्या समासांत सांगितल्याप्रमाणें

निराकार म्हणिजे काये । निराधार म्हणिजे काये ।
निर्विकल्प म्हणिजे काय । मज निरोपावें ॥ १
अनाम्य म्हणिजे काये । अजन्मा म्हणिजे काये । १७

इत्यादि विचारीत सुटतो. ( अशा ४३ शब्दांची यादी देऊन शेवटीं समर्थांना सांगावें लागलेंच कीं,

हें कळे अनुभवमतें । सद्गुरु केलियां ॥ ९-१-२९ )

त्याला वाटतें—

ऐसें कैसें ब्रह्मज्ञान ।
कांहींच नाहीं असोन । हें केविं घडे ॥ ९-३-१
सकळ करून अकर्ता । सकळ भोगून अभोक्ता ।
सकळांमधें अलिप्तता । येईल कैसी ॥ २

कोणत्याहि कठीण गोष्टीची बोलल्यावाचून समजूत पडत नाहीं व येथें तर शब्दाचा लाग चालत नाहीं, तेव्हा हें व्हावें कसें अशाच संशय येऊन परीक्षितानें

ब्रह्मन्ब्रह्मण्यनिर्देश्ये निर्गुणे गुणवृत्तयः ।
कथं चरन्ति श्रुतयः साक्षात्सदसतः परे ( भा. स्क. १०-८७-१ )

असा प्रश्न केला आहे. अर्थात् हें सर्व समजून घेण्यास छान्दोग्यांत सांगितल्याप्रमाणें पण्डित व मेधावी लागतो, व त्यालाहि साधनचतुष्टयसंपन्न होऊन मगच महद्प्रयासानें ब्रह्माचें ज्ञान होतें. विचाराच्या उपाच्या या मार्गाला ज्ञानमार्ग म्हणतात. परंतु सर्वच मनुष्यें कांहीं तीव्र बुद्धीचीं नसतात. मग सामान्य बुद्धीच्या माणसास हा ज्ञानमार्ग शक्य नसल्यामुळें त्यानें परमसाध्य जी ब्राह्मी स्थिति, किंवा निद्रावस्था किंवा मोक्ष, याला कायमचें मुकावें काय असा प्रश्न उत्पन्न होतो. परंतु अशा मनुष्यानें निराश होण्याचें कारण नाहीं हा मुक्काम गांठण्यास दुसराहि एक मार्ग आहे. त्याचें नाव भक्तिमार्ग.

अव्यक्त, अनिर्देश्य, अक्षरब्रह्माची उपासना करणारांना फार क्लेश पडतात.

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥

या ज्ञानमार्गाला क्लेशमार्ग म्हणून पाटी लावली आहे, पण भक्तिमार्गाला " एष निष्कंटकः पन्थाः" अशी पाटी लावलेली आहे. या मार्गांत निःसीम श्रद्धा व

चळकट प्रेम गाठीं असलें म्हणजे काम भागतें. या जगांत श्रद्धेनेंच लोक आपले रोकडे व्यवहार करीत असतात. श्रद्धेनें भक्ताचें काम कसें जमतें तें पहा.

नान्योतोऽस्ति द्रष्टा नान्योतोऽस्ति श्रोता नान्योतोऽस्ति विज्ञाता ( बृ. ३-७-२३ )

असें अन्तर्यामीला लक्षून श्रुतिवचन आहे. या वचनाचा खोल विचार करून साधकबाधक प्रमाणाची मीमांसा करून एखाद्या श्वेतकेतूसारख्या जिज्ञासु पुरुषानें त्याचा पुरा तपास लावला व ब्रह्म तसें आहे, असें त्याच्या प्रत्ययाला आलें व त्याला आनंद झाला; तर तोच आनंद

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ॥ गीता ९-१८

वगैरे मीच सर्व आहे असें सांगणाऱ्या भगवन्ताच्या वचनावर आप्तवाक्य म्हणून विश्वास ठेवून श्रद्धावान् सामान्य समजुतीच्या मनास होऊं शकतो. माझा सगुण-रूपधारी राम तोच हें सर्व आहे असा ज्याचा विश्वास असतो; व त्या विश्वासामुळें त्यालाहि ज्ञानी माणसाप्रमाणें आनंद होऊं शकतो.

तो म्हणतो—

राम तो जाणिजे आत्मा । सर्वांतरात्मा तो चि तो ।
त्रैलोक्य चालवितो तो । आतां हि रोकडा पाहा ॥ च. मा. १-१
देखवी ऐकवीतो तो । चाखवी दाखवी सदा ।
बोलवी चालवीतो तो । देहपुरासी वर्तवी ॥ २

एवंगुणविशिष्ट माझा राम आहे व त्या सगुणरूपधारी रामाची भक्ति मला तुझ्या-सारखाच आनंद देऊं शकते.

सर्वशक्तिमान् सर्वसाक्षी अशा परमेश्वराची निःसीम श्रद्धेनें भक्ति केल्यास त्याचा लाभ काय होतो, हें भगवानांनीं सर्वगुह्यतम म्हणून अखेर अर्जुनाला सांगितलें.

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।

असा वागलास, तर मी प्रतिज्ञेनें सांगतों कीं,

मामेवैष्यसि

मलाच येऊन मिळशील. हा लाभच जीवब्रह्माभेदरूप ज्ञानानें व्हावयाचा असतो. रहस्यकार सांगतात, 'जो परमेश्वर सर्वशक्तिमान् असूनहि आपल्याशीं बोलेल, आपल्यावर ममता करील, जो आपला ' गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः

शरणंसुहृद् ' आहे, असा जिव्हाळ्याचा सगुण प्रेमगम्य व व्यक्त प्रत्यक्ष रूपधारी सुलभ परमेश्वरच, मनुष्य, भक्तीसाठीं स्वतः स्वीकारीत असतो. ' (गीतारहस्य पा. ४१३ ).

देहधारी देवावाचून त्याचें नडतें; तो विचारतो—

देहेंविण देव कैसा भजावा । देहेंविण देव कैसा पुजावा । १९-५-९

त्याच्या अडचणीचा परिहार प्रतीकोपासनेनें होतो. गीतेंतहि मानवरूपधारी सगुण परमेश्वराची नि.सीम व एकान्तिक भक्ति हेंच परमेश्वरप्राप्तीचें मुख्य साधन धरलें आहे.

नातुडे मुख्य परमात्मा । म्हणोनि करावी लागे प्रतिमा ।

असें समर्थ म्हणतात, यातलें बीज तरी हेंच आहे. मनुष्याचें मन फार चंचल आहे, त्याला स्थिर केल्यावाचून पदार्थाचेंच ज्ञान होऊं शकत नाहीं. परंतु अभ्यासानें व वैराग्यानें मनाला स्थिरता आणतां येते. अभ्यास करण्यास सोपें जावें म्हणून काहीं दृश्य वस्तु डोळ्यापुढें ठेवून त्यायोगें चित्ताची स्थिरता होते. ही जी दृश्य वस्तु हेंच प्रतीक. रहस्यकार प्रतीक व प्रतीकाच्या ठिकाणीं ठेवलेली भावना याचें मुख्य प्रयोजन काय आहे त्यासंबंधीं सांगतात—' चित्ताची प्रवृत्ति परमेश्वराकडे वळविण्याचें प्रतीक हें एक साधन आहे. या प्रतीकाचे ठायीं उपासक आपल्या सोयीसाठीं ईश्वरभावना ठेवीत असतो व ती भावनाच त्याला खरी तारक व साध्याकडे नेणारी आहे. प्रतीकाच्या ठिकाणीं जशी भावना असेल तसें तुमच्या भावनेचें फल परमेश्वर—प्रतीक नव्हे—तुम्हास देत असतो. प्रतीक आणि प्रतीकांत ठेवलेला भाव यातला हा भेद लक्षात ठेवल्यास प्रतीक कोणतेंहि असल्यास त्याबद्दल तंटा करण्याचें कारण नाहीं. प्रतीकामध्यें ज्या देवतेचा भाव ठेवावयाचा तिचें स्वरूप तुमच्या देहस्वभावाप्रमाणें जितकें शुद्ध मानतां येईल तेवढें शुद्ध कल्पून सुरुवात करावी. काहीं कालपर्यंत याच भावनेचें फल परमेश्वर तुम्हांस देत असतो. पण पुढें चित्तशुद्धीच्या दुसऱ्या साधनाची अपेक्षा न रहाता यथामति चालू ठेवलेल्या परमेश्वराच्या नित्य भक्तीनेंच ही भावना सुधारत जाते आणि मग परमेश्वराचें ज्ञानहि वाढत जाऊन अखेर वासुदेवः सर्व अशी मनाची अवस्था होऊन उपास्य व उपासक हा भेदहि शिल्लक न रहातां शुद्ध ब्रह्मानंदांत शेवटीं आत्म्याचा लय होतो.'

जगात सर्वत्रच जर परमेश्वर भरला आहे तर परब्रह्माचें प्रतीक म्हणून

कोणतीहि सगुण किंवा व्यक्त वस्तु उपासनेसाठीं घेतली तरी हरकत नसावी. परंतु अज्ञानानें किंवा मोहानें ही दृष्टि सुटल्यामुळें वृथाभिमान उत्पन्न होऊन रणें पडतात. शिवाय प्रतिमांच्या उपासनेंत स्वार्थ, ऐहिक लाभ, कामनापूर्ति, सुखप्राप्ति, दुःखनिवारण इत्यादि मलवेच हेतु शिरले म्हणजे त्या उपासनेला व्यापाराचें स्वरूप येतें व अर्थात् साधक साध्यापासून च्युत होतो. हठयोग्याला सिद्धींच्या तडाख्यात न सापडण्याबद्दल जो इशारा दिला आहे तोच इशारा येथेंहि देणें भाग आहे. मुख्य साध्याकडे नेण्यासाठीं भक्तिमार्ग हें एक साधन आहे, व त्या साध्याकडे लक्ष ठेवून केलेली भक्ति हीच सात्विक भक्ति आहे. नवविधा भक्ति सात्विक स्वरूपाची असली तरच अखेरचें ठिकाण गाठता येईल. एरव्हीं नाहीं

मागें आपण पाहिलेंच कीं, भक्तिमार्गाचा साधन या नात्यानें उपयोग असून अखेरचें साध्य ब्रह्मात्मैक्यज्ञान हें आहे ही गोष्ट स्वतः आचरून दुसऱ्यास आपल्या उदाहरणानें आचरण्यास लावून देण्याचें काम श्रेष्ठ जो ब्राह्मणवर्ग त्याचें आहे.

ब्रह्मज्ञानाचा विचार । त्याचा ब्राह्मणासी च अधिकार ।
वर्णांना ब्राह्मणो गुरु । ऐसे वचन ॥ १४-७-३०

परंतु अशा या ब्राह्मणांची समर्थकालीं कशी स्थिति झाली होती, पहा—

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।
गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्याचे ॥ ३१

या ब्राह्मणास आपले तेहेतीस कोटि देव व अनेक अवतारी पुरुष पुरे न वाटून केवळ स्वार्थाकरिता, काहीं ऐहिक फायद्याकरिता

कित्येक दावलमल्कास जाती । कित्येक पीरास भजती ।
कित्येक तुरुक होती । आपले इछेने ॥ ३२

या ओवींत "आपले इछेनें" हे शब्द महत्त्वाचे आहेत जे म्लेच्छाच्या भयानें बाटले त्याना एकपरी दोष लावता येत नाहींत, परंतु स्वइच्छेनें तुरुक होणारेहि काहीं होते ! सर्व वर्णांत जे श्रेष्ठ त्यांची जर ही गति, तर इतरांची काय कथा ? स्वार्थ व ऐहिक सुख यानीं प्रेरित झालेल्या जनतेनें भक्तिमार्गाचें उच्च ध्येय सोडून दिलें, भक्तीचें सात्विक रूप लुप्त झालें व जिकडे तिकडे तिचें राजस व तामस रूप बोकाळलें. विषयावर नजर ठेवून अगर यश-ऐश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून देवाचें पूजन मनन करावयाचें अगर हिंसा, दम्भ, मात्सर्य याना

अनुलक्षून त्या त्या देवतांची आराधना करावयाची असाच दंडक पडला. 'आर्त' व 'अर्थार्थी' या दोन वर्गातच सर्व भक्त मोडू लागले. "मला काही तरी देव" हीच सर्वांची वृत्ति बनली.

नवस पुरवी तो देव पुजिला । लोभासाठीं झाला कासावीस ॥

भागवतात वेगवेगळ्या कामनाप्रीत्यर्थ आराध्यदेवतांची मोठी यादीच दिली आहे.

इन्द्रं इन्द्रियकामस्तु । प्रजाकामः प्रजापतीन् ।
देवीं मायां तु श्री कामस्तेजस्कामो विभावसुम् ॥
आयुष्कामोऽश्विनौ देवौ पुष्टिकामः इलां यजेत् ।
रूपाभिकामो गन्धर्वान्स्त्रीकामोऽप्सरउर्वशीम् ॥

याप्रमाणें त्या त्या देवतांचें पूजन करून इच्छित सुखें प्राप्त करून घेता येतात. कारण 'व्याधिष्टो देवभक्तश्च' असा नियमच आहे. सुखें इच्छित तशीं दुःखें नकोत म्हणून दुःखाचा व्याधींचा—परिहार करणाऱ्या देवताहि पूज्य झाल्याच. असें होता होता आयुर्वेदात जितके रोग तितके देव देव्हाऱ्यात शिरलेच व त्यांची भीड उल्लंघवत नसल्यामुळें कामनेचा पाईक बनलेल्या या भक्ताचा व्याप उदंड वाढतच चालला. चित्ताची एकाग्रता करून मुख्य परमात्म्यास आतुडणाऱ्या या भक्तांच्या चित्ताची अशी शोचनीय अवस्था झालेली पाहून समर्थांना त्याची कींव आली, व

विघडले देव आणी भक्त । जीवशिवपणें द्वैत ।
तया देवभक्तां येकांत । करी तो सद्गुरु ॥ ५ २-१०

अशा कोटींतले ते असल्यामुळें वहकलेल्या या भक्तांना जेथील तेथें नेऊन घालण्याकरिता त्यांनीं नाना प्रकारें उपदेश केला.

समर्थांनीं पाहिलें कीं, उपासनेचे म्हणून मातीचे, धोंड्याचे, लाकडाचे, रुईचे वगैरे उदंड देव झाले, तसेच उपासनेचे भेदहि उदंड झाले. उपासनेच्या अभिमानानें भांडणेंहि फार माजलीं. जितुके देव तितुके मंत्र झाले. हें पाहून ते म्हणतात—

शास्त्रांचा बाजार भरला । देवांचा गल्बला जाला ।
लोक कामनेच्या व्रताला । झोंबोन पडती ॥ ११-२-२२
मतामतांचा गल्बला । कोणी पुसेना कोणाला ।
जो जे मतीं सांपडला । तयास तें चि थोर ॥ २५

विद्यारण्यस्वामींनींहि हा शास्त्राचा बाजार व देवाचा गलबला पाहून असेच उद्गार काढले आहेत. मुख्य ईश्वर कोण हें ठरवितांना

अत्रापि कलहायंते वादिनः स्वस्वयुक्तिभिः
वाक्यान्यपि यथाप्रज्ञं दार्ढ्यायोदाहरंति हि ॥ चित्रदीप १०४

एक म्हणाला, ज्याला अनेक डोळे व अनेक हातपाय आहेत तो ईश्वर. याला सहस्राक्षः सहस्रपात् हें वचन त्यानीं पुढें केलें. त्यावर एक जण म्हणाला, मेहावळीसारख्या विरूपाला अनेक हात पाय असतात, तेव्हा तो ईश्वर होईल, तरी उपलक्षणावृत्तीनें चतुर्मुख ब्रह्मदेव हाच ईश्वर समजावा; त्याला 'पुत्रार्थं तमुपासीनाः', 'प्रजापतिः प्रजा असृजत' या श्रुति त्यानें आधार म्हणून सांगितल्या. त्यावर तिसरा म्हणाला, विष्णूच्या नाभिकमलापासून जर ब्रह्मदेव झाला, तर अर्थात् विष्णु श्रेष्ठ. याला भागवतपुराणांचा आधार त्यानें पुढें केला. चौथा एक शैव पुढें होऊन म्हणाला, छे, विष्णूला शिवाच्या पायाचा थाग लागला नाहीं, अशी शिवपुराणात कथा आहे; तेव्हा शिवच श्रेष्ठ. पाचवा एक गाणपत्य म्हणाला, त्रिपुरासुराचें भस्म करण्याचे वेळीं याच तुमचे शिवानें प्रथम गणपतिपूजन केलें, अशी गणेशपुराणांत कथा आहे. तेव्हा गणपतिच श्रेष्ठ. असें होता होतां

अन्तर्यामिणमाश्रित्य स्थावरान्तेश वादिनः।
संत्यश्वत्थार्कवंशादेः कुलदैवत दर्शनात् ॥ १२२

याप्रमाणें अन्तर्यामींपासून दगड, पिंपळ, रुई, वेळु येथपर्यंत दैवतें पसरलीं आहेत. असो.

समर्थांनी हेरलें कीं,

प्राणी साभिमानें भुलले। देहाकडे पाहात गेले।
मुख्य अंतरात्म्यास चुकले। अंतरीं असोनी ॥ १८-१-२१
अंतरीं ठेवणें चुकलें। दारोदारीं धुंडूं लागले।
तैसें अज्ञान जालें। देव न कळे ॥
देवावेगळें कोणी नाहीं। ऐसें बोलती सर्व हि।
परंतु त्यांची निष्ठा कांहीं। तैसी च नसे ॥ ४-८-१९

मुख्य देव कोण—

ऐहिक लाभार्थ अनेक देवतांची उपासना करणाऱ्यांना प्रतीकें पुढें टेकून श्रद्धेनें आराधना करण्याची जी संवय लागलेली होती, त्या संवयीचा फायदा तेवढा घेऊन,

ही आराधना कोणत्या देवाची करावयाची हें या कामनिक भक्तांना प्रथम समजून दिल्यास ते नीट मार्गास लागतील असें धोरण धरून त्यांनी प्रथम "मुख्य देवाचा निश्चयो" प्रकरण सांगितलें.

सकाम भक्तांना आपल्या आराध्य देवता आपआपलें इच्छित फल देतात असें वाटत असतें; परंतु उपासनेच्या ह्या सर्व ऑर्डरी कोणत्या मुख्य ऑफिसांत नोंदल्या जाऊन त्या त्या ऑर्डरीप्रमाणें घर प्रसादाचा बटवडा कोणत्या ऑफिसांतून होतो त्याबद्दल गीतेंत जाहीर झालेंच आहे कीं,

येऽप्यन्य देवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्य विधिपूर्वकम् ॥ गी. ९-२३
लभते च ततः कामान्मयैव विहितान् हितान् (गी. श्लो. ७-२१-२२
यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति तस्य ......

समर्थ सांगतात—

भक्तांचा देव लोभाळु । भक्तांचे मनींचें करी । स्तु. म. ५ १
सांपडे भक्त जो जैसा । तैसा तो होतसे तया । २

भागवतकार सांगतात—

अकामः सर्वकामो वा मोक्ष-काम उदारधीः ।
तीव्रेण भक्तियोगेन यजेत पुरुषं परम् ॥ स्क. २

अशा या परमपुरुषाची आराधना जर सर्व काम पुरविणारी आहे, तर इतर अनेक क्षुद्र देवता, ज्या मुख्य देवतेच्या मुखत्या गुमास्त्यासारख्या आहेत, त्यांची आराधना करण्यात फायदा काय ? समर्थ सांगतात—

सेवकें साडिला राजा । सेविल्या आदरें प्रजा । मा. प. २-४

असें तुमचें चाललें आहे व अशा युक्तीनें तुमचा सर्व खटाटोप फुकट जात आहे. लहान मुलांना चांगलें चालतां येण्यासाठीं म्हणून पांगुळगाड्याचा उपयोग असतो, त्याप्रमाणें अर्चन कसें करावें, भाव कसा ठेवावा, ध्यान कसें करावें, हें आंगवळणीं पडून पुढें मोठ्या पायरीकडे जावयाचें या हेतूनें प्रतिमापूजनाचा वगैरे उपयोग आहे, परंतु ती दृष्टि अजिबात सोडून स्वार्थमूलक दृष्टीनें अनेक देवतांचें पूजन जन्मभर करीत बसावें असा मूळ उद्देश नाहीं.

अर्चादौ पूजयेतावदीश्वरं मां स्वकर्मकृत् । यावन्न वेद स्वहृदि सर्वभूतेष्ववस्थितम् ॥ (भा. स्क. ३ अ. २७ )

आता असा हा मुख्य देव कोण हें समजून देण्यासाठीं तर्कशुद्ध पद्धतीनें समर्थ सांगतात कीं,

कुलाळ पात्रापूर्वी आहे। पात्र कांहीं कुलाळ नव्हे।
तैसा देव पूर्वींच आहे। पाषाण न हे सर्वथा॥ ८-१-३१
देवें निर्मिली हे क्षिती। तिचे पोटीं पाषाण होती।
तयास चि देव म्हणती। विवेकहीन॥ २९
एवं जगदीश तो वेगळा। जग निर्माण त्याची कळा। ४१
मुख्य देवाचें लक्षण असें सांगता येईल कीं,
सृष्टिपूर्वीं सृष्टि चालता। सृष्टि सर्व संहारिता।
शाश्वत देव तत्वता। आदि अंतीं॥

सर्वांच्या भालपट्टावर लिहिणारा जो ब्रह्मदेव त्या ब्रह्मदेवाच्याहि भालपट्टावर जो लिहितो, सर्वांचें पालन करणारा जो विष्णु त्या विष्णूचेंहि जो पालन करतो, संहारकालीं सर्वांस जाळणारा जो शंकर त्यालाहि पण जाळण्यास जो अजून उरला आहेच, तोच तो मुख्य देव होय. त्या मुख्य देवानेंच चराचर केलें; त्यानेंच रवि शशि मेघमाळा केल्या, त्यानेंच सागराला मर्यादा घातली आहे; पृथ्वीला स्थिर केलें आहे, सूर्याला भ्रमण करण्यास लावून दिलें आहे, आता विचार कर कीं, कर्तृत्वगारी तुझ्या ह्या देव्हाऱ्यातील देवात आहे काय?

देव्हाऱ्याचा उठोनि देव। करूं नेणे सर्व जीव।
तयाचेनि ब्रह्मकटाव। निर्मिला न वचे॥ ८-१-२२

अर्थात्, तुझ्या देव्हाऱ्यातील देव हा मुख्य देव नव्हे.

आता असा साहजिक प्रश्न येतो कीं, असा हा मुख्य देव कोठें असतो? त्याबद्दल समर्थ समजून घालतात, देव जे दृष्टि झाला तरी देवळातच सांपडणार.

देव पाहावयाकारणें। देऊळें लागती पाहाणें।
कोठें तरी देऊळाच्या गुणें। देव प्रकटे॥

आता इतर देवांचें दर्शन घेण्यास चुना, दगड, विटा यांनीं रचलेल्या देवळात जावें लागतें, पण या मुख्य देवाचें देऊळ निराळ्याच प्रकारचें आहे. तें चालतें बोलतें आहे.

देउळें म्हणिजे नाना शरीरें। तेथें राहिजे जीवेश्वरें। १७-१-१३
चालतीं बोलतीं देउळें। त्यामधें राहिजे राऊळें। १४

अस्तिमांसांचीं शरीरें। त्यांत राहिजे जीवेश्वरें। १५-२-१

असल्या देवळांत वस्ती करतांना त्या कृपालु जगदीश्वरानें

नाहीं उंच नीच विचारलें। नाहीं बरें वाइट पाहिलें।

अशी स्थिति असतांना, समर्थ सांगतात, केवढा उदंड व्याप मनुष्यानें आपलेमागें विनाकारण लावून घेतला आहे! प्रत्येकाचें केवढें मोठें देवदेवतार्चन चालू आहे, अनेक देवळांत जाऊन रोजचा देवदर्शनाचा किती कडक नियम कांहीं जण पाळीत आहेत, किती त्रासदायक अनेक कष्टाच्या यात्रा करून देहाला क्षीण केलें चाललें आहे, केवढे यज्ञ-याग, व्रत-नियम, जप तप, मंत्र-तंत्र चालले आहेत, हें पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटतें.

भ्रान्त देवाळयासाठीं। देव चि सांडिती जनीं।

या लोकांना सांगितलें, तर आश्चर्य वाटेल कीं, इतके सायास करण्याची मुळींच जरूरी नाहीं. अहो, हा मुख्य देव तुमच्या, खुद्द तुमच्या शरिरात बसला आहे. तुमच्यासारख्या चाणाक्ष धूर्तांना हें समजू नये हें आश्चर्य नव्हे काय?

बहु चातुर आतुरसे दिसता। परि व्यर्थ मनीं उगले शिणतां॥

उगा च घर पाहोन गेला। घरधनी नाहीं वोळखिला।

राज्यांमधून चि आला। परी राजा नेणे॥ ११-८-१४

देहसंगें विषये भोगिले। देहसंगें प्राणी मिरवले।

देहधर्त्यास चुकलें। नवल मोठें॥ १५

अशी चूक करून कसें चालेल? साधा व्यवहारसुद्धा असा आहे कीं,

कोणी येके ग्रामीं अथवा देशीं। राहणें आहे आपणासी।

न भेटतां तेथिल्या प्रभूसी। सौख्य कैचें॥ ६-१-२

म्हणौन ज्यास जेथें राहाणें। तेणें त्या प्रभूची भेटी घेणें। ३

कारण, असें न केल्यास

त्यास न भेटतां त्याचे नगरीं। राहतां धरितील वेगारी।

तेथें न करितां चोरी। आंगीं लागे॥ ६

याकारणें जो शाहाणा। तेणें प्रभूसी भेटावें जाणा।

ऐसें न करितां दैन्यवाणा। संसार त्याचा॥ ७

तुझ्या सर्व आयुष्यभर तुझ्या या शरीररूपी देवघरात काय चाललें आहे याची

तुला मुळींच दाद नाहीं. अरे, तुला सांगितलें तर आश्चर्य वाटेल कीं, तुझ्या या शरिरात बसलेला हा देव तुझ्याकडून काहीं वेतन न देता, वेगाऱ्यासारखीं, तुला एका क्षणाचाहि विसावा न देता, आपलीं सर्व कामें करून घेत आला आहे, व तूंहि तीं निमूटपणें करीत आला आहेस.

देहदेउळामधें बैसला । न भजतां मारितो देहाला ।
म्हणौनि त्याच्या भेणे तयाला । भजती लोक ॥ १७-१-६
जे वेळेसी भजन चुकलें । तें तें तेव्हां पछाडिलें । ७
पांचा विषयाचा नैवेद्य । जेव्हां पाहिजे तेव्हां सिद्ध । ९
जेणें काळें नैवेद्य पावेना । तेणें काळें देव राहेना । १०

अरे, तू समजतोस कीं, मी अमक्या तमक्या नामाचा असा कोणी जो आहे तो सर्व उपभोग घेतों; परंतु खरा प्रकार तसा नाहीं. तो मुख्य देवच

दृष्टीमधें पाहातो । श्रवणामध्यें ऐकतो ।
रसनेमध्यें स्वाद घेतो । प्रत्यक्ष आता ॥ १३-१-५
घ्राणामधें वास घेतो । सर्वांगीं तो स्पर्शतो ।
वाचेमधें बोलवितो । जाणोनि शब्द ॥ ६

असा हा वेगवेगळ्या इंद्रियाकडून आपलीं कामें करवून घेतो. याचाच अर्थ, पांचा विषयाचा नैवेद्य तू त्याला तो मागेल तेव्हां पोंचवतोस, त्या देवाच्या हुकुमानें शरीरामार्फत कशीं कामें करून घेतलीं जातात पहा.—

तृषेनें शोकलें शरीर । आत्म्यास कळे हा विचार ।
मग उठवून शरीर । घालवी उदकाकडे ॥ १३-९-१४
क्षुधा लागते ऐसें जाणतो । मग देहाला उठवितो । १६
हाताकरवीं ग्रास उचलवी । मुखीं जाऊन मुख पसरवी ।
दांताकरवीं चाववी । नेटें नेटें ॥ १९

हा प्रकार कसा चालला आहे, हें थोडा वेळ एकान्तांत बसून विचार केलास तर तुला सहज समजेल.

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥

हें भगवंतांचें म्हणणें तुझ्या प्रत्ययाला येईल. बाहेर अनेक देवळांतून तू ज्या देवाला धुंडीत होतास, तो तुझ्याच हृदयांत रात्रदिवस वास करीत होता, परंतु

ज्ञान; व हें अशा भक्तिमार्गानें जाऊन देव व देवालय या शब्दांचें खरें ज्ञान प्राप्त झाल्यास सामान्य बुद्धीच्या माणसास होऊं शकतें, असें समर्थांनीं शिकविलें आहे.

ही शिकवण ध्यानीं धरून ज्या कोणालाहि देवदर्शन खरोखरच घेणें असेल त्यानें पूर्ण सत्याग्रह करून आपल्या देहदेवालयामध्यें घुसावें, जिज्ञासेनें आपल्या देहदेवालयात वसलेल्या " सन्त समीपे रमणं रतिप्रदं " ची भेट घेण्याचें ठरविलें तेव्हां ती उदरली. चोखोबानीं हाच मुख्य देवाची देहेदेवालयामध्यें गाठ घेतली, म्हणूनच ते सर्वांना वंद्य झाले. असो.

समर्थ आपल्या ओजस्वी वाणीनें ही शिकवण आपल्या शिष्याना देऊन त्यांस स्थितप्रज्ञाच्या स्थितीला आणून सोडीत व अशांना मठपति करीत, व स्थितप्रज्ञांनीं या कोटीस पोचल्यावर लोकसंग्रहार्थ जगात पुढें कसें वागावयाचें हें आपल्या प्रत्यक्ष उदाहरणावरूनच प्रत्ययाला आणून देत. विरक्तानें स्वतः उपाधींत न सापडता लोकसंग्रहार्थ उपाधि वाढविली पाहिजे, हा उपदेशातलें मर्म हेंच आहे. समर्थसंप्रदायकार्याला कसलाहि — मग देवदेवतार्चनाचा का असेना — घोळ घालून बसणारे लोक नको असत. ताडदिशीं उडी मारून कामाला धावणारे, बुद्ध बुद्धीत, स्थितिस्थापकत्व अंगीं आणणारे, असे शिष्य हवे असत, व अशा निवडक शिष्यास देहदेवालयात परमेश्वरस्वरूपाचें प्रेमानें आकलन करून मन तदाकार करण्यास ते शिकवीत. समर्थ रोज स्वतः मानसपूजा करीत हें विदीतच आहे. असो. समर्थांची ही शिकवण लक्ष्यात घेऊन हा देहमंदिरातच, पूर्वी ज्यानीं घेतली नसेल त्याना, देवाची भेट घेण्याची सद्बुद्धि होवो, अशी परमेश्वराची प्रार्थना करतों.



तो इतके दिवस तुझ्या आड देहबुद्धीनें चोरल्यासारखा होऊन तुला दिसत नव्हता. परंतु विवेकानें ही देहबुद्धि हळूं हळूं नष्ट होतांच हें तुझें ठेवणें तुला आयतेंच सापडलें आहे. आता देवदर्शनाचें काम पार सोपें झालें आहे. आपली बैठक न सोडतां त्या अन्तरात्म्याची अखंड भेट घेण्याचा योगहि तुला लाभेल. तो अं रीं असलेला जो देव आहे तो कोदण्डधारी प्रभु रामचंद्रच आहे, असें समजून मोठ्या प्रेमानें व श्रद्धेनें त्याचें स्वरूप चित्तानें एकान्तात, त्या मूर्तीनें ध्यान धरून बहुविधा प्रकारानें त्याची भक्ति कर म्हणजे तुझी भावना शुद्ध होत जाऊन सर्व कर्ता तोच आहे असें तुला पटत जाईल व मी कर्ता असें म्हणणारा जो इतके दिवस व्यर्थ कष्ट भोगीत होतास तो

राम कर्ता म्हणतां पावसी । येश कीर्ती प्रताप ॥

प्रीतिपूर्वक सतत युक्त अशा भक्तांना देव आपण होऊनच मग जवळ करूं लागतो. देवाची जवळीक होत चालली कीं, ऐहिक सुखाचा तिटकारा उत्पन्न होतो. देवाच्या सान्निध्यातच राहून तेथें आनंद लुटावा असें वाटूं लागतें. कारण, तो अन्तर्यामी अखंडानंदरूप आहे. नारदानीं भक्तीची व्याख्या

सा तु अस्मिन् परमप्रेमरूपा

अशी हृदयावर हात ठेवून, तेथें असलेल्या मुख्य देवाला उद्देशून, केली आहे. असो. अशा ह्या आनंदाचें व्यसनच भक्ताना जडलें म्हणजेच भागवतात सांगितलेली अहेतुकी अव्यवहिता भक्तिः घडते. मग येवढा तेवढा सुखाचा तुकडा मिळावा म्हणून जो भक्त कामनेच्या मताला झोंबून पडत होता तोच

भक्त तो घेइना कांहीं । देवें त्रीलोक्य दीधलें ।
सर्व ही सांडिलें दोघीं । येकमेकासी लाविती ॥ स्फु. प्र. ५-१५

अशी वेळ वेळ येऊन ठेपते.

ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके सर्वान्कामान्छन्दतः प्रार्थयस्व ।

असें यम पाठीस लागून घे घे म्हणतो, तर नचिकेत 'तवैवास्तु तत्' असें म्हणत सुटला, तसा प्रकार होतो. अशा निष्काम, निःस्पृह, वैराग्यशाली भक्ताला जास्त खोल विचाराअंतीं प्रत्येकाचें शरीर हेंहि एक देऊळ असून त्यातहि मुख्य देव असलाच आहे व त्या त्या शरीरमार्फत व्यवहार चालवीत आहे असें दिसू लागतें.

तें मुंगी समान शरीरें । उदंड असती लाहानथोरें ।

समस्तांमध्यें जीवेश्वरें । वस्ति कीजे ॥ १५-८५

किती धाकुटे थोरले देहधारी। परि अंतरात्मा चि नाना विकारी ॥

करुणाष्टक ८०-१

अर्थात्, आत्मौपम्यबुद्धि वाढत चालल्यामुळें हर्ष शोक, निन्दा-स्तुति, शत्रु-मित्र हीं द्वंद्वें मावळायला लागतात. त्याला जिकडे तिकडे माझा राम वावरतो आहे, असें दिसू लागतें व मग

विद्या विनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनिचैव श्वपाके च

तो रामदर्शी होतो; व पुढें पुढें हेच विचार विस्तृत होत जाऊन

खं वायुमग्निं सलिलं महीं च । ज्योतींषि सत्त्वानि दिशोद्रुमादीन् ।

सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं । यत्किंच भूतं प्रणमेदनन्यः ॥ भा. स्क. ११

तो सर्वांनाच नमस्कार करीत सुटतो, व

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते । नमोस्तु ते सर्वत एव सर्व ।

अशा प्रकारची अर्जुनासारखी त्याची स्थिति होते.

आपल्या मागील आयुष्याकडे व हल्लींच्या स्थितीकडे पाहून तो म्हणतो

विसरलों मज मी ममतागुणे । बहुत काळवरी दुख भोगणें ।

अवचिता सुखसागर भेटला। भवजळें सरिलापति आटला ॥ क. १०-१

दशदिशा भरलें दुरिचा दुरी । दुरि म्हणों तरि तें मज अंतरीं । २

सदा स्वरूपानुसंधानाकडे वळलेल्या त्या भक्ताला एका रामावांचून दुसरें जगांत कांहीं दिसत नाहीं.

सगुण उपासनेच्या अंतिम सीमेच्या प्रांताला पोंचलेल्या या भक्ताला 'वासुदेवः सर्व' असें जें वाटणें तें हेंच होय. येथून म्हणजे स्थितीचा टप्पा लाव नाहीं. उपास्य व उपासक नाहींसा होऊनच तो टप्पा गाठला जावयाचा असल्यामुळें भक्तिमार्ग तिकडे बोट दाखवून संपतो. उपासकाचा अहंकार नाहींसा झालेला असल्यामुळें — म्हणजे मधला 'मी' चा चोर मारला गेल्यामुळें व भक्तानें आपल्याच स्वतःचा नैवेद्य या ठिकाणीं मुख्य देवाला दाखविला असल्यामुळें — भक्त च देव असें द्वैत दाखवावयाला तरी खालीं शिल्लक काय राहिलें आहे ! 'माचा' असला, तरच 'मामा' या शब्दाला किंमत; पण माचाच नाहीं, तर मामा तरी शिल्लक कोठें रहाणार ! तसें देव व भक्त हें द्वंद्व मावळून जातें. ज्ञानेश्वरमहाराज सांगतात त्याप्रमाणें 'देवचि झाला देऊळ' असें होऊन जातें. हेंच ब्रह्मात्मैक्य-

( १८ )

श्रीसमर्थ

# श्रीसमर्थसंप्रदायाचा अध्यात्म हा प्राण आहे.

( लेखक — श्री अमृतराव ठोंबरे, जांब )

वैदिक धर्म आपण ज्याला म्हणतों तो या आपल्या भारताचा सर्वश्रेष्ठ अधा प्राचीन धर्म आहे. म्हणून आपला हिंदुस्थान हा इतर राष्ट्रांना अध्यात्मिकतेचे बाबतींत गुरुस्थानीं आहे, व यामुळेंच आर्यसभ्यतेचा ठिका देशी विदेशी जातीवर आजसुद्धा कायम आहे, हें आपण जाणतच आहा. इतिहासाची साक्ष आहे कीं, ज्या ज्या वेळीं आशिया, युरोप या देशांतील सज्जन पुरुष अध्यात्मिकतेची तहान शमविण्यासाठीं आपल्या देशात आले त्या त्या वेळीं त्याना येथून निराश होऊन जाण्याचा मुळीं प्रसंगच आला नाहीं. ते येथून संतुष्टच होऊन गेले. म्हणून अध्यात्मिकतेचें जन्मस्थान असा या भारताची या परस्थ सज्जनानीं मुक्तकंठानें स्तुति करून कृतज्ञताबुद्धिहि व्यक्त केली आहे यावरून भारतवर्षाचा गौरव तेव्हा व आजसुद्धां जो आहे तो केवळ भारतांतील अध्यात्मिकतेकरिताच आहे, ही गोष्ट आपण लक्षात घ्यावयास पाहिजे

इतर राष्ट्रांना अध्यात्मिकतेचा गंध नाहीं असें विद्वान् लोक म्हणतात. आपला भारतवर्षच असा देश आहे कीं, ज्या देशांत वेळोवेळीं ऋषि, मुनि, साधुसंत, अवतारी महापुरुष अवतीर्ण झाले व त्यानीं आस्तिकता त्याचप्रमाणें अध्यात्मिकता यांचे या भूमींत वीं पेरून मोठ मोठे धार्मिक संप्रदायाचे वृक्ष उभे केले, व याच वृक्षाच्या शीतल छायेच्या आश्रयानें भारतांतील जनता सुखसमाधानानें

नांदली, व आजहि आपण नांदत आहोत, ज्या महोपकारी साधुसंतांनी आम्हाला अध्यात्मिकतेचा प्रकाश देऊन, नास्तिकतेच्या पापापासून दूर ठेविलें; त्या साधु संताचा आम्हाला कधींच विसर पडणार नाहीं. जर आम्ही आमच्या महापुरुषांना कृतघ्नपणानें विसरलों तर या कृतघ्नतेच्या पापापासून आमची कधींच मुक्तता होणार नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे.

आपल्या राष्ट्रांत ज्या महान् साधुसंतांनीं अध्यात्माचे पाठ दिले, त्या महान् संतसाधूंपैकीं श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज हे एक होते. त्यांच्याच या श्रीवाग्देवतामंदिराच्या उद्घाटनसमारंभाला आपण सर्व सज्जन येथें जमला आहात. मला वाटतें, आपल्या आयुष्यातील हा एक भाग्याचा सुप्रसंग, आपणा सर्वांस लाभला आहे. कारण

जेथें श्रवणाचा उपाये । आणि परमार्थ समुदाये ।
तेथें जनासी तरणोपाये । सहज चि होय ॥

अशी समर्थांची उक्ति आहे व आपण सर्व सज्जन परमार्थाकरिताच या सभेला आला असल्यामुळें आपल्या तरणोपायाचा मार्गहि याशिवाय दुसरा असू शकत नाहीं, हें आपल्या सहज लक्षात येण्यासारखें आहे.

श्रीसमर्थांनीं भगवंताजवळ

आध्यात्मविद्येच्या परमार्था । मज बोलवावें ॥

अशीच प्रार्थना केली आहे. यावरून श्रीसमर्थांना अध्यात्मविद्येचें महत्त्व किती वाटत होतें, हें आपल्या लक्षात येईल. बरोबर आहे, संतमहंतांना अशी विद्या नकोच आहे कीं, जी विद्या मनाला शांति देत नाहीं. म्हणून ते विद्येची व्याख्या करितांना म्हणतात कीं,

विद्या ऐशी यावी । शांतवी मनासी ।
आठवी भवासी स्वनळानें । विद्यातें परम ।
आत्मप्राप्तीकर । जाणता शंकर । महायोगी

म्हणून बाकीच्या विद्या अविद्या आहेत, अर्थात् संसाराकरिता उपयुक्त आहेत, असें संतांचें म्हणणें आहे.

अध्यात्माला जें हें महत्त्व प्राप्त झालें आहे, त्याचें कारण अध्यात्माशिवाय या संसारी जीवांना समाधान व खरी शांति मिळू शकत नाहीं, हें होय. आमच्या मतें या संसारी जीवांना खरी शांति देण्यासाठीं म्हणजे जीवन्मुक्त करण्यासाठीं, मुक्त

स्थितींतून श्रीसमर्थांसारखे महान् आत्मे देह धारण करून ईश्वरी संकेताप्रमाणें मुद्दाम या भूलोकावर येतात; येरवीं त्यांचें येथें येण्याचें दुसरें प्रयोजनच नाहीं. श्रीसमर्थांना या महान् संतमहत्ताविषयीं किती आदर आहे, हें त्यांच्या ग्रंथातून आपणास ठिकठिकाणीं वाचावयास सांपडेल. उदाहरणार्थ,

जे त्रैलोकीं नाहीं दान। तें करिती संतसज्जन।
तयां संतांचें महिमान। काय म्हणौनि वर्णावें॥ १-५-२४
अरे या संतांचा महिमा। बोलावया नाहीं सीमा।
जयांचेनि जगदात्मा। अंतर चि होये॥ ६-५-२६
जे वस्तु परमदुल्लभ। जयेचा अलभ्य लाभ।
ते चि होये सुल्लभ। संतसंगें करूनी॥ १-५-२
रायाचे सन्निध होतां। सहज चि लाभे श्रीमंतता।
तैसा हा सत्संग धरितां। सद्वस्तु लाभे॥ ६-९-२०

याप्रमाणें श्रीसमर्थांनीं आपल्या ग्रंथात संतांचा योग्य परिचय आपणास करून दिला आहे. तसेंच,

जयास नाहीं परमार्थ। तयास न कळे येथीचा अर्थ।
नेत्रेंविण निधान स्वार्थे। अंधास कळेना॥

या वचनावरून श्रीसमर्थांचें म्हणणें असें दिसतें कीं, ज्याला परमार्थ नाहीं म्हणजे विवेक नाहीं, म्हणजे ज्यांनी कर्त्याला ओळखिलें नाहीं— अर्थात् मायोद्भवाचें मूळ ज्यांनीं शोधिलें नाहीं, त्यांना ग्रंथराजाचा अर्थ कळणार नाहीं. यावरून श्रीसमर्थांनीं ग्रंथराजात अध्यात्मालाच प्राधान्य दिलें आहे, हेंहि उघड होतें.

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवोब्रह्मैव नापरः।

हा वैदिक धर्माचा त्रिकालाबाधित सत्य सिद्धांत आहे. याच सत्य सिद्धांताचा अनुभव आमच्या सर्व संतमहंतांनीं घेऊन, तोच अनुभव सर्व संसारी जीवांनीं घ्यावा व समाधान पावावें, असा त्यांचा आदेश आहे. परंतु तार्किक व अहंकारी जीव बुद्धीला प्राधान्य देऊन, अनुभव व निरीक्षणाचे बळावर स्वतःचे मनाला विचारीत सुटतात कीं, ब्रह्म खरें, जग खोटें व आपणच ब्रह्म हें कसें काय आहे! व याचा उलगडा त्याच्या मनाला झाला नाहीं, म्हणजे ते कष्टी होतात व मग संत हे परंपरेला धरून उगाच काहींतरी बोलून गेले असतील, अशी आपल्या मनाची ते समजूत करून घेतात, व वादाला प्रवृत्त होतात. श्रीसमर्थांनीं या बुद्धिवंताकरिता

सरळ सांगितलें आहे कीं, बावांनो, पंचज्ञानेंद्रियामार्फत जें तुम्हांला ज्ञान होतें तें सर्व सापेक्षिक ज्ञान आहे, म्हणून तुमचें समाधान होत नाहीं, वादच शिल्लक राहतो करितां मायोद्भवाचें मूळ शोधा, अंतर्निष्ठ व्हा, म्हणजे

एकांतीं विवेक करावा। आत्माराम ओळखावा।
येथून तेथवरी गोवा। कांहींच नाहीं॥

इतकें सांगूनच ते थांबले नाहींत, तर त्यांना समाधान व खरी शांति हवीच असेल त्यांनीं

ज्ञाता पाहावा। त्याचा अनुग्रह घ्यावा।
सारासारविचारें जीवा। मोक्षप्राप्ति॥

अशी सल्ला दिली आहे. हें कांहींच न करितां

जो दुःखें अंतरीं झिजे। आणि वैद्य पुसतां लाजे।
तरी मग त्यासीच साजे। आत्महत्यारेपण॥

असेंहि म्हटलें आहे. श्रीसमर्थांनीं दासबोधांत वैदिक धर्माचा सत्य सिद्धांत जीवांना काय केलें असतांना कळतो, याचा सुंदर खुलासा केला आहे. ते म्हणतात—

सकळ मिथ्या होऊन जातें। हें रामभजनें कळों येतें।
दृश्य ज्ञानियाचे मतें। स्वप्न जैसें॥

म्हणजे संसाराचें भजन सोडून रामभजन केल्याशिवाय हा सत्य सिद्धांत जीवांना समजत नाहीं. म्हणून सत्य ज्ञान होण्यासाठीं सर्वांनीं रामभजन करावें, असा समर्थांचा या बाबतींत अभिप्राय आहे. आज आमच्या राष्ट्रांत अध्यात्माचा कमीपणा झाला असल्यामुळें आमचे कांहीं विद्वान् लोक अध्यात्माला आजीबाईचे विचार म्हणूं लागले आहेत व धर्माबद्दल त्यांचे मनांत घृणा उत्पन्न झाली आहे. परंतु यांत सर्वस्वीं या लोकांचाच दोष आहे, असें आम्ही म्हणत नाहीं. कारण श्रीसमर्थांसारख्या महापुरुषांच्या मार्गें लोक आपला खरा धर्म विसरले म्हणजे संतांनीं सांगितलेलें अध्यात्मसाधन, भजन, अभ्यास विसरले. त्यांत आणखी धर्माच्या नांवाखालीं ज्या अनंत प्रथा प्रचलित झाल्या व ज्या वेषधारी संतांनीं 'बाबावाक्यं प्रमाणं' म्हणून त्या चालविल्या, त्यामुळें सामान्य लोकांना धर्माधर्माचें, सत्यासत्यतेचें अनुमान करितां आलें नाहीं; व धर्मामुळेंच अनेक भेद उत्पन्न होऊन आपण रसातळास जात आहों असें त्यांस वाटूं लागलें व धर्मालाच ते दोष देऊं लागले. आमच्या मतें या बाबतींत धर्म जबाबदार नाहीं, तर परा-

नीण वरातीचे सोहळे चालविणारे हे पाखाडी लोकच जबाबदार व दोषी आहेत. जसें शस्त्र केव्हांहि दोषी ठरत नाहीं, तर त्याचा उपयोग करणाराच दोषी ठरतो, हें आपण लक्षात घ्यावें म्हणून अध्यात्म (माया-ब्रह्म ओळखणें) थोताड व दोषाई आहे, असें म्हणणाऱ्यांना कळावयास पाहिजे कीं, अहो, ज्या विद्येच्या योगानें तुम्हांला संसारात सुखासमाधानानें रहातां येतें, शिवाय

संसार कळतो तुम्हा । सत्यासत्यही तो कसा ।
पावता सच्चिदानंद । निजानंदांत रंगुनी ॥

आणि

सकळ विद्येमध्ये सार । आध्यात्मविद्येचा विचार ।
दशमोध्याई सारांधर । भगवद्गीतेसि बोलिला ॥

अशी ही अध्यात्मविद्या आहे, ती थोताड कशी असू शकेल? ती तर सद्विद्या आहे. याकरिता विद्या प्राप्तीसाठीं आपण मायोद्भवाचें मूळ शोधा म्हणजेच अध्यात्मसाधन करा. जसें आपण शरीरसामर्थ्य वाढविण्यासाठीं भिन्न भिन्न प्रकारचे व्यायाम घेता, पौष्टिक अन्न खाता किंवा मानसिक शक्ति जागविण्यासाठीं अनेक पुस्तकें वाचता, २५-२५ वर्षे एकसारखा अभ्यास करिता, तेव्हांच आपली मानसिक शक्ति जागल्याचा आपणास प्रत्यय येतो, म्हणजे आपण विद्वान् होता; मग मायोद्भवाचें मूळ शोधण्यासाठीं म्हणजे आपण कोण आहीं हें जाणण्यासाठीं, अर्थात् आत्म्याचे जागृतीसाठीं आपणास कांहीं प्रयत्न करावयास नको काय? नश्वर पदार्थांचे प्राप्तीसाठीं आपण जीवापाड मेहनत घेता, मग माया-ब्रह्म ओळखण्यासाठीं म्हणजे आत्मज्ञानासाठीं आपण कांहींच साधन न करिता तें कळत नाहीं या सबबीवर तें थोताड आहे असें म्हणता, याला काय म्हणावें? तेव्हां असें न करिता श्रीसमर्थांचे उपदेशाप्रमाणें माया-ब्रह्माचें विवरण करून व संतांला शरण जाऊन त्यांनीं सांगितलेलें साधन, भजन करावें व मोक्षप्राप्ति करून घ्यावी, हें आपलें आद्य कर्तव्य आहे. इतकेंच नाहीं तर हाच आपला स्वधर्म आहे. उगाच माया-ब्रह्म थोतांड आहे, किंवा तें आपणास अप्राप्य आहे, अशी समजूत करून घेणें बरें नाहीं.

या संसारांत आपणांला असा नेहमींचा अनुभव आहे कीं, आपल्या मनासारखें येथें घडून न आल्यामुळें आपणांस दुःख होतें, किंवा त्या कांहीं घेटाळ्या मूकपाशासारख्या आकस्मिक घटना येथें घडून येतात, त्याचा आपल्या मनाला

अदाज करिता येत नाहीं, त्यामुळें आपण हिरमुसले होता. या कष्टमय स्थितींतून सुटण्याची ज्या कोणास इच्छा असेल, त्याच्याकरिता सत्पुरुषानीं कृपाळु होऊन उपाय सुचविला आहे. परतु जो कोणी हा उपाय आचरणात आणील, तोच दु खनिवृत्त होईल, हें सागावयास नको या बाबतींत श्रीसमर्थांचें असें म्हणणें आहे कीं, तुम्हाला जोंपर्यंत तुमची अतरातील प्रज्ञा व बाहेरची प्रज्ञा ह्या दोन्ही एकच आहेत असा अतरात अनुभव येणार नाहीं, तोंपर्यंत तुम्हाला शाति मिळणार नाहीं, यासाठीं पिंडीं तेंच ब्रह्मांडीं याचा तुम्हीं स्वप्रत्ययानें अनुभव घ्या, याच प्रत्ययानें तुम्हाला आपण कोण आहों याचाही अतरात बोध लागेल, असें झालें म्हणजे या ससाराच्या घटनेंतील सुखदु खाचे परिणाम तुमच्यावर सहसा होणार नाहींत, व आमचें साधूसतांचें म्हणणें काय आहे, आत्मा काय आहे, परमात्मा काय आहे, याचाहि तुम्हांला अतरात बोध होईल असा प्रकारचा बोध होणें यालाच 'विवेक पाहाणें' असें म्हणतात. *हा विवेक पाहिल्यावाचून जो जो उपाय दु खनिवृत्त होण्यासाठीं* तुम्ही कराल, तो सर्व क्षीण आहे, पहा —

विवेक पाहिल्यावीण । जो जो उपाय तो तो क्षीण ।
विवेक पाहता आपण । आत्माच आहो ॥
आत्मयाच्या ठायीं कांहीं । बद्ध मोक्ष दोनी नाहीं ।
जन्म मृत्यू हे सर्व ही । आत्मत्वीं न घडे ॥

अशी वस्तुस्थिति आहे, व म्हणून तुम्हाला आम्ही ' परमात्मा तो तू चि जाण ' असें निरूपण केलें, म्हणजे

जीवो ब्रह्मैवनापर

हा वैदिक सिद्धात प्रतिपादन केला आम्हीं इतकें सागितल्यावरहि जर तुम्हांला शका राहील तर

गुरुमुखे हा विचार । उमजो लागे ॥

आपण श्रीसमर्थांचें वरील म्हणणें लक्षात घेऊन अध्यात्मविद्येची प्राप्ति, प्रपच परमार्थांत किती आवश्यक आहे याचा विचार करावा

साधु म्हटला म्हणजे त्याला ब्रह्म मायेशिवाय दुसरी उठाठेव नाहीं, या सताना ससार साधला नाहीं म्हणून ते या उठाठेवींत पडले, असले आक्षेप पुष्कळ लोक सतावर घेतात, परतु हे आक्षेप निरर्थक आहेत कारण, सतांना मुळांतच ससार साधावयाचा नव्हता ते तर राजाधिराज होते. ससारांत कोठेंहि

त्यांचा लोभ गुंतलेला नव्हता, म्हणूनच ते सदासर्वदा संतुष्ट असत. त्यांना कशाचीहि जरूरी नव्हती, मग त्यांना संसार साधला नाहीं, हें म्हणणें सयुक्तिक कसें ठरेल? दुसरें आक्षेपकांना हेंहि कळावयास पाहिजे कीं, जर संत अध्यात्माचे उठाठेवींत पडले नसते, तर आपणाला समाधानासारखी अमोल वस्तु कशी मिळाली असती? पुन्हा संसारी पदार्थांत सुख नाहीं, सुख तर आमच्यातच आहे, आमचा आत्माच सर्व सुखांचें भांडार आहे, या सत्य गोष्टींचें ज्ञान आपणाला कसें झालें असतें? म्हणून कोणीहि असले आक्षेप आपले साधुसंतांवर कधींच घेऊं नयेत.

श्रीसमर्थांनींसुद्धा बहिर्मुख जनतेला अंतर्मुख होण्याचा उपदेश केला म्हणूनच त्या वेळीं महाराष्ट्राला प्रपंचपरमार्थ साधला; एरवीं साधला नसता.

संसारीं असावें उदास। विवेक पाहावा सावकाश।
येणेंकरितां जगदीश। अलभ्य लाभे॥
जगदीशापरता लाभ नाहीं। कार्याकारण सर्व कांहीं।
संसार करित असतां ही। समाधान॥

ही श्रीसमर्थांची वरील शिकवण प्रपंचपरमार्थ कसा साधावा हेंच शिकविते. श्रीसमर्थ सर्वज्ञ असल्यामुळें ते जाणून होते कीं, जर जीव फक्त गृहस्थावस्थेंतच राहून आपलें जीवन व्यतीत करील, तर तो क्रमशः अधोगतीस जाईल; किंवा फक्त विरक्तावस्थेंत यावज्जीवन अहर्निशीं रहाण्याचा अट्टाहास धरील तर ही गोष्ट त्याला साधणार नाहीं. कारण अनेक जन्मापासून जीवाचा कल संसाराकडेच झुकलेला आहे, म्हणून एकदम विषयापासून निवृत्त होणेंहि त्याला साधणार नाहीं; जर कोणी हठयोगाचा आश्रय करून विषयनिवृत्त होण्याचा यत्न करील तर शृंगी, पराशर, विश्वामित्र वगैरे ऋषींप्रमाणें त्याचें मन पाशविक भावांत वाहून जाण्याचा संभव आहे व गीतेंतहि

स्वभाववश ही भूतें बलात्कार निरर्थक।

असें वचन आहे. ज्ञानी माणसाची ही अवस्था होते, तर दुर्बल हृदयजीवाची काय गति होईल, असें जाणून श्रीसमर्थांनीं साधकाला अध्यात्मविद्येचा परमार्थ दिला व कायमचें विषयनिवृत्त केलें, कारण त्यांना माहीत होतें कीं,

निराहार बळें वाह्य। सोडी विषय साधक।
आंतील न सुटे गोडी। ती जळे आत्मदर्शनें॥

म्हणून सर्व जीवांना त्यांनीं आत्मज्ञानाचाच उपदेश केला व जीवन्मुक्त केलें. श्रीसमर्थांनीं ज्ञानाची व्याख्या

पहावें आपणासी आपण । या नांव ज्ञान ॥

अशी केली आहे. त्यांनीं शरण आलेल्या मुमुक्षु जीवांना साधन-भजन सांगितलें. ज्या ज्या त्याच्या भक्तांनीं अध्यात्मसाधन करून पिंडीं तैच ब्रह्मांडीं याचा अंतरांत प्रत्यय घेतला, त्यांना त्यांना श्रीसद्गुरु समर्थ व सर्वात्मा श्रीराम हे एकच आहेत, असा अंतरींच अनुभव आला, व त्यामुळें त्यांना समाधान प्राप्त झालें. अशा रीतीनें त्या वेळीं अनेक संस्कारी जीव श्रीसमर्थांचे भक्त बनले; इतकेंच नाहीं तर सगळ्या महाराष्ट्रानें, किंबहुना सर्व भारतानें, त्यांची पूजा व आराधना केली, हें आपणास माहीत आहे. बरोबरच आहे कीं, जर भगवंत मानवदेहात आलेच होते, तर संस्कारी जीवमक्तीची ही अमूल्य संधि कशी वायां घालवितील !

भगवंत मानवदेहांत आल्याशिवाय भगवंताची भक्ति होऊं शकत नाहीं. कारण,

देहावेगळी भक्ती फावेना । देहावेगळा देव पावेना ।
याकारणें मूळ भजना । देह चि आहे ॥

असें समर्थ म्हणतात. यावरून भक्ति सगुणाची ( साकाराची ) संभवते.

अव्यक्तीं गोविती चित्त । क्लेश त्यास विशेष ची ।
देहवंतास अव्यक्ती । सुखें बोध घडे चि ना ॥

असें असल्यामुळें अव्यक्तापेक्षा एखाद्या हयात असलेल्या संताची धातु-पाषाण-मयी मूर्तींत भावना ठेवणें कांहीं गैर नाहीं. कारण, निराकाराचें ध्यान व भक्ति संभवत नाहीं. असो. कांहीं का असेना, त्या वेळीं मात्र सगुणब्रह्म श्रीसमर्थ यांचे आधारें श्रीसमर्थभक्तांनीं निर्गुणपदाची प्राप्ति करून घेतली, यांत कांहीं संशय नाहीं.

एकंदरींत श्रीसमर्थांनीं त्या वेळीं महाराष्ट्राच्या उद्धाराची ईश्वरी संकेता-प्रमाणें जबाबदारी शिरावर घेऊन, महाराष्ट्राचा उद्धार केला व खऱ्या भक्ति-मार्गाचा जनतेंत प्रसार करून, अनेक मुमुक्षु जीवांना आपल्या सान्निध्याचा लाभ दिला, व अशा रीतीनें आपल्या यशकीर्तिप्रतापानें भारताला उज्ज्वल करून ते निजधामास गेले.

श्रीसमर्थांची मंगलमूर्ति या संसारात हयात असतांना जो जनतेला लाभ

झाला व होऊं शकला, तो आता स्वप्नांतसुद्धां दुर्लभ आहे, हें सांगावयास नकोच. परंतु आम्हा महाराष्ट्रीयांचे भाग्यानें ज्या काहीं श्रीसमर्थचरणाच्या खुणा आज शिल्लक राहिल्या आहेत, त्या पवित्र स्मरणीय वस्तूंचे बाबतींत आपण सर्वांनीं कृतज्ञताबुद्धि ठेवणें, हें आपलें आद्य कर्तव्य आहे, हें कोणासहि कबूल करावें लागेल. आज आपल्या देशात आपल्या दुर्दैवानें नवीन शिक्षणपद्धतीचा परिणाम नास्तिकतेंत झाला असल्यामुळें आत्मा, परमात्मा, परलोक, सत्कर्म आणि अध्यात्मसाधन या गोष्टींकडे बहुतेकांचें दुर्लक्ष होत चाललें आहे. भौतिकशास्त्राचे वातावरणात आज अनेक व्यक्ति परमेश्वराचें अस्तित्वच मानावयास तयार नाहींत. परंतु आम्ही या नास्तिक लोकाना असें विचारतों कीं, आपलें या संसारात येणें व जाणें या गोष्टी आपल्या स्वाधीनच्या आहेत काय ? जर ह्या स्वाधीनच्या असत्या तर भंग्याच्या घरीं जन्म घेणें कोण पसंत करील ? कोणीहि नाहीं. तसेंच या संसारात येण्यासाठीं कधीं कोणीं प्रयत्न केला होता काय ? आमच्या मतें जर एखादा बुद्धिवान् मनुष्य या बाबतींत सूक्ष्म दृष्टीनें विचार करील, तर त्याला समजून येईल कीं, कोणती तरी अंतरिक्षशक्ति अवश्य जीवाच्या जन्ममरणाची व्यवस्था करीत असली पाहिजेः म्हणूनच आपल्या जन्माबरोबर आपल्या स्वागतासाठीं आई, बाप वगैरे आप्तमंडळी मोठ्या आनंदानें उत्सुक झालेली दिसतात व सर्व प्रकारें आपणास सुख पोंहचविण्यासाठीं तत्पर असतात. इतकेंच नाहीं तर आपल्यासंबंधीं त्याना अनन्य प्रेम उत्पन्न होऊन आपल्या आईच्या रक्ताचें तर दुधात परिवर्तन होतें. या सर्व गोष्टी आकस्मिक रीतीनें घडून येतात काय ? कधींच नाहीं आपलें संसारात जन्म घेणें व आपलें पालनपोषण योग्य प्रकारानें होणें, हें जर कोणत्या तरी तिरोहित शक्तिद्वारा अवश्य होत आहे असें विचारांतीं ठरतें, तर मग आपल्या जन्मांतराकरिता सुद्धा या तिरोहित शक्तीनें काहीं प्रबंध केला नसेल काय ? अवश्य केला असला पाहिजे. विश्वातील चंद्र, सूर्य, पृथ्वी आपापलीं कामें नियमितपणानें करीत असताना आपणास दिसतात, तसेंच संसारांतील सगळीं कामें नियमित रीतीनें अखंड चालू आहेत हेंहि आपण पहातों. जर ही नियमबद्धता नसती, तर या गोष्टी अशक्य होत्या. म्हणूनच पेरूला आंबे लागत नाहींत, पेरूच लागतात. यावरून कोणती तरी तिरोहित शक्ति, नियामक शक्ति, विश्वाच्या मुळाशीं आहे हें आपणास मानणें ओघानेंच येतें.

ज्या ज्या वेळीं नास्तिकतेचें वारें भारतांत सुटलें त्या त्या वेळीं याच परमशक्तीनें नास्तिकतेचा नाश करण्यासाठीं व जनतेला अध्यात्मप्रकाश देण्यासाठीं भारतात अनेक साधुसंत, ऋषिमुनि पाठविले व त्यांच्याकडून आध्यात्मिक मार्गाचें प्रदर्शन करवून जीवांना अध्यात्मशक्तीचा साक्षात्कार करविला; व त्यामुळें भारतीयांच्या हृदयातून नास्तिकता नाहींशी झाली. आपले श्रीसमर्थ हे सुद्धा याच परमशक्तीनें महाराष्ट्राचे उद्धाराकरितां पाठविलेले महान् पथदर्शक होते. त्यांनीं महाराष्ट्राला अध्यात्माचे पाठ दिले, महाराष्ट्रीयांत नवी प्रज्ञा जागविली व त्यांना स्वतंत्र केलें.

श्रीसमर्थांच्या अध्यात्मावर अनेक कविता प्रसिद्ध आहेत. श्रीमत् दासबोध हा भक्तिमार्गाचा निदानग्रंथ त्यांनीं लिहिला आहे. आम्हाला वाटतें, हा ग्रंथ इतका लोकप्रिय व्हावा कीं, महाराष्ट्रात एकहि घर असें असूं नये कीं, ज्या घरात हा ग्रंथ नाहीं.

श्रीसमर्थांचे संप्रदायाला स्वरूपसंप्रदाय हें नाव आहे. हल्लीं हा संप्रदाय रामदासी संप्रदाय या नावानें प्रसिद्ध आहे. श्रीसमर्थांचे उपदेशाप्रमाणें अध्यात्मसाधनाची अभिरुचि जर या संप्रदायाला लागेल तर आजहि या संप्रदायाचा जीर्णोद्धार होईल, कारण अध्यात्म हाच तर संप्रदायाचा प्राण आहे. परंतु असें होण्याला या संप्रदायाला एक सूक्ष्म अडचण पडली आहे कीं, अध्यात्माचें ज्ञान गुरुकृपेशिवाय होऊं शकत नाहीं, व पुस्तकी ज्ञानानें हा कार्यभाग होण्यासारखा नसतो; व हीच ती सूक्ष्म अडचण होय. हें आम्हीच म्हणतों असें नाहीं; तर श्रीसमर्थ, उपनिषदें, गीता आपल्याला या बाबतींत हेंच सांगतात कीं,

प्रभूच्याच प्रसादानें ज्ञान हे साध्य होतसे ।
न विद्येनं न वेदान्तें दानानें न तपोबळें ॥
आत्मज्ञान न हे साध्य सत्संगाविण तें कधीं ।
म्हणूनि सद्गुरू जोडा नसे अन्यत्र साधन ॥
जयास पाहणें आहे प्रत्ययें देव कोण तो ।
सत्संग धरावा त्यानें सोडुनी देहबुद्धीला ॥
सत्संगेंविण जोडेल राम तो अघटीत हे ।
अभिप्राय समर्थांचा दासबोधांत सांजळ ॥

असें असल्यामुळें महाराष्ट्रानें एखाद्या प्राप्त पुरुषाची कांस धरून श्रीसमर्थांचे उपदेशाप्रमाणें अध्यात्मसाधन करावें, व इहपरलोकीं सुखी व्हावें.

श्रीसमर्थांचे उपदेशाप्रमाणें वागण्याची सर्वांना प्रभु सद्बुद्धि देवो, अशी प्रभूच्या चरणीं प्रार्थना करून हा लेख संपवितों.

श्री रघुवीर समर्थ

# श्रीसमर्थांचा आत्माराम ग्रंथ

( लेखक — श्री. सदाशिव नारायण करंदीकर, वकील, चाळीसगाव )

ऐसा सर्वात्मा श्रीराम । सगुण निर्गुण पूर्णकाम ।
उपमा चि नाहीं निरुपम । रूप जयाचें ॥ आत्माराम १-१५

## उपन्यास

श्रीरामदासस्वामींचा "आत्माराम" नांवाचा एक अनुपम ग्रंथ आहे, सदर ग्रंथ केवळ सूत्ररूप आहे. त्यांतील विषय वेदांताचा आहे. त्यावर जितकें लिहावें तितकें थोडेंच आहे वेदांतामध्यें सृष्टीचे पूर्वी काय होतें, हल्लीं दृग्गोचर होणारी सृष्टि काय स्वरूपाची आहे, दोहोंचा काय संबंध आहे, या दोहोंपैकीं सत्य काय आहे, इत्यादि विषयाचा सांगोपांग विचार केलेला असतो हे विषय "आत्मारामा"मध्यें अत्यंत तात्पर्यरूपानें आलेले आहेत. त्यासंबंधानें मीं लिहावें असा माझा वास्तविक अधिकार नाहीं, परंतु "दासा"वर असलेलें प्रेम मजला हें काम करण्यास लावीत आहे "दासा"ची ही केवळ वेडी वाकडी सेवा म्हणून मी या कठीण मार्गास लागलों आहे.

## बहिरंग

श्री "दासां"चे कवितासमुद्रामध्यें काहीं लघुवेदांतप्रकरणें आहेत, त्यांत "आत्माराम" हें एक अत्यंत महत्त्वाचें प्रकरण आहे. त्याचे पांच समास आहेत, व ओव्या १८३ आहेत. श्री "दासां"चा जो ग्रंथराज "दासबोध" ग्रंथ आहे,

त्यांतील वेदांतभाग " आत्मारामा "मध्यें एके ठिकाणीं संक्षेपरूपानें फार सुंदर रीतीनें वर्णिला आहे; व अधिकारी शिष्यास जीवन्मुक्तिदशेस पोहोंचविणारा मार्ग दाखविला आहे.

" दासबोध " हा " दासा "नीं शके १५६६ चे सुमारापासून शके १५८१ पर्यंत लिहिला; त्यानंतर " आत्माराम " ग्रंथ लिहिला. नक्की कोणत्या शकांत व कोणते प्रसंगीं तो लिहिला हें मला सांगता येत नाहीं; परंतु दासबोधानंतर हा लिहिला गेला, ही गोष्ट खालील ओव्यावरून सिद्ध होत आहे.

तूं आशंका नाहीं घेतली । परि चिंता मज लागली ।
जे तुझी भ्रांति फिटली । नाहीं अद्यापि ॥ आत्माराम १-१९
दासबोधांचे समासीं । निर्मूळ केलें मीपणासी ।
त्या निरूपणीं वृत्तीसी । पालट दिसेना ॥ २०
म्हणोनि न पुसतां सांगणें । घडलें शिष्या तुजकारणें ।
आतां तरी सोय धरणें । श्रवण मननीं ॥ २१

" आत्माराम " हा ग्रंथ परम दयाळु दासांनीं अधिकारी शिष्याचें पूर्ण कल्याण करण्याकरितां लिहिला, व त्यांतील उपदेशाचा तात्पर्यार्थ ग्रहणपूर्वक श्रवण करणेबद्दल व श्रवण केलेले उपदेशाचें मनन करणेबद्दल आग्रहपूर्वक सांगितलें आहे.

" आत्माराम " ग्रंथ अनुबंधचतुष्टययुक्त आहे. त्याचा अर्थ योग्य रीतीनें कळला असता, श्रेष्ठ पुरुषार्थसिद्धि होण्यासारखी आहे. म्हणून त्याचें श्रवण, मनन व निदिध्यासन करणें मुमुक्षूस अवश्य आहे. " आत्माराम " हा ग्रंथ विशिष्ट फल, विषय, संबंध व अधिकारी यांनीं युक्त आहे. याचें मोक्ष हें विशिष्ट फल आहे. परमार्थतत्त्व हा विशिष्ट विषय आहे. या ग्रंथाचा त्याचे द्वारें मोक्षफलाशीं साधन-साध्यभाव हा विशिष्ट संबंध आहे. तीव्र वैराग्यशाली मुमुक्षु हा विशिष्ट अधिकारी आहे. असा हा " आत्माराम " ग्रंथ वेदांतशास्त्रावरील अत्यंत श्रेष्ठ असा प्रबंध आहे.

या ग्रंथाची मराठी भाषा अत्यंत शुद्ध, हृदयस्पर्शी व परिणामकारक आहे. सोळाव्या शतकांत गद्य लिहिण्याची फार चाल नव्हती. धार्मिक ग्रंथ बहुधा पद्यांत लिहिलेले आहेत. त्याचा छंद विशेषतः ओवी किंवा अभंग किंवा अनुष्टुप् हा असे.

हे छंद जरी पद्यापैकीं आहेत तरी ते गद्याचे जवळ आहेत. गद्यात विचार प्रकट करण्यास पुष्कळ मोकळेपणा असतो. तसा या हिन्दी छंदांत सुद्धा नसतो. हल्लीं गद्यांत मोठमोठीं मिश्र वाक्यें असतात. ओवीमध्यें चार पाद असतात. पहिले तीन पादास प्रास असतो. त्यामुळें वाक्यरचना सरळ नसते. एका ओवींत अगदीं लहान लहान दोन दोन, तीन तीन वाक्यें असतात. कधीं कधीं निरुपायानें दोन तीन ओव्यांमध्यें अन्वय असतो. त्या वेळीं बरीच दुर्बोधता येते. "आत्माराम" ग्रंथ हा ओवीबद्ध आहे. काहीं ठिकाणें सोडल्यास समजण्यास फार चांगला आहे. हल्लींहून त्या वेळेस शब्दांचीं काहीं रूपें वेगळीं असत. परंतु तीं समजण्यास जड जात नाहींत. "ज्यास" बद्दल "जयासि", "तयास" बद्दल "तेशीयास", "भावानें" बद्दल "भावबळें" अशीं रूपें येतात. वाक्यांत "कीं" बद्दल "जें" येतें. जसें :

तूं आशंका नाहीं घेतली। परि चिंता मज लागली।
जें तुझी भ्रांती फिटली। नाहीं अद्यापि ॥ १९

या ओवींत "जें" हा शब्द "कीं" बद्दल आहे. "जें" हा शब्द संस्कृत "यत्" बद्दल आलेला आहे. "यत्" चें "जत्" व "जत्"चें "जें" झालें आहे. असा "यत्"चा उपयोग पचतंत्रात केलेला आढळतो. याप्रमाणें या ग्रंथाचे भाषेंत शब्द व प्रयोग यांत आणाखीहि फरक दाखविता येतील. परंतु एकंदरीनें भाषा जोरदार, फळकळीची व व्यवस्थित आहे, आणि विषयप्रतिपादन सरळ व सोप्या रीतीनें केलें आहे.

## अंतरंग

विचारी माणसाचे मनात कधीं कधीं गहन विचार येत असतात. प्रत्येक मनुष्य आपले स्वतःस सृष्टीचें केंद्र समजून विचार करीत असतो. मी व हें सर्व दृश्य, असे दोन भाग त्याचे अन्तश्चक्षूसमोर येतात. मी भोक्ता व सर्व दृश्य सृष्टि ही माझी भोग्य आहे असें तो समजतो. अत्यन्त दुबळा जरी असला तरी त्याचे विचाराचें वळण असेंच असतें. तोच मनुष्य जास्त विचारी असल्यास त्याचे मनात पुढें लिहिल्याप्रमाणें किंवा तत्सदृश विचार येतात : मी कोण आहे, म्हणजे माझें स्वरूप काय आहे, देहच मी आहे किंवा या देहाचा चालक आहे, मी व हें सर्व दृश्य कसें उत्पन्न झालें, त्याचा कर्ता कोण आहे, आणि त्या कर्त्यानें हें सर्व कोणत्या पदार्थाचें व का बनविलें आहे, या जगास व मजला प्रारंभ कधीं

झाला, जगत् व मी नेहमी टिकणारीं आहों किंवा त्यांचा पूर्ण नाश होणार आहे, पूर्ण नाश होणार असल्यास कधीं व कसा, इत्यादि विचार उत्पन्न होतात. असे विचार कित्येकांचे मनांत येतात व जातात. परंतु कांहीं मोठे महात्मे या विचाराची तड लावण्याचा प्रयत्न करतात. मनुष्य केवढाहि बुद्धिवान् असला व त्याला दीर्घायुष्य जरी लाभलें, तरी प्रत्यक्ष प्रमाणांनीं असे प्रश्न सुटणें शक्य नाहीं. त्याला इतर प्रमाणें साहाय्यास घेणें जरूर आहे. अनुमान व आप्तवाक्य हीं अशा विचारास येणें फार अवश्य आहे. या प्रश्नाचा विचार व त्याचा निर्णय करुणासागर ईश्वरानें आपलीं जीं उच्छ्वसितें म्हणजे वेद त्यांचे मुखानें केला आहे. तसा निर्णय दुसरे कोठेंहि सापडणार नाहीं.

वेदांचे कर्मकांड, उपासनाकांड व ज्ञानकांड असे जरी भेद असले तरी त्या त्रिकांडात्मक वेदांचें ब्रह्मस्वरूप विशद करण्यात व मुक्तींत तात्पर्य आहे. वेदामध्यें मंत्र, ब्राह्मण व आरण्यक असे तीन भाग आहेत. त्यांत उपनिषदामध्यें वरील प्रश्नांचा म्हणजे अर्थात् ब्रह्मासंबंधीं ज्ञानाचा ऊहापोह करून ब्रह्मसिद्धांत काढला आहे. उपनिषदें बहुतकरून आरण्यकांत आहेत, परंतु कांहीं मंत्र व ब्राह्मण या भागांत आहेत. उपनिषद् हें नांव जरी ग्रंथास लावतात, तरी त्या शब्दाचा अर्थ ब्रह्मविद्या असा आहे. सर्व अडचणींचें शैथिल्य किंवा नाश करून ती विद्या ब्रह्माजवळ मुमुक्षूस पोंचविते व त्याला ब्रह्मरूप करते, असा त्या शब्दाचा अर्थ आहे.

उपनिषदामध्यें जो वेदांतसिद्धांत प्रतिपादिला आहे, त्याचे चार पंथ झाले आहेत. अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत व शुद्ध द्वैत असे ते पंथ आहेत. यापैकीं अद्वैतसिद्धांतानुयायी फार आहेत. श्रीमदाद्य शंकराचार्य हे अद्वैतमतानुयायी होते, हें सर्वविश्रुत आहे. त्यावरील त्यांची ग्रंथसंपत्तिहि अद्वितीय व विशाल आहे. उपनिषदें संस्कृत भाषेंत असल्यामुळें, कालांतरानें बरेच लोकांस दुर्बोध झालीं. पुढें त्यावर टीका व भाष्यें झालीं, तींहि संस्कृतामध्यें, तींहि कालांतरानें सर्वसाधारण जनतेच्या आटोक्याबाहेर गेलीं. तेव्हां, परमकारुणिक अशा साधुजनांनीं लोककल्याणाकरितां त्यांतील तत्वें लोकांचे रोजचे भाषांत विशद केलीं. आपल्या मराठी भाषेंत असे ग्रंथ मुकुंदरायापासून आढळतात. त्याचेनंतर ज्ञानराज, एकनाथ, तुकाराम, श्रीसमर्थ रामदासस्वामी इत्यादि संतमहंतांनीं मराठी भाषेंत वेदांतावर केवळ ग्रंथभांडार लिहून तें सुलभपणें सर्वांना सुभा ठेविली

आहे. दासांनीं नुसत्या मुमुक्षुजनाकरितां ग्रंथ लिहिले नाहींत, तर त्यांनीं विश्वाची चिंता केली. त्यांचा अवतार त्याकरिताच होता आपल्या मातोश्रींसहि त्यांनीं तेंच सांगितलें. " चिंता करितों विश्वाची " हे त्यांचे शब्द आहेत. दासांनीं आपलें आयुष्य हिंदु जनता — जी दु:खसागरांत निमग्न झाली होती तिला — तारण्याकरितां कष्टांत घालविलें. दासांचे आयुष्याचें रहस्य म्हणजे कष्ट, सावधानता व प्रयत्न यांत आहे. लग्नप्रसंगीं सावध होऊन बारा वर्षे गायत्रीपुरश्चरण व रामनामाचा जप, नंतर बारा वर्षे तीर्थयात्रा, याप्रमाणें चवथ्या छत्तीस वर्षे कष्ट करून ईश्वरी अधिष्ठान प्राप्त करून घेऊन, बाकीचा राहिलेला आयुष्याचा काळ ज्या महात्म्यानें रंजल्या गांजलेल्या हिंदु जनतेच्या उद्धारार्थ खर्च केला, त्या दासाचें वर्णन मीं पामरानें काय करावें ? त्यांचे चरणास शतशः प्रणाम असोत !

महाराष्ट्रामध्यें अद्वैतसिद्धांत मुख्यत्वेंकरून प्रचलित आहे. ज्ञानराजादि साधुवर्य अद्वैतमतानुयायी आहेत, त्यांचेपैकीं दास हे आहेत. दासाचा श्रेष्ठ ग्रंथ म्हणजे " दासबोध ". त्यामध्यें सर्व प्रकारचे लोकांस मार्ग दाखविला आहे. गरीब-श्रीमंत, लहान-थोर, बद्ध-मुमुक्षु, साधक-सिद्ध वगैरे सर्वांचे मार्गांचा विचार करून त्या त्या लोकांना त्यांचे त्यांचे अधिकारपरत्वें उपदेश केला आहे. असा सर्वांगसुंदर ग्रंथ त्याच्यासारखा तोच आहे. त्याला वेदमाऊलीवाचून दुसरी उपमा शोभत नाहीं इतर विषयाप्रमाणें वेदांताचीहि दासबोधांत मीमांसा केलेली आहे. तीच मीमांसा वर सांगितलेप्रमाणें एकलित रूपानें " आत्माराम " ग्रंथांत आली आहे. " आत्माराम " ग्रंथांत अद्वैतसिद्धांत प्रतिपादिला आहे

अद्वैतसिद्धांताचें स्वरूप थोडक्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें आहे . या जगांत अणूप्रमाणें अत्यन्त सूक्ष्म व सूर्यमालिकेप्रमाणें अत्यंत प्रचंड असे पदार्थ दिसतात. त्यांच काहीं नेत्राला दिसणारीं तर नेत्राला न दिसणारीं परंतु अनुमानगम्य अशीं अनेक रूपें आहेत. या विश्वाचा आरंभ कोठें, शेवट कोठें व अर्थात् मध्य कोठें हें समजत नाहीं. अशी ही सृष्टि प्रवाहरूपानें जरी सतत चालणारी असली तरी तिजमध्यें अनेक रूपांचे, अनेक नावांचे व अनेक गुणांचे अनेक अगणित पदार्थ आहेत त्यांत काहीं क्षणभंगुर तर काहीं हजारों, लाखों वर्षे भंगुर असे पदार्थ आहेत अर्थात् ते सर्व विनाशी आहेत, म्हणजे असत् आहेत या जगांत सत् वस्तु एकच आहे, बाकी सर्व असत् आहे असत् वस्तूला भाव म्हणजे अस्तित्व नसतें, व सत् वस्तूचा अभाव नसतो. सत् तेंच सत्य व असत् तेंच

असत्य. सत्य म्हणजे ज्या रूपानें जें निश्चित केलेलें असतें तें रूप व्यभिचार पावणारें नसलें म्हणजे त्याला सत्य म्हणतात. असत्य म्हणजे ज्या रूपानें जें निश्चित केलेलें असतें तें रूप व्यभिचार पावणारें असल्यास त्याला असत्य असें म्हणतात. जगतात जी नाना रूपाची सृष्टि आपण पहातों तिचीं रूपें व्यभिचार पावणारी म्हणजे घटकोघटकीं फिरणारीं असतात. म्हणून हें दृश्य जगत् असत् आहे, म्हणजे असत्य आहे, म्हणजे खोटें आहे, आणि हें असत्य जगत् ज्या वस्तूवर भासतें त्या वस्तूचें रूप पालटत नसल्यानें ती सत् म्हणजे खरी वस्तु आहे. त्या वस्तूला ब्रह्म ही संज्ञा आहे. या सृष्टींत असणारा जो जीव तो ब्रह्मच आहे, दुसरें काहीं नाहीं. अज्ञानामुळें जीवास ही सृष्टि निराळी विवर्तरूपानें भासते. ज्ञान झालें असता सर्व सृष्टिच ब्रह्मरूप भासू लागते. सर्व भेद नष्ट होऊन मुमुक्षु स्वतः च ब्रह्मरूप होऊन जातो.

"सत्य ज्ञानमनंत ब्रह्म" अशी ब्रह्माची व्याख्या लक्षणेनें केली आहे. सर्व जगत् असत्य, जड व सांत आहे, आणि ह्या गोष्टी ब्रह्मांत नाहींत अशा रीतीनें ब्रह्मविषयीं लक्षणेनें ज्ञान करून घ्यावयाचें असतें. आपणास ज्याप्रमाणें जगातील वस्तूचें ज्ञान होतें, तसें ब्रह्माचें ज्ञान होत नाहीं सूर्य हा एक निराळा तेजोगोल आपण पहातों, त्याचें ज्ञान जसें आपणास ज्ञाता, ज्ञेय व जाणणेची क्रिया अशा त्रिपुटीचे मार्गानें होतें, तसें ब्रह्माचें ज्ञान होत नाहीं. तसें होतें असें म्हटल्यास द्वैत सिद्ध होईल. ब्रह्म वाणी व मन याना अगोचर आहे. मन म्हणजे वृत्ति होय, ही केवळ साकार व सगुण वस्तूची होते, मग वाणी तेथें प्रवृत्त होऊन त्याचे रूपगुणाचें वर्णन करते. ब्रह्म तर निर्गुण-निराकार पडलें. असें आहे तर ब्रह्म समजावयाचेंच नाहीं असें म्हणावें लागेल. पण तसें नाहीं. ब्रह्म हें सृष्ट वस्तूप्रमाणें प्रत्यक्ष जरी ज्ञात होत नाहीं, तरी तें अज्ञातहि नाहीं असें तें आहे. आपणा स्वतःस आपण एखादे सृष्ट पदार्थाप्रमाणें किंवा आपले देहाप्रमाणें पहात नाहीं, परंतु आपण आपणास जाणत नाहीं असें नाहीं, तर जाणतोंच. हा अनुभव प्रत्येक मानवप्राण्यास आहे. ब्रह्म जर निर्गुण निर्विकार आहे, व तें काहीं करीत नाहीं व तें एकच एक आहे, तर विवर्तरूपानें तरी ही सृष्टि कशी व कोणास भासते, हा प्रश्न उत्पन्न होतो. ब्रह्मास भ्रांति होते म्हणावें तर ब्रह्म ब्रह्मपणापासून च्युत होईल. मग काय राहिलें ! याचा उलगडा असा आहे: ब्रह्माची एक शक्ति आहे. तिलाच माया किंवा प्रकृति म्हणतात. ती ही सृष्टि

उत्पन्न करते असें म्हटलें, तर पुन द्वैत उत्पन्न होईल. यावर उत्तर असें : ही शक्ति ब्रह्माहून वेगळी नाहीं. ती कार्यावरून अनुमानली जाते. जशी मनुष्याची शक्ति मनुष्यापासून वेगळी दाखविता येत नाहीं, परतु ती परिणामावरून कळते, तसें हें आहे. ब्रह्माची शक्ति ब्रह्मानुकूल असते, म्हणून द्वैत सिद्ध होत नाहीं, प्रतिकूल असेल तर द्वैत होईल. ही शक्ति किंवा माया ब्रह्माहून स्वतत्र न रहाता, तें अध्यक्ष असता, ती या सृष्टीस उत्पन्न करते. त्या सृष्टींतील ईश्वराश जो जीव, त्याला ती सृष्टि भ्रांतपणानें भासते. परतु त्या योगानें जीवाचे ईश्वराश त्यास किंवा त्याचे मूळचे निर्गुण निराकारत्वाला बाध येत नाहीं नाटकात पुरुषानें स्त्रीवेष घेऊन एका राणीची अवस्था परतु सत्याप्रमाणें स्त्रीत्वसृष्टि उत्पन्न केली तरी ती भूमिका घेणारा पुरुष जसा निर्विकार रहातो, पुरुषत्वापासून चळत नाहीं, व स्त्रीत्वाचा गधमानहि त्यात येत नाहीं, स्त्रीत्व केवळ भासमात्र असतें, त्या प्रमाणें ह्या सृष्टीचें आहे. तात्पर्य काय कीं, ब्रह्म सत्य आहे व जीव हा ब्रह्मच आहे, दुसरें काहीं नाहीं. जगत् मिथ्या आहे.

श्रीमद्भगवद्गीतेप्रमाणें " आत्माराम " हा उपनिषद्रूप गोमातांचें दुग्धामृत आहे. उपनिषदामध्यें ब्रह्मरूप, सृष्टयुत्पत्ति, जीवरूप, उपासना वगैरे याचें उद्घाटन असतें. त्याचप्रमाणें " आत्माराम "मध्यें संक्षिप्त व सुटसुटीतपणानें तें आहे. आधुनिक काळातील दासबोध हा जर मराठी वेद मानला तर " आत्माराम " हा मराठी उपनिषद् आहे त्यात उपनिषदाचें सारें सार आलेलें आहे. त्यांतील प्रत्येक तत्त्व उपनिषदाला धरून आहे, असें आपणास दिसून येईल. त्याबद्दल एक निर्देश करतों. —

जे शब्दासि आकळेना। शब्देंवीण तें कळेना।
कळेना ऐसें ही घडेना। जये स्वरूपीं॥ आत्माराम १ ४

इतर सृष्ट पदार्थांप्रमाणें जें ब्रह्म ( शब्दद्वारें ) इंद्रियगोचर होत नाहीं, तें शब्दावाचून कळण्यास दुसरा मार्ग नाहीं, आणि त्याचे स्वरूपासबधानें ज्ञान होत नाहीं असेंहि नाहीं, असें तें ब्रह्म आहे

नाहमन्ये सुवेदेति नोनवेदेति वेद च ॥
योनस्तद्वेदनोनवेदेति वेद च ॥
(केनोपनिषद् खड २, मत्र २)

( नतर निबधकारानीं ग्रथांतील पाचहि समासाचें थोडक्यात सार देऊन

## ( २० )

# श्रीसमर्थ व मुकुंदराज

( लेखक — प्रो दत्तो वामन पोतदार, बी ए, पुणें )

प्रस्तुतच्या वाचणात एक ल्हानसा मुद्दा चर्चेसाठीं पुढें ठेवावयाचा आहे.

श्रीसमर्थांची प्रतिभा स्वयस्फूर्त होती आणि मुकुदराज हे मराठींतील प्रथम युगांतील एक प्राचीन कवि होऊन गेले या दोन्ही गोष्टी सर्वमान्य आहेत अर्थात् या दोघां सत्पुरुषांच्या काळांत कित्येक शतकाचें अतर सहजच पडत असल्यानें त्याचा साक्षात् काहीं सबध समवत नाहीं साक्षात् राहोच, परतु परपरया देखील काहीं सबध असल्याबद्दल प्रसिद्धि नाहीं

महाराष्ट्रातले सर्व सतकवि भक्तिपोषक अद्वैतवेदातांचें प्रतिपादन करतात असें जर स्थूलमानानें त्याचें मुख्य लक्षण केलें तर समर्थ व मुकुदराज हे दोघेहि त्या एकाच वर्गांत मोडतील दोघाच्याहि ग्रथांत अद्वैताचें खुलें व अनुभवी प्रतिपादन आहे.

मुकुदराज व समर्थ याची वर्णनाची व प्रतिपादनाची हातोटीहि स्वतत्रच आहे दोघाचीहि प्रतिभा स्वतत्र आहे

प्रतिभेचें स्वातत्र्य सर्वथा मान्य केलें तरी नम्रतेचे पुतळे असे जे सत ते होऊन गेलेल्या अनुभवी सत्पुरुषाच्या शब्दाचा लाभ करून घेण्यास आळस करीत नाहींत

' काहीं पाठ केलीं सताचीं उत्तरें ' असें तुकोबा सागतात, तर ' भाष्य-कारांतें वाट पुसुत । '' व इतराचा ' मागोवा ' घेत ज्ञानेश्वर चालतात पण

यामुळें कोणी कोणाची उसनवारी करितो असें मात्र आपणांस म्हणतां याव-याचें नाहीं.

पूर्वसूरींचे ग्रंथ पाहण्याचा अधिकार सर्वांचाच आहे. आणि आवडीप्रमाणें व प्रसंगाप्रमाणें तो पुष्कळांनीं बजाविलाहि आहे. कित्येक वेळा गुरुशिष्यादि परंपराप्रसंगामुळें तर विचार व भाषा यांची मोकळी देवाण घेवाण चाललेली आढळून येते.

विचार व भाषा यांची ही देवाण किंवा घेवाण जर आपणांस कळून आली तर इतर पुरावा हातीं नसतांनाहि उभय लेखकांचा संबंध आपणास अनुमानिता येतो. इतर पुराव्यानें त्याची सिद्धता झाल्यास आपलें अनुमान सत्य-कोटीप्रत सहजच पोंचतें.

श्रीसमर्थांनीं भरतखंडपर्यटण केलें होतें व श्रवणमनननिदिध्यासांत पुष्कळच काळ व्यतीत केला होता. अनेक ग्रंथ त्यांनीं पाहिले होते व ' समतींस ' बोलाविले होते. हें त्यांनींच आपणास सांगून ठेविलें आहे.

या संमतिग्रंथांत प्राकृत ग्रंथाचा निर्देश नाहीं ! पण एवढ्यानें असें ठरत नाहीं कीं, प्राकृत ग्रंथाची संमति समर्थांनीं घेतली नव्हती ' संस्कृत थोर ' म्हणून त्याचा उल्लेख त्यांनीं केला इतकेंच

समर्थांनीं कोणकोणते प्राकृत कवींचे ग्रंथ बारकाईनें अभ्यासले होते हें पाहणें बोधप्रद होईल.

श्रीसमर्थांच्या लिहिण्यावर नाथभागवताची छाया पडल्याचें कोठें कोठें दाखवून देता येईल व माझे मित्र रा. न. र. फाटक यांनीं 'विविधज्ञानविस्तारांत' तसा प्रयत्न केलाहि होता नाथांचें निर्याण व समर्थांचें अवतरण यांत जो संबंध परंपरया मानण्यांत येतो त्यावरून श्रीसमर्थांच्याच जन्मभूमीजवळचे परम श्रेष्ठ संत नाथ यांच्या चरित्रकथालेखनादिकांचा संस्कार बाल्यपणापासून समर्थांच्या मनावर घडत गेला असणें अगदीं सरळ आहे

परंतु मुकुंदराज व समर्थ यांचाहि असा थोडा संबंध विचारभाषादि-दृष्ट्या अनुमानिता येतो अशी आशंका माझ्या मनांत दासबोध व विवेकसिंधु हे जवळ जवळ ठेवून वाचल्यामुळें आली ती येथें जरा भीतभीतच मांडतों. ही एक आशंका आहे पटली तर सिद्धांत होईल आग्रह नाहीं.

( १ ) समर्थांच्या दासबोधांत जे कांहीं विशेष समजले जातात त्यांत

दासबोधांत अवलंबिलेली संवादपद्धति — गुरुशिष्यांचा संवाद — हा एक मोठा व प्रमुख विशेष मानला जातो. अनेक ग्रंथांत गुरुशिष्यसंवाद आढळतात, पण समर्थांनीं जसें या पद्धतीला उचलून धरिलें आहे तसा इतरांचा तो विशेष धाटत नाहीं. गुरूच्या सांगण्यावरून ज्ञानेश्वरादिकांनीं व्याख्यानें केलीं आहेत. म्हणजे ज्ञानेश्वरादींच्या पद्धतीस व्याख्यान म्हणणें युक्त होईल. परंतु दासबोधाची पद्धति संवाद या स्वतंत्र नामाभिधानाला विशेष पात्र आहे. अलीकडे जी प्रत्यक्ष पद्धति किंवा Direct Method अध्यापनांत पुढें आली आहे तशी कांहींशी समर्थांची पद्धति आहे.

दासबोधाप्रमाणेंच विवेकसिंधूंतहि मुनि मुकुंदराज यांनीं

गुरुशिष्यांचेनि संवादें । जें बोलिजेल विनोदें ।
तें आईक आनंदें । महानुभाव ॥ १-२२

अशी मांडणी केली आहे.

संवादपद्धतीचें माहात्म्य मुकुंदमुनींनीं यथार्थ गाईलें आहे.

*आइकें शिष्याचे आक्षेप । सिद्ध चि गुरुवाक्यदीप ।*

असा संवादपद्धतींतला थाट असतो.

विवेकसिंधूच्या प्रत्येक प्रकरणाच्या अखेरीस “ इति श्रीमद्विवेकसिंधौ गुरुशिष्यसंवादे० ” अशा प्रकारची समाप्ति आढळते. ‘ कृष्णार्जुनसंवादे ’ पासून चालत आलेली ही प्रभावी संवादपद्धति मुकुंदमुनींनींहि अनुसरिली यांत त्यांचें चातुर्य दिसून येतें व श्रीसमर्थांनींहि तिचाच पुरस्कार करून तिची श्रेष्ठता अनुभवास आणून दिली.

( २ ) क्वचित् भाषासाम्यहि मुकुंदराज व समर्थ यांच्या रचनेंत दिसून येतें.

याचि देहीं याचि वेळे । होईजे संसारीं निराळे ।

अशा आशयाचें समर्थांचें वचन प्रसिद्ध आहे. मुकुंदराजहि हुबेहूब तसेंच म्हणाले होते —

याच देहीं आपले डोळां । जंव न भोगिजे मुक्तीचा सोहोळा ।
तरी वैराग्याचा तातवेळा । कां दिणावें ॥ २८-१

दासबोधांतहि प्रारंभींच्या विवेचनांत गुरुशिष्यलक्षणें दिलीं आहेत, तशींच विवेकसिंधूच्या पहिल्याच प्रकरणांत थोडक्यांत दिलीं आहेत. या ओव्या

वाचतांना दासबोधाची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं.

प्रगटावया आपुली महंती । सभेमाजीं गुरुतें आक्षेपिती ।
युक्ती खुंटलिया चळासि येती । ते ही शिष्य त्यजावे ॥ १-५६

ही ओवी समर्थांच्या एकवीससमासींत सहज खपून जाईल !

महंती-महंत हे रामदासी वाङ्मयाचे परवलीचे—खुणेचे—शब्द होत. ते येथें मुकुंदमुनींनीं समर्थांच्या पूर्वी कैक वर्षे वापरले आहेत.

इहीं लक्षणीं अलंकृत । जे देखिजेती महंत ।
ते चि सद्गुरु जाणावे निश्चित । ईश्वरी अवतार ॥ १-५०

प्रकरण पुढें चालवावयाचें असतां रामदास ' कथा ', ' कथानुसंधान ' शब्द वापरतात. तो मुकुंदराजानींहि वापरलेला आहे.

आतां कीजेल अनुसंधान । पुढलिया कथेचें ॥ १-८८

दासबोध ७-१-१९ वर

आतां कथानुसंधान । सावध ऐका ॥

असे शब्द आहेत.

प्रत्ययावर भर हा तर रामदासाचा ठसठशीत बाणा ! तसाच नमुना—तितका प्रखर नसला तरी—विवेकसिंधूंत पाहून घ्यावा :

असो हें ब्रह्म अनुभवावें । जयाचें तेणें चि ॥ २-११
अनुभवी तो या खुणे । जाणेल गा ॥ २-६०
हें अनुभवी तो चि जाणे । इतरां टकमक ॥ १३-१२

( परमामृत )

ये ग्रंथीचे हें चि आश्चर्य । जे रोकडें स्वानुभवसौंदर्य ॥ शेवट ३१

मूळमाया, गुणक्षोभिणी, केवळ ब्रह्म वगैरे पंचीकरणपरिभाषा दोहींकडे सारखीच आहे. विस्तारात मात्र भेद बराच आहे.

दृष्टांत तितुका एकदेशी

हें समर्थांचें आवडतें वाक्य. इकडे मुकुंदराज म्हणतात—

येथें कायसे पा दृष्टांत । परी एकदेशी होय उचित ॥ २-२९

धादांत, वेदात व सिद्धांत या रामदासी त्रयींतली वेदांत व सिद्धांत ही दुकल विवेकसिंधूंत एका जागीं आढळली.

मायाब्रह्मीचा विवर्त । ऐसें बोले वेदांतसिद्धांत ॥ २-२४

रामदासाचा एक आवडता सिद्धान्त त्यांनी कूट पद्धतीनें पुढीलप्रमाणें मांडलेला आपणांसमोर आहे तो असा :

> आहे तितुकें नाहीं जालें । नाहीं नाहींपणें निमालें ।
> आहे नाहीं जाऊन उरलें । नसोन कांहीं ॥ ६-१०-३८

मुकुंदराजाची एक अशीच ओवी घेऊं.

> अगा सर्वही आपण व्हावें । अथवा कांहींच न व्हावें ।
> कांहींच न होऊनि असावें । नेणूं काईजे ॥ ५४

असो, वर्ती साम्यस्थळें दृष्टीस दिसलीं त्याचा मनास आनंद वाटला. दोघा सत्पुरुषाच्या प्रतिभास्वादन्यात काहींच उणेपणा आपणास आढळत नाहीं. परंतु पूर्वसूरि जे मुकुंदमुनि त्याचे ग्रंथ रामदासानीं पाहिले – पढले – असावेत एवढें अनुमान केल्यास चूक होणार नाहीं, असें वाटल्यावरून ही आशंका पुढें ठेवली आहे.

पुणें, १८५७ ज्येष्ठ शुद्ध १२

( यानंतर प्रो. पोतदार यानीं खालील टीप दिलेली आहे. )

* रामदासाचा भर बुद्धिवादावर व बुद्धिमंतावर विशेष. "भाविकें मानवीं मोळीं" यावर कमी; नसाच विवेकसिंधूकाराचाहि आशय दिसतो. रसिकमुद्रा व तर्कमुद्रा अशा दोन मुद्रा बोलण्याच्या दोन तऱ्हा म्हणून त्यानीं एके जागीं सांगितल्या आहेत. आणि या दोहोंत तर्कमुद्रेस प्राधान्य दिलें आहे. ते म्हणतात —

> रसिकमुद्रा बोलिजेल । तरी ग्रंथाचा विस्तार पाविजेल ।

म्हणजे रसिकमुद्रेचें बोलणें पारद्यालिक – Popular – सदरात पडतें हें उघड झालें. मुकुंदमुनि पुनः म्हणतात —

> जयासि नाहीं प्रतीति । नेणती तर्कमुद्रेची स्थिती ।
> तयांलागि मराठिया उक्ती । केली ग्रंथरचना ॥ शेवट १३२

आणि अशा या तर्कमुद्रा

> सांप्रदायाचा अभिमानी । स्वयें आपण शूळपाणी ।

असा निर्देश करून मग गुरुपरंपरा दिली आहे. ती नाथसंप्रदायापैकीं आहे. हा सर्व संप्रदायप्रश्न अत्यंत महत्त्वाचा असून स्वतंत्र सविस्तर चर्चेचा अत्यंत योग्य विषय होईल.

( २१ )

## चढता वाढता श्रीदेवाचा उत्सव : चढतें वाढतें राज्य

( लेखक — श्री. भास्कर वामन भट, वकील, धुळें )

रामदासी संप्रदायाच्या इतिहासाचीं जीं साधनें आजपावेतों प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांत प्रामाण्याच्या दृष्टीनें अग्रस्थान श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, भाग नववा, यास दिलें पाहिजे. या नवव्या भागात "श्रीदेवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तैसेंच चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल" हें आशीर्वादरूपी वाक्य बऱ्याच ठिकाणीं आढळतें. या वाक्याचा अर्थ आकलन होण्यास कोणत्याहि प्रकारचें काठिण्य नाहीं. श्रीदेवाचा म्हणजे सातारा जिल्ह्यांतील चाफळ-ग्रामीं श्रीरामदासस्वामींनीं स्थापन केलेल्या श्रीरामाचा अथवा श्रीरघुनाथदेवाचा महोत्सव जसजसा मोठ्या प्रमाणावर केला जाईल, तसतसें छत्रपति शिवाजीचें राज्य वृद्धिंगत होत जाईल, असा या वाक्याचा साधा व सरळ अर्थ आहे. अशा प्रकारचा या वाक्याचा साधा व सरळ अर्थ असला, तरी या वाक्याचे अंतर्गत असें आधुनिक काळांतील सुशिक्षित महाराष्ट्रीयास आकलन होण्यास कठीण असें एक गूढ आहे. हें गूढ म्हणजे चाफळ येथील श्रीरामाच्या उत्सवाचा व छत्रपति शिवाजीमहाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याच्या विस्ताराचा कार्यकारणदृष्ट्या संबंध काय हें होय. श्रीरामाचा उत्सव मोठ्या प्रमाणात केला असतां त्याचें पर्यवसान शिवाजीच्या राज्याचा विस्तार होण्यात व्हावें, ही गोष्ट मनास पटण्यासारखी नाहीं, असें आधुनिक काळांतील सुशिक्षित माणसास आपलें मत प्रकट करण्यास यत्किंचितहि दिक्कत वाटणार नाहीं. अशा स्थितींत या वाक्याच्या

अंतर्गत असलेलें गूढ आधुनिक काळच्या सुशिक्षित तार्किकास कितपत पटण्यासारखें आहे, यासंबधाची चर्चा या निबंधात मी करणार आहे.

या चर्चेस प्रारंभ करण्यापूर्वी प्रास्ताविक स्वरूपाच्या कांहीं गोष्टींचें निवेदन करावें लागेल. समर्थ रामदासस्वामींच्या चरित्रांतील कांहीं ठळक प्रसंगांचें कथन व श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें भाग १ यांत वरील वाक्य निरनिराळ्या स्थळीं ज्या स्वरूपात आढळतें त्याच स्वरूपात त्याचें दिग्दर्शन करावें लागेल. या स्वरूपाचें प्रास्ताविक निवेदन केल्यावर या निबंधाच्या विषयांतर्गत गूढाविषयींची चर्चा आम्हीं केली आहे.

श्रीरामदासस्वामींचें कुलदैवत श्रीरामचंद्र हें असून ते श्रीरामाचे निःसीम भक्त होते. लग्नसमयीं जांब गावाहून समर्थांनीं पलायन केल्यावर ते नाशिकशेजारीं पंचवटीस जाऊन राहिले. त्यानीं तेथें बारा वर्षे खडतर पुरश्चरण करण्यांत घालविलीं. सूर्योदयापासून दुपारीं बारा वाजेपर्यंत गोदावरी नदीचे पात्रांत कमरेइतक्या पाण्यांत उभें राहून जप केल्यावर समर्थ मधुकरी मागत व भोजनोत्तर दुपारचा सर्व काळ पंचवटींतील श्रीरामाचे मंदिरांत पुराणश्रवण करण्यांत घालवीत. वाल्मीकि रामायणावर व तदंतर्गत रामकथेवर समर्थांची फार भक्ति होती, ही गोष्ट समर्थवाग्देवतामंदिरांत प्रतिष्ठित केलेल्या व समर्थांनीं स्वहस्तें लिहिलेल्या रामायणग्रंथावरून सिद्ध होत आहे. समर्थांची वाल्मीकि रामायणावर निस्सीम भक्ति होती व ती कोणत्या कारणामुळें होती, ही गोष्ट रामदासाची कविता भाग १, पान ११ वरील समर्थांच्या स्वतःच्या खालील उद्गारांवरून उत्तम प्रकारें व्यक्त होत आहे.

कथा शंकराची कथा कार्तिकाची । कथा चंडिकेची कथा मोरयाची ।<br>
कथा वेंकटीची कथा वीठलाची । कथा मल्लयाची कथा भैरवाची ॥ ५<br>
कथा नृसीह्मा वामना भार्गवाची । कथा कौरवा पांडवा माधवाची ।<br>
कथा देव इंद्रादि ब्रह्मादिकांची । समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची ॥ ६<br>
जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा । बळें तोडिला बंद त्या त्रीदशांचा ।<br>
म्हणोनी कथा थोर या राघवाची । जनीं ऐकतां शांत होते भवाची ॥ ७<br>
कथा थोर रामायणीं सार आहे । दुजी ऊपमा ये कथेला न साहे ।<br>
त्रिलोकीं लोक गाती सदा आवडीनें । भविष्योत्तरें वांटिलीं शंकरानें ॥ ८

पुरश्चरणसमाप्तीनंतर तीर्थयात्रा करून समर्थ पंचवटी येथें बारा वर्षांनीं

परत आल्यावर कांहीं दिवस त्यांनीं तेथें वास्तव्य केलें. नंतर ते कृष्णातटाका-नजीकच्या प्रदेशांत वास्तव्य करण्यास गेले. या प्रांतांतील कांहीं ठिकाणांचें निरीक्षण केल्यावर प्रथम चाफळशेजारील शहापूर गांवीं व नंतर मसूर गांवीं समर्थांनीं वास्तव्य केलें.

शके १५६७ सालांत ( इ. स. १६४५ ) त्यांनीं श्रीरामाचा उत्सव करण्यास प्रारंभ केला. शके १५६९ सालात अगापुरचे डोहातून चाफळच्या श्री-रघुनाथदेवाची मूर्ति त्यांनीं काढिली, व तिची स्थापना चाफळ येथें केली. श्री-रघुनाथदेवाविषयीं एकनिष्ठता बाळगण्याच्या चाफळ येथील पाटील, देशमुख इत्यादि लोकांच्या शपथा झाल्या ( रामदासी भाग १, लेखांक ५२ ).

अशा रीतीनें श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवास सुरुवात केल्यावर त्या-उत्सवास छत्रपति शिवाजीमहाराजाकडून साह्य होऊं लागलें. याविषयींचे लेख संप्रदायाचा पत्रव्यवहार भाग १ मध्यें एकंदर जितके छापण्यांत आले आहेत त्या-पैकीं प्रस्तुत निबंधाच्या विषयाचा उल्लेख ज्या लेखात आला आहे, त्यांतील या विषयाच्या चर्चेपुरते उतारे कालानुक्रमानें खालीं दिले आहेत.

( १ )

लेखांक १९ ] १५९९ भाद्रपद वा॥ १ [ अस्सल मोडी

श्री

श्रीरघुनाथ देउ
राजमान्य राजश्री येकाजी रुद्र सुभेदार
व कारकून महालनिहाये ता॥ कोळे गोसावी
यासी

सेवक दताजी त्रिमल नमस्कार सुहूर सनसमान सबैन अलफ —
कसबे चाफळ येथे श्री याचे देवाल्य आहे तेथे रामनवमीस
याचेचा मोहोछाव राजश्री स्वामी करीत असताती त्यावरी राजश्री
छत्रपती स्वामी श्री देवाचे भेटीस आले होते ते समई स्वामीन राजश्री
राजयास आज्ञा केली की देवाचा नित्य उछाव व यात्रा उछाव करावा ऐसी आज्ञा
केली आज्ञेप्रमाणे राजश्रीनें मान्य करून नित्य उछाव यास खर्च लागतो त्याचा बेगमी
जाउलीचे सुभेवरी करून दिल्ही आणी रामनवमीचा उछाव चालवा ते विसी आम्हास
आज्ञा केली......

( २ )

लेखांक २४ ] १५९९ अश्विन वा १३ [ अस्सल मोडी

श्री

रघुनाथदेव

श्री रामदास छत्रपती

राजमान्य राजश्री देशाधिकारी व देस लेखक प्रांत राजमडल गोसावी

यास

( से )वक दताजी त्रीमल नमस्कार सुा समान सबैन अलफ उप( री ) श्री साहेबाचे आज्ञा की सन सीतामध्यें आज्ञा की श्री (स्वा)
मी याचे पुरातन स्थान श्री आपीस्टान चाफल ( ऐ )सी यास आपणास श्रीनें आज्ञा केली कीं तेथील माहानवमी ( चा ) मोहछाव पुरातन चालिला आहे तो तुम्ही चालवणे......( ये )णेप्रमाणे प्रतीवरसी चैत्र सुध नवमी दिवस अकरा प( रि ) येत मोहछाव करवणे म्हणोन श्री गोसावी याचे आज्ञा ते++श्री छत्रपती साहेबी मान्य केली तेणेप्रमाणे चालवणे म्हणोन राजश्री साहेबाचे आज्ञा......

( ३ )

लेखांक २६ ] श्रीरघुनाथ [ नक्कल-मोडी

श्रीरामदासस्वामी छत्रपती

श्री गुरुभक्तिपरायेण तीर्थस्वरूप वेदमूर्ती राजमान्य राजश्री

दिवाकर गोसावी यासी

स्नेहांकीत दताजी त्रीमल नमस्कार विनती उपरी येथील क्षेम जाणून स्वकीयें कुशल लिहीले पाहिजे उपरी राजश्री धजमान कर्नाटकातून स्वारीकरून श्री च्या दर्शनास सज्जनगडासी आले ते समई श्रीस प्रार्थनायुक्त विनंती केली की श्री नी पूर्वी चिम्बाडीचे मुक्कामी श्री सिवथरी मांती असतां मधे माहानदी माहापुर आणी अकस्मात रात्री पलणापासी येऊन चमत्काररूपे दर्शन दिल्हे कितेक चिर्सी होतें तोंची आसीर्वाद दिल्हे दुसरे दिवसी सिवथर माली सुंदर मठी भेटी जाली तेथेही पूर्वप्रसंगप्रमाणे कृपा करून कितेक अलभ्य देसभाषीचें चीन सुचवीले माना इत्य श्री देवस्थान चाफल याचे पूजेस अक्राअकरी येकसे येकवीस गाउ मुकासे यावे म्हणउन आज्ञा केली गावाची नावे दूर दूर देशी सांगितली यामधे चंदी श्री चा मुकासा व श्री नी दिल्हा देश तो पाहून आलो या उपरी श्री नी शिष्यवर्गास पाठऊन जे कार्य पूजेस आणवणे ते आणवीले पाहीजे व कर्नाटकामधे राज थोर थोर जाले त्याचे मधी + + स्थलोस्थली देवालयें गोपुरे कितेक प्रकारीचा

नित्य उत्छव व रथ उछाव अनसने ऐशा धर्मस्थापना केल्या त्या पाहिल्या तरी हे आपणासही घडले पाहिजे .

ऐसीयास श्री ची तो उदासीन स्थिती परतु त्याची आज्ञा पूर्वीच आपणासी आहे

कीं श्री देवाचा समारभ उत्तरोत्तर वृधीतें पावावा तैसेंच राज्यही उत्तरोत्तर अभीवृधीतें पावेल.. .

(४)

लेखांक ४३ ] १६०३ पौष वा ९ [ नकल बाळबोध

श्रीरामदासस्वामिचीं वचन

मन्मादि सवत्सरीं सिंगणवाडीचे मठीं राजश्री ( नीं ) श्री च्या सर्व कार्यांचा आंईकार केला त्याप्रमा( णें ) त्यांनि नित्य उत्सव व यात्रा समारभ उत्तम घालविला पुर्दे इमारतीचेंही स्मरण यावें हे त्यानी मान्य केल्यावरि आपण सज्जनगडीं सुखें वास्तव्य के( ले ) ॥ ६ ॥

कर्नाटक रितीचा रथ करून या भोगमूर्ती ( आण )उन प्रतिवर्षी रथोत्साव केल्यानें राज्यासी कल्याण आहे वार्षीक चिन्ह दिसोनि येईल विशेष चिन्ह दिसोनि येईल ॥ ८ ॥

श्रीचे पेठेचे पत्र दृढ्य करावे कार्यकर्ते नीति पैदावी । श्रीकार्यासी अनितप्पर ऐशा पुरुषाच्या योगे धर्मवृधी आहे धर्मवृधीने राज्यवृधि आहे ॥ ११ ॥

(५)

लेखांक ५२ ] १६०४ [ नकल मोडी

तालीक श्रीरघुनाथ

श्रीगुरुभक्तपरायेण राजमान्य राजश्री दिवाकर गोसावीयासि यधुवर्ग विठ्ठल गोसावी नमस्कार उपरी ..

श्री ची स्थापना चाफली जाली ते समई नरसीगराउ आवरसानी मुद्राधारी व परांजी देशमुख नागोजीपत देशकुलकर्णी व नागोजी भावे नाईकवाडी नानेघोलकर या पाचा जणाकडून श्री च्या पुष्पावर श्री नी हस्त ठेविले कीं या अधिष्ठानाची भक्ती परपरा करावी सर्व साह्यता करावी कानुकानुनाती यात्रेत होऊ न द्यावी सर्वस्वेसी साह्ये असावे म्हणून पुष्पावरी हस्त पाचा जणानी ठेविले. ...

(६)

लेखांक ८० ] १६१८ मार्ग वा २ [ अस्सल मोडी

श्री रघुनाथ दैव

श्री रामदास स्वामी

×××श्री राजाराम ( छत्रपति ) याणी राजश्री आनाजी ( जनार्दन ) देशाधिकारी व लेखक वर्तमान ( व भा )वी प्रांत वाई यांसी आज्ञा केली ऐसीजे .. . ऐसीयासी श्री चे कृपेकरुन माहाराजाचे राज्य वृधीतें पावले याउपरी श्रीचा समारंभ विशेष चालवीला पाहीजे येविसी पुर्वी श्रीचे वचन राजश्री कैलासवासी यासी आहे कीं श्री देवाचा चढता वाढता महोत्साव चालवावा तेणे च चढते वाढते राज्य अभिवृधीते पावेल हे श्रीचे कृपापूर्वक असीवादरूप वाक्य आहे तरी.... .

(७)

लेखांक ८१ ] १६१८ मार्ग वा २ [ अस्सल मोडी

श्रीरघुनाथ
श्रीरामदास

राजश्री आनाजी जनार्दन सुभेदार व कारकून वर्तमान
व भावी प्रांत वाई गोसावी यांसी

श्री अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक रामचंद्र नीलकंठ अमात्य नमस्कार सुहुर सन सबा तीसेन अलफ वेदमूर्ती राजश्री दिवाकर गोसावी याणी हुजुर येउन विदित केले कीं .....श्रीचा समारंभ बहुतच चालेल तेणें करून राजश्रीस बहुतच कल्याण आहे व राज्याभिवृधी होईल येविसीं पूर्वीही राजश्री कैलासवासी स्वामीस श्रींचे वचन आहे कीं श्रीदेवाचा चढता वाढता मोहछाव चालवावा तेसेच चढतें वाढतें राज्य अभिवृधीते पावेल हे श्रीचे कृपापूर्वक आसीवादरूप वाक्य आहे .....

(८)

लेखांक ८२ ] १६१८ मार्ग वा २ [ नक्कल मोडी

श्री

××श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री त्र्यबक कृष्ण ++ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत स्वारगड यासी आज्ञा केली ऐसीजे राजश्री दिवाकर गोसावी याणी विदित केले कीं श्री देवस्थान का। चाफल का। नानेघोल प्रांत कऱ्हाड व श्री देवस्थान किले सजनगड ××

श्रीचे वचन राजश्री कैलासवासी यासी आहे कीं श्रीदेवाचा चढता वाढता मेहात्सव चालवावा तेसेच चढते वाढते राज्य अभिवृधीते पावेल हे श्रीचे कृपापूर्वक आसीर्वादरूप वाक्य आहे तरी महाराष्ट्रराज्य म्हणजे देवाब्राह्मणाचे आहे श्रीचा समारंभ विशेष उतरोतर चालवणे हे स्वामीस अगत्य यासतव मौजे ( मजकूर ) हा गाव कुलबाब .

(९)

लेखांक ८४ ] १६१८ मार्ग. वा ५ [ अस्सल मोडी

राजश्री आणाजी जनार्दन देशाधिकारी व देशलेखक वर्तमान
व भावी प्रांत थाई गोसावी यास

+ + सेवक शंकराजी नारायेण सचीव नमस्कार सुहुर सन सबा तीसेन अलफ
वदमूर्ती ( राजश्री दिवा)कर गोसावी येही विदित केले कीं......श्रीं कृपेने
राजश्री छेत्रपती स्वामी यांचे कल्याण होऊन राज्याभिवृधी होत आहे
तरी...हे राज्य देवाब्राह्मणाचे असीर्वादाचे आहे श्री चे स्थली पूजा मोहछाह
विशेश चाल्लीयाने राजश्री स्वामीचे कल्याण आहे याकरितां......

(१०)

लेखांक ८५ ] १६१८ मार्ग वा १० [ अस्सल मोडी

श्रीशंकर

श्री रघुनाथ देवः
श्री रामदास स्वामिः छेत्रपती

राजश्री उधो बावाजी हवालदार व कारकून
वर्तमान व भावी समत नीव गोसावी यासि
शेवक अनाजी जनार्दन सुभेदार व कारकून सुभा प्रा थाई नमस्कार......
श्रीचे वचन राजश्री केलासवासी यासि आहे कीं श्री देवाचा चढता
वाढता मोहछाव चालवावा तेसेंच चढते वाढते राज्य अभीवृधीते पावेल हे श्रीचे कृपा-
पूर्वक आसीर्वादरूप वाक्य आहे तरी ... हे म्हराठे राज्य म्हणिजे देवाब्राह्मणाचे आहे
श्रीचा समारम विशेशयाकारे चालवणे हे स्वामीस अगत्य आहे ........

(११)

लेखांक ८६ ] १६१८ फाल्गुन शुा ३ [ अस्सल मोडी

श्री

श्री रघुनाथ देव
श्री रामदास स्वामी

राजश्री मानजी गोपाल मुख्य देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत
कऱ्हाड गोसावी यांस
श्री अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक रामचंद्र नीलकंठ
अमात्य नमस्कार. .. ऐसीयासी उतरोतर चढता वाढता श्री देवाचा भक्तिमोहत्सव
चालवावा तैसेंच चढतें वाढतें राज्य अभिवृधीतें पावेल हे श्रींचे कृपापूर्वक आसीर्वाद-
वाक्य आहे तरी हे धर्मराज्य श्रीचे कृपेकरून वृधीतें पावलें याउपरी श्रीचा समारम
विशेष चालायाकारणें का चांफल हा गांव इनाम......

(१२)

लेखांक ८८ ] १६१८ फाल्गुन शुा ३ [ अस्सल मोडी

श्री

श्री हनुमंत श्रीमहाबलेश्वर

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २३ धाता नाम संवत्सर फाल्गुन शुध त्रितीया रविवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपती यांणी राजश्री माहादाजी सामराज नाम जाद व लेखक वर्तमान व भावी मांत जाउली यांसी आज्ञा केली ऐसीजे. ऐसीयासी हें राज्य म्हणजे देवाब्राह्मणाचे आहे धर्मस्थापना विशेषाकारें चालवणें हें स्वामीस अगत्य आहे याकरितां......

(१३)

लेखांक ९४ ] १६१९ ज्येष्ठ वा १४ [अस्सल मोडी

श्री

श्रीमहाबलेस्वर
छेत्रपती

राजश्री संडो आपाजी हवालदार व
कारकून सा थारामुरें गोसावी यांसि

सेवक माहादाजी सामराज नामजाद व कारकून सुभा जावली नमस्कार. - स्वामी...... आज्ञा की.. हे माहाराष्ट्र राज्य म्हणजे देवाब्राह्मणाचे.. ...

हे संपूर्ण लेखांक वाचकांनीं मूळावरूनच वाचले पाहिजेत; आम्हीं महत्त्वाचा भाग सेधढाच उतरून घेतला आहे. प्रस्तुत विषयाच्या चर्चेच्या दृष्टीनें या लेखाचें स्वरूप व त्याचे निरीक्षणावरून ज्या महत्त्वाच्या गोष्टी निदर्शनास येतात त्या नमूद करितों.

( १ ) या लेखांपैकीं पहिले तीन लेख छत्रपति शिवाजीमहाराजांच्या हयातीमधील आहेत. हे तीन लेख शिवाजीच्या विश्वासातील श्रेष्ठ अधिकारी अथवा सरकारकून दत्ताजी त्रिमल यांचे आहेत, व त्यात खास शिवाजीमहाराजांचे चाफळ येथील महोत्सवास द्रव्यसाहाय्य करण्याविषयींचे विचार नमूद केलेले आहेत. पहिल्या पत्रात रामनवमीच्या उत्सवाची मोईन सालगुदस्ताप्रमाणें सालमजकुरीं करून दिल्याचा उल्लेख आहे. दुसऱ्या लेखात सन सीतामध्यें ( शके १५९४, इ. स. १६७२ ) छत्रपतींनीं आज्ञा केल्याप्रमाणें चाफळ येथील महोत्सव चालविणें असें नमूद आहे. तिसरा लेख म्हणजे समर्थांचे पारपत्या-

धिकारी दिवाकर गोसावी यास दत्ताजी त्रिमल यानें पाठविलेलें पत्र आहे. त्यातील उल्लेख फार महत्त्वाचा आहे.

लेखांक ४ हें एक टिपण आहे. हें शके १६०३ म्हणजे इ. स. १६८१ म्हणजे छत्रपतींचे निधनानंतर एक वर्षानें व समर्थांचे निधनापूर्वी एक महिना या काळचें आहे. यात "रामदासस्वामींचीं वचनें" या मथळ्याखालीं चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाचें देवालय व त्या संबंधाचे छत्रपतींचे सनदा यांचें टिपण आहे. त्यात "प्रतिवर्षी रथोत्सव केल्यानें राज्यास कल्याण आहे" ही गोष्ट नमूद केली आहे.

लेखांक ६ ते ११ हे सर्व शके १६१८ व १६१९ म्हणजे इ स. १६९७ व १६९८ या सालातील असून यात "श्रीदेवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तेणेंच चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल" हें श्रीचें कृपापूर्वक आशीर्वादरूपी वाक्य आहे, ही गोष्ट नमूद केली आहे.

ऐतिहासिक प्रामाण्याच्या दृष्टीनें या सर्व लेखांचा विचार केला असता लेखांक १ ते ३ हे श्रेष्ठ प्रतीचे समजले पाहिजेत. छत्रपतींचा दत्ताजी त्रिमल हा वाकेनवीस म्हणजे वृत्तान्तलेखक (राज्यव्यवहारकोश पहा) होता छत्रपतींच्या राज्याभिषेकाची हकीकत लिहिणारा हेन्री ऑक्‌सिन्डेन यानें दत्ताजी त्रिमल यास Publique Intelligencer असें विशेषण दिलें आहे (इ. रे. भाग १, पा ४८६) अशा श्रेष्ठ दर्जाच्या अधिकाऱ्यास छत्रपति शिवाजीमहाराजाचे जे विचार व जी बोलणीं विदित झालीं तीं या लेखांकात त्याचे हाताखालील अधिकाऱ्यास लिहिलेल्या पत्रात त्यानें नमूद करून चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवासंबंधीं काय योजना करावयाची त्याचें दिग्दर्शन केलें आहे ही गोष्ट लक्षात घेतली असता पहिल्या तिन्ही लेखांतील श्रीरघुनाथदेवाच्या उत्सवासंबंधाचे उल्लेख प्रामाण्याच्या दृष्टीनें अव्वल दर्जाचे मानले पाहिजेत. अशा प्रकारच्या या उल्लेखावरून "श्रीदेवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तेणेंच चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल" असें समर्थांचें शिवाजीस सांगणें होतें, व शिवाजीस हें समर्थांचें सांगणें पटून त्याच्या सांगण्याप्रमाणें छत्रपति चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवास लागणारें द्रव्य व साधनसामुग्री पुरवीत असत व अशा रीतीनें "श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवाला साह्य छत्रपति करीत म्हणून त्याच्या राज्यांत नवीन मुलु

राची भर पडून तें शृद्धिंगत पावे हा प्रत्यय शिवाजीस आला होता, व येत असे " हें निर्विवादपणें सिद्ध होतें. या सिद्धांतास बाकीच्या लेखांतील उल्लेखाचे योगानें चांगलीच पुष्टि मिळत आहे. लेखांक ४ हें टिपण समर्थांचे माहीतगार शिष्यांपैकीं कोणातरी शिष्यानें शके १६०३ म्हणजे इ. स. १६८१ म्हणजे शिवाजीच्या निधनानंतर व श्रीसमर्थ यांचे हयातींत केलें असल्यानें यांतील उल्लेखहि प्रामाण्याच्या दृष्टीनें श्रेष्ठ प्रतीचा आहे. लेखांक ६ ते १३ हे छत्रपति राजाराममहाराजांचे कारकीर्दींतील आहेत.

ले. ६, ८, १२ हे लेख खास राजाराम छत्रपतींचे असून वाई, व्याघ्रगड व जावळी या प्रांताच्या देशाधिकाऱ्यांस चाफळ येथील देवस्थानाच्या बाबतींत केलेले हुकूम आहेत. लेखांक ६ त " ऐशियास श्रींचे कृपेंकरून महाराजांचें राज्य ( छत्रपति शिवाजीमहाराज ) वृद्धीतें पावलें " असें प्रथम नमूद केलें असून " श्रींचें वचन राजश्री कैलासवासी यांसी आहे कीं, श्रीदेवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तैसेंच चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल हें श्रींचें कृपापूर्वक आशीर्वादरूप वाक्य आहे " असें नमूद केलें आहे. वरील पहिल्या उल्लेखांत श्रीरघुनाथदेवाचे कृपेंकरून शिवाजीमहाराजांचें राज्य अभिवृद्धीतें पावलें अशी राजाराममहाराजांची समज व्यक्त होत आहे. या उल्लेखावरून स्यांत दिग्दर्शित केलेल्या गोष्टीचे सत्यतेविषयीं शंका घेणें युक्त होणार नाहीं. त्याचप्रमाणें दुसऱ्या उल्लेखावरून छत्रपति शिवाजीमहाराजांना समर्थ रामदासस्वामींचे चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवाविषयींचें सांगणें लेखांक १ व २ यांत जें नमूद केलें आहे, तें छत्रपति राजाराममहाराजांस विदित असून त्याचा उल्लेख त्यांनीं या पत्रांत केला आहे. लेखांक ८ मध्यें लेखांक ७ मधील दुसऱ्या बाबीचा उल्लेख केला आहे. ले. १२ त " हें राज्य देवाब्राह्मणांचें आहे, धर्मस्थापना विशेषाकारें चालविणें हें स्वामींस आगत्य आहे" इतकेंच नमूद आहे. या उल्लेखावरून चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवास साह्य करणें हें धर्मस्थापनेचें एक महत्त्वाचें कलम राजाराम छत्रपति समजत असें दिसून येतें. राजाराम छत्रपतींच्या वरील लेखांशिवाय औरंगजेबावरोबर झालेल्या महाराष्ट्राच्या स्वातंत्र्य युद्धांत प्रसिद्धि पावलेले रामचंद्र नीळकंठ अमात्य यांचे लेख नं. ७ व ११ असे दोन लेख आहेत. यांत राजाराम छत्रपतींच्या पत्रांत ज्या स्वरूपाचे उल्लेख आहेत तशाच प्रकारचे उल्लेख असून लेखांक ११ त " तरी हें धर्मराज्य श्रींचें"

कृपेंकरून वृद्धींतें पावलें " असा उल्लेख आहे. छत्रपति शिवाजीमहाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्याचा उल्लेख धर्मराज्य या संज्ञेनें रामचंद्र नीळकंठ यांनीं केला असून 'श्रीरघुनाथदेवाचे कृपेंकरून तें वृद्धींतें पावलें' असें रामचंद्र नीळकंठ यांनीं नमूद केलें आहे. शिवकालीन राजकारणी पुरुषांपैकीं रामचंद्र नीळकंठ हे एक पुढारी असून तत्कालीन सर्व प्रकारच्या राजकीय हालचालींशीं त्यांचा संबंध असल्याकारणानें त्यांच्या लेखांतील वरील उल्लेख प्रामाण्याच्या दृष्टीनें श्रेष्ठ दर्जाचे आहेत.

लेखांक ९ हा शंकराजी नारायण सचिव यांचें वाईच्या देशाधिकाऱ्यास पत्र असून त्यांत "श्रीकृपेनें राजश्री छत्रपती स्वामी यांचें कल्याण होऊन राज्याभिवृद्धि होत आहे" असें नमूद केलें आहे. लेखांक १० हें वाईच्या देशाधिकाऱ्याचें उधो बाबाजी हवालदार समत नीरा यास लिहिलेलें पत्र असून त्यांत वरील आशीर्वादरूप वाक्याचा उल्लेख आहे.

येथपावेतों आधारभूत लेखांत नमूद केलेल्या महत्त्वाच्या बाबी लक्षांत घेतां "श्रीदेवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तैसेंच चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल" हें वचन रामदासांनीं छत्रपतींस सांगितलें होतें व छत्रपति ह्या वचनाचा अंगीकार करून चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवास द्रव्यसाह्य करीत असत, या गोष्टी सत्यस्वरूपी व विश्वसनीय आहेत याविषयीं शंका घेण्याचें कारण उरत नाहीं.

आतां आशीर्वादरूपी वचन समर्थांनीं शिवाजीस केव्हां सांगितलें व त्या वचनांत सांगितल्याप्रमाणें छत्रपति शिवाजीमहाराज चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवास केव्हांपासून साह्य करूं लागले याचें दिग्दर्शन करितों. उपलब्ध झालेल्या श्रीसमर्थचरित्रसाधनावरून चाफळास श्रीरघुनाथदेवाची स्थापना समर्थांनीं शके १५६९ मध्यें केली व तेव्हांपासून मसूर येथें श्रीरामाचा महोत्सव समर्थ करीत असत तो चाफळ येथें करण्यास त्यांनीं सुरुवात केली. चाफळ येथें श्रीदेवाची स्थापना करण्यापूर्वी मसूर येथें श्रीरामाचा महोत्सव करण्याचा परिपाठ सुरू असतां एका प्रसंगीं छत्रपति शिवाजीमहाराज श्रीरामाचे उत्सवास आले असून त्यांची व समर्थांची भेट झाली होती असें "श्रीसमर्थ व शिवाजीमहाराज यांचा अन्योन्यसंबंध" या ग्रंथांत आम्हीं दर्शविलें आहे. समर्थांची व छत्रपतींची या उत्सवप्रसंगीं प्रथम भेट झाल्यानंतर लागलीच समर्थांनीं चालविलेल्या श्रीरघुनाथदेवाच्या वार्षिक महोत्सवास द्रव्य-

साहाय्य करण्यास सुरुवात केली, असें अनुमान काढणें युक्त होणार नाहीं. समर्थ व शिवाजी या उभयतांचे हालचालींची माहिती परस्परांस होऊन त्यांनीं चालविलेल्या कार्याविषयीं आदर व त्याची उपयुक्तता एकमेकांस पटण्यास दोन तीन वर्षांचा काळ लागला असला पाहिजे. इतका काळ गेल्यावर समर्थांनीं वरील आशीर्वादरूपी वचन शिवाजीस सांगितलें व त्यास अन्वयें चाफळच्या श्रीरघुनाथ-' देवाच्या महोत्सवास द्रव्यसाहाय्य करण्यास शिवबानें प्रारंभ केला असला पाहिजे असें अनुमान करणें युक्त होईल. या अनुमानान्वयें चाफळ येथें समर्थांनीं श्रीरामाचा महोत्सव करण्यास सुरुवात केल्यानंतर दोन तीन वर्षांनीं वरील आशीर्वादरूपी वचन समर्थांनीं शिवाजीस सांगितलें व शिवाजी श्रीदेवाचे महोत्सवास साह्य करूं लागले असें विधान करण्यास प्रत्यवाय नाहीं.

सत्कार्योत्तेजक सभेच्या मथळ्यावरील हें आशीर्वादरूप वचन अर्थवाद अथवा गौरवस्वरूपी आहे असा आक्षेप कित्येकांकडून येण्याचा संभव आहे. परंतु हा आक्षेप निराधार आहे, असें सुरुवातीस दिलेल्या निरनिराळ्या लेखांतील उद्धृत केलेल्या वाक्यावरून दिसून येतें. वर दिलेल्या लेखांपैकीं दोन लेखांतील आशीर्वादरूपी वचन खास शिवाजी महाराजांना समर्थांनीं सांगितलें व त्यांना स्वतः त्याचा प्रत्यय आला, हें सिद्ध असल्यामुळें तें अर्थवादस्वरूपाचें नसून सत्यस्वरूपाचें आहे, असें मानणें भाग आहे.

याप्रमाणें वरील आक्षेपाचें निराकरण झाल्यावर चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाचा महोत्सव विशेषोत्कर्षें केल्यानें शिवाजीमहाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्याचा विकास कशा रीतीनें झाला या मुद्द्याचा उलगडा करणें ओघानेंच प्राप्त होतें. प्रस्तुतचें Rationalistic म्हणजे तर्कप्रधानबुद्धीचें युग आहे. प्रत्येक गोष्टीचा उलगडा कार्यकारणसंबंध दाखवून मानवी बुद्धीस पटेल अशा पद्धतीनें करावयाचा हें या युगाचें वैशिष्ट्य आहे. या पद्धतीस अनुसरून या आशीर्वादरूपी वचनाचा उलगडा करण्यास्तव चाफळच्या श्रीरामाचा महोत्सव जसजसा वाढत्या प्रमाणांत करण्यांत येईल तसतसें तुम्हीं स्थापन केलेलें स्वराज्य वृद्धिंगत होत जाईल, असें शिवाजीस सांगणारे श्रीसमर्थ व समर्थांनीं सांगितलेल्या या आशीर्वादरूपी वचनावर विश्वास ठेवून त्याप्रमाणें वर्तन करणारे छत्रपति शिवाजीमहाराज यांची मनोरचना ( Psychology ) कशा प्रकारची होती, याचें दिग्दर्शन प्रथम केलें पाहिजे. हें दिग्दर्शन आपले लक्ष्यांत आलें म्हणजे वर

दर्शविलेल्या मुद्याचा उलगडा होणार आहे.

श्रीसमर्थ रामदासस्वामी श्रीरामचंद्राचे निस्सीम भक्त होते हें सर्वश्रुत आहे. सदासर्वकाळ श्रीरामाचें व त्याचे चरित्राचें चिंतन, मनन व निदिध्यास त्यांचा चालू असे. या स्वरूपाची त्याची रामभक्ति असल्यामुळे त्याचे मनांत ज्या कित्येक आकांक्षा यवत होत्या त्या श्रीरामकृपेनें फलद्रूप होत, असा त्यांना अनुभव आला. या अनुभवाचे योगानें त्यांची मनोरचना पूर्णपणें अशी बनली होती कीं, श्रीरामचंद्राची निस्सीम भक्ति केल्यामुळे त्याची कृपा त्याचेवर इतकी होत असे कीं, ज्या ज्या गोष्टी प्राप्त व्हाव्या अशी वांछा व आकांक्षा ते बाळगीत त्या सर्व फलद्रूप होत असत. समर्थांच्या मनोरचनेच्या स्वरूपाचें हें जें दिग्दर्शन केलें आहे तें यथार्थ आहे, याविषयीं आपले मनात किंतु राहूं नये म्हणून एतद्विषयक श्रीसमर्थांचे कांहीं महत्त्वाचे उद्गार खालीं नमूद करितों.

श्रीरामदासाची कविता प्रथमखंड, प्रस्तावना, पान ४५, यात समर्थांचे खालीं नमूद केलेले जे उद्गार आढळतात, ते या मुद्याची सत्यता पटविण्याचे दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे आहेत. ते व इतर दोन उतारे सादर करितों.

परंतु येकवचनी देव येक। जेणें सोडिले देव अनेक।
सेवाहीन मी सेवक। त्याचा म्हणवी ॥१
समर्थें अंगिकार केला। नाना संकटीं रक्षिला।
त्याचिया अन्नें पिंड वाढविला। जन्मवरी ॥ २
मारुतीसारिखे सेवक। तेथें मी मानवी रंक।
नवल सामर्थ्याचें कौतुक। काये सांगों ॥ ३
समर्थ आणि दीनानाथ। वैभवें समर्थाहून समर्थ।
जेणें माझे मनोरथ। पूर्ण केले ॥ ४
जें जें मनें अभिलासिलें। तें तें समर्थें पुरविलें।
मज दीनास वाढविलें। मर्यादेवेगळें ॥ ५
समर्थाते समर्थ करावें। तरीच समर्थ म्हणवावें।
त्रैलोक्यास पडिलें ठावें। सामर्थ्य ज्याचें ॥ ६
आंतीक्य रजनीचर माजले। देव कारागृहीं घातले।
म्हणोनी वैकुंठीहून पातले। देव सोडवावया ॥ ७
देवमात्र जाजावला। म्हणोनी कैपक्षी पावला।

भुवनकंटक निर्दाळिला । दसमुख शत्रु ॥ ८
जिहीं त्रैलोक्य जिंकिलें । त्यास मर्कटाहातीं मारविलें ।
भुवनत्रय आनंदविलें । दाशरथीनें ॥ ९
देवाचे बंद सोडविले । देव स्वस्थानीं स्थापिले ।
• प्राणीमात्र आनंदविले । रामराजें ॥ १०
बिभीषणास दिधली लंका । सुरवरांची फिटली शंका ।
समर्थ रामदास रंका । नवाजिलें ॥ ११ वगैरे

× × × ×

आम्हा नाहीं चाड ते कोणी येकाची । दृढ राघवाची कास धरूं ॥ स्फु. ओ. ८-६-
कास धरूं जेणें पावनची केलें । तेथें माझें जालें समाधान ॥ ७
समाधान जालें प्रत्ययासी आलें । धन्य तें पाउलें राघवाचीं ॥ ८
राघवाचीं पदें मानसीं धरीन । विघ्न उधरीन हेळामात्रें ॥ ९
हेळामात्रें शुध करीन या जना । तरीच पावना राघवाचा ॥ १०
राघवाचा दास मी जालों पावन । पतीत तो कोण उरों शके ॥ ११
उरों शक ऐसें कल्पांतीं घडेना । जो कोण्ही पुसेना त्यासी उणें ॥ १२
उणें न सगतां माझ्या सूर्यवौशा । कोण्हीची दुराशा नाहीं आम्हा ॥ १३
आम्हा नाहीं उणें राघवाच्या गुणें । ब्रीदची राखणें पावनाचें ॥ १४
पावनाचें ब्रीद आम्हा प्राप्त जालें । प्रचीतीस आलें कितीयेक ॥ १५
कितीयेक जन ज्ञानें उधरीले । कृत्याकृत्य जाले तत्काळची ॥ १६
तत्काळची मोक्ष हें ब्रीद रामाचें । होत आहे साचें येणें काळें ॥ १७
येणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास म्हणवीना राघवाचा ॥ १८
राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उधार करावया ॥ १९

× × × ×

कास या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।
इत्तर कष्टती प्राणी । थोर संसारसाकडीं ॥ मा. ५, ४-१
सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणाळयें ।
पुर्वीच तुटली माया । दुख शोक विसंचला ॥ २
सेवकु मानवीयांचे । कष्टती बहुतापरी ।
सेविला देव देवाचा । तेणें मी धन्य जाहालों ॥ ३

नीच हे मानवी प्राणी । नीचाश्रय कामा नये ।
महत्कीर्ति श्रीरामाची । फावला महदाश्रयो ॥ ४

समर्थांचे वरील उद्गारावरून चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाचे कृपेचे फळ त्यांस कोणत्या स्वरूपाचें प्राप्त झाहलें याविषयींची त्यांची मनोरचना उत्कृष्टपणें व्यक्त झाली आहे. ज्या रामकृपेचीं उत्कृष्ट फळें आपणास प्राप्त झालीं त्याच रामकृपेचीं फळें समर्थांचे प्रिय शिष्य व निस्सीम भक्त शिवाजीमहाराज यास प्राप्त व्हावींत, अशी समर्थांची स्वाभाविकपणें इच्छा झाली. प्रतापगडचे श्रीभवानीची श्रीसमर्थांनीं जी प्रार्थना केली आहे तींत शिवाजीविषयींचे समर्थांचे उद्गार खालीं नमूद केल्याप्रमाणें आढळून येतात.

येक ची मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवीं राजा । सीघ्र आम्हा ची देखतां ॥ स्फु. प्र. ३६-१७
दुष्ट संव्हारिलें मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडे कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥ १८
देवाचीं राहिलीं सत्वें । तुं सत्व पाहासी किती ।
भक्तांसी वाढवी वेगीं । इछा पूर्ण परोपरीं ॥ १९
रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।
क्षमावें तुळजे मातें । इच्छा पूर्ण ची तें करी ॥ २०

या उद्गारांवरून समर्थांचे अंतःकरणांत शिवाजीचे अभ्युदयाविषयीं किती तीव्र उत्कंठा वसत होती हें दिसून येतें. अशा स्थितींत शिवाजीचे हातून चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवाची वृद्धि शिवाजीचे द्रव्यानें जितकी अधिक होत जाईल तितकी श्रीरघुनाथदेवाची कृपा शिवाजीमहाराजावर अधिक होऊन त्यांनीं स्थापन केलेल्या राज्याचा विस्तार अधिक प्रमाणात होईल, अशी दृढ भावना समर्थांचे मनात वसत असल्याचें सिद्ध होतें.

तथापि कोणतेंहि ऐहिक फल मानवी प्रयत्नावाचून प्राप्त व्हावयाचें नाहीं, व जितका प्रयत्न तितकेंच फळ, हा सिद्धांत ठरलेला आहे व तो समर्थांस पूर्ण संमत होता, हें समर्थांच्या खालील उक्तीवरून स्पष्ट दिसतें.

म्हणे उदास दास हा । बरें पाहा बरें पाहा ।
करील प्रेत्न जीतुका । तयास लाभ तीतुका ॥ स्फुट श्लो. ८

कोणत्याहि लोकोत्तर पुरुषानें मानवी प्रयत्नावाचून निव्वळ परमेश्वरी-

कृपेवर विसंबून एखादें महत्कार्य सिद्ध केल्याचें उदाहरण इतिहासांत सापडणें दुरापास्त आहे. मानवी प्रयत्नावाचून कार्यसिद्धि होणें नाहीं हा सिद्धांत जर सत्य आहे, तर मग परमेश्वरी कृपा भाकण्याची आवश्यकता काय आहे, व अशा प्रकारची कृपा भाकण्याची महत्कार्यसिद्धीच्या दृष्टीनें कांहीं उपयुक्तता आहे कीं काय, हे दोन मुद्दे उपस्थित होतात व या दोन मुद्दयांचे दृष्टीनें श्रीसमर्थ रामदासस्वामी व छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या मनोरचनेच्या स्वरूपाचें जें वर दिग्दर्शन केलें आहे, तें लक्षांत घेऊन या दोन मुद्यांची चर्चा करणें ओघानेंच प्राप्त होत आहे.

कोणत्याहि क्षुद्र अथवा महत्कार्याचा उगम मानवी मनापासून होतो. जें कार्य करावयाचें तें ज्या व्यक्तीकडून केलें जातें त्या व्यक्तीच्या तें कार्य करीत असतां मानसिक वृत्तीच्या तीव्रतेच्या कमीअधिक प्रमाणावर त्या कार्याचे सिद्धीचा कमीजास्तपणा अवलंबून असतो. कर्म करणाऱ्या व्यक्तीच्या मानसिक वृत्तीची तीव्रता सामान्य प्रकारची असल्यास त्या कार्याची फलनिष्पत्ति सामान्य प्रतीची असते; परंतु कर्म करणाराची मानसिक वृत्ति तें कार्य करीत असतां तीव्र व उत्कट स्वरूपाची असल्यास त्या कर्माची फलनिष्पत्ति कर्म करणाऱ्या व्यक्तीस संपूर्ण फल प्राप्त करून देण्यांत होते. हा सिद्धांत लक्षांत येण्याकरितां सामान्य व्यवहारांतील एक दृष्टान्त आम्ही येथें देतों. मुंबई बंदराच्या गोदींत काम करणाऱ्या मजुरांच्या टोळ्या एखादा अवजड व वजनदार बोजा जहाजांतून वर उचलण्याची क्रिया करीत असतांना एखाद्या गाण्याचें पालुपद मोठ्या आवाजांत एका ठक्यांत बोजा उचलीत असतांना म्हणत असल्याचें दृष्टीस पडतें. गाण्याचें पालुपद मोठ्या आवाजांत म्हणण्यानें त्या मजुरांच्या समुदायाचे मनांत एक प्रकारचा असा तीव्र उत्साह व आवेश उत्पन्न होतो कीं, बोजा वर उचलण्याकरितां त्या मजुरांच्या टोळीची जी सामुदायिक शक्ति अपुरी पडते ती त्यामुळें वृद्धिंगत होत जाते व त्याचे योगानें विकट कार्य विशेष श्रम पडल्याचा भाव न होतां सहज रीतीनें पार पडतें. या दृष्टान्तांत गीताचें पालुपद मोठ्या आवाजांत सर्वांनीं एकसमयावच्छेदेंकरून म्हणण्यानें जें कार्य घडतें तेंच कार्य आपण करीत असलेल्या कार्यावर परमेश्वरी कृपा आहे या भावनेनें कार्य करणाराचे मनावर होतें. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या पंधराव्या खंडाच्या पान २७२ वरील ज्या लेखांक २६८ मध्यें हिंदवी स्वराज्याचा उल्लेख आढळतो

त्यात " हें राज्य व्हावें हें श्रींचे मनांत फार आहे " असा उल्लेख स्वराज्य-स्थापनेचें जें महत्कार्य शिवाजीमहाराजांनीं हातीं घेतलें होतें, त्या कार्याविषयींची त्यांची मनोरचना दर्शविणारा उल्लेख आढळतो. ' चढता वाढता श्रीदेवाचा उत्सव चढतें वाढतें राज्य ' या आशीर्वादरूपी वचनांत शिवाजीमहाराजांची चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवाविषयींची मनोरचना श्रीसमर्थांनीं प्रथित केलेली व शिवाजीस मान्य झालेली जी दर्शविण्यात आली आहे, तिचे योगानें स्वराज्यस्थापनेप्रीत्यर्थ शिवाजीनें जीं जीं कार्यें हातीं घेतलीं तीं तीं यशस्वी होणार असा शिवाजीचे मनांत आत्मविश्वास उत्पन्न होत असे व त्याचे योगानें त्यास सतत यशःप्राप्ति होत असे.

समर्थाचिया सेवका वक्र पाहे। असा सर्व भूमंडळीं कोण आहे।

या समर्थोक्तींत जो आत्मविश्वास भरला आहे तो " चढता वाढता श्रीदेवाचा उत्सव चढतें वाढतें राज्य " या समर्थोक्तीच्या अंतर्गत असलेल्या श्रद्धेवर उभारलेला आहे. चढता वाढता श्रीदेवाचा उत्सव केल्यानें तुझ्यावर श्रीरघुनाथदेवाची कृपा झाल्यामुळें तुझ्याकडे कोणीं वाकड्या नजरेनें पहाणें अशक्य आहे व स्वराज्यस्थापनेस्तव जीं जीं कर्में तूं करशील तीं तीं कर्में यशस्वी होऊन तुझें राज्य वृद्धिंगत होईल, असें समर्थांचें शिवाजीस सांगणें होतें शिवाजीस समर्थांच्या ह्या सांगण्याचा प्रत्यक्ष अनुभव आल्यानें तें त्यास पूर्णपणें पटलें व या कारणास्तव शिवाजीमहाराज व त्यांचे पश्चात्‌चे छत्रपति हे चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाचे महोत्सवास सढळ हातानें द्रव्यसाहाय्य करीत.

येथपावेतों केलेलें विवेचन शुद्ध तर्कनिष्ठ मनोरचनेच्या कांहीं लोकांस कदाचित् संमत न झाल्यास त्यांचे बुद्धीस पटेल अशा प्रकारचा, वरील आशीर्वादरूपी वाक्याच्या अंतर्गत असलेला कार्यकारणसंबंध कोणत्याहि प्रकारची ओढाताण न करितां दाखवितां येण्यासारखा आहे, व तो आम्ही आतां स्पष्ट करून दाखवतों. समर्थ-शिवाजी उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्र देश विजापुरच्या आदिलशाही मुसलमान घराण्याच्या राजकीय सत्तेचा अंकित होता. या घराण्याची राजकीय सत्ता महाराष्ट्रधर्मास म्हणजे श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास विघातक असल्यामुळें ती नष्ट करून स्वधर्माभिवृद्ध्यर्थ स्वराज्याची स्थापना न केल्यास महाराष्ट्रधर्म नष्ट झाल्याखेरीज व महाराष्ट्रांतील चातुर्वर्णी समाजाचे सर्व लोक मुसलमान-धर्मानुयायी बनल्याखेरीज रहाणार नाहींत, अशी ज्ञानेश्वरकाळापासून महाराष्ट्रांत

झालेल्या हरिस्यानिरूपण करणाऱ्या सताची व राजकारणी पुढाऱ्याची पूर्ण खातरी झाली होती. समर्थ व शिवाजी या उभयतांनाहि हीच गोष्ट दिसत होती. यास्तव महाराष्ट्रधर्मरक्षणार्थ स्वराज्याची स्थापना करून त्याची अभिवृद्धि करण्याचा उपक्रम शिवाजीनें सुरू केला. या उपक्रमाचा अर्थ महाराष्ट्रात विद्यमान असलेल्या राजकीय स्थितींत क्रांति घडवून आणून तिचे ठिकाणीं त्याला मान्य अशी महाराष्ट्रधर्मरक्षण करणारी राजकीय घटना स्थापित करावयाची असा होता. जगातील निरनिराळ्या देशात घडलेल्या राजक्रांत्यांच्या इतिहासाचें निरीक्षण केलें असता क्रांति घडून येण्यास दोन महत्त्वाच्या गोष्टी कारणीभूत झालेल्या दिसून येतें. पहिली गोष्ट म्हणजे प्रचलित राजसत्तेचा विध्वंस करण्याकरिता शस्त्रास्त्रादि युद्ध सामुग्री व लढवये लोक उभारून विद्यमान राजसत्ताधाऱ्यांशीं झगडा सुरू करावयाचा व ती सत्ता त्यांचे हातून काढून घ्यावयाची ही होय या पद्धतीनें राज्यक्रांति घडवून आणण्यास जरूर तें आनुकूल्य शिवाजीनें साध्य करून या पद्धतीचा त्यानें स्वीकार केला. क्रांति घडवून आणणाऱ्या या एकाच मार्गाचा आश्रय केल्यानें ती यशस्वी होत नाहीं. क्रांति घडवून आणण्याच्या काळीं जी राजसत्ता विद्यमान असते त्या राजसत्तेचा दरारा प्रजेवर असतो व तिचेविरुद्ध कोणत्याहि प्रकारची चळवळ करून ती घडवून आणणारास सामील होण्यास सामान्य जनता तयार नसते या शिवाय प्रजेपैकीं धनवान् लोक, त्याचप्रमाणें राजसत्तेशीं ज्याचे हित संबंध निगडित झालेले असतात व जे प्रजेचे पुढारी असतात असे वतनदार, जमीनदार, इनामदार, इत्यादिकांची सहानुभूति व मदत क्रांति घडवून आणणारास प्राप्त होणें दुरापास्त असतें या कारणास्तव या दोन्ही प्रकारच्या लोकांची सहानुभूति व मदत क्रांति घडवून आणणारास मिळविणें क्रांति यशस्वी करण्यास्तव अत्यंत जरूरीचें व अवश्य असतें शिवकालीन क्रांतींतील हा कार्यभाग समर्थ रामदासस्वामींकडून एका विशिष्ट व अपूर्व पद्धतीनें घडून आला.

समर्थ व शिवाजी यांची मनोरचना श्रद्धावान् होती हें मागील विवेचनांत सिद्ध करून दाखविलें आहे. त्या काळच्या सामान्य महाराष्ट्रीय जनतेची मनोरचनाहि श्रद्धावान् अशीच होती. म. इ. साधनें, खंड १५ वा, लेखांक ४३४, हा एक त्या काळचा लेख आहे चाकण येथील मुग्धरभट्ट अहे यानें दुष्काळ पडून लोक परागंदा होत असतां दहा दिवसात पर्जन्य पडेल, असें सर्व लोकास सांगितलें व त्याप्रमाणें पर्जन्य पडून दुष्काळाचें निवारण झालें, याबद्दल

कृतज्ञता दर्शविण्यास्तव पचवीस टक्के धर्मादाय मुरारभट्टास ग्रामस्थांनीं दिल्या-बद्दलचा उल्लेख या लेखांत आहे. या व अशाच प्रकारच्या त्या काळच्या उपलब्ध झालेल्या दुसऱ्या कांहीं लेखांवरून त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेची सर्व-साधारण मनोरचना श्रद्धाप्रधान होती असें दिसून येतें.

अशा प्रकारची मनोरचना असणाऱ्या लोकांचीं मनें छत्रपतींच्या स्वराज्य-स्थापनेच्या कार्यास अनुकूल करून घेण्यास स्वतः समर्थांस प्रिय असलेलें राम-राज्याचें ध्येय अहेतुकपणें कसें कारणीभूत झालें, याचें आम्ही दिग्दर्शन करितों.

समर्थांचा परमेश्वरी अवताराच्या कल्पनेवर पूर्ण विश्वास होता.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।

इत्यादि भगवद्गीतेंतील श्रीकृष्णाच्या वचनावर त्याचा पूर्ण विश्वास होता.

धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥

ही शिवाजीमहाराजास अनुलक्षून समर्थांनीं उच्चारिलेली ओवी परमेश्वरी अव-तारावरील त्याचा दृढ विश्वास उत्तम प्रकारें व्यक्त करिते.

समर्थ रामदासस्वामी पंचवटीस करीत असलेलें पुरश्चरण समाप्त झाल्या-वर, भरतखंडांतील निरनिराळ्या तीर्थांचें व क्षेत्रांचें दर्शन घेण्याकरितां प्रवासास निघाले व बारा वर्षें त्यांनीं सर्व भरतखंडभर पर्यटन केलें. या पर्यटनांत त्यांनीं केलेल्या लोकस्थितीचे अवलोकनावरून रामरावणकाळाची पुनरावृत्ति भरतखंडांत होत असल्याचें त्यांच्या निदर्शनास आलें. रामावताराचे काळीं भरतखंडांत रावणादि दैत्यांनीं जे उत्पात केले तेच उत्पात सर्व देशभर होत असून सर्व महा-राष्ट्रीय जनता त्रस्त झाल्याचें त्यांचे निदर्शनास आलें. ज्या श्रीरामानें एका काळीं अवतार धारण करून देवांना रावणाच्या बंदीवासांतून सोडविलें तोच राम महा-राष्ट्रीय जनतेची पारतंत्र्यांतून मुक्तता करण्याकरितां अवतार धारण केल्याखेरीज रहाणार नाहीं, असा समर्थांचा दृढ विश्वास बनला होता. अशा प्रकारची त्याची मनोरचना बनल्यावर समर्थ पचवटी सोडून कृष्णातटाकाच्या संनिध असलेल्या प्रदे-शांत वास्तव्य करण्यास्तव आले. कन्हाडनजीकचें चाफळखोरें त्यांनीं वास्तव्य करण्यास पसंत केलें. त्या प्रांतांतील सामान्य लोकांच्या मनांत रामावताराविषयीं त्याची स्वतःची बनलेली दृढ भावना उत्पन्न करण्यास्तव त्यांनीं रामनवमीचा महो-त्सव करण्याचें ठरविलें. देवादिकांचे महोत्सव करण्याची प्रथा फार पुरातन काळा-

पासून महाराष्ट्रीय जनतेत रूढ असून अशा प्रकारच्या महोत्सवानिमित्त दूरदूरच्या प्रदेशांतील लोक एकत्रित होत असत. या महोत्सवाचीं दोन अंगें महत्त्वाचीं असत. एक अंग देवाच्या भोगमूर्ति रथात स्थापन करून मोठ्या थाटानें व वैभवानें त्या देवतेचें वैभव व थोरवी लोकांच्या प्रत्ययास येईल, अशा तरतुदीनें त्याची मिरवणूक काढणें हें होतें, दुसरें अंग म्हणजे महोत्सवानिमित्त जमलेल्या लोकास देवाचा प्रसाद मिळावा म्हणून सामुदायिक भोजन करणें हें होतें

समर्थांनीं प्रथम मसूर गांवीं वास्तव्य केल्यावर तेथें श्रीरामनवमीचा वार्षिक महोत्सव करण्यास त्यांनीं सुरुवात केली. रामावताराची प्रतीति महाराष्ट्रीय जनतेस येईल अशा रीतीनें समर्थांनीं रामाच्या महोत्सवाच्या कार्यक्रमाची योजना सुरू केल्यावर सामान्य जनतेची भक्ति रामाचे ठायीं दृढ होण्यास्तव श्रीरामाच्या मूर्तीची स्थापना होणें, त्यांच्या ध्येयास पोषक व आवश्यक अशी गोष्ट, शिल्लक राहिलें होतें. अनपेक्षित रीतीनें ही गोष्ट त्वकरच घडून आली. अंगापुरचे डोहात त्यांना श्रीरामाची एक मूर्ति प्राप्त झाली. या मूर्तीची त्यांनीं चाफळ येथें स्थापना करून चाफळ खोऱ्यातील वजनदार पुढारी लोकाकडून श्रीरघुनाथदेवाची " भक्ती परंपरा करावी सर्व साह्यता करावी कानुकानुजाती यानेंत होऊ न द्यावी सर्वस्वेंशीं साहे असावे " अशा श्रीदेवाच्या पुण्यावर हात ठेवून, शपथा घेवविल्या. श्रीरामावताराच्या पुनरावृत्तीच्या कल्पनेचा प्रत्यय महाराष्ट्रातील सामान्य लोकास येण्यास्तव या गोष्टी समर्थांकडून घडून चाफळ येथील अधिष्ठित केलेल्या श्रीरघुनाथ देवाचा महोत्सव साल दरसाल वृद्धिंगत होत चालला, व महाराष्ट्रांतील दूरदूरचे लोक या महोत्सवानिमित्त साल दरसाल चाफळ येथें जमू लागले.

महोत्सवाकरिता केवढा मोठा जनसमुदाय लोटत असे, याची तत्कालीन उपलब्ध झालेल्या साधनाचे आधारें आम्ही किंचित् कल्पना देतों 'रामदास आणि रामदासी माले 'च्या नवव्या भागातील जे उतारे सुरुवातीस आम्हीं दिले आहेत, त्यांत महाराष्ट्रदेशांतील अनेक ठिकाणाहून सिंहासनें घेऊन हजारों लोक चाफळास श्रीरामाच्या महोत्सवास येत असत असें नमूद केलेलें आढळतें समर्थांचे चरित्रकार गिरिधरस्वामी ( ज्यांनीं हे महोत्सव स्वत डोळ्यांनीं पाहिले होते ) त्यांनीं 'समर्थप्रताप' ग्रंथात चाफळ येथील श्रीरामनवमीमहोत्सवानिमित्त गोळा होणाऱ्या महाराष्ट्रांतील लोकसमूहाचें तपशिलवार व माहितीपूर्ण वर्णन केलें आहे-त्यावरून श्रीरामाच्या महोत्सवानिमित्त महाराष्ट्रातील लोकांचा केवढा मोठा जन

समूह जुळत असे, समर्थशिष्यांपैकीं कोणकोणते शिष्य हा जनसमूह एकत्रित करून आणीत असत व या एकत्रित झालेल्या जनसमूहात कोणत्या कल्पनाचा प्रसार करण्यात येत असे, इत्यादि मुद्यांविषयींची अत्यंत विश्वसनीय व उत्तम माहिती आपल्यास उपलब्ध होत आहे.

चाफळ येथील श्रीरामाचा महोत्सव समर्थ कोणत्या हेतुस्तव करीत, याचें दिग्दर्शन गिरिधरानीं खालील ओव्यात केलेलें आहे.

स्वधर्मरक्षणीं प्रेम ज्यासी महोछायाचे ।
रामोपासक गिरी बाळक शरणागत त्याचे ॥

ज्या स्वधर्मरक्षणास्तव चाफळ येथील श्रीरघुनाथदेवाचा महोत्सव करण्याचें समर्थांना प्रेम वाटे, त्या सवधाचा खुलासा गिरिधरानीं अनेकदा केला आहे. संकेतरामायणातील एकच उतारा देतों :

ब्राह्मणाच्या कार्याकारणें । अवतार घेतले नारायणें ।
म्हणोनि मातें आज्ञा देणें । द्विजां रक्षणें उचित ॥ १-९-२२
देवब्राह्मण अग्निपूजनें । नाना योग याग व्रतें दानें ।
नाना तपे तीर्थाटणें । मातें रक्षणें उचित ॥ २३
नाना पुरश्चरणें अनुष्ठानें । नाना योग नाना साधनें ।
आत्मचिंतनें स्वानंदभुवनें । स्वधर्म रक्षणें उचित ॥ २४
ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण जेथें । सर्व सांडोनि धांवणें तेथें ।
नाना वैष्णवी माया भक्तजनातें । क्षणीं बाधील म्हणूनियां ॥ २५
नाना षट्कर्में चालती जनीं । विध्योक्त क्रिया आचरती मनीं ।
ब्रह्मसंपन्नीं स्वानंदभुवनीं । नवविधा भजनीं तत्पर ॥ २६
निःकामभजनें सर्वस्वत्याग । भजनिमित्य मांडिती योगयाग ।
आत्मचिंतनें भवस्वर्गभोग । तुच्छ करिती स्वानंदें ॥ २७
ऐसें योगी दुर्लभ जगीं । धुंडित चालिले वीतरागी ।
ऐसया कारणें मजलागीं । अवतार घेणें निर्धारें ॥ २८
पूर्वीं स्तिका गृहीं दिधलें दर्शन । मातें तुजला असेल स्मरण ।
सुरसाधुधर्मधरारक्षण । करावया मी अवतरलों ॥ २९
एवं धर्मस्थापनाकारणें मातें । रायें दिधलें मखरक्षणातें ।
अग्निब्राह्मण आमुचीं दैवतें । आज्ञा देई सिद्धाश्रमा ॥ ३०
( स. प्र. अनुक्रमणिका पान ४८ )

याचप्रमाणें खुद्द श्रीसमर्थहि मानचक्रांतील पहिलें मान उतरून घेण्यासारखें आहे. तें वाचकांनीं अवश्य विचारांत घ्यावें. या सर्व ठिकाणीं रामराज्य, धर्मराज्य, देवाब्राह्मणांचें राज्य, स्वधर्मराज्य इत्यादि शब्दांत अंतर्भूत होणाऱ्या अनेक बाबींविषयींची माहिती महाराष्ट्रीय जनतेस समर्थांचे शिष्य करून देत व त्यांचीं मनें छत्रपति शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेस अनुकूल करून घेत.

लोकीं लोक मेळविले । तेणें अमर्याद जाले ।
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥

या उक्तींत दर्शविल्याप्रमाणें रामराज्याचा विस्तार महाराष्ट्रांत व्हावा, अशी तीव्र इच्छा बाळगणारे असंख्य लोक चाफळ येथें होणाऱ्या श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवांत निर्माण होऊं लागले.

श्रीरामचरित्र समर्थांनीं अनेक ठिकाणीं वर्णिलेलें आपणास आढळतें. या वर्णनाचा एक विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आपणांस आढळतो. रामचरित्रांतर्गत प्रसंगांचें वर्णन समर्थ करीत असतां तत्कालीन घडत असलेल्या प्रसंगाचेंच ते वर्णन करीत आहेत, असा भास होतो. अशाल्या प्रकारच्या वर्णनाचा एक उत्कृष्ट नमुना खालीं दिला आहे.

राम हा देव देवाचा । देव प्रत्यक्ष सोडिले ।
गाजली गोष्ट वैकुंठीं । माजली सचराचरीं ॥ स्फु. प्र. ६४ १
वदींचे सोडिले देव । आनंदीं धावले सदा ।
कष्टले लोक देवाचे । त्यावरी फीरला दिसे ॥ २
रावणु तर्टकु मोठा । त्रैलोक्य पीडिलें चळें ।
पीडिले पाळिले सर्वें । रामच्याप्रपंचानें ॥ ३
मातले हस्त ते मोठे । तुरुंगें गोयलें बहु ।
चौताळला राम तेथें । वडांती राक्षसें किती ॥ ४
धपेटी लपेटी दाटी । लाटालाटी करीतसे ।
मातले दैत्य ते मोठे । आन्याय करितां बहु ॥ ५
धर्डिले चिर्डिले राजे । गागावो रणदेवता ।
देव रुसी मुनी योगी । तापसी बहुतापसीं ॥ ६
तुंबरु नारदादीक । देव मृदंग वाजवी ।

गाजवीतो ध्वनी नाना । दुर्जना लाजवीतसे ॥ ७
प्रस्तुत कोपला देवो । देवद्रोही पुरे पुरे ।
सर्वही चालिल्या फौजा । सेनामार परोपरीं ॥ ८
देव तो चेतला आहे । मडसा पुर्वीतसे ।
काये होईल पाहावे । राहावे सुखभुवनीं ॥ ९

या वर्णनांपैकीं " प्रस्तुत कोपला देवो " या वाक्यांतील देवो हा शब्द समर्थांनीं शिवाजीमहाराजास अनुलक्षून योजल्याचें उघड दिसतें.

महाराष्ट्रांत विद्यमान असलेल्या आदिलशाही राजकीय सत्तेचा विध्वंस करून तिचे ठायीं रामराज्यरूपी स्वराज्याची स्थापना करण्याकरितां जी क्रांति शिवाजीमहाराज व समर्थ रामदास घडवून आणीत होते, तिच्या समर्थअंगीकृत बाजूचें स्वरूप येथपावेतों स्पष्ट करून दाखविलें.

आतां समर्थांचे शिष्य त्यांनीं अंगीकारिलेल्या बाजूची उपासना कोणत्या पद्धतीनें करीत, याचा बोध श्रीरामदासाची कविता–स्फुट श्लोक ३९, ४० व ४१ यावरून होत आहे.

शिवकालीन महाराष्ट्रांत वर दर्शविल्याप्रमाणें क्रांति घडवून आणण्यास्तव समर्थांचा एक गुप्त पंथ होता, असें

अखंड गुप्त पंथ हा । चतुर हो पाहा पाहा ।

वगैरे स्फुट श्लोक ३८ यावरून दिसतें.

समर्थांच्या गुप्त पंथाच्या वरील वर्णनांतील शब्द समजण्यास कठीण नाहींत; परंतु त्यांच्या अंतर्गत असलेला समर्थांचा आशय प्रस्तुत आपल्या प्रत्ययास येणें दुरापास्त झालें आहे. वरील काव्यांतील

गुणीच गोविले गुणी । विशेष राजकारणी ।
बहुत रंग रंगिणी । तरंगिणी तरंगिणी ॥ ४०-२

या वाक्यावरून राजकारणाशिवाय अन्य गोष्टीहि साध्य करण्याचा हेतु या गुप्त पंथाचा असावा असें दिसतें, परंतु राजकारण सिद्ध करण्याकरितां गुणी लोक मिळवून एकत्र करणें, हें या पंथाचें प्रमुख धोरण होतें असें दिसून येतें.

येथपावेतों केलेल्या विवेचनावरून चाफळ येथें दरसाल होणारा श्रीरघुनाथदेवाचा महोत्सव छत्रपति शिवाजीमहाराजांकडून स्थापण्यांत आलेल्या रामराज्यरूपी स्वराज्याचे प्रसारास किती उपकारक होत असे, हें स्पष्ट झालें आहे. ही

गोष्ट लक्षात घेतली असतां शिवाजीच्या स्वराज्यास उपकारक होणाऱ्या या महोत्सवास जसजसें अधिक द्रव्यसाहाय्य करावें तसतसें तें राज्य वृद्धिंगत होत जावें हें स्वाभाविकच होतें. छत्रपति शिवाजीमहाराजांच्या काळीं विद्यमान असलेले त्याचे चरित्रकार गिरिधर यांनीं वरील आशीर्वादरूपी वाक्यातील आशय निराळ्या शब्दात पुढील ओवींत दर्शविला आहे.

> जंव जंव शिवराज्य वर्धमाने । तंव तंव रामभजनासी ग्रामप्रदानें ।
> राजा महाराम अनुसंधाने । राज्यश्रिया विराजित ॥

गिरिधरांनीं या ओवींत शिवाजीचें राज्य जसजसें वृद्धिंगत होत चाललें तसतसीं शिवाजीमहाराजांकडून श्रीरघुनाथदेवाच्या महोत्सवास ग्रामप्रदानें मिळत गेल्याची त्याना ज्ञात झालेली गोष्ट नमूद केली असून, ती वरील आशीर्वादरूपी वाक्यांतर्गत आशयाच्या सत्यतेस अप्रत्यक्ष रीतीनें बळकटी आणीत आहे.

प्रस्तुत निबंधात ज्या मुद्द्याचें आम्हीं विवेचन केलें आहे, त्याची सत्यता वाचकांस पटवून देण्याच्या हेतूनें हा निबंध समाप्त करण्यापूर्वी गेल्या चवदा पंधरा वर्षांत भरतखंडांत घडलेल्या ताज्या इतिहासाचें चित्र क्षणभर डोळ्यांसमोर आणून त्याची मीमांसा आपल्या मनात करण्याविषयीं वाचकास विनवितों. एखाद्या श्रेष्ठ, लोकोत्तर व अधिकारी अशा पुरुषानें एखादें तत्त्व भारतीय जनतेपुढें मांडल्यास त्याचे योगानें अल्प काळात जनता वरी मारून जाऊन कल्पनासृष्टींत न येणाऱ्या गोष्टी मूर्तिमंत सर्व देशभर कशा घडून येतात, याचा अगदीं ताजा प्रत्यय आपणां सर्वांस उत्तम प्रकारें आला आहे. हा प्रत्यय आपण आपल्या ध्यानात बाळगून मी आतापावेतों केलेल्या विवेचनांतर्गत विचारसरणीकडे वाचक पहातील तर मी या निबंधात वरील आशीर्वादरूपी वाक्याच्या केलेल्या मीमांसेची सत्यता सर्वांना पटल्यावेरीज रहाणार नाहीं असें मला वाटतें.

समर्थ आणि छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या ठिकाणीं वसत असलेली श्रद्धा प्रस्तुत काळीं पाश्चात्य शिक्षणानें विभूषित असलेल्या आपल्यापैकीं ज्या थोड्या लोकांच्या ठायीं वसत असेल ते खेरीज करून ज्यांची निव्वळ तार्किक दृष्टि आहे त्यांच्या बुद्धीस पटणारा असा कार्यकारणसंबंध, "चढता वाढता श्रीदेवाचा उत्सव चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल" या समर्थांनीं शिवाजीस सांगितलेल्या आशीर्वादरूपी वाक्यात कोणत्या स्वरूपाचा आहे, याविषयींचें आम्हीं केलेलें हें विवेचन समर्थचरणीं अर्पण करून हा निबंध समाप्त करितों.

( २२ )

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

# श्रीसमर्थांच्या सांप्रदायिक तत्त्वांचा प्रत्यक्ष प्रचार

हा च

# " अधोगामी भारताचा पुनरुद्धार "

( लेखक — श्री. वामनराव नाईकसाहेब, हैद्राबाद )

दास म्हणे आम्ही केलें पावलों । दयेसी नाहि सरी... श्रीसमर्थ

आपदि स्फुरति प्रज्ञा यस्य धीरः स एव हि... हितोपदेश

सतराव्या शतकाच्या आरंभीं परकीय आक्रमणाखालीं भरडल्या चिरडल्या जाणाऱ्या 'महाराष्ट्रभू'चें रक्षण करून म्हणजे आततायी दुष्टांचा संहार करून, " उदंड जाहलें पाणी । स्नान संध्या करावया ।" अशी सुस्थिति मुख्यतः ज्या दोन पुण्यश्लोक परमपवित्र थोर पुरुषांच्या दीर्घ प्रयत्नामुळें महाराष्ट्राला लाभली ते श्रीसमर्थ रामदासस्वामी व श्रीछत्रपति शिवाजीमहाराज हे होत. एक महाराष्ट्राचें ब्रह्मतेज होतें, तर दुसरें त्याचें क्षात्रतेज होतें. या दोन महापुरुषांनीं महाराष्ट्रावर केलेल्या उपकाराची जाणीव संमूढचेतन व परप्रत्ययनेय बुद्धि झाल्यामुळें महाराष्ट्र विसरला होता. मेंढराच्या कळपात राहिल्यामुळें स्वार्थी धनगराच्या शिकवणीनुसार सिंहाचा छावा देखील आपल्याला कुत्रा समजून त्या जातीच्या स्वाभाविक इमानी-पणामुळें सेवाधर्म पाळण्यांतच तो मोठेपणा मानूं लागला. पाश्चात्य संस्कृतिदूषित नवविचारांचें काहूर सर्वत्र उठल्यामुळें आमचे पूर्वज व त्यांची संस्कृति ह्यांत सर्वत्र दोषच भरले आहेत, असें आम्हांला वाटूं लागलें; तरी पण वादळाचा भर

ओसरूं लागला तसतशी आमची सारासारबुद्धि जागृत होऊन सत्यशोधनाकडे लोकांचें लक्ष्य लागलें व महाराष्ट्राच्या इतिहासाचें संशोधन सुरू झालें.

महाराष्ट्राचा खरा इतिहास व संस्कृति जनतेपुढें ठेवण्याचा प्रथम मान कै. महर्षि माधवरावजी रानडे व कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना आहे. Rise of the Maratha Power ह्या पुस्तकानें श्रीशिवछत्रपति व मराठे यांच्याविषयीं पुष्कळ दूषित ग्रहांचें निरसन झालें, तर कै. चिपळूणकरांच्या निबंधमालेनें महाराष्ट्रांत स्वाभिमानाचें नवचैतन्य ओतलें. पुढें लवकरच कै. लो. टिळकांसारखा कुशल व साहसी नेता मिळाल्यानें नुसत्या महाराष्ट्रीय मनाचीच नव्हे, तर अखिल भारतीयांची राजकीय आकांक्षा इतकी वाढली कीं, कै. लोकमान्यांच्या निशाणाखालीं संपूर्ण राष्ट्र " स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे " ह्या चतुर्दशाक्षरी महामंत्राचा एकसुरानें जयघोष करूं लागलें. श्रीसमर्थां प्रमाणें कै. लोकमान्यांच्या संप्रदायाची उभारणी शिस्तीच्या व उत्कट भावनांच्या पायावर झाली नसली तरी त्यांचेहि सांप्रदायी महंत साऱ्या हिंदुस्थानभर विखुरले होते. श्री. नानासाहेब देव हे त्यांपैकींच एक होत. सुदैवानें श्री. रा. नानासाहेबांच्याच परिश्रमानें सुमारें ४२ वर्षांपूर्वी 'सत्कार्योत्तेजक सभे'ची स्थापना झाली. श्रीसमर्थांचें चरित्र, त्यांची शिकवण, मठ वगैरे बाबतींत संशोधन करणें, हेंच विशेषतः या सभेचें धोरण असून, श्रीसमर्थवाङ्मयविषयक वरचेवर लिखाण २५।२६ ग्रंथद्वारा प्रसिद्ध करून, सभेनें महाराष्ट्राची फारच मोठी कामगिरी केली आहे. जुनें ऐतिहासिक वाङ्मय हा राष्ट्राचा अत्यंत अमोलिक ठेवा आहे, या दृष्टीनें तर या वाङ्मयाला महत्त्व आहेच, पण त्याहिपेक्षा जास्त महत्त्व आणखी एका दृष्टीनें सदर वाङ्मयाला आहे. आजच्याप्रमाणेंच ३०० वर्षांपूर्वी महाराष्ट्र हा हिंदुस्थानच्या इतर भागाप्रमाणें पारतंत्र्यशृंखलेनें बद्ध झाला होता. अशा वेळीं इतस्ततः विखुरलेल्या, अज्ञानांधकारांत खितपत पडलेल्या, दारिद्र्यानें नाडलेल्या महाराष्ट्रसमाजास सुसंघटित करून, नव्या " महाराष्ट्रधर्मा "ची शिकवण व शिस्त लावून स्वराज्याला पात्र करणाऱ्या श्रीसमर्थांची ही शिकवण काय होती, ह्याची संगति सत्कार्योत्तेजक सभेनें प्रकाशित केलेल्या ह्या वाङ्मयावरून लागते.

'History often repeats itself' ( इतिहासाची वारंवार पुनरावृत्ति होते ) ह्या नियमानुसार श्रीसमर्थसंस्थापित महाराष्ट्रधर्माची हीच शिकवण आजच्या बदललेल्या परिस्थितींतहि स्वराज्यसाधनाच्या आमच्या प्रयत्नांत

आम्हांला मार्गदर्शक झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ही कशी होईल हें सांगण्या-पूर्वी श्रीसमर्थपूर्वकालीन व समकालीन देशपरिस्थिति व सद्य परिस्थिति ह्यातील साम्य दाखविणें व श्रीसमर्थांनीं तत्कालीन परिस्थितीवर विजय मिळविण्या-करितां पूर्वतयारी कोठें, किती व कशी केली, याचें विवेचन करणें अप्रासंगिक होणार नाहीं.

श्रीसमर्थकालीं व त्याच्याहि पूर्वी नुसत्या महाराष्ट्रावरच नव्हे तर साऱ्या हिंदुस्थानभर म्लेंच्छ राजसत्तेची "अस्मानी सुलतानी" पूर्ण जोरात होती. हिंदूंच्या बायका, जीवित अगर मालमत्ता सुरक्षित नव्हतीं. 'हम करेसो कायदा' हीच मुख्यत्वेंकरून परकी सत्ताधिकाऱ्याची राजनीति होती. आप आपसातील दुहीमुळें व राष्ट्रीय स्वाभिमानाच्या अभावामुळें मूठभर परकीयांच्या सत्तेपुढें अफाट हिंदुसमाजाला मान वांकवावी लागली. मोठमोठे प्रबल हिंदु सरदार केवळ ताटाखालचीं मांजरें बनले होते. Lick above and kick below (वरिष्ठाच्या पदीं माथा व कनिष्ठा अखंड लाथा) हा एक प्रकारचा शिष्टसंमत जीवनक्रमच बनला होता. परकी राज्यकर्त्यांची शक्ति Divide and Rule या धोरणानें वागण्यात असते, हेंच तत्त्व त्या वेळच्या मुसलमान सत्ताधिकाऱ्यांनीं आपल्यासमोर ठेविलें होतें. तरी पण मुसलमान पादशहा सुधारलेले नसल्यामुळें हिंदु समाज व हिंदु धर्म यावरील त्यांचें आक्रमण उघड उघड असे. हिंदु धर्माचा तो वनवासकाल होता. आज हिंदु धर्माला अज्ञातवास प्राप्त झाला आहे. पांडवांच्या वनवासाप्रमाणें ६०० वर्षांच्या दीर्घ वनवासकालात हिंदु समाजाचें शरीर बरेंच खिळखिळें झालें तरी त्यातील धर्माभिमान जागृत होता, व 'आघातप्रत्याघाता'च्या नियमानुसार तो उलट जास्तच वाढला. ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव वगैरे साधुसंतांनीं 'धर्मत्यागापेक्षा प्राणत्यागहि श्रेयस्कर' अशी मनोभूमिका तयार केली. आज अज्ञातवासात असलेला हिंदु समाज वरपांगी तुकतुकीत दिसत असला तरी, त्याच्यातील धर्मभावनेचा जिवंतपणा नाहींसा झाला आहे. आज धर्मासाठीं प्राणत्याग तर दूरच राहिला, पण क्षुल्लक वैषयिक सुखाचा थोडासाहि त्याग करण्याच्या अनिच्छेमुळें स्वैर अधर्माचरणालाच धर्माचें स्वरूप देण्याकरितां आधुनिक मनुस्मृति निर्माण करण्याची इच्छा वाढू लागली. स्वैराचार हाच खरा धर्म अशी नवी शिकवण शिकविणारे सतमहंत पावसाळ्यातील दुतोंडी सर्पाप्रमाणें जिकडे तिकडे निर्माण होऊं लागले आहेत.

नवमतवादाच्या या पयोरुची मायेनें हिंदु समाजातील धार्मिक भावनांचा कडवेपणा नाहींसा झाला आहे. "ज्यूलियस सीझर" नाटकात मार्क अँटनीनें म्हटल्याप्रमाणें स्वैराचाराचें हें पिशाच्च पाश्चात्य संस्कृतीनें आमच्या समाजात मोकाट सोडलें आहे व त्यामुळें सारा समाज अधोगतीकडे चालला आहे. श्रीसमर्थकालीन परिस्थितीपेक्षाहि आजची परिस्थिति अधिक चिंताजनक आहे; परंतु त्यावर उपाय सुचविण्यापूर्वी श्रीसमर्थांनी तत्कालीन परिस्थितींतून कोणती पूर्वतयारी केली व उपाय योजले तें आधीं पाहूं.

वयाच्या १२ व्या वर्षी श्रीसमर्थ आत्मिक उद्धाराकरिता घर सोडून निघाले ते टाकळींत येऊन तेथें त्यांनीं १२ वर्षे अत्यंत खडतर तपश्चर्या केली. वयाच्या ११ व्या वर्षी "आई चिंता करितों विश्वाची" ही मनाची तयारी असणाऱ्या श्रीसमर्थांचें आत्मिक बल या १२ वर्षांच्या तपश्चर्येनें

हेळामात्रें मुक्त करीन या जना। तरी च पावना राघवाचा॥

इतका आत्मविश्वास उत्पन्न होण्याइतकें वाढलें असल्यास नवल नाहीं. वयाच्या २४ व्या वर्षी या वयांत आमचे आजचे बी. ए., एम. ए. विद्याविभूषित तरुण स्वोदरपूर्तीकरिता देशभर हिंडत फिरत असतात. त्या वयात स्वतःकरिता मिळवावयाचें असें कांहींच राहिलें नसताहि केवळ राष्ट्रोद्धाराच्या इच्छेनेंच श्रीसमर्थांनीं १२ वर्षे तीर्थाटणाचा कार्यक्रम आखला. परकीय जुलुमाला सर्वच कंटाळले होते. दासोपंतासारख्या कित्येकांनीं त्याचा जो धार्मिक छळ झाला त्याला कंटाळून वैतागानें परमार्थाची वाट धरिली पण श्रीसमर्थांनीं जें इतर कोणीं केलें नाहीं, इतकेंच नव्हे तर जें करण्याची नुसती कल्पनाहि कोणाला सुचली नाहीं, तें कार्य अंगावर घेऊन यशस्वी रीतीनें पार पाडलें व यातच त्यांचें "समर्थपण" आहे. आपल्या म्हणण्याची छाप समाजावर पडेल इतकें सामर्थ्य प्राप्त झाल्यावरच त्यांनी देशपर्यटनाला सुरुवात केली होती. प्रखर वैराग्य, निःसंगपण, प्रेमळ वृत्ति, निस्पृहपणा, वैयक्तिक सुखाविषयीं पूर्ण उदासीनता, बोलल्याप्रमाणें कृति करण्याचा करारीपणा, अचाट धोरण, साक्षेप, विनयपूर्ण वर्तन वगैरे एक एक गुणाच्या जोरावर मनुष्याला पुढारीपण मिळतें; मग ह्या सर्व गुणसमुच्चयाचें निधान असलेल्या श्रीसमर्थांची छाप ते जातील त्या ठिकाणीं पडून आपल्या कार्याला बळकटी आणणारे मठ त्यांना ठिकठिकाणीं स्थापन करता आले यात नवल नाहीं. कोणत्याहि ठिकाणीं मठ स्थापन करण्यापूर्वी तर काय, पण साधा ग्रामप्रवेश करण्यापूर्वीहि

तो किती सावधपणानें करावा यासंबंधीं श्रीसमर्थांनीं जे नियम घालून दिले आहेत, त्यावरून त्यांच्या दूरदृष्टीची व मठस्थापना करतांना त्यांनीं घेतलेल्या खबरदारीची कल्पना येते. श्रीसमर्थ नुसते तीर्थस्नान करण्यास अगर देवदर्शन घेण्यास गेले नव्हते; स्वधर्म व स्वराज्यस्थापनेच्या कामाकरितां योग्य माणसें निवडून काढून त्यांना सांप्रदायिक दीक्षा देण्याचें काम करून त्याचेकरितां मठस्थापना व कार्याची दिशा आखून देणें हीं कामें त्यांनीं केलीं. महंताची ही परंपरा तुटून खंड पडूं नये म्हणून

महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखरावे । नाना देशीं ॥ ११-१०-२५

हा दंडक घालून दिला.

समर्थानें समर्थ करावे । तरी च समर्थ म्हणवावें ।

तसेंच

हिंडतां पारखी लोकां । कार्यकर्ता जिवीं धरी ॥

या उक्तिप्रमाणें कार्यकर्ते हुडकून काढून त्यांच्यात नवचैतन्य भरून त्यांना कार्यप्रवण केलें. ' उदंड बाजारी मेळवून ' कार्य सिद्धीस नेण्याचा विचारहि त्यांनीं मनात आणिला नाहीं. श्रीसमर्थांची माणसांची निवड इतकी योग्य होती कीं, श्रीसमर्थनिर्मित महंतांत दगाबाजीचें एक देखील उदाहरण नाहीं. महंतांवर कार्य सोंपवून समर्थ स्वस्थ कधींच बसले नाहींत, तर ज्याला जें काम नेमून दिलें तें त्याच्याकडून व्यवस्थितपणें पार पडलें किंवा नाहीं हें पहाण्याविषयीं ते अखंड दक्ष व जागरूक असत. ज्या विजयानीं नेपोलियननें जगाला थक्क करून सोडलें त्या विजयाचें मर्म त्याच्या एका चरित्रलेखकानें असें दाखविलें आहे कीं, नेपोलियन रणक्षेत्रावर असता निरनिराळ्या हुकुमांचीं सुमारें २०० पत्रें रोज लिहीत असे. या हुकुमांपैकीं प्रत्येक हुकूम अक्षरशः पाळला गेल्याविषयींची तो स्वतः खात्री करून घेत असे. परंतु वॉटर्लूच्या क्रांतिकारक लढाईत ही प्रथा त्याचा उजवा हात— Bravest of the Brave असा जो मार्शल ने त्यानें मोडली. Quartér Brass ची टेंकडी हस्तगत होण्यापूर्वी तीन तास ती हस्तगत झाल्याचें त्यानें नेपोलियनला कळविलें. त्याची पक्की खात्री करून न घेता विश्वास ठेवल्यामुळें व मार्शल ग्राउचीच्या विश्वासघातामुळें वॉटर्लूच्या लढाईत नेपोलियन हरला. श्रीसमर्थांच्या सांप्रदायिक महंतांत एकहि मार्शल ग्राउची

निघाल्या नाहीं ह्याचें पुष्कळसें श्रेय श्रीसमर्थांकडेच होतें. घालून दिलेली शिस्त महंत पाळतात किंवा नाहीं यावर श्रीसमर्थांची फार करडी नजर असे. शिस्त मोडणारा महंत असला तरी त्याला योग्य ती कडक शिक्षा करण्यासहि श्रीसमर्थ चुकत नसल्यानें दूरदूरच्या महंतांवरहि त्यांचा दरारा असे. 'यत्न तो देव जाणावा' त्याप्रमाणेंच तो यत्नहि 'अचूक यत्न तो देवो' असा असावा, हा समर्थांचा दंडक होता. स्वतःच्या कसोटीला पूर्णपणें उतरलेल्या मुख्य मुख्य माणसांना 'धुरा करून' त्यांच्यावर सर्व जबाबदारी टाकल्यामुळें कार्यहानि तर झाली नाहींच, उलट श्रीसमर्थांनीं आपल्याला विश्वासांत घेतलें, याचा अभिमान बाळगून ह्या असल्या धुरीणांनीं आपल्यावरची जबाबदारी अपेक्षेबाहेर चोख रीतीनें पार पाडली म्हणून आग्र्याचें राजकारण, पन्हाळ्याचें राजकारण, वगैरे मसलती या कानाच्या त्या कानाला न कळता पार पडल्या. फलानुमेया प्रारंभाः हें तर राजकारणी पुरुषाचें वैशिष्ट्य आहे. धुरीणपणाच्या मोठेपणाचा मान मिळाल्या-मुळें याच धुरीणांनीं पुढें स्वसामर्थ्यानुसार आपल्याभोंवतीं "उदंड बाजारी" मिळवून फार प्रचंड खटाटोप केला म्हणूनच महाराष्ट्रधर्म इतक्या लवकर सर्वत्र पैलावला, व त्याचा बभ्रा सचक ढसला. नुसत्या उदंड बाजारींच्या हातीं मुख्य काम सोंपविलें असतें तर श्रीसमर्थांच्या कार्याचाहि १९२१ च्या असहकारितेच्या चळवळीप्रमाणेंच बोजवारा उडाल्याशिवाय रहाता ना. 'खर आणि साखर' प्रकरणात व इतर कित्येक प्रसगीं दिसून आलेली लोकमान्यांची बुद्धि व माहिती गोळा करण्याचें कौशल्य कमी दर्जाचें नव्हतें, पण कडक शिस्तीच्या अभावीं त्यांचे महंत तितके कार्यप्रवण होऊं शकले नाहींत व त्यांचे गैरहजेरींत त्यांची चळवळ पुन्हा शून्यवत् झाल्याचें दिसून आलें. उत्कट भावनेशिवाय चळवळ नाहीं व चळवळीशिवाय सामर्थ्य नाहीं हें खरें, पण ह्या चळवळीला भगवंताचें अधिष्ठान नसेल तर ती चळवळ प्रसरप्रतापी व दीर्घजीवी होऊच शकत नहीं, असा इतिहासाचा अनुभव आहे. श्रीभगवंताच्या अधिष्ठानाच्या आधारावर समाजाची धार्मिक भावना जागृत करून सर्व समाजाचें राष्ट्रकार्याकरिता एकीकरण झालें तर किती प्रचंड कार्य होतें, हें जोन ऑफ् आर्कच्या उदाहरणावरून स्पष्ट होतें. जोन ऑफ् आर्कनें फ्रान्समध्यें केलेल्या कार्यातील तत्त्व व श्रीसमर्थांच्या राजकारणातील 'वन्ही चेतवितांच चेततो' हें तत्त्व मूलत एकच, पण श्रीसमर्थांचें राजकारण जास्त भरींव व मकम पायावर होतें म्हणून जोन ऑफ् आर्कप्रमाणें श्रीसमर्थांच्या

राजकारणाला धूमकेतूप्रमाणें अल्पकालच टिकणारें यश मिळालें नाहीं, तर तें कायम टिकणारें असें मिळालें.

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११-५-४
चौथा अत्यंत साक्षेप ।

ह्या आपल्या सांप्रदायिक चतुःसूत्रीची उघड उघड घोषणा करूनहि त्यांनीं आपल्या प्रत्येक चळवळीला धार्मिक सदाचाराची शिस्त व स्वरूप दिल्यामुळें व मुख्य राजकारणाच्या बाबतींत अत्यंत गुप्तपणा राखिल्यामुळें उघड उघड त्यांची चळवळ दडपून टाकणें त्या वेळच्या राजसत्तांच्या शक्तीबाहेरचें ठरलें.

उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।
तेथें वेश्यकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥

हा खुद्द श्रीसमर्थांनीं आपल्या स्वानुभवाचा समर्पित रोकडा दाखला दिला आहे. श्रीसमर्थ श्रीशिवछत्रपतींचे गुरु होते ही गोष्ट अगदीं साधी पण शक १५९४ मध्यें श्रीछत्रपतींना अनुग्रह झाल्यानंतर २४ वर्षांनीं एक श्रीसमर्थ-शिष्य दुसऱ्या गुरुबंधूला लिहीत असतांना पत्रोपत्रींदेखील इतकी सावधगिरी घेत कीं, त्या नुसत्या पत्रावरून श्रीसमर्थ हे छत्रपतींचे गुरु होते, अशी कोणालाहि कल्पना येणार नाहीं. यावरून श्रीसमर्थांच्या सखोल राजकारणाची व गुप्त व्यापाची कल्पना येईल. इतक्या कडक रीतीनें गुप्तपणा राखला गेला म्हणूनच त्यांच्या कोणत्याहि कार्याला अपयशाचा डाग कधींहि लागला नाहीं. समाजाच्या धार्मिक भावना जागृत करून स्वधर्माकरता, स्वराष्ट्राकरिता वाटेल तो त्याग करण्याची पूर्वतयारी गुप्तरूपानें — अर्थात् हरिकथानिरूपणद्वाराच — झाल्यावर प्रत्यक्ष कार्यास सुरुवातीपासून एकसारखें यश मिळत गेलें यात काहीं नवल नाहीं. धार्मिक भावना व बंधनें यांनीं एकवटलेल्या अगदीं चिमुकल्या समाजावर देखील पारतन्त्र्य लादणें फार कठीण जातें. मूठभर लोकांनीं ३५ कोट लोकसंख्येच्या अफाट प्रदेशावर सहा हजार मैलांवरून निर्वेध सत्ता गाजवावी याचें सान्या जगाला आश्चर्य वाटतें; पण हिंदुस्थानांतील आपआपसांतील दुही व उत्कट धार्मिक भावनांचा अभाव यांचा ज्याला परिचय असेल त्याला या दृश्याचें आश्चर्य वाटणार नाहीं.

हरिकथानिरूपणाचा हा गुप्त राजकारणी संप्रदाय काढल्यावर त्याच्या योग--

क्षेमाची सोय करून तो वाढविण्याची तजवीजहि श्रीसमर्थांनीं करून ठेविली. 'संहतिः कार्यसाधिका'—दसकी लकडी एकका बोजा—या तत्त्वानुसार संप्रदायाच्या धारणापोषणाची जबाबदारी त्यांनीं जनतेकडे सोंपविली. भिक्षा ही श्रीसमर्थसंप्रदायाची मुख्य दीक्षा असली तरी तें सांप्रदायिकाचें नुसतें निर्वाहापुरतें साधन होतें. ही भिक्षा देखील निस्पृहपणें मागणें, अधिक दिली असता फक्त 'मुष्टि एक' घेणें, नित्य नूतन हिंडून भिक्षामिषें लहान थोर लोक पारखून सोडणें, ठिकठिकाणच्या 'मुलद' लोकांच्या ओळखी करणें, वगैरे अनेक निर्बंध त्या भिक्षेवर होते. ऐदीपणानें, संसारतापाला कंटाळून करण्यात येणाऱ्या भिक्षान्नाचा श्रीसमर्थांनीहि धिक्कारच केला आहे ( ओव्या शत. ११-३८ ). आपल्या संप्रदायाला ह्याप्रमाणें भिक्षेची जोड देऊन तो त्यांनीं अत्यंत स्वावलंबी व निःस्पृह केला म्हणूनच त्याचें स्वकीय-परकीय लोकांवर वजन पडलें.

संप्रदायाची चतुःसूत्री य रूपरेखा ह्याप्रमाणें आखल्यानंतर व सांप्रदायिकाच्या योगक्षेमाची व्यवस्था लावल्यानंतर सांप्रदायिकाची निवड कशी करावयाची तें ठरवून त्याच्याकरिता श्रीसमर्थांनीं शिकवणहि तयार करून ठेविली. ती शिकवण येथें संक्षेपतः देऊन त्या शिकवणीचा व सांप्रदायिक तत्त्वाचा सद्यःपरिस्थितींत कसा उपयोग करावयाचा हें आता दाखवावयाचें आहे.

श्रीसमर्थसांप्रदायिक शिकवण श्रीसमर्थांच्या लिखाणात जागोजाग आढळून येते. त्यापैकीं एकाच जागीं एकन अर्थीं २० लक्षणें दिलेलीं आहेत. त्यांतील ( १ ) लिहिणें, ( २ ) वाचणें, ( ३ ) अर्थांतर सांगणें, ( ४ ) आशंकानिवृत्ति—संशयरहित मन होणें, ( ५ ) रोकडी प्रचीति अनुभवणें, ( ९ ) अर्थभेद समजणें, ( १० ) प्रबंध, लेखन व ( ११ ) प्रबोध या लक्षणावर श्रीसमर्थांना आपल्या संप्रदायात सुशिक्षित लोकांचाच समावेश करून घेणें इष्ट होतें, नव्हे अवश्य होतें. आजहि कोणतीहि सुधारणा करण्याची इच्छा असल्यास समाज प्रथम सुशिक्षित असला पाहिजे. तो सुशिक्षित करावयाचा म्हणजे कार्यकर्त्यांनीं, आधुनिक सांप्रदायिकांनींहि सुशिक्षित असणें अवश्य आहेच. नुसतें सुशिक्षित असून भागत नव्हतें; त्या शिक्षणाला ( १२ ) वैराग्य व ( १३ ) विवेक यांची जोड असावी लागे. अशा तऱ्हेचा योग्य मनुष्य असल्याबद्दल खात्री पटल्यावरच त्याला पुढील ( १४ ) लोक राजी राखणें, ( १५ ) राजकारण, ( १६ ) अव्यग्रता व ( १७ ) प्रसंगावधान ह्यांची दीक्षा देण्यात येई. ह्या शिकवणींत आपआपल्या सामर्थ्यानुसार

तयार झाल्यावर ( १८ ) उदासीन व ( १९ ) सर्वाभूतीं समान वृत्ति व या सर्वांचा मेरुमणीच अशी ( २० ) रामउपासना या तयींच्या जोडीला ( ६,७,८ ) गाणें, नाचणें, टाळी वाजविणें ह्यांची भर घालून, " भक्तिरंगें जना वेध लावण्याकरितां " जगाच्या खुल्या बाजारात सांप्रदायिकाला मोकळा सोडीत. रामनाम-युनिव्हर्सिटींतील हा एम्. ए. आजकालच्या एम्. ए. सारखा शरिरानें अशक्त व मनानें दुबळा, दरमहा ४०।२० रुपयांकरितां वाटेल त्याच्यापुढें Your most humble ( and tumbled down ) servant, Sir, म्हणून मान वाकविणारा नव्हता. आपल्या धर्माकरिता–राष्ट्राकरिता–त्यानें सर्व सुखावर पाणी सोडलें होतें. समाजावर प्रत्येक घरीं एक एक मूठ याप्रमाणें चरितार्थास अगदीं अवश्य इतक्याच अन्नाचा त्याचा भार असे, व तें अन्न निःस्पृहपणें मिळवून आपलें सर्व आयुष्य तो त्याच समाजाच्या सेवेंत घालवीत असे. त्यामुळें कोणाचाहि मिंधा नसलेला हा सांप्रदायिक साहजिकच अत्यंत निर्भय वृत्तीचा व उत्साहपूर्ण असे.

सांप्रदायिक शिकवणींत ह्याप्रमाणें उत्तीर्ण झाल्यावर जनताजनार्दनसेवाकार्यालयात सांप्रदायिकाचा प्रवेश होत असे. ह्या ठिकाणींहि त्याला ( १ ) परिभ्रमण, ( २ ) चाळणा, ( ३ ) दीर्घोद्योग, ( ४ ) जीविताविषयीं अनासक्ति, ( ५ ) कीर्तीची स्पृहा, ( ६ ) नम्र व गोड वर्तन, ( ७ ) क्षमा, ( ८ ) परोपकार, ( ९ ) उत्कट भक्ति, वगैरे दिव्यातून पार पडावें लागे. श्रीसमर्थांचा महंत म्हणविणाऱ्या प्रत्येकाच्या अंगीं वर नमूद केलेलीं बहुतेक सर्व लक्षणें असत.

श्रीसमर्थसंप्रदाय व त्याची शिकवण ह्याचें ह्याप्रमाणें अगदीं थोडक्यात वर्णन आहे. याशिवाय "वर्तायाचे" नियम वगैरे पुष्कळच आहेत; पण विस्तारभयास्तव ते सर्व येथें देणें शक्य नाहीं. आतां श्रीसमर्थसांप्रदायिक शिकवणींचा व तत्वाचा आजच्या परिस्थितींतहि समाजस्थिति सुधारण्यास कसा उपयोग होईल, हें संक्षेपतः दाखवून बाकीचें वाचकाच्या चाणाक्षपणावर सोंपवून बराच लांबलेला हा लेख पुरा करावा अशी इच्छा आहे.

श्रीसमर्थकालीन परिस्थिति व सद्य परिस्थिति यात साम्य पुष्कळ असलें तरी फरकहि बराच आहे. श्रीसमर्थांचें कार्यक्षेत्र मर्यादित होतें. तत्कालीन समाज आजच्याइतका नेभळा व स्वधर्माविषयीं उदासीन नव्हता. श्रीसमर्थकालीं जित व जेते जवळ जवळ तुल्यबळ होते, व जेत्यांची राजनीति देखील

सामान्य दर्जाची होवी. आज आम्हाला जगातील अत्यंत प्रबळ अशा राजसत्तेशीं "नेमस्त" व विष्टसंमत अशा मार्गांनीं झगडून आमचा स्वातंत्र्याचा जन्मसिद्ध हक्क प्रस्थापित करावयाचा आहे. कौटिल्यनीति, कणिकनीति, विदुरनीति, वगैरे सर्व सुप्रसिद्ध राजनीतिशास्त्रांनीं जिच्यापासून धडे घ्यावे इतकी परिणतावस्थेला पोहोंचलेली अशी ब्रिटिश राजनीति आहे. अशा परिस्थितींत नवीन समर्थसांप्रदायिकाला आपल्या तत्त्वाच्या वरशिलाहि परिस्थित्यनुरूप बदल करावा लागेल. समर्थसांप्रदायिक सुशिक्षित असला पाहिजे ह्या दृष्टकाची त्या वेळेपेक्षा आज फार तीव्र जरूरी आहे. शेंकडा ७।८ साक्षरांचें असलेलें प्रमाण वाढल्याशिवाय आजच्या जागतिक चढाओढींत हिंदुस्थान टिकणें शक्य नाहीं. राष्ट्राच्या अभ्युदयास बौद्धिक स्वायत्ततेची अत्यंत जरूरी आहे. किंबहुना, बौद्धिक उन्नति व स्वायत्तता हा राष्ट्राच्या अभ्युदयाचा पाया आहे. ह्या स्वायत्ततेशिवाय राष्ट्राच्या उर्जितावस्थेस आवश्यक जी औद्योगिक प्रगति ती होणें अशक्य आहे. बौद्धिक स्वायत्तता पाहिजे म्हणजे काय पाहिजे, हें प्रथम सांगितलें पाहिजे. बौद्धिक स्वायत्तता म्हणजे ज्ञानार्जन स्वतंत्र रीतीनें करण्याची पात्रता, व संपादित ज्ञानाचा उपयोग राष्ट्रोन्नतीकडे करण्यास भरपूर वाव. अर्वाचीन काळीं राष्ट्राची उन्नति होण्याला त्यांतील बुद्धिमंतांनीं लावलेले व नित्य नूतन लावण्यात येणारे शोध कारणीभूत होतात. त्यांचें मूळ ज्ञानांत आहे, व तें ज्ञान आज आमच्यांत जवळ जवळ नाहींच म्हणण्याइतकें अल्प आहे. तें प्रथम संपादन केलें पाहिजे. २५० वर्षांपूर्वी श्रीसमर्थांची या बाबतींतील शिकवण आजहि लागू पडते.

धूर्तपणें सकळ जाणावें। अंतरीं अंतर बाणावें।
समजल्यावीण सिणावें। कासयासी ॥१९-२-२३

आपल्यांत काय उणीवा आहेत त्या समजून घेऊन प्रथम त्या नाहींशा केल्या पाहिजेत. त्याकरितां प्रचंड यत्न केला पाहिजे.

आहो या ब्राह्मणपणाकारणें। बहुतांचे कष्ट करणें।
परंतु ब्राह्मणपण सिकणें। हें उत्तमोत्तम ॥ १५-३-२५

ज्ञानार्जनाकरतां वाटेल ते कष्ट करून, तें मिळवून राष्ट्रकार्णी लाविलें पाहिजे.

व्याप आटोप करितो। धके चपेटे सोसितो।
तेणें प्राणीं सदेव होती। देखतदेखतां ॥१५-३-७

असले धकेचपेटे सोसून शेजारच्या जगानें पहातां पहातां आपली उन्नति करून

घेतली आहे. 'अकलेचे पवाड' घालून आज तें मसणाहूनहि गाड झालेलें आपण पहातों. याकरितां दीर्घ प्रयत्न करून प्रथम हें ज्ञान संपादन केलें पाहिजे. दीर्घ प्रयत्नापुढें करटपणाची वार्ताच नको.

जेहीं उदंड कष्ट घेतले । ते भाग्य भोगून ठेले ।
येर ते बोलत चि राहिले । करंटे जन ॥ १८-७-१६

आतापर्यंत बोलण्याशिवाय अधिक असें आम्हीं कांहींच केलें नाहीं. यापुढें कृति पाहिजे, व त्या कृतीलाहि राष्ट्रीय भावनेचें अधिष्ठान राहिजे; त्याशिवाय सर्व व्यर्थ आहे. भर्तृहरीनें म्हटल्याप्रमाणें

तत्तत्कर्मकृतं यदेव मुनिभिस्तैस्तैः फलैर्वंचिताः ॥

ज्ञानार्जनाकरितां इतरांप्रमाणें कष्ट करून तें मिळवूनहि जर त्याच्या मुळाशीं राष्ट्रीय भावना नसेल तर त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. आजहि विद्यार्जनाकरितां शेंकडों तरुण परदेशांत जाऊन ज्ञान संपादन करूनहि येतात, परंतु राष्ट्रभक्तीच्या अभावीं त्यांच्या हातून नोकरीशिवाय इतर व्यवसाय क्वचितच होतात.

मोघार्थो विफलोऽपि दूषणपदं दुष्यस्तु कामी लघुः ॥

उच्च ध्येयामुळें पदरीं अपयश आलें तरी तें क्षुद्र ध्येयाच्या पूर्तीपेक्षांहि जास्त श्रेयस्कर असतें. परदेशांतून कष्टानें संपादून आणलेल्या ज्ञानाचा स्वदेशांत प्रचार करून वाढविणारे आधुनिक सांप्रदायिक विरागी निघाले पाहिजेत. त्यांनीं आपल्या अनुभवाची व ज्ञानाची नित्य चाळणा करून त्याचा उपयोग करण्याच्या "तजवीजा" केल्या पाहिजेत.

अखंड तजवीजा चाळणा जेथें । पाहतां काय उणे तेथें । १९-६-२९

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे

उत्कट भव्य तें चि घ्यावें । मळमळीत अवघें चि टाकावें । १९-६-१५

वगैरे किती तरी निरनिराळ्या प्रकारांनीं श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. श्रीसमर्थांचा सांप्रदायिक बनण्यास जरूर असलेली पूर्वतयारी करून त्यांच्या शिकवणीप्रमाणें वागणारे हाताच्या बोटांवर मोजता येतील इतके लोक निघाले तरी त्यांच्या तेजस्वी वर्तनाची छाप बसून मतामतांचे गलबले मोडून टाकण्यास मदत होईल.

यत्र सर्वे विनेतारः । यत्र सर्वेभिमानिनः ।
सर्वे महत्त्वमिच्छन्ति । कुलं तदवसीदति ॥

अशी आज तरी आमची स्थिति झाली आहे. श्रीसमर्थांच्या सन्या सांप्रदायि-काला ही दुरवस्था नाहींशी करणें अशक्य नाहीं.

आतापर्यंत बौद्धिक स्वायत्ततेबाबत श्रीसमर्थांची शिकवण कशी लागू पडते हें सांगितलें. त्याप्रमाणेंच इतर म्हणजे राजकीय, सामाजिक व आर्थिक स्वायत्त-तेच्या बाबतींतहि श्रीसमर्थांनीं आपल्या लाडक्या महाराष्ट्राकरिता उपदेशाचे दिव्य बोल ठिकठिकाणीं ठेविले आहेत. त्या सर्वांचें या लहानशा लेखात दिग्दर्शन करणें शक्य नाहीं, म्हणून जिज्ञासु अभ्यासकानें त्याचा शोध करून स्वत च्या जरूरीप्रमाणें त्याचा फायदा घ्यावा इतकीच विनति आहे.

श्रीसमर्थांचें राजकारण व चळवळ व त्यांनीं स्थापन केलेला महाराष्ट्र-धर्म हीं मुसलमानी धर्माचा उच्छेद करण्याकरता होतीं असा कोणी कोणी आक्षेप करतात, त्याचें निरसन करणें व सत्य काय आहे तें प्रकाशित करणें निदान आजच्या काळीं तरी अत्यंत जरूर आहे. "आहे चिंता करितों विश्वाची" म्हणणारे श्रीसमर्थ 'विश्वाची चिंता' वहाण्याकरतां "सनाळीं" रहाणारे हे समर्थ '*विश्व*' म्हणजे महाराष्ट्रीय हिंदु समाज असा अर्थ करण्याइतके संकुचित वृत्तीचे असतील असें मानणें न्याय्य होणार नाहीं. श्रीसमर्थांना सर्व धर्म, सर्व समाज गुण्यागोविंदानें व बंधुभावानें वागावे, अशी फार इच्छा होती. त्याचा कटाक्ष अस्मानी सुलतानीवर होता. आततायी लोकानाहि—मग ते कोणीहि असोत—विचार न करिता मारावें, हें श्रीसमर्थच काय पण कोणीहि सांगेल. मुसलमानी धर्माविषयीं त्याना आदर वाटत नसता तर सज्जनगडाच्या बांधकामाचे वेळीं

धनधान्य रसखाने । दारूखाने जामदारखाने ।
नाना अठरा कारखाने । घुमट मशिदी मनोहरे ॥

यात सांगितल्याप्रमाणें मुसलमानाना आपल्या धर्माप्रमाणें वागता यावें म्हणून त्याच्याकरिता मशिदी बांधण्याची श्रीशिवछत्रपतीस सल्ला त्यांनीं दिली नसती. आजहि आम्ही राजकीय स्वातंत्र्यासाठीं झगडत आहों, याचा अर्थ प्रच-लित राजसत्तेविरुद्ध आमचा झगडा आहे, असा अर्थ कोणीच करीत नाहींत आमचा झगडा आमच्या बाबतींत जे राजकीय अन्याय होतात ते नाहींसे होण्या करिता आहे, व श्रीसमर्थांचें राजकारण तरी तसेंच होतें. त्याचा विपर्यास करणें हा अन्याय आहे.

श्रीसमर्थांचें स्मारक म्हणून आज हें श्रीसमर्थवाग्देवतामंदिर उघडण्यांत

आलें आहे. पूर्वीच्या आनंदवनभुवनाचें केंद्रस्थानच नवीन स्वरूपांत या वाग्देवता-मंदिराच्या रूपानें अवतीर्ण झाल्यासारखें वाटतें. 'आनंद-वन-भुवन' या शब्दात किती गूढ अर्थ भरला आहे, हें श्रीसमर्थांच्या महाराष्ट्रांत जन्मास आलेल्या प्रत्येक महाराष्ट्रीयानें समजून घ्यावें. पूर्वीच्या आनद वन भुवनाचें केंद्र त्याच्या दक्षिण दिशेला होतें तें आज उत्तरेला आलें आहे. या रूपानें आमचा अभ्युदयच ऊर्ध्वगामी झाला आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. आता आहे, या श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत श्रीसमर्थशिकवणीचे धडे देण्याची व्यवस्था होईल. खेड्यापाड्यांची तीक्ष्ण बुद्धीची सतेज मुलें हिंडता हिंडता पारखून त्याना श्रीसमर्थवाग्देवतामंदिरात आणून त्याच्या संप्रदायाची दीक्षा देण्याचें काम मंदिराच्या कार्यकर्त्यांकडून झालें तर समाजात बळावत चाललेलें बुद्धि-मांद्य नाहींसें करण्याचें श्रेय मंदिराला मिळेल. श्रीसमर्थांनीं तरी

आणीक नलगे कांहीं। बुद्धि दे रघुनायका ॥

हेंच मागणें प्रथम मागितलें होतें. श्रीसमर्थांच्या संप्रदायाच्या तत्वाचा व शिकवणींचा प्रत्यक्ष प्रचार हाच अधोगामी भारताचा पुनरुद्धार आहे.



## ( २३ )

# श्रीसमर्थ आणि शास्त्रीय जीवन

( लेखक — श्री. गोपाळ लक्ष्मण कुळकर्णी, बी. एस्सी., खांडवा )

उदास दास राहतो । प्रचीत सत्य पाहतो ॥

प्रत्येक काळाचें कांहीं तरी वैशिष्टय असतें; व त्याला अनुसरून त्याचें नामाभिधान होतें.

जें जें जये प्रसंगीं जालें । ते ते काळाचे नांव पडिलें ।

आजच्या भौतिक सुखवादी युगात आचार विचार संक्रमणावस्थेत असल्यानें निरनिराळ्या मताचे स्वतंत्र गट दिसू लागले आहेत. भौतिक सुखवादी विज्ञानशास्त्राच्या अभ्यासानें ऐहिक उन्नति करून मानवी जीवनाचा व बुद्धीचा विकास करण्याच्या खटपटींत आहेत. कोणत्याहि राष्ट्राची उन्नति पूर्वपरंपरागत तत्त्वज्ञानाला फाटाळून व्हावयाची नसून, ज्ञानाच्या क्षेत्रातील निरनिराळ्या विभागातील प्रगतीअवलंबून असल्यानें, प्रत्येक मनुष्याची वृत्ति प्रगमनशील असावी, असें आज वाटूं लागलें आहे. ही प्रचलित विचारसरणी श्रीसमर्थांच्या वाङ्मयात आढळते. शुकाचार्यांनीं 'वेदाध्ययन म्हणजे पोपटपंची' ठरविली आहे. सारांश, आजच्या विचारप्रणालीचीं बीजें बऱ्याच काळापासून रुजत आलीं आहेत व त्याना न्या. मू. रानड्यापासून अंकुर फुटूं लागला.

गेल्या ४० वर्षांपासून भौतिक शास्त्राचा अभ्यास होऊं लागला. प्रो. रामन् याना मिळालेलें 'नोबेल प्राईझ' व डॉ. बोस यांचे वनस्पतिशास्त्रातील शोध यांनीं सुशिक्षित बहुजनसमाजाचें मन आकर्षित होऊन ह्या शास्त्राचा पुनः

हिंदुस्थानांत अरुणोदय झाला. प्राचीन काळीं हिंदूंनीं तत्त्वज्ञान व वाङ्मय ह्यां-बरोबर विज्ञानशास्त्रांतील ज्योतिष, वैद्यक, रसायन, नौकानयन, शिल्प, इत्यादि विभागांत इतर राष्ट्रें अज्ञानांधकारात असताना प्रगति करून आपलें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें. इ. स. पू. २५० ते इ. स. ८०० पर्यंतच्या कालांत ह्या शास्त्रांचा अत्यंत उत्कर्ष झाला. पुढें बदलत्या काळाबरोबर शब्दप्रामाण्य, मुसलमानांच्या अमानुष आक्रमणानें पूर्वजांनीं मिळविलेल्या ज्ञानाची संरक्षण करण्याची पडलेली जबाबदारी, संस्कृत भाषेच्या पुनरुज्जीवनानें प्राकृत भाषेंत बंद झालेला ज्ञानप्रसार, राजे व धनिक यांचा आश्रयाभाव, यांमुळें स्वतंत्र शोध लावण्याची बुद्धि नष्ट झाली. आमच्या इकडील पंडितांनीं वित्तेषणा, दारेषणा जिंकली पण ते लोकेषणा अंकित करूं शकले नाहींत; म्हणून त्यांचे शोध त्यांचेजवळ राहिले आणि बहुजन-समाजांत परंपरेबद्दल आदर उत्पन्न होऊन तो गतानुगतिक बनला. शक ११०० ते १६०० पर्यंतच्या कालांत प्राकृतांत ज्ञानप्रसाराची कामगिरी मुकुंदराजापासून तुकारामापर्यंत झालेल्या संतकवींनीं केली. पण त्यांना आपल्या ग्रंथांत पूर्वीच्या ठरीव ठशाचें तत्त्वज्ञान टाळणें अशक्य झालें.

भौतिक शास्त्रांतील गेल्या ५० वर्षांतील पाश्चात्य राष्ट्रांची प्रगति आश्चर्यचकित करून सोडणारी आहे. मध्यकालीन परिस्थिति इतकी आशादायक नव्हती. पाश्चात्य राष्ट्रांच्या भौतिक शास्त्राच्या पूर्वेतिहासास आरंभ ग्रीक शास्त्रज्ञ थेल्स ( Thales— इ. स. पू. ६४० ते ५४६ ) पासून होतो, आणि ॲरिस्टाटल-पर्यंतच्या काळात (इ. स. पू. ३८४ ते ३२२) प्रत्येक सिद्धांतील शास्त्रज्ञांनीं बरीच प्रगति केली. पुढें ॲरिस्टाटलच्या मताचें साम्राज्य यूरोपमध्यें २००० वर्षें होतें.

The master hath said it and it must be true

ह्या कूपमंडूक वृत्तीमुळें प्रगति होणें अशक्य झालें. इ. स. १५८३ त ब्रुनो ऑक्सफर्डला गेला असतांना तेथील विद्यार्थ्यांना ॲरिस्टाटलच्या मताविरुद्ध ५ शिलिंग दंड होत असे असें त्यास आढळलें.

'The University statutes enacted that bachelors and masters, who did not follow Aristotle faithfully were liable to a fine of five shillings for every point of divergence and every fault committed against the logic of the organon.'

प्राचीन पाश्चात्य शास्त्रज्ञ तत्त्वविवेचन व ग[illegible]

करीत. प्रयोगयुक्त संशोधनाकडे त्यांचें दुर्लक्ष होतें. पायथागरस (Pythagoras, in 6th C. B. C.), टोलमी (Ptolomy, 2nd C. A. D.), यांचें प्रयोगांकडे लक्ष गेघलें; परंतु त्याला विशेष प्राधान्य देतां येत नाहीं. तरी पण प्रयास व निरीक्षण यावर त्यांची बरीच भिस्त होती. प्रथम रोजर बेकन (Roger Bacon, 1214-94 A. D.) यानें आपल्या आपुस मॅजस ग्रंथांत सप्रयोग ज्ञान मिळविण्याचा मार्ग प्रतिपादन केला आहे. आजपर्यंत फ्रान्सीस बेकनला याचें श्रेय मिळत असे; परंतु योग्य काळीं त्यानें ह्या मताचें प्रतिपादन केल्यानें, त्याच्याकडे पुष्कळांचें लक्ष आकर्षित झालें.

आपल्या इकडे भौतिक शास्त्राचा अभ्यास सप्रयोग होत असे. प्रत्यक्ष शव-छेदन करून विद्यार्थ्यांना अंतरेंद्रियांचें ज्ञान करून दिलें जात असे व वैद्यक-ज्ञानात प्रत्यक्ष प्रयोगानें मिळालेल्या ज्ञानाची भर घातली. परंतु ग्रीक ह्या क्षेत्रात मागासलेले होते. पुढें ह्या अभ्यास बंद होऊन अध्यात्माच्या मार्गें बहुजनसमाज लागून इहलोकींच्या सुखासंबंधीं उदासीन वृत्ति बळावत चालली. तिला समर्थांनीं आळा घालण्याचा प्रयत्न करून भौतिक शास्त्राकडे आणि सप्रचित ज्ञान मिळवि-ण्याच्या मार्गाकडे हा विचारौघ वळविण्यास आरंभ केला.

पूर्वीच्या ज्ञानाच्या अभ्यासानंतर स्वत: मिळविलेल्या ज्ञानाची त्यात भर घालून ज्ञानाची वृद्धि होते. अशाच रीतीनें समर्थांनीं त्या काळच्या ज्ञानात स्वतःच्या अनुभवजन्य ज्ञानाची भर घालून नवीन वळण लावून दिलें. तत्कालीन विचार-सरणीचा परिणाम ' श्रीमत् दासबोध ' व ' समर्थांची कविता ' व इतर वाङ्मय यावर झालेला दिसतो; तरी त्यांच्या आशावादी वृत्तीनें आणि राष्ट्रोद्धाराच्या कार्यानें त्यांच्या विचारसृष्टींत नाविन्य आढळतें.

श्रीमत् दासबोधाला आधारग्रंथाची यादी द. १ स. १ यात दिली असून मुख्य ' भक्तिमार्ग ' हा प्रतिपाद्य विषय असल्याचें सांगितलें आहे. पण श्रीमत् भगवद्गीता हा मुख्य आधारग्रंथ असल्यानें दासबोधात विवेकवैराग्ययुक्त भक्तिज्ञानाच्या पायावर उभारलेला निष्काम कर्ममार्ग सांगितला आहे. अशा रीतीनें हा आध्यात्मिक शास्त्राचा ग्रंथ असल्यानें त्यात वैज्ञानिक शोध, सृष्ट्युत्पत्ति, कालगणना यासंबंधीं शास्त्रीय विवेचनाची अपेक्षा करणें दूरान्वयमूलक होय. तरी पण व्यवहारात अवश्य असलेली शास्त्रीय दृष्टि, भ्रामक कल्पनांचा तिरस्कार, स्वतंत्र विचारपद्धतीची आवश्यकता, इत्यादि भौतिक शास्त्राच्या–विज्ञानविषयक–

अभ्यासानें सहजसाध्य गुणाचें वर्णन व अंगीं बाणण्याची आवश्यकता यासंबंधीं विवेचन त्या ग्रंथात पहावयास मिळतें.

समर्थांनीं शिवाजीला राज्य स्थापण्याच्या कामीं मदत केली, हें सिद्ध झालेंच आहे व समर्थप्रतापात त्यांना कृष्णातीर पावन करावयाचा होता, हें स्पष्ट उल्लेखिलेलें आहे. ह्यावरून त्या वेळच्या समाजाची ऐहिक आणि पारमार्थिक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक उन्नति करावयाची हें त्यांचें मुख्य कार्य होतें, हें निर्विवाद आहे. म्हणून राजकीय परवशतेचा पाश तोडण्याच्या प्रयत्नाबरोबर राष्ट्रातील घटकाच्या सुखसाधनाकडे त्यांचें लक्ष होतें. म्हणून 'प्रपंचीं सुवर्ण' मिळविण्याचें प्रतिपादन केलें आहे. परंतु पैसा मिळविण्याकरिता निरनिराळ्या साधनांचें ज्ञान पाहिजे. ह्या साधनाचा भौतिक शास्त्रात समावेश होत असल्यानें भौतिक शास्त्रातील प्रगतीबरोबर त्या राष्ट्राची आर्थिक आणि त्याबरोबरच राजकीय उन्नति होते, ही गोष्ट आसेतुहिमाचल हिंदुस्थानच्या अवलोकनानें त्यांच्या ध्यानात आली म्हणून तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाबरोबर, किंबहुना त्याचेहि आधीं, भौतिक शास्त्राचा अभ्यास करणें, हें आद्य कर्तव्य ठरवून ह्या शास्त्रातील विषयाच्या अभ्यासाचा समावेश श्रवणभक्तींत केला आहे, आणि ह्या विषयाचा बुद्धिपुरस्सर श्रवणभक्तींत समावेश केल्यानें समाजाची दृष्टि ह्या विषयाकडे वळविण्याचा उद्देश ह्याच्या मुळाशीं दिसतो.

नाना पिंडांची रचना। नाना भूगोळरचना।
नाना सृष्टीची रचना। कैसी ती ऐकावी ॥४-१-१५
............... । नाना वल्ली नाना औषधी।
धातु रसायण बुद्धि। नाडिज्ञानें ऐकावीं ॥ ४-१-२२
कोण्या दोषें कोण रोग। कोणा रोगास कोण प्रयोग।
कोण्या प्रयोगास कोण योग। साधे तो ऐकावा ॥ २३

ह्यांत ज्योतिषशास्त्र, रसायन, वैद्यक याच्या अभ्यासाबद्दल स्पष्ट शिकवण घातली आहे. वैद्यकशास्त्राचा जास्त प्रचार त्या कालात असल्यानें त्याचें स्पष्टीकरण केलेलें आढळतें. त्या कालीं निरनिराळ्या शास्त्रात विशेष प्रगति नसल्यानें आणि ज्ञानावर त्यांचा पूर्ण भरवसा असल्यानें ह्या सर्व विषयांचा समावेश श्रवणभक्तींत केलेला आहे. पाश्चात्य राष्ट्रात एकच मनुष्य निरनिराळ्या शास्त्रात शोध लावीत असे, असें आढळून येतें. म्हणून एकाच मनुष्यास निरनिराळे सर्व विषय अभ्यास

करण्यास सांगितले, यांत यावरों कांहींच नयन त्या कालाच्या विचारसरणीला धरून असल्याचें दिसतें.

पारमार्थिक प्रवृत्तीच्या मनुष्याला भौतिक शास्त्राची काय आवश्यकता, अशी शंका उत्पन्न होते. परंतु भौतिक शास्त्रज्ञ हा नास्तिक असतो व हा त्या शास्त्राच्या अभ्यासाचा परिणाम म्हणून पारमार्थिक प्रवृत्तीच्या मनुष्यानें दुर्लक्ष करावें हें बरें, ह्या पायावर उभारलेला डोलारा असल्यानें या भ्रामक समजुतीवर विश्वास ठेवण्याची आवश्यकता नाहीं. सृष्टीच्या गूढ शक्तीच्या आकलनानें शास्त्रज्ञाला ईश्वरी सामर्थ्याची साक्ष पटून तो आस्तिक बनतो. शास्त्रीय प्रवृत्तीच्या मनुष्याला सृष्टीच्या प्रत्येक घडामोडीच्या मार्गे असलेलें आदितत्व जड सृष्टीच्या अभ्यासानें शोधून काढावयाचें असतें; आणि तें तत्व सर्वशक्तिमान् आहे, अशी त्याची दृढ समजूत असते. पारमार्थिक प्रवृत्तीच्या मनुष्याला हेंच तत्व शोधावयाचें असतें, म्हणून दोघांचे मार्ग भिन्न असले तरी ध्येय एकच असतें, आणि म्हणून जड सृष्टीच्या अभ्यासाच्या मदतीनें हा मुख्य देव शोधून काढण्याकरितां समर्थांनीं सांगून शास्त्रज्ञांच्या जडाच्या साह्यानें आदितत्त्व शोधून काढण्याच्या मार्गाचा पुरस्कार केलेला आहे.

पूर्वपक्षेंसि सिद्धांत । पाहावा प्रकृतीचा अंत ।
मग पावावा निवांत । निश्चय देवाचा ॥ ५-१०-३४

ह्या ओवीवरून शास्त्रीय विषयाचा अभ्यास करण्याचें पुन्हा सांगितलेलें आढळतें.-

शास्त्रज्ञाची आस्तिक्य बुद्धि-पाश्चर म्हणतोः

'Blessed is he who carries with him god an ideal and' obeys it; ideal of art, ideal of science, ideal of the gospel virtues; therein lies the springs of great thoughts and great action. They all reflect light from the infinite.'

Huxley :- 'In thine own work thy garden lies
This above all, Thale now. The rest leave it to God. He knoweth best.'

बर्नार्ड पॅलिसी (Bernard Palissy the potter) नें मातीच्या भांड्याना चकाकी आणण्याचा प्रयोग केला व त्यांत आपल्या घरचें सामान वगैरे खर्च करून यश मिळवून विज्ञानात भर घातली. समर्थांनीं तर मानवी मनास

उज्ज्वलता आणण्याचा मोठा प्रयोग करून त्यांत यश मिळविलें. समर्थांचे दर वर्षी किंवा तीन वर्षांनीं भेटीस येणारे महंत निरनिराळ्या भागांतील परिस्थिति व ती नाहींशी करण्याकरितां योजलेली साधनें समर्थांना सांगत व सर्वांच्या निरनिराळ्या आलेल्या अनुभवांच्या साह्यानें व प्रत्यक्ष पाहिलेल्या परिणामानें एक समन्वित सिद्धांत ठरवून त्याची योजना इतर ठिकाणीं करून त्याचें सत्यत्व ठरवीत. अशा रीतीनें सबंध आपल्या आयुष्यांत प्रयोग करून निश्चयी, आशावादी बनले—बनविले, म्हणून मनुष्यमनाला उजळा देण्याच्या प्रयत्नाला प्रयोग असें नांव देऊन शास्त्रज्ञ म्हटल्यास काय अडचण आहे ! त्यांनीं पदार्थविज्ञान, रसायन, इत्यादि विषयांत शोध लाविले नसतील; परंतु मानवसृष्टींतील शोध अपूर्व आहेत. आपल्या ध्येयानें वेडावून त्यांनीं सर्वस्वाचा त्याग करून वर्नार्ड पॅलिसीपेक्षाहि जास्त मोठा स्वार्थत्याग केला.

शास्त्रीय विचार म्हणजे केवळ जड सृष्टीचा अभ्यास किंवा सृष्टीच्या अज्ञात शक्तींचें आविष्करण नसून मानवी हिताहितासंबंधींचे विचार व प्रयत्न त्यांत येतात. विज्ञानाचा उद्देश मनुष्याच्या सुखांत भर घालणें हा असल्यानें मनुष्यजीविताच्या सुखदुःखांचा विचार हें देखील ह्या शास्त्रांत येतें.

Scietific thought does not mean thought about scientific subjects. The subject of science is human Universe, that is to say, everything that is or has been or may be related to man. —W. K. Clifford.

विज्ञानांत पूर्वग्रहदूषित विचाराला थारा नाहीं. सत्य सर्वांना सारखें अनुभवास यावें हा मुख्य उद्देश असतो. म्हणून

The rational and systematic study of any subject is a science

अशी शास्त्राची व्याख्या केल्यास ह्यात पुष्कळ विषयांचा समावेश होतो. मुंग्या, मधमाशा, किडे यांचे मनोधर्म शोधणें, चंद्र, सूर्य, मेघमंडळें यांचा भौतिक शास्त्रांत समावेश झालेला आहे आणि मानसशास्त्राकडे लक्ष जास्त घेतल्यानें त्याचा देखील ह्या शास्त्रांत समावेश नुकताच होऊं लागला आहे. हक्सलेनें भौतिक शास्त्राची व्याख्या

'Science is an organised common sense'

अशी केली आहे. ह्या दृष्टीनें विचार केल्यास आणि विज्ञानाचा किंवा विज्ञान-

घेतल्याचा रूढार्थ न घेतल्यास मानवी कल्याणाचा आटोकाट प्रयत्न करणाऱ्या मानवधर्माचा सप्रयोग अभ्यास करणाऱ्या समर्थांना शास्त्रज्ञांच्या मालिकेंत कां बसवितां येऊ नये ? हिंदुस्थानचा भौतिक शास्त्राचा इतिहास कोणी लिहिला तर त्यांत समर्थांना स्थान देतां येणार नाहीं, असें म्हणतां येणार नाहीं. त्याना जड सृष्टीच्या शक्तीचें संशोधन करावयाचें नव्हतें. मानवी सृष्टि त्यांच्या संशोधनाचा विभाग होता. विश्वोद्धाराच्या प्रयोगाचें कार्यालय हिंदुस्थान आणि हिंदुसमाज ही त्यांची आवश्यक सामुग्री होती. प्रयोगापूर्वी (कृष्णातीर पावन करणें) निरीक्षण, पूर्वतयारी, साधकबाधक प्रमाणाचा विचार यांत १२ वर्षे खर्च करून १५६७ ते १५९६ पर्यंत हा प्रयोग करून श्रीशिवरायाचा राज्याभिषेक, हिंदुपदपातशाहीची स्थापना हें दृश्य फल दिसून आलें. आणि दासबोधाची उभारणी स्वानुभवावर असल्यानें ह्या प्रयोगाचें वर्णन दासबोधात आलें आहे. शास्त्रीय प्रयोगाची मांडणी साधारणपणें सामुग्री, साधनें, निरीक्षण, प्रयोगवर्णनरीति, त्यावरून निघणारीं अनुमानें व सिद्धांत अशी असते. दासबोधाची मांडणी स्थूल मानानें अशीच दिसून येते: दशक २ आणि ३ अवलोकन; दशक ४,५,६ प्रयोगास लागणारी साधनसामुग्री व मार्ग; व उत्तरार्ध दशक १२ पासून पुढें सिद्धांत, अनुमानें, फल अशी आहे.

प्लेटो, ऑरिस्टाटल यांचे काळीं प्रवास व निरीक्षण हीं ज्ञानार्जनाचीं साधनें होतीं असें आपण पाहिलें आहेच (पान २२८) त्याप्रमाणें आपल्याकडे देखील प्रवासाची बरीच महती वर्णन केलेली आहे. देशाटन केल्यानें पंडितमैत्री, सभासंचार याचा फायदा होऊन ज्ञान मिळतें, अशी शिकवण आढळते व समर्थांनीं देखील प्रवास हें एक महत्त्वाचें साधन सांगितलें असून निःस्पृहानें (विरक्तें) 'एक देशीं नसावें, नाना तीर्थाटणें करावींत, व ज्ञानार्जन करावें' हें सांगितलें व त्याला भिक्षेचा दंडक घालून निरीक्षणाची जोड घालून दिली.

कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें ।
भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ १५-६-२४

ज्ञानार्जनाला त्याचप्रमाणें पूर्वापार पद्धतीप्रमाणें गुरूची आवश्यकता त्यांनीं सांगितली आहे. मुद्रणकला अस्तित्वात नसल्यानें आणि हस्तलिखित पुस्तकांत अर्थविपर्यास झालेला नसेल ही गोष्ट नक्की नसल्यानें गुरु हें एक अवश्य साधन त्या वेळीं होतें व तें 'ज्ञानकोशा'चें काम करी. 'दासबोधां'त गुरुमहिमा जरी

आढळला तरी विचाराची गुलामगिरी करणें हा आशय त्याचा दिसत नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांत पोपच्या मताविरुद्ध जाणें धर्मबाह्य समजलें जात असे; पण समर्थांनीं गुरुवाक्यासंबंधीं विचार करण्यास व त्याचा अनुभव घेण्याचा उपदेश केला आहे.

प्रत्ययो शोध शोधावा। सावधान चहुंकडे ॥ स्फु. प्र. २-२०
आत्मशास्त्र गुरुवाक्य। प्रचीत पाहाणें वरी ॥

ह्यावरून शब्दप्रामाण्यापेक्षा बुद्धिप्रामाण्याला दिलेलें श्रेष्ठत्व दिसून येतें.

यूरोपांत रोजर बेकननें सप्रचित-प्रयोगजन्य-ज्ञानाकडे लोकांचें लक्ष वेधण्याचा व त्याचें श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केला, त्याप्रमाणें समर्थांनीं आपल्याकडे याचा पुरस्कार केला व त्याचें श्रेष्ठत्व वर्णन केलें आहे. ह्यासंबंधीं समर्थ आणि रोजर बेकन यांच्या विचारांत पुष्कळ साम्य दिसून येतें. ह्याचा क्रमाक्रमानें विचार करूं.

भौतिक शास्त्रांत प्रयोगाला फारच महत्त्व आहे. प्रयोगजन्य ज्ञानामुळें शंकेला वाव रहात नाहीं, आणि कोणत्याहि गोष्टीची सत्यता सुलभतेनें पटवितां येते; अर्धवटपणा किंवा संशयितपणा शिल्लक रहात नाहीं. असें संशयरहित ज्ञानच श्रेष्ठ असतें, अर्धवट ज्ञानानें फायद्यापेक्षां तोटाच जास्त, म्हणून सप्रचित ज्ञानाच्या श्रेष्ठपणाबरोबर संशयित ज्ञानाचा त्यांनीं स्पष्ट तिरस्कार केलेला ( दशक ५, समास १०, ओव्या १५ ते २७ ) आढळतो.

निश्चयेंविण सर्व कांहीं। अणुमात्र तें प्रमाण नाहीं।
वेर्थ चि पडिले प्रवाहीं। संदेहाचे ॥ ५-१०-२४
निश्चयेंविण जें बोलणें। तें अवघें चि कंटाळवाणें।
पाल्हाळ बोलिले वाचाळपणें। निरार्थक ॥ २५
असो निश्चयेंविण जे वल्गना। ते अवघी च विटंवना।
संशयें कांहीं समाधाना। उरी नाहीं ॥ २६
म्हणोनि संदेहरहित ज्ञान। निश्चयाचें समाधान।
तें चि सिद्धाचें लक्षण। निश्चयेंसी ॥ २७

आणि केवळ गुरूनें सांगितलेलें ज्ञान किंवा पुस्तकी ज्ञान याचा अनुभव येऊन तें पटत नाहीं तोंपर्यंत त्याला कांहीं किंमत नाहीं, ही गोष्ट त्यांनीं स्पष्ट सांगितली आहे.

ज्ञानाला अनुभवाची आणि प्रचीतीची जोड असली तर त्याचा परिणाम टिकूं शकतो. अनुमानजन्य ज्ञान प्रतीतिविरहित असल्यास विरुद्ध अनुभवानें त्यावरील विश्वास एगेच उडतो, म्हणून प्रचीतियुक्त ज्ञान मिळविण्यास लागून त्याचें श्रेष्ठत्व वर्णन केलेलें आढळतें.

प्रचितनिश्चयापुढें अनुमान। जैसें सिंहापुढें आलें श्वान।
खऱ्यापुढें खोटें प्रमाण। होईल कैसें॥ ९-५-११
येथें प्रचित हें प्रमाण। नलगे शास्त्राचा अनुमान।
अथवा शास्त्रीं तरी पाहोन। प्रत्ययो आणावा॥ १४
प्रचितीवीण जें बोलणें। तें अवघे चि कंटाळवाणें।
तोंड पसरून जैसें सुणें। रडोन गेलें॥ १५
तेथें काये हो ऐकावें। आणी काये शोधून पाहावें।
जेथें प्रत्ययाच्या नांवें। सुन्याकार॥ १६
. . . . . . । प्रचीत पाहील तें शहाणें।
येर येडे वैन्ययाणें। प्रचीतीविण॥
सांगणेवांगणीचें काम नव्हे। आपुल्या अनुभवें जाणावें।
प्रत्ययाविण सिणावें। तें चि पाप॥ १०-१०-५३

प्रतीतियुक्त ज्ञानाची आवश्यकता व त्यापासून फायदे यांसंबंधीं वरील प्रमाणें आणखी बऱ्याच ठिकाणीं दासबोध व समर्थकविता यांत याच अर्थाच्या ओव्या आढळतात ( १२-१०-२०, १३-२-२८, १५ ४-२१, १५-६-११, १८-५-२१, १८-८-२०; अभंग १९० पान २७८ समर्थांची कविता ).

समर्थांनीं प्रचीति आणि स्वानुभव यांसबंधीं विवेचन करून शब्दप्रामाण्याला महत्त्व दिलें नाहीं; परंतु आप्तवचनश्रेष्ठत्वप्रतिपादक स्थळें दासबोधांत आढळतात. याची सागड कशी घालावी ?

भगवद्वचनीं अविश्वासे। ऐसा कोण पतित असे।
भगवद्वाक्याविरहित नसे। बोलणें येथींचें॥ १-१-२१
शास्त्रीं बोलिलें अविश्वास। मानूंच नये॥ ३-८-१७
सद्‌गुरुविण जन्म निर्फळ॥ ५-१-२९

असा प्रश्न उत्पन्न होतो. हा प्रथम विरोध दिसला तरी यांत कालमहात्म्य दिसून येतें. बहुजनसमाज वेदादिक ग्रंथांना अपौरुषेय समजून अत्यंत मान देत म्हणून

ह्या ग्रंथाकडे लक्ष वेधण्याकरिता आणि अविश्वास उत्पन्न न व्हावा म्हणून ह्या गोष्टींचाहि समावेश समर्थांनीं केला.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्म संगिनाम् ॥
जोषयेत्सर्व कर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥

ज्ञात्यानें आपल्या आचरणानें बहुजनसमाजाचा बुद्धिभेद करू नये आणि त्याला हळूहळू शिकवून शहाणा करावा ह्या ध्येयामुळें बहुजनसमाजाच्या रुचीस पोषक अशीं वचनें 'दासबोधा'त आहेत. म्हणून अशीं विरोधाभासाचीं स्थळें आढळलीं तरी त्यांची प्रतीतियुक्त ज्ञानावर भर होती ही गोष्ट निर्विवाद होय. त्या कालात मांडित्याला बराच ऊत आला होता आणि वादविवाद फार बोकाळले होते, परंतु वादविवादावर समर्थांचा भरवसा नव्हता (दासबोधांतील त्यांच्या वादविवाद न करण्याच्या दंडकावरून दिसून येतें) म्हणून वादविवाद न करण्याचा दंडक त्यांनीं घालून दिला.

पाश्चात्य राष्ट्रांत प्रयोगयुक्त ज्ञान मिळविण्याचें प्रथम प्रतिपादन करणाऱ्या रॉजर बेकनच्या आणि समर्थांच्या विचारसरणींत बरेंच साम्य आहे. वादविवादानें मनाचें समाधान न होता प्रत्यक्ष प्रयोगानें मिळालेल्या ज्ञानानें मनाचें समाधान होतें आणि म्हणून ह्या मार्गाचें अवलंबन करण्यास त्यानें सांगितलें आहे.

There are two modes in which we acquire knowledge: argument and experiment Argument shuts up the question and makes us shut it up too, but it gives no proof; nor does it remove doubt, and cause the mind to rest in the conscious possession of truth unless the truth is discovered by experience .. . But after the experiment had been made his mind receives certainty and rest in the possession of truth which would not be given by argument but by experience.

आपुस मॅजसमध्यें ह्याप्रमाण वादविवादात्मक पद्धतीचें आणि वचनप्रामाण्याचें खंडन करणाऱ्या त्याच ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत सर्व प्रकारचें ज्ञान बायबलमध्यें आहे, असें प्रतिपादन करून वरील विचारसरणीला विरोधात्मक अशा वचनप्रामाण्याचीहि त्यानें तरफदारी केली आहे. दासबोधात देखील अशीच विचारसरणी असल्यानें दोन्ही ग्रंथांचें विचारसादृश्य आढळून येतें.

शास्त्रीय विचारसरणीचा मनुष्य प्रचलित असलेल्या विचारपद्धतीवर रणकार्यभावाचा विचार केल्याशिवाय विश्वास ठेवीत नाहीं, व सत्य जें आढळेल निर्भीडपणें जगासमोर मांडतो.

The scientific mind asks for reasons for its belief and unnwilling to express an opinion upon which it is based.

ार्यांनीं देखील रूढ कल्पनांवर विश्वास ठेवलेला नाहीं.

पुण्यनदीचें तीर। तेथें पडावें शरीर।
हा इतर जनाचा विचार। साधु नित्यमुक्त ॥ ७-१०-१२
उत्तरायेण तें उत्तम। दक्षिणायेन तें अधम।
हा संदेहीं घसे भ्रम। साधु तो निसंदेह ॥ १३
शुक्लपक्ष उत्तरायेण। गृहीं दीप दिवा मरण।
अंतीं राहावें स्मरण। गतीकारणें ॥ १४
ब्रह्मा लिहितों अदृष्टीं। आणी वाचून जाते सटी।
ऐशा प्रकारीच्या गोष्टी। या नांव भ्रम ॥ १०-६-३४

ाणारास वाट पुसों नये', 'रात्री प्रवास करू नये' इत्यादि वाक्यें त्या काळास सरून लिहिलेलीं आहेत. शुभशकुन पहाणें इत्यादि त्या काळच्या विचार-णीचा परिणाम होय.

विज्ञानशास्त्राचा विद्यार्थी स्वतःच साक्षीदार आणि न्यायाधीश असतो. ीं मतें दुराग्रहमूलक पायावर न बसविता अनुभवानें आढळून आलेल्या ांशा आधारावर प्रांजलपणें उभारतो; पुढें असत्यता पटल्यास तीं मतें बदल- ास तयार असतो. परंतु राजकीय व सामाजिक क्षेत्रात मतापेक्षा पक्षालाच त्व येऊन 'मज नाहीं तुज साजेना' हा विचारसरणीलाच प्राधान्य जास्त. कारामुळें त्याना उत्तर काहींच सुचत नाहीं.

अहंकारनक्रें उडविलें। नेऊन पाताळीं बुडविलें।
तेथुनिया सोडविलें। नवचे प्राणी ॥ ३-१०-३
काम मगरमिठी सुटेना। तिरस्कार लागला तुटेना।
मद मत्सर वोहटेना। मूळि पडिली ॥ ४
वासनाघामिणी पडिली गळा। घाळून वेंटाळें वमी गरळ
जिव्हा लाळी वेळोवेळां। भयानक ॥ ५

ह्यात समर्थांनी रेखाटलेलें अशास्त्रीय मनोवृत्तीचें चित्र दिसून येतें. शास्त्रीय प्रवृत्तीचा मनुष्य वैयक्तिक श्रेष्ठतेच्या भरीस पडत नाहीं. त्याची मनोवृत्ति समर्थांच्या खालील ओव्यांत वर्णन केल्याप्रमाणें असते.

तिरस्कार तो चिरडिला। द्वेष चिरडूनि सांडिला।
विषाद अविषादें घातला। पायांतळीं॥ ५-९-४९
कोणावरी घालणें घातलें। कापट्य अंतरीं कुटिलें।
सत्य आपुलें मानिलें। विश्व जनीं॥ ५०
अभ्यासाचा संग धरिला। साक्षपासरिसा निघाला।
प्रेत्न सांगाती भला। साधनपंथें॥ ५५
थोरपणासि पाडिलें। वैभवासि लिथाडिलें।
महत्त्वासि झिंजाडिलें। विरक्तिबळें॥ ३८

न्यूटनच्या 'डायमंड'नें सर्व कागदपत्र जाळले तरी न्यूटनची स्थितप्रज्ञ वृत्तिः पास्कर आपल्या कामात गर्क असल्यानें लोकाच्या मनात असलेला त्याचेसंबंधींचा आदरभाव त्याला माहीत नसणें; डेव्ही, फॅरडे याना त्याच्या शोधामुळें बक्षिसें देऊं केलें असता त्याचा अव्हेर करणें इत्यादि गोष्टी आणि त्याचें सबंध आयुष्य व विचार वरील ओव्यातील दंडकाप्रमाणें आढळून येतात. वैयक्तिक सुखापेक्षा समाजकल्याणाकरिता झटणें हा आदर्श दिसून येतो व समर्थांनीं तर समाजाकरिता प्रत्यक्ष प्राण अर्पण करावयास सांगितला आहे.

देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाऱ्या जिवलगांसी तुटी।
सर्व अर्पावें सेवटीं। प्राण तोहि वेंचावा॥ ४-८-८

निष्काम लोकसेवा हा आत्मोन्नतीचा मार्ग समर्थांनीं घालून दिल्यानें आणि ज्ञान मिळविणें अत्यंत अवश्य आहे म्हणून ज्ञानाचा उपयोग पैसे मिळण्याकडे करूं नये असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे.

मोलें कीर्तन करूं नये। १४-१-५५
ज्ञान वोलोन करी स्वार्थ। कृपणा ऐसा सांची अर्थ।
अर्थासाठीं लावी परमार्थ। तो येक पढतमूर्ख॥ २-१०-३५

सकाम संशोधनास विज्ञानशास्त्रात येवढी किंमत नाहीं आणि निरनिराळ्या शास्त्रज्ञांनीं निरपेक्ष बुद्धीनें निरनिराळे शोध लावले.

Reward for work done or results obtained is the last

thought of man of science. I have no time to make money. Naturalist Sours Agassiz. In science men of science would consider that they lowered themselves by doing so. (Pasture)

आजच्या शास्त्रीय युगात श्रद्धा या शब्दावर बराच वादविवाद होत आहे. श्रद्धा आणि अंधश्रद्धा हे शब्द सापेक्ष असल्यानें एकाच्या दृष्टीनें ठरणारी श्रद्धा दुसऱ्याच्या विचारानें अंधश्रद्धा ठरूं शकते व तिला वगैयारी लागूं शकते. त्यामुळें श्रद्धा आणि अंधश्रद्धा यांत विशेष फरक न दाखविता आल्यानें दोन्ही एकच करून श्रद्धेची हेटाळणी करण्यात येते. परंतु कोणतेंहि कार्य तडीस नेण्याकरिता दृढनिश्चय व त्याबरोबर ध्येयावर श्रद्धा असावी लागते. शास्त्रज्ञ आपलें आयुष्य अज्ञात शक्तीच्या शोधात घालवितात, परंतु त्याच्या मुळाशीं दृढनिश्चयच नसून श्रद्धा ही देखील असते. आदर्श शास्त्रज्ञ आणि समर्थांचा आदर्श शिष्य एकच होत.

शिष्य असावा विश्वासी । शिष्य असावा कायाक्लेशी ।
शिष्य असावा परमार्थासी । वाढऊं जाणें ॥ ५-३-३०
शिष्य असावा स्वतंत्र । शिष्य असावा जगमित्र ।
शिष्य असावा सत्पात्र । सर्वगुणें ॥ ३१

कुलाभिमान, विकल्प, दुराग्रहमूलक विचार, biased mind असल्यास त्याचेकडून कांहीं होणार नाहीं.

जये स्थळीं विकल्प जाये । कुळाभिमान पाठी लागे ।
तो प्राणी प्रपंचसंगे । हिंपुटी होय ॥

भौतिक ज्ञानाच्या क्षेत्रात व्यक्तीपेक्षा गुणालाच श्रेष्ठत्व आहे. समाजातील श्रेष्ठपणापेक्षां गुणालाच फार मान असतो. समर्थांचाहि हाच आशय पुढील ओव्यावरून दिसतो.

देउळामध्यें जगन्नायेक । आणि देउळावरी बैसला काक ।
परी तो देवाहून अधिक । म्हणतां नये ॥
सभा बैसली राजद्वारीं । आणि मर्कट गेले स्तंभावरी ।
परि ते सभेहूनि चतुरी । श्रेष्ठ कैसे मानावें ॥

अंगीं सामर्थ्य असून लीनता असणें हें महद्भाग्य. सामर्थ्य असून लीनता असणें हा एक अलंकार आहे. प्रौढी मिरविणारा गृहस्थ कोणालाहि आवडत

नाहीं. समर्थांनीं देखील नेणतेपण घेण्यास ह्याच उद्देशानें सांगितलें आहे. ह्या-संबंधीं न्यूटनचें वाक्य सर्वांना विदितच आहे—

'I do not know what I may appear to the world, but to myself I seem to have been only like a boy playing on the sea-shore and diverting myself in now and then finding a smoother pebble or prettier shell than ordinary while the great ocean of truth lay all undiscovered before me.'

विज्ञानक्षेत्रातील विचार व शास्त्रीय शिक्षणानें तयार होणारी मनोभूमिका, आणि समर्थांची विचारसरणी आणि त्याना तयार करावयाचा मनुष्य ह्यात किती साम्य आहे हें दिसून येईल. निकालाबाधित सत्य सर्व दूर एकच असावयाचें. नीतिविषयक किंवा इतर आदर्श तत्त्वें ग्रन्थस्थीत ठेवावयाचीं नसून त्याना आचरणांत आणावयाचें आहे. शास्त्रीय क्षेत्रात आणि इतर क्षेत्रात हाच महत्त्वाचा फरक आढळतो. सत्याच्या शोधाचा प्रयत्न करण्यास सांगणें व प्रत्यक्ष त्याप्रमाणें कृति करणें अत्यंत भिन्न आहे. समर्थांनीं आपलीं तत्त्वें नीतिपाठ म्हणून सांगितलीं नसून त्याचा आचरणात आणण्याचा प्रयत्न झाला पाहिजे, ह्या गोष्टीकडे त्याचा कटाक्ष आहे. त्याची ही मनोभूमिका शास्त्रज्ञास साजेशी आहे. विज्ञानक्षेत्रात जें आढळतें तेंच दासबोधात आढळतें म्हणून विज्ञानाची जरूर नाहीं, असा सांगण्याचा ह्यात आशय नाहीं, परंतु समर्थांच्या विचारसरणीचें एक अंग दिसावें हा आहे.

दासबोधात संसार असार आहे अशी फार्णीकपाळीं ओरड केली नाहीं. पाप्याची मनोभूमिका घेऊन ईश्वराला शरण जाण्यास सांगितलें नाहीं. परंतु आजच्या परिस्थितीस लागू पडेल असें वळण लावून देण्याचें ह्या ग्रंथात असल्यानें रा. शंकरराव देव म्हणतात त्याप्रमाणें ह्या ग्रंथाचें नुसतें अध्ययन घरोघर न होतां त्याची शिकवण अंगीं बाणण्याची खटपट झाली पाहिजे; आणि ह्या दृष्टीनें प्रत्यक्ष चळण देण्याच्या दृष्टीनें कामगिरी झाली पाहिजे. ब्र. मसूराश्रम ह्याप्रमाणें मार्ग आक्रमण करण्याच्या प्रयत्नांत दिसतो व बहुजनसमाजात प्रत्यक्ष वळण लावण्याच्या प्रयत्नांत आहे, ही एक आशादायक गोष्ट दिसूं लागली आहे.

पाश्चात्य राष्ट्रांच्या भौतिक शास्त्रातील इतिहासात थेल्स, ॲरिस्टॉटल, रोजर बेकन इत्यादि शास्त्रज्ञांचें जें स्थान आहे, तेंच स्थान समर्थांना हिंदुस्थानच्या

भौतिक शास्त्रांतील इतिहासांत यावें लागेल. परंतु समर्थांची विचारसरणी धार्मिक विचारसरणीच्या नांवाखालीं मोडते याचें कारण त्यांची धार्मिक प्रवृत्ति होय. रोजर बेकननें अज्ञानयुगानंतर जी कामगिरी केली त्याच तऱ्हेची किंबहुना त्यापेक्षा श्रेष्ठ समर्थांची कामगिरी आहे.

समर्थांच्या महाराष्ट्रधर्मांत केवळ हिंदुपदपातशाहीसंस्थापन, राजकारण, भक्ति, लोकसंग्रह इत्यादि अंगांचाच समावेश न होतां विज्ञानक्षेत्रांतील निरनिराळ्या विषयांचा अभ्यास करणें हें प्रमुख अंग आहे. रोजर बेकननंतर त्यानें घालून दिलेल्या मार्गाचा अवलंब करणारे यूरोपांत क्रमाक्रमानें प्रत्येक पिढींत निर्माण झाले, परंतु समर्थांनंतर ह्या श्रवणभक्तींतील विभागाकडे दुर्लक्ष झाल्यानें पाश्चात्यांशीं, भौतिक शास्त्रांत प्रगति केलेल्यांशीं, तोंड देण्यास महाराष्ट्र असमर्थ झाला. आज देखील केवळ पारमार्थिक किंवा राजकारणी पुढाऱ्यांचीच आवश्यकता नसून त्यांना भौतिक शास्त्रज्ञांची जोड पाहिजे. उशिरा कां होईना पण ही गोष्ट आतां पटूं लागली आहे व त्याप्रमाणें प्रयत्न झाला म्हणजे राष्ट्रोद्धार होईल हें निःसंशय. समर्थांची शिकवण सर्वांगपूर्ण असून देखील त्यांच्यानंतर तिला चिरस्थायी रूप देण्याचें व बहुजनसमाजांत प्रचार करण्याचें विशेष कार्य न झाल्यानें ही शिकवण कांहीं काळ दृष्टीच्या आड झाली. म्हणून हिचें पुनरुज्जीवन झाल्याशिवाय आजची होणारी दैना नाहींशी होणार नाहीं. आज इच्छा उत्पन्न होऊन त्या दृष्टीनें विचार सुरू झाले आहेत व तुरळक कार्याला आरंभ झालेला दिसतो. ह्यालाच मोठें स्वरूप प्राप्त होईल अशी आशा बाळगणें वावगें होणार नाहीं. धकेचपेटे खासूनच खंबीरपणा अंगीं बाणेल.



## श्रीमत् दासबोधांतील तत्त्वज्ञान

(लेखक — श्री. दत्तात्रेय वासुदेव शिदोरे, एम्. ए., एल्‌एल्. बी., उमरावती)

आपल्या देशांत कोठेंहि जा, तत्त्वज्ञानाला व वितंडवादाला कमतरता पडणार नाहीं. मनःपूत आचार करणारे क्रियाहीन परंतु शब्दज्ञानवान् असे असंख्य पुरुष या कालांत सांपडतील. ही स्थिति आजची नाहीं. जेव्हां जेव्हां आपल्या समाजाला अवकळा प्राप्त झाली तेव्हां तेव्हां अशा परकीय संसर्गानें मोकाट सुटणाऱ्या धार्मीराची पेवें फुटलीं असे दाखले इतिहासांत मिळतात.

आजि ज्ञानगाथा घरोघरीं । क्रिया मांडिली आसुरी ।
हे चि या काळाची थोरी । कौतुक पाहिलें पाहिजे ॥

शके १५९० मध्यें श्रीश्रेष्ठांनीं ' भक्तिरहस्य ' नावाचा निरुपम ग्रंथ लिहिला आहे. त्यातला हा दाखला आहे. त्यातला आणखी एक उतारा पहा —

असूया तिरस्कार शुष्क वैर । अधर्मनिरत वृथा अहंकार ।
परस्परें आक्षेप साक्षेप घोर । मी च अधिक हा कल्हो ॥

× × ×

आत्मप्रतीति गुरुप्रतीति शास्त्रप्रतीति । हे अवघी च अवगणी नीति ।
नवीन च अवलंबी रीति । ते च माने वाप्फळा ॥

× × ×

निरंतर आवर्पण । क्षुधामयें पीडे जन ।
तस्करभयें कंपायमान । नीतिसंरक्षण तें कैचें ॥

हें हृदयविदारक वर्णन १९३५ सालच्या महाराष्ट्राला किती तंतोतंत लागू पडतें पहा! अशी समाजाची विटंबना होत चालली की, शब्दशूर पंडिताच्या तत्त्वज्ञानाची व प्रत्यक्ष व्यवहाराची अशा दोन भिन्न भूमिका स्पष्ट दिसू लागतात व त्यांच्यांतलें अंतर पढिक पंडितांच्या क्रियाहीनतेमुळें अधिकाधिक दुरावत जातें. अशा विपन्न स्थितींत संस्कारक्षम, ध्येयवादी व निष्ठावंत अशा कर्त्या पुरुषामध्येंहि दोन पक्ष पडतात. एका पक्षातील विचारवंताना सर्व वातावरण निराशामय दिसतें. अशा अधकारग्रस्त मनःस्थितीच्या औदासीन्याचें शमन करावयाची त्याना नकळत त्याच्या अंतर्मनाची धडपड सुरू होते; व मग ते स्वतःभोंवतीं अद्वैतवादातून सहजच उद्‌भूत होणाऱ्या निवृत्तिमय तत्त्वज्ञानाचें आवरण निर्माण करून त्या गुंगींत बेभान होतात. अशा मंडळींना समाजाचीं दुःखें कळतात; समाजाची हरघडी होणारी विटंबना त्याना बोचते. परंतु हीं दुःखें व घावें विसरून जावयाचें सोरें औषध त्याना निवृत्तिमार्गांत सापडतें. दुसऱ्या वर्गांतील कर्ते पुरुष अशा निराशेनें दचत नाहींत व पार्थिव अनुभवानें प्राप्त झालेल्या व दैवी अंतःसाक्षीनें प्रत्ययास आलेल्या सत् सत् ज्ञानाला जगापासून म्हणजे व्यवहारापासून दूर ठेवावयाचा देखावा करीत नाहींत. श्रीसमर्थ हे या दुसऱ्या वर्गाचे आदर्श प्रतिनिधि होत.

इतर महाराष्ट्रीय साधुसंतांप्रमाणेंच श्रीसमर्थहि अद्वैतवादी होते.

उगे चि पाहातां भीषण दिसे । शोध घेतां कांहीं च नसे ।

किंवा

आपण आपणास कळेना । पाहो जातां आकळेना ।
काशास कांहीं च मिळेना । उदंडपणें ॥

असे उतारे त्याच्या ग्रंथातून अनेक काढून दाखविता येतील. आपण वास्तविक ब्रह्मस्वरूप असूनहि घोटाळ्यात पडलों आहोंत, असें त्यांनीं गुरुशिष्यसंवादाच्या मिषानें पुनः पुनः सांगितलें आहे. अद्वैताचें तात्त्विक निरूपण नाना दृष्टांत देऊन, व्यावहारिक दाखले घेऊन, त्यांनीं इतक्या प्रसादानें जागोजागीं केलें आहे कीं, वामन पंडितासारख्या वाङ्मयविशारदाचें निरूपणहि त्यापुढें फिकें पडतें. नुसतें तात्त्विक निरूपण पाहिलें तर समर्थांची भूमिका व इतर अद्वैतवाद्यांची भूमिका यात मुळींच भेद दिसत नाहीं. तात्त्विक चर्चेचा म्हणजे मायाब्रह्मनिरूपणाचा एकदेशी टप्पा ओलांडून समर्थ जेव्हां त्यापलीकडील विचारीं व कर्तव्याचीं

-आपल्या तत्त्वज्ञानाची सांगड घालतात तेव्हां त्याचा भिन्नपणा व त्यांचें अपूर्वत्व -स्पष्ट होतें. इतर अद्वैतवाद्यांप्रमाणें समर्थांचा द्वैतवाद्यांशीं विरोध नाहीं. या दृष्टीनें दासबोधांतील सहाव्या दशकाचे ७, ८ व ९ हे समास अभ्यासण्याजोगे आहेत. सर्व द्वैती परस्परांशीं विरोध करून परस्परांनीं जे पूर्वग्रह स्वतः ठरविले असतात -त्यांचें खंडन करतात. तेव्हां द्वैत व अद्वैत यांच्यांत विरोधच होणें संभवत नाहीं, असें समर्थांनीं ठरविलें आहे [ दासबोध ६।१० ]. त्याचें कारण समर्थांनीं दिलें तें असें: परमार्थांत काय किंवा व्यवहारांत काय, ' सृष्टि आहे हे शाश्वत ' व " अज्ञान सत्य आहे ' असें द्वैतवाद गृहीत धरतो. उलटपक्षीं

म्हणौनि हे मायाभ्रमणें । सृष्टि मिथ्या कोटिगुणें ।

× × ×

देखणें तें सत्य मानावें । हें ज्ञात्याचें देखणें नव्हे ।
जड मूढ अज्ञान जीवें । हें सत्य मानिजे ॥
दृष्टिसि दिसे मनासी भासे । तितुकें काळांतरीं नासे ।
म्हणोनि दृश्यातीत असे । परब्रह्म तें ॥
परब्रह्म तें शाश्वत । माया तें चि अशाश्वत ।

-असें समर्थांनीं नाना शास्त्राचा आधार घेऊन प्रतिपादिलें आहे. समर्थांचें म्हणणें असें कीं, द्वैत व अद्वैत याचा विरोध होतो असें म्हणणें म्हणजे द्वैतवादाला उगाच वरच्या पायरीवर बसविणें होतें. द्वैतवाद कितीहि झाला तरी एकदेशी व अद्वैतवाद सर्वसंग्राहक. भागशः सत्संग्रह करणाऱ्या द्वैताचा सर्वव्यापी अद्वैताशीं विरोध होणें शक्यच नाहीं. द्वैतवाद्यांत तट आहेत. एक द्वैतवादी आपली कल्पना मांडतो, दुसरा त्याचा भाऊ द्वैतवादी दुसरी कल्पना रचतो व एकीचा दुसरीशीं छेद पडतो. द्वैत्यांतला हा कलह पाहून अद्वैतवादी दोघांनाहि मिथ्या मानतो व त्या दोघांची जेथें एकवाक्यता होत असेल तितक्यापुरतें तत्त्व जलक्षीर- -न्यायानें स्वीकारून अद्वैतवाद प्रतिष्ठापित करतो. उत्पत्तिवादाचाच वादग्रस्त प्रश्न घ्या. दासबोधाच्या सहाव्या दशकांतील 'मायोद्भवनाम' समासांत व त्याचप्रमाणें तेराव्या दशकांतील ' उभारणीनाम' समासांत समर्थांनीं द्वैतवादी मांडतात तीच सृष्ट्युत्पत्तीची कल्पना मांडून तिची परिणति मात्र अद्वैतवादानुसार उत्पत्तीचा -मायिकपणा सिद्ध करण्यांत केली आहे. द्वैतवादांतील कल्पनांच्या गुन्या अलगद

छेदून त्या परत पुर्वीनें द्वैतवादावरच पेकून मारण्याचें हें असें कौशल्य दुसऱ्या प्राकृत ग्रंथकारात दिसत नाहीं. उत्पत्ति होत नाहीं हा श्रुत्यनुसारी अद्वैताचा सिद्धांत. तोच प्रतिष्ठापित करावयास समर्थांनीं घाणास सेनानीप्रमाणें प्रतिपक्षानें रचलेल्या साहित्याचाच उपयोग केला.

स्वप्नीं स्वप्नाचा विचार । तो तूं जाण हा संसार ।

या सुसबद्ध ग्याल्वेंब समर्थांनीं सर्व उपनिषदांचें सार ओतलें आहे. 'शब्द थोडे अर्थ फार' ही समर्थांची लेखनशैली. कोठें तरी एका कलमाचा फटकारा ते सहजासहजीं मारून जातात, पण त्यात गगनाहून विशाल अर्थाचें प्रमाड येऊन जातें. हें ईश्वरी देणें आहे यांत शंका नाहीं. जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तुम्हाआम्हा सामान्य जनांच्या अवस्था व साक्षात्कारी महात्म्याच्या प्रत्ययास येणारी तुर्यावस्था या प्रसिद्ध अवस्था आहेत. स्वप्नात स्थलाचा, कालाचा व आकाशाचा उपाधि असत नाहीं. स्वप्नस्थ व्यक्ति निसड हुडून येते व परत आपल्या साडेतीन हात मचकायर जागी होते. एका क्षणाला स्वप्नद्रष्टा हत्ती, घोडे इत्यादि वैभवचिन्हांचा उपभोग घेतो व दुसऱ्या क्षणाला डोळे किलकिले करून स्वत ऱ्या वीतभर खोलींतील मोडका संसार पहातो. तेव्हा स्वप्नव्यवहाराचें वैतथ्य कोणालाहि सहज पटण्यासारखें आहे. परतु जागृतींत आपण देश-काल, कार्यकारण, नामरूपसमूह इत्यादींचा जो पसारा मांडतों व त्यात रमतों तोहि स्वप्नव्यवहाराइतकाच मिथ्या होय, असा अद्वैतवादी तत्वज्ञाचा ठोकळ सिद्धात आहे. समर्थांनीं हा सर्व विचार मांडला आणि जागृतींतला व्यवहार मिथ्या का वाटत नाहीं, याची चर्चा करताना आपल्या अभिमानबुद्धीवर चाग-लेच कोरडे ओढले [ दासबोध द० ६, स० ९ ] कावाडी ओझीं वहातात, दुसरे गोवऱ्या गोळा करतात व तिसरे रत्नाचा उपभोग घेतात—आणि सर्वच आपापल्या वर्तण्याचा अभिमान धरतात, असें मोठें मनोवेधक चित्र समर्थांनीं रगविलें आहे. आता हा सर्व आटोप व्यर्थ का भासत नाहीं, याची मीमांसा करताना समर्थांनीं असा स्पष्ट प्रश्न विचारला आहे कीं, स्वप्न खरें कीं खोटें याचा कयास स्वप्नात कसा करता येईल बरें ? त्याचप्रमाणें व्यवहार खरा कीं खोटा हें व्यवहारदृष्टीनेंच पाहू गेलों तर काय कळणार ?

असें जरी आहे तरी समर्थांनीं व्यवहारदृष्टीचा अधिक्षेप करावयाचा आव आणून जनतेचा बुद्धिभेद केला नाहीं, हें त्यांचें वैशिष्ट्य होय. अद्वैतवाद व

प्रत्यक्ष व्यवहार याचा दुवा जोडण्यातच समर्थांच्या कार्याची गुरुकिल्ली आहे. साक्षात्कार व महानुभव या दृष्टीनें समर्थांच्या मनोवृत्तीचा टप्पा कितीहि जरी उच्च असला तरी प्रत्यक्ष पृथ्वीवरचे आपले पाय त्यानीं पृथ्वीवरच ठेवून वर्तमानकाळासाठीं उदंड कष्ट केले. 'ब्राह्मण बुद्धीपासून चेवले व आचारापासून भ्रष्ट झाले' म्हणून गुरुत्वहि त्याना पारखें झालें, याबद्दल त्याना अतिशय हळहळ वाटे.

गुरुत्व आलें नीच यातीं । कांहीं येक वाढली महंती ।
शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणाचा ॥

× × ×

राज्य नेलें म्लेंछि क्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं ।
आपण अत्रीं ना परत्रीं । कांहीं च नाहीं ॥

अशा स्थितीचा समर्थांना संताप येई. म्हणून सारे व व्यवहार माया होत असें म्हटलें म्हणजे कार्य सपलें, असें समर्थ मानीत नाहींत. अद्वैतवादी झाला तरी प्रपंच सोडून काय होणार ?

संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधी न सांडितां ।
जनामध्यें सार्थकता । विचारें चि होये ॥
हे प्रचितीचें बोलणें । विवेकें प्रचित पाहाणें ।
प्रचित पाहे ते शाहाणे । अन्यथा नव्हे ॥

समर्थांनीं आपल्या अद्वैतवादाला दिलेली ही प्रपंचउपाधीची बैठक मराठी संत मालिकेच्या इतिहासात अपूर्वच होय यात संशय नाहीं.

मूर्ति व देव, देह व आत्मा, असत्य व सत्य, माया व ब्रह्म या परस्पर-समान जोड्या समर्थांच्या ग्रंथातून वर्णिलेल्या आढळतात व त्यावरून तत्त्वज्ञांच्या उच्चतम भूमिकेवर आरूढ झालेल्या समर्थांची मूर्ति अधिकच उज्ज्वल भासते.

पाषाणाचा देव केला । येके दिवसीं भंगोन गेला ।
तेणें भक्त दुश्चवला । रडे पडे आक्रंदे ॥
देव हारपला घरीं । येक देव नेला चोरीं ।
येक देव दुराचारीं । फोडिला बळें ॥
येक देव जापाणिला । येक देव उदकीं टाकिला ।
येक देव नेऊन घातला । पायातळीं ॥

नर्मदागंडिकातीरीं । देव पडिले लक्षवरी ।
त्यांची संख्या कोण करी । असंख्यात गोटे ॥
× × ×
धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा ।
तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥
× × ×
परी त्या देवाचिया खुणा । वेगळ्याची ॥

हें मूर्तीसंबंधींचें आख्यान अद्यतन, नवमतवादी रशिअन क्रांतिवीरांच्या तत्त्वज्ञानाच्याहि हार जाणार नाहीं.

ज्ञानेश्वरांपासून श्रीसमर्थांपर्यंतच्या काळांत नर्मदेपासून कृष्णेपर्यंतच्या महाराष्ट्रांत श्रीविठ्ठलाची उपासना एकमेव व अखंडित चालू होती. हा काळ निराकांक्षतेचा काळ होता, असें सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें बोलावयास हरकत नाहीं. समर्थांनीं काळाचीं चक्रें उलटीं फिरूं लागलीं हें सर्वांच्या आधीं ओळखलें व हें प्रत्यक्ष स्थितीचें ज्ञान सर्वत्र पेलावलें. या जाणिवेमुळें त्यांना विठ्ठलोपासना पटेना. अठ्ठावीस युगें कमरेवर हात ठेवणाऱ्या विठोबापेक्षां देनाना दैत्यांच्या मगरमिठींतून सोडवणाऱ्या श्रीरामचंद्रप्रभूची धनुर्धारी मूर्ति समर्थांच्या अंतर्मनाला अधिक आकर्षक वाटली व या लढाऊ देवतेची उपासना त्यांनीं सुरू केली. समर्थांनीं महाराष्ट्राला देव दिला हेंच त्यांचें अवतारकार्य होय. त्यांनीं हें ओळखलें कीं, आपले लोक विभूतिपूजक आहेत. त्यांनीं हें प्रथम ओळखलें कीं, पांडुरंग ही देवता शांततेच्या काळांतील देवता आहे; ती संतुष्ट, तृप्त जनतेची देवता आहे. हें सत्य समर्थांना प्रथम पटलें. ज्ञानेश्वरनामदेवाचा काळ आतां राहिला नाहीं, कित्येक म्लेंच्छ होऊन गेले, कित्येक फिरंगणात आटले, कितीयेक देशमापेला पारखे झाले, महाराष्ट्रदेशाची सरहद्द आकुंचित व्हावयाला लागली व राजकारणावांचून धर्मकारण होईना, ही परिस्थितीची तीव्र जाणीव समर्थांना झाली व त्यांना स्वस्थ बसवेना. त्यांचा आशावाद जबरदस्त होता, ध्येय स्पष्ट होतें व परमेश्वरावरची त्यांची निष्ठा प्रखर होती. म्हणूनच त्यांनीं श्रीरामचंद्राची उपासना सुरू करून 'सावधान' हा मंत्र समाजाला शिकविला. समर्थांनीं आपल्या उपास्य दैवताचें जें वर्णन केलें आहे तें मननीय आहे.

आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।
जो समर्थाचा ही समर्थ । देवां सोडवितां ॥
त्याचे आम्ही सेवकजन । सेवेकरितां जालें ज्ञान ।
तेथें अभाव धरितां पतन । पाविजेल कीं ॥
गुरु सांगती सारासार । त्यास कैसे म्हणावें असार ।
तुज काय सांगणें विचार । शाहाणे जाणती ॥
समर्थाचे मनींचे तुटे । तें चि जाणावें अदृष्ट खोटें ।
राज्यपदापासून करंटें । चेवलें जैसें ॥
मी थोर वाटे मनीं । तो नव्हे ब्रह्मज्ञानी ।
विचार पाहातां देहाभिमानी । प्रत्यक्ष दिसे ॥

× × ×

तरी आतां ऐसें न करावें । रघुनाथभजनीं लागावें ।
तेणें चि ज्ञान बोलावें । चळेना ऐसें ॥
करी दुर्जनांचा संव्हार । भक्तजनासी आधार ।
ऐसा हा तो चमत्कार । रोकडा चाले ॥
मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघें चि नासोन जातें ।
कृपा केलियां रघुनाथें । प्रचित येतें ॥

गुप्तपणें राजकारण ज्या काळात चाले अशा त्या काळात श्रीसमर्थांनी रेखाटलेलें हें प्रभूचें चित्र त्यांच्या स्वतःच्या तत्त्वज्ञानावर लख्ख प्रकाश पाडीत नाहीं काय ? जसे लोक तसे देव, व जसे देव तसे लोक, हा संशोधकाचा अबाधित सिद्धांतच आहे.

समर्थांनी आदर्श महंताचें दासबोधात एक समास रचून घालून वर्णन केलें आहे, त्यावरून त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या अपूर्वाईबद्दल संशयी अभ्यासकाचीहि खात्री पटेल [ दासबोध द० ११, स० १० ]. निःस्पृहानें कसें वर्तावें हें सांगताना समर्थांनी असा निर्वाळा दिला आहे कीं, हें सर्व स्वानुभवाचें, 'प्रचितीचें' बोलणें आहे. महंत एकांगी नसावा, सर्वद्रष्टा असावा, त्यानें गुप्तपणें उदंड समुदाय करावे आणि त्याना कष्ट करावयास शिकवावें. लोकाचा अधिकार पहावा व त्याप्रमाणें त्याना कार्यें सांगावें. वेषभूषण तें भूषण नव्हे. कीर्तिभूषण तें भूषण होय. कीर्तिरूपें उदंड ख्यात व्हावें व उपासना वाढवावी. महंतानें महंत करावे

व युक्तिबुद्धीनें नाना देश भरावे व जाणते करून सोडावे.

असें हें श्रीसमर्थांचें तत्त्वज्ञान 'येकदेशी' नाहीं, 'सर्वत्र पहाणारें', सावधानतेचा मंत्र शिकविणारें निरंत तत्त्वज्ञान आहे. त्याची भूमिका सर्वोच्च असली तरी ती व्यवहाराचा त्याग करीत नाहीं. उत्पत्ति-स्थिति-संहाराचा अनंत टप्पा या तत्त्वज्ञानानें व्यापिला असला तरी प्रत्यक्ष वर्तमानाला तें विसरत नाहीं. विश्वाचा प्रचंड पसारा या तत्त्वज्ञानाच्या मुठींत रहात असला तरी तीच मूठ स्वराष्ट्राच्या व स्वधर्माच्या अभिमानासाठीं दुर्जनांचें तख्त फोडावयास सर्वथा सज्ज आहे. या अशा नित्य नूतन तत्त्वज्ञानानें आमच्या अवनत समाजाला यशकीर्ति-प्रतापाचें लेणें चढविलें, आणि तें तत्त्वज्ञान आम्ही विसरलों म्हणूनच करंटेपणाची अवकळा आमच्या अंगीं आली.



## ( २५ )

# श्रीरामदासी वाग्विशेष

( लेखक — श्री. गो. कृ. मोडक, संस्कृताध्यापक, पुणें )

एखादा विचार वर्तमान मराठींत ज्या रूपानें आपण मांडितों त्याहून निराळ्या रूपानें रामदासी वाङ्मयात तो कधीं-कधीं मांडलेला आढळतो. विचार मांडण्याच्या रूपांतील भेद म्हणजेच वाग्विशेष. असले भेद लेखनात, शब्दरूपात, विभक्तिरूपात, प्रयोगात, संधींत इत्यादि अनेक ठिकाणीं सापडतात. या भेदाचा म्हणजेच वाग्विशेषाचा विचार पुढील ओळींत करीत आहें.

### १ प्रयोग-गत वाग्विशेष

#### ( क ) जा—कर्मणि सहाय धातु

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।

हा चरण प्रसिद्धच आहे. येथें चिंतन ही क्रिया व मुमुक्षु तिचा कर्ता आहे. त्याचें रूप मुमुक्षूनें असें अध्याहृत आहे. येथें 'मुमुक्षूकडून असें रूप घ्यावें व जा धातु मुख्य घेऊन प्रयोग कर्तरि मानावा'—असें कदाचित् कोणी म्हणेल. त्यास उत्तर —

तेणे विषयो चिंतीत जावा ( ९३, ६१ )*

या चरणावरून मिळतें. या चरणात तेणें ही शुद्ध तृतीया आहे. याचप्रमाणें प्रस्तुत चरणात मुमुक्षूनें अशीच तृतीया घेतली पाहिजे. अशा वाक्यांत कर्त्याची

---

* ९ व पुढील कसगत आंकडे दासबोधाच्या पांचव्या आवृत्तींतील क्रमानें पानाचे व ओव्यांचे बोधक समजावे.

शुद्ध तृतीया आढळत असल्यानें, प्रयोग कर्मणि ठरून जा हा कर्मणि सहाय-धातु ठरतो. वर्तमान मराठींत जा हा कर्मणि सहाय धातु नाहीं. 'रामानें राक्षस मारिले', 'रामानें राक्षस मारावे' इत्यादि वाक्यातील प्रयोग शुद्ध कर्मणि आहे, पण 'रामाकडून राक्षस मारिले जातात' या वाक्यात असा कर्मणि प्रयोग नाहीं; कारण या वाक्यांत तृतीया बसत नाहीं. हें उघड आहे कीं, क्रियापद कर्मणि असल्यास, त्याचा कर्ता शुद्ध तृतीयेंत रहावो, तो कडून या शब्दयोगी अव्ययानें युक्त होत नाहीं. अर्थात् वर्तमान मराठींतील मारिले जातात इत्यादि प्रयोग कर्मकर्तरि होत.

सारांश — रामदासी वाङ्मयात जा हा शुद्ध कर्मणि सहाय धातु ठरतो, व तो मुख्य धातूच्या त-प्रत्ययान्तापुढें येतो, ला-प्रत्ययान्तापुढें येत नाहीं. वर्तमान मराठींत 'मुमुक्षूनें राम चिंतीत जावा' असाही कर्मणि प्रयोग जरी आढळतो, तरी तो आपण सर्वशुद्ध मानीत नाहीं; त्याचे ठिकाणीं 'मुमुक्षूनें राम चिंतीत जावें' असाच भावे प्रयोग प्रशस्त मानितों. 'मुलानें रोज व्यायाम करीत जावें' असेंच आपण शुद्ध म्हणू.

( ख )– न-वच – कर्मकर्तरि सहाय धातु

तयांचेनि हा ज्ञानविचार।
निघला न-वचे ( ११,२२ )
सद्गुरु न वचे कल्पिला।
ईश्वराचेनि। ( १२७, ४४ )

या दोन्ही उदाहरणात कर्त्याची शुद्ध तृतीया नसून, त्याचें रूप 'त्याच्याकडून', 'ईश्वराकडून', अशा अर्थी करण-बोधक आहे. अर्थात्, त्याचें कर्तृत्व कर्मामध्येंच संक्रांत झालें आहे; म्हणजे कर्म हेंच कर्ताही मानिला जावें; ज्यामुळें येथील प्रयोग कर्मकर्तरि आहे. ही दोन्ही क्रियापदें अकरणरूपी आहेत, ही गोष्टहि लक्षणीय आहे. यावरून ठरतें कीं, न-सह वच हा धातु अकरणरूपी वाक्यांत कर्मकर्तरि सहाय धातु म्हणून योजिला जातो. अशा रूपानें याचा प्रयोग वर्तमान मराठींत आढळत नाहीं. त्याची जागा वरील जा धातूनें घेतली आहे. यामुळें, कर्मणि सहाय धातु मुळींच उरला नसल्यानें, एकंदरीत मराठीची हानीच झाली आहे. रामदासकालापासून आजपर्यंत कवि व लेखक यांची परंपरा असखिल असतां, असा आवश्यक सहाय धातूचा लोप कां व्हावा, हें विचारणीय आहे.

(ग) भावे प्रयोग

विरक्तें असावें परम दक्ष (४९, १४)

प्रगट होईजे ईश्वरें (११८, ४०)

हे दोन्ही भावे प्रयोग वर्तमान धर्तीवर रचले आहेत. यांतील विधेयें दक्ष व प्रगट अर्थी अनुक्रमें आहेत. ही विधेयें ज्ञानेश्वरी वाङ्मयात दक्षां व प्रगटा अर्शी व्हावीं.

तुम्हीं निरतां होआवें (ज्ञा. ३,११८)

जेणे कृतकार्यां होईजे (ज्ञा. १-२५)

यांतील रूपांवरून दिसतें कीं, वर्तमान भावे प्रयोगाची घडण, ज्ञानेश्वरींतल्याहून भिन्न अशी, रामदासकालापासून तरी प्रचारांत आहे.

(घ) षष्ठीपूर्व प्रथमा, अर्थे कर्म

आम्हांसि हें घडलें प्रसंगें।

श्रोतीं क्ष्मा करावें (१६३, ३७)

येथें क्रियापद करावें असें आहे. यात धातु कर आहे व क्रिया करणें ही आहे. या क्रियेचें वास्तव कर्म क्ष्मा (=क्षमा) असें आहे व (वाक्यगत) दृश्य कर्म हें असें आहे. या दोहोंचा मेळ कसा घालावयाचा? येथें पूर्वरचना 'श्रोतीं ह्याची क्ष्मा करावी' अशी होती. यांतील क्रिया क्षमा करणें, सोसणें, साहणें अशी घेतली जाऊन तिचें रूप क्ष्मा करणें असें मानण्यांत आलें; म्हणजे साहणें किंवा क्षमणें अशा अर्थी क्ष्मा करणें असा मिश्रधातु घेण्यांत आला. यांतील क्ष्मा हें पद धातूच्या पोटांत समाविष्ट मानिल्यानें, करावें या क्रियापदाचा अन्वय हें या कर्माशीं करण्यांत येऊन, त्याचें नपुंसकलिंग करण्यांत आलें. अशा मिश्र-धातूच्या पोटातील नामास आपण धातूचें उपपद म्हणूं. या उपपदाचा क्रियापद-रूपाच्या अन्वयात मुळींच संबंध येत नाहीं. 'ब्रह्मदेवें जीवसृष्टि निर्माण केली' (३०२, ३१) अशा वाक्यांत निर्माण हें असलेंच उपपद आहे. अशीच रचना वर्तमान मराठींत इंग्रजीवरूनहि वारंवार येते. माझ्या सायकल्-ला रामानें विदारण केलें, अशी विवक्षा असता प्रायः (माझ्या सायकलला रामानें पंक्चर केलें–असें न म्हणता) माझी सायकल रामानें पंक्चर केली–असेंच आपण म्हणतों. पंक्चर करणें ही मिश्र क्रिया मानिली आहे. यात पंक्चर हें उपपद आहे, पंक्चर हें वास्तव कर्म आहे व सायकल हें दृश्य कर्म आहे. परमार्थेतील शब्दांच्या साहानें क्रिया दर्शविण्याचा प्रसंग आला म्हणजे असें वारंवार घडतें.–

'ही कथा आम्हीं श्रवण केली' यांतीलहि प्रयोग याच धर्तीवर बनला आहे. येथील (Parsing किंवा) पदसंबंधांचा विचार करितां, कथा षष्ठीपूर्व (पूर्वी षष्ठी असलेली) प्रथमा असून, तिचा अर्थ कर्म आहे; व श्रवण हें कर्मचर (पूर्वी कर्म असलेलें) प्रथमा असून उपपद आहे, असें ठरतें.

२ पदगत वाग्विशेष

(क) हें, जें, तें, हीं नपुंसकलिंगी प्रथमेचीं एकवचनाप्रमाणें अनेकवचनाचींही रूपें आढळतात. असलीं रूपें एकवचनी म्हणून कोणीही मान्य करील; पण तीं अनेकवचनीं कशीं कसावीं?

निर्माण पंचभूतें 'यीयें'। कल्पांतीं नासतीं येथान्वयें।
प्रकृति पुरुष 'जीयें'। 'तेंही' ब्रह्म होतीं॥ (१४०, ४७)

येथें जें-चें अनेकवचन, माडें-मांडीं या धर्तीवर, जीं असें होतें; व शिवाय जें+ए (नपुंसकलिंगी अनेकवचनाचा प्रत्यय) या जोडणीनें (१) सरळ जयें किंवा जियें अथवा जीयें होतें, व (२) पूर्वरूप संधि होऊन जें असेंही कायम रहातें. रामदासी वाङ्मयांत हीं उत्तरोक्त रूपें जें, तें, हें, दोन्ही वचनांत आढळतात; जसें:—

कीं 'हें' सुखाचीं तारुयें लोटलीं।
आक्षे आनंदें उतरलीं। (१५, ३१)
ऐसीं 'हें' मूर्ख लक्षणें। (२८, ७२)
सत्कर्मे 'तें' नावडतीं। (३९, १८)
'हें' तिन्ही लक्षणे। (२४५, ३७)

पुढील उदाहरणांत 'जें' एकवचनी आहे.

विषय जनित 'जें-जें' सुख।
तेंथें चि होतें परम दुःख। (९३, ६५)

यांतील सुख या विशेष्यावरून जें-चें एकवचन उघड आहे.

(ख) इच्छा, कृपा अशा स्त्री० आ-कारान्त शब्दांचें व दृष्टी अशा स्त्री० ई-कारान्ताचें तृतीया एकवचन मूळ रूपाप्रमाणें होतें.

या चत्वार मुक्ति तत्वता।
'इच्छा' सेवून राहिले। (२०, १६)

येथें इच्छा म्हणजे इच्छेनें.

ॐ नमोजी गजानना । येकदंता त्रिनयना ।
'कृपादृष्टी' भक्तजना । अवलोकावें । (२३, १)

येथें कृपादृष्टी म्हणजे कृपादृष्टीनें. आ-कारांत पुल्लिंगाची तृतीया एकवचनी श्रोतेन–श्रोतेनि, व अनेकवचनी श्रोतीं–श्रोता अशा धर्तीवर होते. तृतीया बहुवचन येथेंहि लक्षणीं ( ३१, २ ) इत्यादि रूपांत (संस्कृत प्रत्यय भिस्–यावरून बनलेला) हीं प्रत्यय आढळतो.

( ग ) सिकवणे-चा मानी वीट ( २५,१९ )

अशा ठिकाणीं षष्ठीच्या रूपांत सामान्य रूपाचा अभावही आढळतो. सि– हा प्रत्यय चतुर्थीचा म्हणून तर आढळतोच, जसें—

देवासि भक्तांचा विसरु ( १११, २८ )

आदेशेंसी (४९, ११) अशा तृतीयेंत त्याचा उपयोग पुनरुक्त आढळतो. देवासि वास्तव्य (९४, ६९)=देवाची वसति, कल्पनेसी अत (१९८, ५२) शरीरासी अंत ( १२२, ४३)=शरीराचा शेवट, – इत्यादि ठिकाणीं सी हा प्रत्यय संस्कृतांतील षष्ठीच्या स्य प्रत्ययाचें रुपान्तर दिसतो. याच विधानास या रूपाच्या षष्ठीतुल्य अर्थानेंही पुष्टि येते.

( घ ) आयुष्य गेलिया (६१, ४७)
नोवरी आलिया ( घरा ) (६०, ३९)
काहीं झाल्या (६४, ३५)

या तिन्ही जोड्यांतील उत्तरोत्तर शब्द सप्तम्यंत भासतात. या पदयोगांतील पूर्व शब्द प्रथमान्त आहेत. हा मराठी व संस्कृत यामध्यें सत् सप्तमीच्या रचनेंत भेद आढळतो. संस्कृतांत उद्देश्य व विधेय दोन्ही सप्तमींत असतात, तर मराठींत केवळ विधेयच सप्तमींत असतें.

( ङ ) आणि नें जोडलेल्या नामापैकीं कधीं कधीं फक्त शेवटल्यासच जरूर तो विभक्तिप्रत्यय लागतो, जसें—कन्या आणि पुत्राची ( ६६,२ ).

( च ) पदसंधि—न + आयके = नायेके (२५,२०), भक्षित + आहे = भक्षिताहे (५५,१९), हे पदसंधि मराठींतहि मधून-मधून आढळतात.

३ समासगत विशेष

परोपकार या समासाचे धर्तीवर अनुपकार चे स्थानीं अनोपकार असें रूप आढळतें, व नरेश्वर चे धर्तीवर ऋषीश्वर चे स्थानीं ऋषेश्वर. यातील संधि

वेदेवाकडे आहेत, हें उघड आहे. दिक्पाल याचें रूप दिग्पाळ व सत्कीर्ति याचे स्थानीं सद्कीर्ति अशीं रूपें आढळतात. येथेंही संधीकडे दुर्लक्ष केलेलें आहे. संधीची घरसोडही पुढील उदाहरणात सापडते. सत् + शिष्य = सशिष्य (११६, २) व सच्छिष्य (१२७, ४९)

### ४ भूतविशेषण

पार्थु द्रोणाचा केला ( ज्ञा. २-३० ) म्हणजे द्रोणानें तयार केलेला, शिकविलेला, म्हणजेच त्याचा शिष्य. अशा रीतीनें ज्ञानेश्वरींत भूतविशेषणाचा प्रयोग नामासारखा होतो, व त्याच्याशीं अन्वित असलेल्या तृतीयेचे स्थानीं षष्ठी आढळते. असाच प्रकार दासबोधातही आढळतो. द्रव्याचा विकला (१२०, २३) = पैशानें विकलेला, पैशाचा गुलाम. शिष्याचे आखिले ( १२०,२३ ) = शिष्याच्या ताब्यात असलेले, ज्याच्यावर शिष्याचा वरचष्मा आहे असे. येथील भूतविशेषणें नामतुल्य असून, त्याशीं युक्त असलेल्या पदाची तृतीयेचे स्थानीं षष्ठी आढळते.

### ५ अनुसाधित-विशेष

धातूपासून प्रत्यय निघालेले, पण क्रियापदें नव्हलेले शब्द धातुसाधितें होत; व धातूहून इतर शब्दापासून साधलेल्या शब्दास संस्कृतात तद्धितान्त शब्द व इंग्रजींत Secondary derivatives म्हणतात. यासच मी येथें अनुसाधितें म्हणतों.

( क ) दास शब्दावरून भाववाचक नाम दास्य असें होतें; पण दासबोधात दासत्व असें दुहेरी भाववाचक नाम वारंवार आढळतें ( ४, १२, १४, २१, ४९, ६३३० ). असेंच सामर्थ्यता (१४,२०), ऐक्यता (२९,८), सायोज्यता (२०, १६). वृद्धपण याचे जागीं वृद्धाप्य असें रूप आढळतें. यावरून बुढाप या गुजराथी रूपाची आठवण होते. वर्तमान मराठींतील आपोआप याचे स्थानीं दासबोधात आपेंआप (१५०, २५) असें रूप आढळतें. यानेंही गुजराथी खरेखर या रूपाची आठवण होते.

( ख ) शब्दारंभीं स-चा प्रयोग अर्थशून्य केलेला आढळतो. आयास-चे स्थानीं सायास, व दृढ-चे स्थानीं सदृढ आढळतें. चरदवन्त ( ४८, २७ ) या शब्दांत वन्त हा प्रत्यय वृथा जोडलेला दिसतो.

( ग ) वस्तूचे अस्तित्वदर्शक प्रत्यय वंत हाच ( मेंत स्थानींसुद्धां ) सार्वत्रिक दिसतो, जसें — बुद्धि शक्ति-युक्ति कीर्ति-वंत (४८, १२६).

## ६ मिथ्या संस्कार

( क ) संयोगवत्व (अथवा शुद्ध व्यंजनाचे स्थानीं जोडाक्षराचा प्रयोग)— परदारी-चे स्थानीं परद्वारीं (६३, १५), धूम-चे स्थानीं धूम्र (३०, २५), नपुंसक-चे स्थानीं नपुस्यक (७६, ३१), पस्तावला (=पश्चात्ताप पावला) याच्या स्थानीं प्रस्तावला (६१ व १४५), शकटे-चे स्थानीं शक्कटे (१०४,२४), सरूपता-चे स्थानीं स्वरूपता ( २० व ११३ ) व कलौ चा क्लौ ( १७, २१ ) असा ल-द्वययुक्त प्रयोग. येथें जोडाक्षरासारखा कठीण उच्चार म्हणजे संस्कृत शब्दाचें लक्षण अशी मिथ्या कल्पना मुळाशीं असावीसें दिसतें.

( ख ) जोडाक्षराप्रमाणें दुरुच्चार व्यंजनामुळेंही शब्दांना संस्कृताची छटा येते; असा वृथा करतेनें पुढील रूपविकार झालेले दिसतात. तापषाचे भार (८१, ५६), क्रूर (१४३, २६), धिःकार (३२, ३२), वेश्या (१२८, ६८), अशीं रूपें क्रमानें पुढील सोप्या व शुद्ध रूपाच्या स्थानीं योजिलेलीं दिसतात,— तापसांचे भार, क्रूर, धिक्कार, वेश्या.

( ग ) पुढील रूपभेद खोट्याच साम्यामुळें प्रवृत्त झाले असावे. मध्यम-चे धर्तीवर अद्यम (१२१, २५), लोकोत्तर-चे धर्तीवर दृढोत्तर (१४८, ६), निजहित-चे धर्तीवर निजध्यास ( ४५, ६१ ), निर्मळ-चे धर्तीवर निर्फळ ( ३४, १२ ), विशेष-चे धर्तीवर अभिशेष (४६, ७६). या ठिकाणीं योग्य रूपें पुढीलप्रमाणें यथाक्रम होत, — अधम, दृढतर, निदिध्यास, निष्फळ, अभिषेक. यावच्चंद्र चे स्थानीं यावश्चद्र ( १२९, ७३ ) हें रूप पुनश्च-चे धर्तीवर आलें असेल काय ?

( घ ) अत्यन्त अपभ्रष्ट रूपें —मूळ शब्द दुष्ट. याच्या निंद्य अर्थास र-कार मिळाल्यानें पुष्टि यावी, म्हणून द्रुष्ट असें रूप करण्यात आलें, व याला संस्कृत छाया यावी म्हणून द्दृष्ट ( १२९, ७० ) असें दुरुच्चार रूप दिलें गेलें. येथें दुष्ट-पासून द्दृष्ट होण्यांत भावनेचा आविर्भाव व संस्कृताच्या श्रवणाचा आभास हीं दोन्ही कारणें विद्यमान आहेत. पुढील शब्दांतील विकारही लक्षणीय आहे. समाधिस्थ व वदिस्थ या रूपाच्या धर्तीवर निद्रिस्थ असें प्रमादिक पण सदृष्टान्त रूप बनविण्यात आलें. पुढें त्याच्या अन्त्याक्षरातून इ-काराची छटा लुप्त करून निद्रिस्त असें रूप बनविण्यांत आलें. हें रूप स्वतःच दिशा हुए आहे. तरी पण हें रूप प्रमाण मानण्यांत येऊन, त्याच्या धर्तीवर मुक्तिस्त (=मुक्तेश ) असें रूप

चनवण्यांत आलें आहे. यांतील भुक हा अवयव शुद्ध मराठी आहे, हें सांगणें नकोच. शिवाय त्याच्या अन्तीं अ आहे, इ नाहीं. अशा रीतीनें भुकिस्त हें रूप चतुर्धा दूषित आहे.

७ शब्दरूप-भेद

(अ) वर्ण-लोपादि — (क) स्वरप्रवेश — प्राकृत-चे स्थानीं पराकृत येतें (१२, १२). येथें प्र या जोडाक्षराच्या घटक व्यंजनामध्यें अ-कार शिरला आहे. वर्प-चे स्थानीं वरुप आलें आहे (६६, १६). येथील जोडाक्षराच्या घटकांत उ-कार शिरला आहे. वक्तृत्व याचें रूप वगतृत्व असें आढळतें (४९, १९). यांत अ-कार शिरला असून, शिवाय क चे स्थानीं मृदु ग आला आहे.

स्वरलोप — नरक चे स्थानीं नर्क असें आढळतें (५५, १०). यात मध्याक्षरातील अ-कार लुप्त होऊन बाजूच्या व्यंजनाचें जोडाक्षर बनलें आहे. नसता-चे स्थानीं नस्ता (५६, २६) व क्षमा-चे स्थानीं क्ष्मा (२८, ७३); या रूपातही अ-का-याचा लोप झाला आहे. अशा रीतीनें स्वरलोप व स्वरप्रवेश अशीं परस्पर विरुद्ध कार्यें घडून शब्दरूपें विकार पावलेलीं आढळतात.

स्वर परागति — न+घेववे (५६, २०) याचा जोड नेघवे असा आढळतो. यात घे-च्या स्वरानें मागील अक्षरांतील स्वरास खो दिला आहे. न+देआवे याचें रूपान्तर ए स्वर मागें सरल्यानें नेद्यावे असें आढळतें (१०७, ३).

(ख) ह-कार लोपादि — शब्द रूपान्तर पावताना त्यात स्वराचा प्रवेश, लोप व मागें सरणें अशीं तीन कार्यें आपण पाहिलीं. अशाच प्रकारचीं कार्यें ह काराला होऊन शब्दरूपें बदललेलीं आढळतात. पावे चे स्थानीं फावे (४९, ३), संपादी याचे स्थानीं सपाधी (५३), व हस्तीचे स्थानीं हस्थी (१०४, २४), अशीं रूपें आढळतात. यात प, द, त याचे स्थानीं यथाक्रम फ, ध, थ हे वर्ण आले आहेत; म्हणजेच येथें महाप्राणत्व किंवा ह कार प्रविष्ट झाला आहे असें ठरतें. पुढील उदाहरणात याच्या उलट प्रकार म्हणजे ह कार लुप्त झालेला आढळतो. अधिक-चे स्थानीं आदिक (१८, ९), साधोसाधी-चे स्थानीं सांदोसांदी (५५, १६), प्रबंध-चे स्थानीं प्रबंद (१३६, २८), जन्मभरी चे स्थानीं जन्म-बरी (७२, ५०), आणि प्रत्यहीं चे स्थानीं प्रत्यई,—अशीं रूपें आढळतात. ह-कार मागें सरलेलाहि दिसतो. वराह चें रूपांतर वऱ्हाव असें आढळतें. यांत ह-काराची परागति दिसून येते.

( आ ) उपधान — Number – Gender इत्यादि शब्दात नासिक्य-वर्ण M व N याचेपुढें उच्चारसौष्ठवासाठीं क्रमानें तृतीय वर्ग्य b आणि d प्रविष्ट झाले आहेत. या प्रविष्ट वर्णांना इंग्रजीमध्यें Cushion अथवा उपधान म्हणतात. हें उपधान मराठींतही आढळतें. आम्र-च्या अंबा या रूपांतरात ब हें उपधान आलें आहे. दासबोधामध्यें अमृत-चें रूपांतर अम्बृत [ ११,३ ] असें आढळतें. विस्मरति चें रूपांतर विश्रमति [ ६४,३५ ] असें आढळतें. यांत ब आणि [ इ-कारयुक्त ब अथवा ] म हीं उपधानें आहेत

( इ ) एकशेष — ब्रह्महत्यारा याचें रूपान्तर अथवा उच्चारान्तर प्रथम ब्रह्महत्यारा असें झालें. यात ह हें अक्षर लागोपाठ दोनदा येतें या दोहोंपैकीं पहिलें एकच शिल्लक राहून बनलेलें ब्रह्मत्यारा हें रूप दासबोधात सापडतें [३३,२५] अशा प्रकारच्या लागोपाठ येणाऱ्या दोन सदृश अक्षराचा एकशेष वर्तमान मराठींतही आढळतो अपरराज व नववर याचे स्थानीं क्रमानें अपरात्र व नवरा आपण योजितों.

( ई ) तत्सम व तद्भव याचें पौर्वापर्य — येथें असा प्रश्न निघतो कीं, वर सांगितल्याप्रमाणें लोप, प्रवेश, परागति इत्यादि विविध वर्णविकारानीं संस्कृत शब्द तद्भवरूपानें मराठींत आले आहेत यापैकीं बऱ्याचशा तद्भवाची घडण उलगडली जाऊन ते मूळ रूपानें म्हणजे तत्समाच्या पेशानें भाषेंत वावरताना सांप्रत आढळतात असें का व्हावें ? तत्समाचा तद्भव होणें हें कार्य अनुलोम दिसतें, तर तद्भवाचा तत्सम होणें हें प्रतिलोम दिसतें शब्दरूपाना असा प्रतिलोम हेलकावा का मिळावा ? याचें उत्तर संस्कृताच्या परिचयाची वाढ हें होय. विद्वानाच्या मनात अपभ्रष्ट रूपाबद्दल प्राय आरंभीं तरी अरुचि असते. यामुळें तद्भवाच्या मुळाचें ज्ञान झाल्यावर, विद्वान् लोक तद्भव टाकून तत्समाचा अंगीकार करितात

शब्द 'पडसाद' ऊठला । तुकाराम

इत्यादि ठिकाणीं येणारें पडसाद हें रूप टाकून त्याचे स्थानीं आपण प्रतिशब्द हा तत्समच योजितों इंग्रजी तद्भव गणेश-टेबल टाकून देऊन आपण कॉन्स्टेबल् बोलतों. इष्टापुरी टाकून स्ट्रॉबेरी-चा अंगीकार करतों इष्टकन्या टाकून स्टॉकिंग घेतों पुढेंही सांगण्यांत येणारे तद्भव टाकून आपण तत्सम स्वीकारतों,

असें दिसून येईल. यासंबंधानें पुढील गोष्ट लक्षणीय आहे. तत्सम रूप अगोदर व तद्भव नंतर हा नैसर्गिक कार्यक्रम नेहमींच आढळत नाहीं. विद्यापरिचयाच्या आधिक्यानें तद्भव अगोदर व तत्सम नंतर असाही कार्यविपर्यय आढळतो.

८ वर्ण विशेष विकार

( अ ) अ-काराचे विकार. ( क ) अभ्यंतरीं चे स्थानीं अभ्यांतरीं (५५,१७),वाताहति अथवा वाताहत-चे स्थानीं वाताहात (६४,२६),शरीर चे स्थानीं शेरीर ( ३९,३ ), छत्र चे स्थानीं छेत्र ( ४३,३६ ), महोत्सव-चे स्थानीं मोहोत्साव ( ३४ व ४३ ) अशींही रूपें आढळतात. येथें दिसून येतें कीं, अ च्या स्थानीं आ, ए, ओ असे स्वर कधीं कधीं प्राप्त होतात.

( ख ) मृत्यु-चें रूप मृत्य असें आढळतें, तर वध-चें रूप वधु ( १५१,४० ) असेंही आढळतें. यात उ-चा अ आणि उलट अ-चा उ झाला आहे. प्रसूतकाळीं ( ५७,३६ ) सद्या ठिकाणीं इ चा अ झाला आहे.

( आ ) ऋ-काराचे विकार — कर्तृत्व-चे स्थानीं कर्तुत्व, ऋण-चें रुण, पृष्ठ-चें पुष्टी अशीं रूपें आढळतात. यात ऋ-काराचे स्थानीं दुरोच्चार म्हणून उ आला आहे. पुढील रूपात ऋ-चे स्थानीं ई आढळतो. घृष-चें रूपांतर घीस असें सापडतें. याच्या उलट प्रकार म्हणजे अन्य सोप्या स्वराच्या स्थानीं उच्चार-प्यास कठीण असलेला ऋ-स्वर आलेलाही आढळतो. वृषापुष्ट-चे स्थानीं वृषापृष्ट (१७८,१०) आढळतें. हा विलोम विकार का व्हावा ? ' संस्कृताचा उच्चार कठीण असावयाचा ' या भ्रान्त तत्त्वाचा अंगीकार याचे मुळाशीं दिसतो. ऐ च्या स्थानीं ई आलेला मीत्री ( ३५,२१ ) या रूपात आढळतो. येथील मूळ रूप मैनी असें आहे. कलेवर-चे स्थानीं कळिवर होण्यात असाच इ-वर्ण आढळतो (५७,४२).

( इ ) य काराचे विकार — य च्या स्थानीं संप्रसारण होऊन इ आणि पुढें ए कधीं कधीं येतात. य चें रूपान्तर ये असेंही आढळतें. य-च्या स्थानीं च-ही येतो. इतिगाइत्री ( १०३,४ )—या रूपांत य-चा इ आढळतो. प्रत्यय चें रूपांतर पत्य ( २६,४८ ) व पति ( ६६,१२ ) असेंही आढळतें. प्रयत्न-चें प्रेत्न ( १४,१४ ), व्यर्थ-चें वेर्थ ( २३, ६१ ), व व्यवस्था-चें येवस्ता ( ५६, २७ ) असें आढळतें. या सर्व ठिकाणीं संप्रसारण झालें आहे. काहीं ठिकाणीं इ या मिथ्या या सत्य संप्रसारणानंतर गुण होऊन ए प्रवृत्त झाला आहे. इतिमात्र-चे स्थानीं ऐतिमात्र, व निश्चय चे स्थानीं निश्चे-यांत

दोन्ही ठिकाणीं सप्रसारण निभृत आढळतें. होये (५६,२४), इंद्रियेदमन (४५, ७०) या रूपात य चा ये झाला आहे. लय चें रूपांतर प्रथम लव होऊन नंतर लो (५९,२२) झालें आहे. शेजारधर्मामुळें मन आणि धन यांच्या अन्त्य स्वराचा उ-कार तनु मनु धनु अशा समासात आढळतो, याच्या उलट याच शेजारधर्मामुळें वर्तमान मराठींत तन मन धन या समासात अ-चा उ झालेला आढळतो.

(ई) संकीर्ण विकार— वर सांगितल्याहून इतरही विकार पुढील शब्दात आढळतात. अहर्निशीं चे स्थानीं आहिर्णेशीं (१३०,८९), उवा चे स्थानीं केवळ वा (२२,५१), चक्रवर्ती चे स्थानीं चक्रवती (१४६, २५), व्यतिरेक-चे स्थानीं वीतरेक (१७०,४९), वानप्रस्थ चे स्थानीं वान-प्रहस्ती (१७, २४), शुचिष्मत् (= अग्नि) चें रूपान्तर सुचिस्मंत व सुचिष्मत असें आढळतें (१६ व ४८). सक्त चे स्थानीं शक्त (१२८,६२), तर शवल चे स्थानीं सबळ (३६,३) व शर्वे-चे स्थानीं सेवें (२८६,८) आढळतें. अशा प्रकारें येथें श् स् या व्यंजनाचा परस्पर-विनिमयही आढळतो. सन्निपात चें रूपांतर सन्यपात व सन्येपात, सनपात (१४१-२२७-२७२) असेंही आढळतें. या रूपातील विकार बहुतेक गैरहिशेबी असे आहेत.

## ९ लेखन गत विशेष

च्छ-चे स्थानीं छ-चें लेखन,—उच्छेदति हा शब्द उछेदीत असा आढळतो (२, १७). तरी पण येथें उच्चार च्छ चाच होत असावा, कारण सूक्ष्मदर्शी मोरोपंत कवि यांच्याही लेखनात च्छ चे स्थानीं छ वारवार आढळतो. च आणि छ याना य कार जोडलेलाही आढळतो. याचा हेतु बहुधा शुद्ध तालव्य अथवा संस्कृतगत उच्चार सुचवावा असा असावा. यांछा-चे स्थानीं वाछ्या, जसें वाछ्या धरून चित्तीं (५, ३०). तुच्छ-चे स्थानीं तुछ्य (१८, १५) असें आढळतें. च्यातुर्ये (१३६,२८) यांतील पहिल्या अक्षरांतील य उघड उघड उच्चाराचें तालव्यत्व सुचविणारा दिसतो. उलट — मवनदीचा प्रवाहीं (२१२,१६) या ठिकाणीं च ला य जोडलेला नाहीं. उच्चार चे स्थानीं उचार (११९,८) असेंही आढळतें. न्य-चे पूर्वी अनुस्वार दिरलेला सुन्य (४१,२५) व प्रजनी या रूपात आढळतो. येथील मूळ रूपें शून्य व पर्जन्यी अशीं आहेत. संवत्सर-चें लेखन संवछर (१३४) असें वारवार आढळतें. ग्रहार व मल्हार अशीं दोन्ही रूपें एकाच पानांत (३०२,४६ व ४०) आढळतात

येथें उल्लेखिलेल्या वर्णांचे उच्चार बहुधा आपण सांप्रत जसे करितों तसे म्हणजेच शुद्ध होत असावे. विसंवाद आढळतो तो लेखनापुरताच असावा.

१० अन्वय–विशेष

( अ ) प्रयोगाकारणें (१५,३१), मजकारणें (६८,३५) यातील कारणें-चें मूळ कारणेन असें असावें. मूळ रचनेमध्यें यातील शब्द समानाधिकरण दिसतात; प्रयोगेण कारणेन, मया कारणेन, अशी मूळ रचना असावी.

( आ ) विद्या वैभव ना धन (२५,३२) यातील ना चा अन्वय सर्वगामी दिसतो. त्यानें केवळ धनाचाच निषेध व्यक्त केला जात नाहीं, तर त्याच्या पंक्तीस बसलेल्या विद्या वैभव याचाही.

( इ ) स्तव-चा अर्थ मुळें असा वारंवार आढळतो. भ्रान्तीस्तव मुलले जन (१४०,५७), जठराग्नीस्तव तापती ( १५६ ), या उदाहरणात मुळें हाच अर्थ आहे.

( ई ) 'मारमारून श्राहणा केला,' अशा अर्थी प्रयोग 'मारमारूं श्राहणा केला' ( ६०,३४ ) असा आढळतो. येथें शंका उत्पन्न होते कीं, मार मारून हें रूप मारून-मारून याचा संक्षेप आहे, किंवा मारंमार या द्विरुक्तीचें रूपांतर आहे? अर्थसाम्यामुळें मार मार हेंच येथें मूळ असावें, मारून-मारून याचें संस्कृत मूळ मारयित्वा मारयित्वा हें 'रोज मारून' असा अर्थ सुचवितें.

११ शब्दगत–विशेष

( अ ) अलोलिक असें रूप ( १७,२० ) आढळतें. याचा अर्थ अलौकिक असा आहे. आपण गौड चें रूपांतर गोड असें करितों. याच्या साम्यानें लौ-चा लो झाला असावा. व कि चे स्थानीं आकारसादृश्यानें चुकून लि वाचला गेला असावा. सारांश, अलोलिक या रूपाच्या मुळाशीं प्रामादिक वाचन कारण असावें. वारयावेघला याचा अर्थ 'वाऱ्याप्रमाणें धावणारा' असा आहे. या शब्दाची घटना, माझ्या मतें, वाऱ्यावेंघला ( = वाऱ्यावर चढला ) अशी असून *अर्थात् तो जोडशब्द असून अनवधानामुळेंच एकेरी मानिला गेला असावा.*

(आ) मराठ्याकारणें ( १५६, २० ), षष्ठी रचाव्याची इच्छा ( २२६, १२ ) इत्यादि ठिकाणीं शब्दाचें मूळ रूप ये कारान्त असून सामान्य रूपाच्या अन्तीं च्या आला आहे. हा च्या सर्वथा हिंदेवी असाच आहे. येथें प्रश्न असा निघतो कीं, 'रचावयाची इच्छा' यांतील षष्ठी यथी

बनली असावी ! रचणें पासून रचण्याची अशी षष्ठी होते, यावरून हीं षष्ठी रचणें याची नाहीं, हें उघड आहे. तेव्हां रचावयाची हें रूप रचाण्याची याच्या सदोष वाचनामुळें झालें असेल काय ! ण्या या जोडाक्षराचें वाचन यया असें अक्षरद्वय-रूप झालें असावें, असा तर्क बरोबर होईल काय ! अशा प्रकारें वाचनदोषामुळें शब्दाचें वैरूप्य किंवा द्वैरूप्य भाषेच्या व्यवहारांत अपूर्व नाहीं. इंग्रजींत A norange याचें वाचन वर्णांच्या सदोष विभागणीमुळें An orange असें एकदां केलें गेलें, व त्यावरून ( नारिंग याचें ) Orange ( ऑरेंज् ) असें भलतेंच रूप किंवा विरूप प्रचारांत आलें आहे. संस्कृतांत इष् म्हणजे इच्छा. इषा चरति स इट्चर. मोकळा सोडलेला पोळ स्वैर हिंडतो. यामुळें त्याला इट्चर अशी संज्ञा प्राप्त झाली आहे. गोपतिरिट्चर । असे पर्यायशब्द अमरांत सापडतात. या शब्दरूपांत च चा आडवा फांटा ड-चें पुच्छ मानला गेला, व अर्थातच आडव्या फाट्यानें शून्य असा च व म्हणून वाचला गेला. ड चें पुच्छ ट ला जोडल्यानें तो ड-सारखा दिसला, व शब्दाचें वाचन इड्वर असें झालें. या दोन्ही रूपांना कोशांत स्थान मिळालें आहे. प्रामादिक वाचनामुळें इंग्रजींत आपण शब्दाचें वैरूप्य पाहिलें, तर संस्कृतांत द्वैरूप्य पाहतों. सारांश, भ्रान्त वाचनामुळें शब्दरूपाचें अन्यथा-ग्रहण होणें अभूतपूर्व नाहीं.

## १२ शब्द विशेष

( अ ) लिंगांतर — आकर हा शब्द संस्कृतांत पुलिंगी आहे. त्याचें मराठी रूप आगर हा शब्द तुकोबाराय नपुंसकलिंगी वापरितात. वर्तमान मराठींतही तो तसाच आहे पण दासबोधांत 'चिंतेचा आगर' (५५,५), अशा ठिकाणीं तो आपल्या मूळ पुलिंगी वळणावर गेला आहे. 'तरी तेथें चुका पडिला' (१७६,३७) येथें चुका चा अर्थ भ्रांति, भूल, चूक असा आहे. या ठिकाणीं चुका आ-कारान्त पुलिंगी असून वर्तमान मराठींत तो आ-कारान्त स्त्रीलिंगी झाला आहे. संस्कृताविरुद्ध हल्लींप्रमाणेंच दासबोधांत जन्म (९१,२३) पुलिंगी व व्याधि (६२, १८) व रासि (१४७,३६) स्त्रीलिंगी आढळतात. प्राणी हा शब्द (५९,१६) नपुंसकलिंगी योजिला आहे.

( आ ) अर्थांतर असाधारण (४१,३८) चा अर्थ फार मोठा असा आहे. आठवे चा अर्थ (३७,२०) वाटे असा आहे. आठवतें म्हणजे वाटतें. तर याचे अर्थी, हल्लींही कवितेंत आढळतें त्याप्रमाणें, तरी असें रूप येतें (२१,२८) द्रव्य-

सुचि (४८,२९) याचा अर्थ त्याच्या मूळ रूपावरून सहज लक्षांत येईल. तें मूळरूप द्रव्यशुचि. शुचि म्हणजे शुद्ध. तेव्हा द्रव्यसुचि म्हणजे सचोटीचा. धूर्त याचा अर्थ हल्लींप्रमाणेंच चतुर असा आहे. संस्कृतातील निंदेचा बोध येथें होत नाहीं. पाढरी म्हणजे 'घरानीं युक्त असा गावाचा भाग' याचा 'विरुद्धार्थक शब्द' काळी असा आहे. त्याचा अर्थ शेत-जमीन हा प्रसिद्धच आहे.

उजेड 'पाहतां' कृष्णपक्षा। पाविजे कैंचा। (१५७,२८ व ५२,५) यातील पहा-चा अर्थ इच्छिणें असा असून, त्याचें मूळ स्पृह् धातु आहे. पाहिली घडी नव्हे आपली (९२,४१) येथें पाहिली म्हणजे 'उद्याची' असा अर्थ दिसतो. संगती पुरेल (६८,३२) येथें पुरेल म्हणजे संपेल असा अर्थ आहे. पुढील (२९,१२) चा अर्थ 'दुसरा' असा आहे. पाहणें, पाहिली व पुढील याचे हेच अर्थ ज्ञानेश्वरींतही आढळतात. पोटें (५९,२३) म्हणजे मनापासून. मुकी वस्तू (२७, ६६) चा अर्थ माणी असा आहे. राहिलीं (६४,२०) या शब्दानें 'गेलीं' असा अर्थ होतो. त्यागी (५४,३६) हा शब्द त्यागी, दाता, असा बोध करतो. ज्ञानेश्वरीप्रमाणें दासबोधांतही वयसा शब्द स्त्रीलिंगी असून तारुण्याचा बोध करतो (९२,४१). सर्व असा अर्थाचा वाचक शब्द अवघा याचें रूपान्तर आघवा (२८,७४) असेंही आढळतें. या उत्तरोक्त शब्दरूपात मुद्रणदोष संभवत नाहीं. कारण हें रूप चरणान्तीं यमकबद्ध असें आढळतें. तरीपण यमकाहून भिन्न स्थानीं समग्रतर असेंच रूप येणार; या दृष्टीनें अवघा हें रूप कविसंमत ठरतें; कारण

हरिकीर्तनें भरावा। ब्रह्मगोल अघवा॥ (९७,५)
हें आवघें चि जाणावें। विलक्षण (१११,४)

येथें उत्तरन अवघा हें रूप आहे.

१३ छंदोविशेष

दासबोध हा ग्रंथ ओवीछंदात आहे. ओवीच्या चरणातील विधानाकडे पाहता, पहिल्या दोन चरणात प्रत्येकीं एक-एक वस्तु व शेवटले दोन चरण मिळून एक वस्तु सांगितलेली वारंवार आढळते. जसें—

जन्म दुःखाचा अंकुर। जन्म शोकाचा सागर।
जन्म भयाचा डोंगर। चळेना ऐसा

१४ विनोद

ध्वन्यर्थानि करणें असा अर्थी प्रौढ पण विनोदी प्रयोग 'ग्रासतीर्थ घेणें'

( ७०,१९ ) असा आहे.

१५ शंका

( अ ) 'चिंता काजळी लागली' याचा अर्थ चिंता हळू-हळू भाजूं लागली, असा दिसतो. तेव्हां चिंता-काजळी म्हणजे चिंतेची सतत गुप्त पीडा. सतत गुप्त पीडा या अर्थी आपण काळजी शब्द योजितों. तेव्हां हा शब्द चिंता काजळी या समासाच्या एकदेशात व्यंजनविपर्यय होऊन झाला असेल काय ?

( आ ) दवाळा आवडे विनोद । उन्मत्तास नाना छंद ।
तामसास 'अप्रेमाद' । गोड वाटे ॥ (२१७,५१)

येथें अप्रमाद म्हणजे काय ? या ओवीचीं अंशतः समानार्थक ओवी पान ४० मध्येंही १९-वी आहे. दोन्ही ठिकाणीं आरंभींचा अ एक प्रकारच्या उच्चारसुलाकरिताच जोडलेला असेल काय ? पान ८४,१५ मध्येंही हा शब्द आढळतो.

१६ समाप्ति

याप्रमाणें व्याकरण व व्युत्पत्ति या दोन दृष्टींनीं दासबोधाचें परीक्षण संक्षेपतः केलें आहे. हें परीक्षण दासबोधाच्या पूर्वार्धावरच आधारिलेलें आहे. असें असलें तरी उत्तरार्धासही हें परीक्षण लागू होईल असें वाटतें. या परीक्षणांतील कांहीं गोष्टी मीं विधानें म्हणून सांगितल्या आहेत, व कांहीं गोष्टी शंकारूपानें मांडिल्या आहेत. या शंकांची निवृत्ति मी दासबोधाच्या व्यासंगी लोकांपासून इच्छितों. तसेंच त्यांस व इतरही विद्वानांस प्रार्थितों कीं, या परीक्षणांतील दोष त्यांनीं निःशंकपणें दाखवावे; म्हणजे मला त्यांच्या दुरुस्तीचा विचार करता येईल. अशा प्रकारच्या दोषदर्शनामुळेंच दासबोधाचा अभ्यास लोकांत अधिक चिकित्सकपणें व समाधानकारक रीतीनें होऊं लागेल; व हीच गोष्ट समर्थांस अत्यंत मान्य आहे. अभ्यास सार्थ असावा. एतदर्थक त्याचा आग्रह पुढील ओवींत स्पष्ट दिसतो.

अर्थान्तर पाहिल्याविण । उगेंचि करी जो श्रवण ।
तो श्रोता नव्हे पाषाण । मनुष्यवेषें ॥ ७-६-८

येथें अर्थांतर म्हणजे 'वरवरचा अर्थ' नव्हे, तर खोल, मार्मिक, सुसंगत असा अर्थ. अशाच अर्थज्ञानाकडे अभ्यासकानीं दृष्टि ठेवावी. अर्थशून्य अध्ययन म्हणजे केवळ काळाचा अपव्यय हें सांगणें नकोच. शेवटीं ही परीक्षणरूपी वाङ्मय-पूजा समर्थांचे चरणीं नम्रपणें वाहून, आपल्या सर्वांचा निरोप घेतों.

## ( २६ )

# श्रीसमर्थांचे विद्यामठ

( लेखक—श्री. त्रिंबक रामकृष्ण गद्रे, बी. ए., एलएल. बी., अकोला )

### भूमिका

श्रीसमर्थ रामदासस्वामींचे अवतारकृत्य धर्मसंस्थापनेसाठीं होतें व त्या हेतूच्या सिद्ध्यर्थ त्यानीं विद्यामठाचा प्रचंड उद्योग केला. श्रीमच्छंकराचार्यांच्या नंतर दत्तसंप्रदायाचे प्रवर्तक श्रीनरसिंहसरस्वती व विजयानगरच्या साम्राज्याचे संस्थापक श्रीविद्यारण्यस्वामी यांनींहि वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनाचा उद्योग केला. परंतु या उद्योगाना जितकें यश यावयास पाहिजे तितकें न येता अखिल भरतखंडभर मुसलमानी साम्राज्य पसरून सर्व हिंदु जनता महमदी धर्म स्वीकारणार अशी भयावह परिस्थिति उत्पन्न झाली. प्रलोभन व जुलूम यांनीं लोक इस्लामी धर्म पत्करूं लागले. मानमरातब व अधिकार यांच्या आमिषानें उच्चवर्णीय ब्राह्मण, कायस्थ, रजपूत, मराठे आदि मुसलमानी बादशाहींत नोकरी पत्करून यावनी साम्राज्याचा विस्तार करूं लागले. अशा वेळीं महाराष्ट्रांत शिवसमर्थांसारख्या विभूति निर्माण न होत्या तर भूषणकवीनें म्हटल्याप्रमाणें हिंदु मात्र आपल्या धर्माला पारखा झाला असता. गोब्राह्मणप्रतिपालक व हिंदुधर्मसंरक्षक असें स्वराज्य स्थापन करावयाचें हा छत्रपति शिवाजीमहाराजांच्या कार्याचा निश्चित हेतु होता, तर समर्थांचा हेतु याच कार्याचा पाठपुरावा करून त्यांना सर्व महाराष्ट्रीय जनतेला व विशेषेंकरून महाराष्ट्रांतील यच्चावत् तरुणांना या कार्यांत आणावयाचें होतें. इतकेंच नव्हे, तर हिंदुधर्माची पुनः सुव्यवस्थित

घडी बसेल अशी व्यवस्था करावयाची होती. धर्मसंरक्षकाचें काम शिवाजी-महाराजांना करतां येणें शक्य होतें; परंतु धर्मसंस्थापनेचें कार्य करण्यास दुसऱ्या पुढाऱ्याची आवश्यकता होती. हें कार्यक्षेत्र समर्थ रामदासस्वामींचें होतें व त्यांच्याशिवाय दुसरा कोणी तसलें बिकट कार्य करण्यास असमर्थ होता व म्हणू-नच तत्कालीन सर्व साधुसंतांनीं रामदासस्वामींना मोठ्या प्रेमादरानें "समर्थ" ही पदवी बहाल केली होती ! कृष्णातीरीं आगमन करीपर्यंतचें रामदासांचें चरित्र पाहिलें तर बयाच्या छत्तिसाव्या वर्षापर्यंत ते जणूं काय आपल्या अंगीकृत कार्यांत यश मिळावें या उद्देशानें स्वतःची तयारी करीत होते. ईश्वरी कृपेमुळें बयाच्या बाराव्या वर्षींच लग्नाच्या पाशांत न सापडतां ते नाशकास विद्यार्जन व तपश्चर्येसाठीं येऊन दाखल झाले. या ठिकाणीं तत्कालीन विद्वानांच्या सान्निध्यात त्यांनीं संस्कृत भाषेचें ज्ञान संपादन केलें व त्यांना संस्कृत येत होतें याचा उत्कृष्ट पुरावा श्री. देव यांना सापडलेलें समर्थांनीं स्वहस्तानें लिहिलेलें वाल्मीकि रामायणच होय ! तपश्चर्येमुळें त्यांचें शरीर सर्व प्रकारच्या शारीरिक संकटांना तोंड देण्याइतकें बळकट झालें. त्यांच्या विद्वत्तेमुळें, श्रीरामचंद्राच्या सेवेमुळें व वैराग्ययुक्त दिन-चर्येमुळें लोक व इतर जनता त्यांना "रामदास" म्हणून संबोधूं लागली होती. त्यांच्या विद्याभ्यासाचे शेवटीं त्यांच्या शहाजीराजांसारख्या मराठे सरदारांच्या भेटी होऊन तत्कालीन राजकीय व राष्ट्रीय परिस्थिति त्यांच्या लक्षांत आली व ती चांगल्या प्रकारें समजावी यासाठीं त्यांनीं भरतखंडभर तीर्थयात्रा करण्याचें ठरविलें. हें करण्यास श्रीरामचंद्रानें त्यांना प्रेरणा केली, असें त्यांनींच नमूद करून ठेवलें आहे. तीर्थयात्रा करीत असतांना त्यांना धर्म, गोब्राह्मण व स्त्रिया यांची शोचनीय स्थिति दिसून आली. परधर्मीय राज्यकर्त्यांकडून एतद्विषयक सुरक्षितता अशक्य असें त्यास दिसून आलें. काश्मीरपर्यंतच्या त्यांच्या प्रवासात तुळसीदासांनीं सुरू केलेली रामोपासना व नानकानें स्थापन केलेला शीख पंथ याचा त्यांना परिचय झाला. सर्व उत्तर हिंदुस्थानच्या प्रवासांत त्यांना आढळून आलें कीं, स्वधर्म-संस्थापना व त्यासाठीं स्वराज्याची उभारणी हें कार्य उत्तरभारतात *तटस्थ लोकां*-कडून होणें जवळ जवळ अशक्य आहे. मोगल साम्राज्याचें प्रचंड सामर्थ्य त्यांनीं स्वतः पाहिलें, तेव्हां अशा परिस्थितींत झाली तर अशा कार्याची सुरुवात दक्षिणेंतच आणि तीहि महाराष्ट्रात होऊं शकेल, असें त्यांच्या मनानें घेतलें. शिवाजी-महाराजांनीं सुरू केलेल्या उद्योगाचीहि सुवार्ता त्यांना कळली. बारा वर्षांची यात्रा

सपवून जनस्थानवासीयाचा व तेथील मित्राचा निरोप घेऊन ते कृष्णातटाकीं येऊन दाखल झाले व आपल्या कार्याला त्यानीं प्रारंभ केला.

### कार्यांचें स्वरूप

तपश्चर्या, विद्याभ्यास व तीर्थयात्रा करीत असतानाच त्यानीं आपल्या मनाशीं आपल्या भावी कार्याची रूपरेखा योजून ठेविली होती. आपल्या कार्यांत तरुणाना निमंत्रण देऊन त्याच्यात शारीरिक सामर्थ्य वाढविण्यासाठीं बलोपासना म्हणून मारुतीची उपासना सुरू करावयाची असें त्यानीं ठरविलें व या हेतूच्या सिद्धयर्थ त्यानीं कृष्णातीरीं आल्यावर सुप्रसिद्ध अकरा मारुतींची स्थापना केली. हेंच कार्य त्याच्या हजारों शिष्यमहंतांनी इतक्या तडफीनें व घडाडीनें केलें कीं, महाराष्ट्रातच काय परंतु सर्व भरतखडात खेडोखेडीं मारुतींची स्थापना होऊन हिंदु तरुण शारीरिक सामर्थ्य कमाविण्याच्या उद्योगास लागला. तथापि नुसत्या शरीरसामर्थ्यानेंच कार्य व्हावयाचें नव्हतें, या शरीरसामर्थ्याचा उपयोग कसा व का करावयाचा ही गोष्ट जनतेला पटवून देण्यासाठीं त्यानीं महाराष्ट्रांत रामोपासना सुरू केली व चाफळ येथें श्रीरामचंद्राचें देवालय उभारून त्यांत धनुर्धारी श्रीरामाची स्थापना केली. श्रीरामाचा जीवितहेतुच आर्य धर्माच्या सरक्षणाचा होता. ऋषींच्या यज्ञयागाचे वेळीं ते सुरळीत पार पडावे म्हणून मखरक्षणार्थ त्याना निमंत्रण येई व क्षत्रियाचें हें ब्रीद पार पाडण्यास श्रीराम नेहमीं उत्साहानें धावून येत. कैकेयीच्या वराच्या पालनाच्या निमित्तानें त्यानीं वैदिक धर्माच्या सरक्षणार्थ दक्षिण हिंदुस्थानात प्रिय भार्या सीतादेवी व बधु लक्ष्मण यासह प्रवेश केला. यज्ञयागांचा, ऋषींचा व त्याच्या आश्रमाचा, वैदिक धर्माचा व आर्य सस्कृतीचा लकेचा सम्राट् रावण हा मोठा भयकर शत्रु समजला गेला होता. त्यानें भरतखडातले सर्व राजे, नव्हे देवसुद्धा, आपल्या बंदिवासांत टाकले होते. या सर्वांना मुक्त करण्यासाठींच श्रीरामानें दक्षिणेंत आगमन केलें व सीताहरणाच्या निमित्तानें त्यानीं रावणाशीं प्रचंड युद्ध केलें. या कामीं त्यांना दक्षिणेंतील वानर जातीच्या लोकांचें व त्यांतील मारुतीसारख्या तरुणांचें उत्तम साहाय्य झालें. ज्या आर्य वीरानें एके काळीं असा अद्भुत चमत्कार घडवून आणला, त्याचें उदाहरण महाराष्ट्रांतील तरुणापुढें ठेवण्यांत रामदासांच्या योजना चातुर्याची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच! मारुतीसारखे स्वयंसेवक व श्रीरामासारखा नेता मिळाल्यावर स्वराज्यरूपी श्री खचित मिळणार असा भाग्य-

याद तत्कालीन महाराष्ट्रीय तरुणांत समर्थांनी उत्पन्न केला, व या योजनेमुळें हजारों मराठे तरुण शिवाजीमहाराजांच्या निशाणाखालीं गोळा होऊं लागले.

## मठ-महंतांचा व्याप

अंगीकृत कार्याच्या प्रचारार्थ शिष्यसंप्रदाय वाढविणें व प्रांतोप्रांतीं विद्यामठाची स्थापना करून त्यांवर महंतांची योजना करणें हा कार्यक्रम समर्थांनीं कृष्णातीरीं आल्यावर सुरू केला. समर्थांनीं स्थापन केलेल्या मठाची योजना प्राचीन गुरुकुलकल्पनेप्रमाणें होती. चार वर्ण व चार आश्रम हें आर्य किंवा हिंदु धर्माचें प्रमुख लक्षण होय व म्हणूनच वैदिक धर्माला वर्णाश्रमधर्म अशी संज्ञा देण्यांत येते. या आश्रमाची व वर्णांची सिद्धता प्राचीन समाजव्यवस्थेंत गुरुकुलद्वारा होत असे. पार प्राचीन काळीं सर्व भरतखंडभर अशीं कित्ये तरी गुरुकुलें स्थापन झालीं होतीं. या कुलांतून हजारों विद्यार्थी शिकत. वयाच्या सातव्या वर्षीच मुलाला गुरुकुलामध्यें पाठवावें लागे व या बाबतींत लक्ष घालणें त्या वेळच्या क्षत्रिय राजाचें एक महत्त्वाचें कर्तव्य मानलें जाई. अशा आश्रमांतून ब्राह्मणक्षत्रियवैश्यादि तरुणांना सर्व प्रकारचें शिक्षण मिळे. वेदवेदांगाबरोबरच उपवेदांचेंहि शिक्षण दिलें जाई; धनुर्वेद, आयुर्वेद, गांधर्ववेद, अर्थवेद अशा विषयांचा गुरुकुलांत अभ्यास होई. ही गुरुकुलपरंपरा ज्या वेळेला मोडली त्याच वेळेला भारतीयांच्या सर्व तऱ्हेच्या ऱ्हासाला सुरुवात झाली. अशा उपयुक्त संस्थेचा मठाच्या रूपानें जीर्णोद्धार करावा, अशी कल्पना मनात येऊनच समर्थांनीं आपल्या विद्यामठाची स्थापना केली असली पाहिजे. मठांतला महंत विद्यासंपन्न, शरीरसामर्थ्यानें बळकट, वर्णानें ब्राह्मण व राजकारणांत लक्ष घालणारा असे. आपल्या मठांत सर्व प्रकारच्या ग्रंथांच्या हस्तलिखितांचा संग्रह करून तो मठाला विद्यामठाचें सार्थ स्वरूप प्राप्त करून देई. ब्राह्मणाचें कर्तव्य अध्ययन व अध्यापन आहे व त्यानें सर्व लोकांत विद्येचा प्रसार केला पाहिजे, हें हा महंत आपल्या आचरणानें दाखवून देई. त्या वेळच्या परिस्थितींत क्षत्रिय जातींत धनुर्विद्येचा प्रसार करून वैदिक धर्माच्या संरक्षणार्थ क्षत्रिय तरुणाला हातांत धरणें जरूर असल्यानें हें कार्य हे महंत विशेष आस्थेनें करीत. हरिभजन व राजकारण यांची सांगड घालण्यांत आल्यानें त्या वेळचा महंत यांहि बाबतींत लक्ष घाली. मठांचें हें व्यापक कार्यक्षेत्र लक्षात आणल्यास व महंतांच्या व्यापाचें स्वरूप ध्यानात ठेवल्यास समर्थांचे मठ हे केवळ शिष्यांचें व महंतांचें निवासस्थान नसून ते खरेखुरे

विद्यामठ होते व त्याची परिणति गुरुकुलासारख्या संस्थेंत व्हावी अशा समर्थांचा हेतु असावा हें सहज दिसून येतें.

## विद्यामठाचें दर्शन

समर्थांनीं व त्यांच्या शिष्यांनीं स्थापन केलेल्या विद्यामठाची माहिती श्री. शंकरराव देव यांच्या परिश्रमामुळें आता थोडी थोडी मिळूं लागली आहे. तथापि, उपलब्ध माहितीवरूनहि या विद्यामठाचें ओझरतें दर्शन होऊं शकतें. समर्थांनीं अकराशें मठ स्थापन केले असें म्हणतात; तथापि तूर्त एकशेंदहा मठाची माहिती मिळते. इतर मठाची माहिती संशोधनद्वारा मिळवणें अत्यवश्य आहे. हे मठ महाराष्ट्र, तेलंगण, कर्नाटक, दक्षिण देश व उत्तर भारत अशा सर्व हिंदुस्थानभर होते. परंतु त्याचा विशेष व्याप दक्षिणेंतच होता. शिवाजीमहाराजाच्या कार्याला या मठाचा उपयोग व्हावा म्हणून त्याची स्थापना झाल्यानें व महाराजांचें कार्यक्षेत्र विशेषेंकरून दक्षिणेंतच असल्यानें मठाचें संख्याधिक्य दक्षिणेंतच असावें यात आश्चर्य नाहीं. थेट तंजावर-रामेश्वरपर्यंत मठ स्थापण्यात आले होते. वऱ्हाड-मध्यप्रांतात अकोला, कारंजा, एलिचपूर, भंडारा या ठिकाणीं मठ स्थापन करण्यात आले होते. जान, चाफळ, सज्जनगड, टाकळी, इंदूरबोधन, तंजावर, डोमगांव, शिरगाव, तिळगाव, कण्हेरी, दादेगाव, कारंजा, माळगाव, घोडराई गवराई, नीळंगें, शिरवळ, मन्यारगुडी, तेलंगणप्रांत, पारगाव व मनपाडळें या ठिकाणीं स्थापिलेल्या मठावर स्वतः समर्थ व शिवाय उद्धवस्वामी, भीमस्वामी, कल्याणस्वामी, दत्तात्रेयस्वामी, दिनकरस्वामी, वासुदेवस्वामी, देवदास, बाळकराम, प्रल्हाद, भिकराज, मुसळराम, अण्णापा, बाजी, नारायण, अनंतस्वामी, शिवराम (उद्धवच), शंकर गोसावी, व जयराम गोसावी या महंताची नेमणूक करण्यात आली होती. यांशिवाय समर्थांच्या पट्टशिष्या वेणाबाई यांची मिरज येथील मठावर महंत म्हणून योजना झाली होती व त्यांचे शिष्य बीड मठाचे महंत गिरिधरस्वामी यांनीं लिहिलेल्या "समर्थप्रताप" या ग्रंथावरून या विद्यामठाची व महंतांची आपणांस माहिती मिळते. राशिवडें व बाळवें येथील मठावर दुसऱ्या समर्थशिष्या अंबिकाबाई यांची नेमणूक झाली होती. याशिवाय सावंतवाडी, पंढरपूर, दंडाराजपुरी, औदुंबर, प्रयाग, अयोध्या, मथुरा, मायापुरी, काशी, कांची, अवंतिका (दोन), द्वारका, बद्रिकेदार, खोरटी, ओंकारेश्वर, औंढ्या, श्रीशैल्यशिखर, भीमाशंकर, पर्यळीनगर, घृष्णेश्वर, रामेश्वर, मल्याळ, अनंतशयन, केज, पारेगाव,

सज्जनगड, तापीपूर व पाली या ठिकाणींहि मठांची स्थापना करण्यांत आली होती. सदर मठावर शंभु, अनंत, त्रिंबक गगनी ( आकारे ), हरिदास, वेणीमाधव, रामकृष्ण, हरिकृष्ण, जयकृष्ण, रामचंद्र, भगवंत, गंगाधर, रघुनाथ, हरि, दयाळ, विश्वंभर, ब्रह्मदास, वहाळ, कोदंडराम, गोपाळ, मल्हारी, आनंद, हनुमंत, मारुति-दास, बलभीम, उद्धव, मुरारी, उदास, कृष्ण, रंगनाथ आठमुळे या महंत-श्रेष्ठांची योजना झालेली होती. याशिवाय हजारों शिष्यसमुदाय सर्व भरतखंड-भर संचार करून राष्ट्रकार्य व धर्मसंस्थापना करीत होता असें दिसून येतें. हे सर्व शिष्य निरनिराळ्या मठाच्या आश्रयानें आपलें कार्य करीत असले पाहिजेत. कृष्णा-तीरावर नृसिंह, दक्षिणदेशीं जयवंत, दक्षिण प्रांतात राघव, बेदरप्रांतीं मुसळराम, कर्नाटकात जयराम, वऱ्हाडप्रांतीं बाळकृष्ण व महारुद्र, सुरतप्रांतीं जनार्दन, देवगड-प्रांतीं दामोदर, रामटेककडे श्रीधर, गोमांतकात गोविंद, गोकर्णाकडे भैरव, तेलंगणात शिवराम ( उद्धव ), रायचूरकडे सदाशिव सागर, श्रीरंगपट्टणाकडे उदासवृत्तीचे शंकर, बेदरात म्लेच्छसंहार करणारे राम, उत्तर भारतात अंतर्वेदींत हरिश्चंद्र, कलकत्त्याकडे गंगासागराजवळ हरियंद्र, सह्याद्रीच्या डोंगरात अनंत कवि, काशी-कडे विश्वनाथ पंडित, सर्वत्र संचार करणारे, निःस्पृह व उदास असे नारायण व चक्रपाणि, वाहेगावी अबादास, व प्रयागहून समर्थस्नानास कावडीनें गंगा-जल आणणारे माधव व यादव हे सर्वत्र समर्थकार्यांचा प्रचार व प्रसार करीत होते. दिवाकर गोसावी, भैरवराम, विठ्ठल, राम, भास्कर, महादेव आगलावे, प्रेमळदोटी, गणेश, गोपाजी, जीवन, तुकोबा चिंडवी, गिरिधर, रंगबोध, रंगमूर्ति, निरंजन, तुकोबा, महादेव, एलिचपूर मठाचे महंत भोळाराम ( विडा कुटून खलवत्ता देणारे ), जीवन्मुक्त व विश्वनाथ असे किती तरी शिष्य कधीं समर्थांसंनिध तर कधीं अन्यत्र कीर्तनभजनद्वारा राष्ट्रकार्य करण्याची परा-काष्ठा करीत असत. याच ठिकाणीं पुण्यस्मरणीय अशा समर्थकन्यांचाहि उल्लेख करणें अवश्य आहे. मिरजमठाधिपति वेणाबाई या तर समर्थांच्या अत्यंत आव-डत्या शिष्या. त्यांना खुद्द समर्थांसमोर कीर्तन करण्याचा अधिकार समर्थांकडून मिळाला होता. शिरगावे येथील मठाच्या अधिपति अंबिकाबाई याहि कोल्हापूर-प्रांतीं समर्थकार्यांचा प्रसार करीत होत्या. याशिवाय, उद्धवमाता अन्नपूर्णाबाई, सतीबाई शहापूरकर, कल्याणस्वामींच्या मातुश्री रुक्मिणीबाई, कऱ्हाडच्या सुप्रसिद्ध रमणाबाई उर्फ अक्का, द्वारकाबाई, ताप्तीतीरच्या नरसाबाई, मानाबाई, आपाबाई,

सत्त्वाबाई, गंगाबाई, गोदाबाई, अक्काबाई, अथ कृष्णाबाई अशा किती तरी समर्थ-कन्या गुरुचरणीं निष्ठा ठेवून समर्थकार्याचा विस्तार सर्व महाराष्ट्रभर करीत होत्या. याशिवाय किती तरी शिष्य राजदरबारींहि होते. यापैकीं पुढील शिष्यांचा गिरिधरांनीं उल्लेख केला आहेः—निळो सोनदेव मुजुमदार, बाळाजी आवजी चिटणीस, रामचंद्र नीळकंठ पंत अमात्य हुकुमतपन्हा, गणेशपंत, मल्हारपंत, नानाजीपंत, रामकृष्णपंत, विश्वंभरपंत, विश्वासराव, नारायणपंत, नृसिंहराव, रायाजीपंत, रंगनाथपंत, कोनेरीपंत मल्हारीपंत, अंबाजी, बाळकृष्णपंत हडपसरकर, अंताजी गोपाळ वाकनीस, अनंतभट महाबळेश्वरकर, आनंदराव देशपांडे व तिमाजीपंत. याशिवाय प्रत्येक महंतहि आपापली शिष्यशाखा वाढवी व उपमठाची स्थापना करून त्यांवर आपल्यातर्फे महंताची नेमणूक करी. कल्याणस्वामी, जगन्नाथस्वामी, मुद्गलस्वामी अशा महंतांनीं शिष्यसंप्रदाय वाढवून मठस्थापना केलेली आहे.

### विद्यामठांच्या अंतरंगदर्शनाचा प्रयत्न

समर्थांच्या या विद्यामठाच्या अंतरंगदर्शनाचा प्रयत्न श्री. देव यांनीं चालविला असून रामदासी संशोधनाच्या पहिल्या खंडावरून त्याची थोडीशी कल्पना येऊं शकते. संशोधनाच्या इतर खंडांवरून यासंबंधानें पुष्कळच माहिती उपलब्ध होईल. "या प्रत्येक रामदासी विद्यापीठांत मोठा थोरला ग्रंथसंग्रह असे. पूर्वकालीन यच्चावत् सर्व साधुसंतांच्या संस्कृत प्राकृत ग्रंथांचा संग्रह या विद्यापीठांतून केलेला असे. श्रीसमर्थांचा सर्व कवितासमुद्र या पीठांतून सांठविला असे, हें सांगावयासच नको. श्रीज्ञानेश्वर, मुकुंदराज, नामदेव, मुक्ताबाई, एकनाथ, तुकाराम, श्रेष्ठ, पूर्णानंदाचे शिवराम, मुक्तेश्वर, उद्धवचिद्घन, वामनपंडित, केशवस्वामी, रंगनाथस्वामी, वेणीस्वामी, राघवरंक, शिवदिनकेसरी, माळो, मोघला, कृष्णदयार्णव, चिंतामणिसुत मुद्गल, विष्णुदासनामा, शिवकल्याण, कोकिळ गंगाधर, श्याम, वासुदेव, नरहरिसुत, राघवसुत, रंगेशात्मज, शिवात्मज, रघुनाथ, बहिरा, किंकर, महिपति इत्यादि ज्ञात व अज्ञात अशा कित्येक सत्पुरुषांचे ग्रंथ आजहि गिरिधरांच्या मठांत आहेत" (समर्थप्रताप प्रस्तावना, पृ. ६१-६२). समर्थप्रतापांत पंधराव्या व सोळाव्या समासांत खुद्द समर्थांचे वेळीं या सर्व संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास सज्जनगडावरील मठांत चालत असे, अशा प्रकारचें वर्णन "महापुरुषभोजनें" व "दुसरी पंगती" या मथळ्याखालीं आलें आहे व त्यांत नमूद केलेल्या किती तरी कवींच्या व संतांच्या वाङ्मयाचें अधिक संशोधन होणें

बाकी राहिलेलें आहे. या मठाच्या नेतृत्वाखालीं श्रीरामनवमीचा व हनुमज्जयंतीचा उत्सव अत्यंत मोठ्या प्रमाणावर होत असे. चाफळ येथें होणाऱ्या रामनवमीच्या उत्सवाचें रसभरित वर्णन "श्रीरामअधिष्ठान" या समासांत गिरिधरांनीं केलें आहे या वेळीं प्रचंड यात्रा भरत असे व असंख्य शिष्यसमुदाय व महंतगण गोळा होत असत खुद्द समर्थ रामदासस्वामीहि उत्सवास हजर रहात असत. या उत्सवाचें वर्णन त्यांनीं एका डफगाण्यावर केलें आहे हा उत्सव आटापल्यावर निवडक मंडळींसह संतमहंत सज्जनगडावर श्रीसमर्थदर्शनास जात असत व त्या ठिकाणीं त्यांचेबरोबर तत्कालीन परिस्थितीबद्दल विचारविनिमय होई या वेळीं

श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती । प्रांतीचे लोक दर्शनासी येती ।
सकळ प्रांतीचा स्वामी परामृश घेती । चिंता करिती विश्वाची ॥
स. प्र २०-५८

देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्थ होती मनें ।
म्हणती कैसी वाचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ ५९
कैसी क्षेम राहेल जगतीं । कैसीं देवदेवाल्यें तगती ।
कैसे कुटुंबवछल लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥ ६०

अशी चिंता शिष्यमहंतांसहवर्तमान समर्थ करीत असत असो श्रीसमर्थांच्या विद्यामठाच्या अंतरंगाचें संपूर्ण दर्शन वाढत्या संशोधनावर अवलंबून आहे व असें रामदासी संशोधन महाराष्ट्रीय विद्वान् तरुणाकडून होवो अशी परमेश्वरास प्रार्थना करून हें लहानसें टाचण येथेंच संपवितों.



## ( २७ )

## श्रीसमर्थांचीं करुणाष्टकें

( लेखक — श्री. मोरेश्वर हरि आपटे, एल्‌एल्. बी., धुळें )

भजन पुजन आहे ज्ञान वैराग्य आहे ।
बहुत श्रवण आहे धारणा सिद्ध आहे ।
हृदय सदय आहे पुण्य कारुण्य आहे ।
विवर विवरताहे गुणसंपन्न आहे ॥ १५४-९

श्रीसमर्थांच्या वाङ्मयी मूर्तीचें दर्शन घेण्याला व त्यांनीं निर्माण केलेल्या प्रचंड वाङ्मयाचा आस्वाद घेण्याला कोणत्या गुणाची जरुरी आहे याचें वर्णन आपणा सर्वांच्या महद्‌भाग्यानें त्यांच्याच शब्दांत पहावयास मिळत आहे. यांपैकीं एकहि गुण मजपाशीं नाहीं; पण समर्थांच्या चरणीं रानफुलेंच का होईनात पण अर्पण करण्याची अनिवार इच्छा उत्पन्न झाल्यामुळें आजचा निबंध लिहिण्याचें साहस मी करीत आहें.

महाराष्ट्रांतील आबालवृद्धांच्या विशेष परिचयाचे समर्थांचे ग्रंथ तीन आहेत. सामान्य वाचकाचा परिचय श्रीदासबोध, मनाचे श्लोक व करुणाष्टकें या तीन समर्थकृत ग्रंथांशीं असतो. यांखेरीज जें समर्थांचें लिखाण आपणास उपलब्ध झालें आहे, तें विशेष व्यासंगी वाचकासच अवगत आहे; सामान्य वाचकांपैकीं पुष्कळांस त्याची जाणीवहि नसेल.

‘ प्रयोजनमनुद्दिश्य न मन्दोऽपि प्रवर्तते ’ ही उक्ति सर्वांच्या परिचयाची आहेच. मन्द माणसाची जर ही प्रवृत्ति तर श्रीसमर्थांसारखे तपाचरणी, बुद्धि-

मान् राजकारणी मुत्सद्दी असे महापुरुष कोणत्याहि कार्याला प्रयोजनाशिवाय प्रवृत्त होत असतील, ही गोष्टच असमवनीय आहे. तेव्हा श्रीसमर्थांनीं रचिलेल्या करुणाष्टकाचा जो दहावा भाग 'रामदास आणि रामदासी' मालेंत प्रसिद्ध झाला, त्याचें प्रयोजन काय असावें असा एक विचार सहज मनात आला व त्याचें उत्तर काहीं सापडतें कीं काय या दृष्टीनें दहावा भाग वाचून काढला. दासबोधाचें प्रयोजन श्रीसमर्थांनीं सांगितलें आहेच. मला वाटतें, प्रपंच साधेना करण्याला परमार्थ कैचा, अशी संसारी माणसाची दुर्दशा पाहून

आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका ॥ १२-१-१

या शिकवणुकीची जरुरी ओळखून प्रपंचपरमार्थ सुलभ रीतीनें कसे साधता येतील हें दाखविण्याकरितां श्रीदासबोधाची रचना झाली असावी. त्याचप्रमाणें 'मन एव मनुष्याणाम् कारण बंधमोक्षयोः ।' हा भगवंताचा अभिप्राय मनात आणूनच मनाच्या श्लोकाची रचना श्रीसमर्थांनीं केली असावी. तेव्हां करुणाष्टकें व इतर स्फुट प्रकरणें जीं दहाव्या भागात प्रसिद्ध झालीं आहेत त्यांचा हेतु कोणता? केवळ रामाला आळवावें, त्याच्यासाठीं रडावें हा एकच हेतु त्यात आहे कीं काय, याचें उत्तर द्यावयाचें झालें तर प्रथम करुणाष्टकें म्हणजे काय हें ठरवा कीं बाकीचा प्रश्न आपोआप सुटेल असें काहीं लोक म्हणतील.

करुणाष्टकाची जी व्याख्या श्री. नानासाहेब देव यांनीं केली आहे ती फार समर्पक व सुटसुटीत आहे. "करुणाष्टकें म्हणजे काय हें एका शब्दात सांगावयाचें झाल्यास 'रडविणारी कविता तीं करुणाष्टकें होत' असें म्हणतां येईल," अशी व्याख्या प्रस्तावनेच्या ४ थ्या पानावर देऊन त्या व्याख्येच्या अनुरोधानें श्री. देव यांनीं पुढील विवरण केलें आहे. तें विवरण लक्ष्यात वागवून करुणाष्टकाचा दहावा भाग वाचू लागल्यास त्यातील बरीच कविता कोठें वर्णनपर, कोठें संसारांतील प्रसंगावर, कोठें निषेधपर अशी रचलेली आढळून येईल. तेव्हां ही करुणाष्टकाची व्याख्या आपल्या उपयोगी येत नाहीं; म्हणून दहाव्या भागात शोध करीत असता "साहित्यसंपादना" या श्लोकाकडे लक्ष गेलें व तो वाचल्यावर अशी कल्पना सुचली कीं, दहाव्या भागात प्रसिद्ध झालेली कविता "साहित्यसंपादना"च्या हौसेकरिता लिहिलेली असावी. तो श्लोक असा :

नाना छंद प्रबंद छेदरचना साहित्यसंपादना।
नाना लाघव गद्य गौरव जना सद्भाव लागे मना।

नाना नाटक सौम्य त्राटक गुणी सप्रेम सद्धता।
नाना काव्य रसाळ भव्य करणें भक्तीन सायोज्यता ॥ २४३

करुणाष्टकांतील स्फुट प्रकरणें वाचलीं असतां वरील तर्कांला वरीच जागा आहे, असें आढळून येईल. वरील तिन्ही ग्रंथासंबंधीं मीं कीं प्रयोजनें सुचविलीं ती जरा धाष्टर्याचीं वाटतील, पण दहाव्या भागाच्या प्रस्तावनेच्या छत्तिसाव्या पानावर श्री. नानासाहेब देव यांनीच लिहिलें आहे कीं, "मला वाटतें, प्रत्येकानें आपआपली स्वतंत्र प्रस्तावना लिहावी." तेव्हां जर प्रस्तावनेच्या बाबतींत इतकें स्वातंत्र्य, तर वरील तर्कांच्याच बाबतींत त्याचा संकोच करण्याचें कारण काय ? असो.

प्रपंच परमार्थाच्या दोन काठांमधून वहाणारा दासबोधांतील भाषेचा धीर-गंभीर प्रवाह रमणीय तर खराच; परंतु ज्याप्रमाणें गंगेचें काशीक्षेत्रीं संथ वहाणारें पाणी जरी निर्मळ व पवित्र असलें, तरी त्याच गंगेचें पाणी ज्या वेळीं जनकाच्या अगासाधावरून यागडत खालीं धावत येतें त्या वेळचें त्याचें सौंदर्य जास्त चित्ताकर्षक वाटतें तसें असतें, याविषयीं दुमत नाहीं, त्याचप्रमाणें दासबोधांतील तत्त्वज्ञान व व्यवहार, प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालणारी भाषा जरी भारदस्त व गंभीर असली, तरी तिचें सौंदर्य करुणाष्टकांतच जास्त प्रतीत होतें, असें म्हटल्यास तें वावगें होणार नाहीं. मनाचे श्लोक एकतारीवरील संगीतासारखे आहेत. एकतारी मधुर तर खरीच, परंतु वैचित्र्याभावामुळें तिच्यावरील संगीत गोड वाटलें, तरी चित्ताकर्षक नसतें. तद्वत् मनाच्या श्लोकांचें आहे; त्यांतील उपदेश अमूल्य पण त्या मनाच्या एकसारखें मागें लागल्यामुळें एखादे वेळीं तें मन विटरून वर करील कीं काय अशी शंका येते. करुणाष्टकें मात्र सतारीवर छेडलेल्या नाजूक संगीतासारखीं मधुर आहेत. अनेक तारांच्या व तरफांच्या साहाय्यानें सतारीवर वैचित्र्यपूर्ण व भावनांना हालविणारें संगीत निर्माण करता येतें. त्यामुळें त्या संगीताचा कंटाळा न येता त्यापासून उत्तेजित झालेल्या भावनांचा पडसाद हृदयांत उठून एक प्रकारचा अपूर्व आनंद होतो. करुणाष्टकें वाचूनहि असाच आनंद वाचकांस होईल, याविषयीं लेखकास तिळप्राय शंका नाहीं. या आनंदाची अंशतः कल्पना वाचकांना आणून द्यावी हा हेतु मनांत धरून करुणाष्टकांचें विवेचन करण्याचें ठरविलें आहे. शिवाय साहित्यसंशोधनाचा हेतु मनांत बाळगून दहाव्या भागांतील प्रकरणें समर्थांनीं रचिलीं असें जें विधान केलें आहे, त्यालाहि पुष्टि देणारें विवेचन प्रसंगवशात् यापुढें येणार आहे. त्याशिवाय करुणाष्टकांत आढळून

णारी श्रीसमर्थांची रामभक्ति, त्यांचें सूक्ष्म निरीक्षण, त्यांच्या उपदेशाची पद्धति, यांची सूक्ष्मार्थभेदाविषयीं दिसून येणारी मार्मिकता इत्यादि गुणांचेंहि दर्शन घडविण्याकरिता करुणाष्टकाची निवड केली आहे म्हणून एकदम विवेचनाकडे वळतों

करुणाष्टकें वाचूं लागल्यावर एक गोष्ट ठळकपणें लक्षात येते, ती ही कीं, मराठी भाषेच्या व्यवहारात रूढ नसलेलीं बरीचशीं नाणीं सढळ हातानीं समर्थांनीं करुणाष्टकात वापरलीं आहेत. समर्थांच्या दासबोधात सुद्धा इतके जुने क्लिष्ट शब्द आढळून येत नाहींत. या क्लिष्ट शब्दांबद्दल विशेष तक्रार करण्याचें कारण इतकेंच कीं, त्यापैकीं बरेचसे शब्द मराठींतील कोणत्याहि नव्या जुन्या शब्दकोशात सापडत नाहींत तेव्हा या शब्दांचा अर्थ शब्दभेदानें, व्युत्पत्तीनें व समकालीन वाङ्मयातील वाक्प्रचाराच्या साहाय्यानें निश्चित व्हावा एतदर्थ प्रयत्न होणें फार अगत्याचें आहे. अशा शब्दापैकीं काहीं शब्द (ज्याचा अर्थ प्रस्तुत लेखकास समजला नाहीं असे) उदाहरणार्थ देतों, सीवणा (१५), जिणावें (२३), मीळ (२६), वेस्तवेंजन (३६), चीक्षा (४१), चटक-चेटकक्रुड (४३), क्रुमव (४६), कटाणे (४८). अशा तऱ्हेचीं उदाहरणें आणखीहि अनेक देता येतील, पण स्थलाभावास्तव एवढींच पुरेत

करुणाष्टकांतील दुसरी विशेष गोष्ट म्हणजे त्यात आढळून येणारी कूट कविता. ही कविता वाचूं लागल्यावर अशी शंका येते कीं, यात काहीं संकेत तर नसेल ना! कदाचित् जें सांप्रदायिक रहस्य उघडपणें लोकास कळू नये पण विस्मरणामुळें नाश पावूं नये, तें तर या कूट श्लोकात गोंवलें नसेल ना! असे अनेक विचार मनात येतात. खुद्द समर्थांची मूर्तिच असा जो दासबोध त्यातहि काहीं कूट स्थळें आहेत, पण त्यात ग्रंथविस्ताराच्या मानानें अशीं स्थळें अत्यंत तुरळक दिसतात, करुणाष्टकात मात्र हीं स्थळें भरपूर आढळतात. तेव्हा ही काय मुद्दाम केलेली रचना आहे किंवा यातहि काहीं अवश्य हेतु आहे, या विषयाला चालना मिळण्यासाठीं अतिशय महत्त्वाचे काहीं कूट श्लोक उदाहरणार्थ देतों.

लक्षा लक्षा लक्षलक्षा अलक्षा
दीक्षा दीक्षा दीक्षदीक्षा परीक्षा।
पक्षा पक्षा पक्षपक्षा उपेक्षा।
भीक्षा भीक्षा भीक्षभीक्षा अपेक्षा॥ १२२-२

कर्ता कर्ता कर्तकर्ता चि कर्ता।
धर्ता धर्ता धर्तधर्ता चि धर्ता।
भर्ता भर्ता भर्तभर्ता चि भर्ता।
वर्ता वर्ता वर्तवर्ता चि वर्ता॥ ३

\+ + +

अनघडां दगडा विघडां घडां।
अनघडां न घडां विघडां गडां।
तडतडां विघडां दुघडां घडां।
कडकडां चि कडां उकडां पडां॥ १३४-४

अहा हा अहा हा अहा हा चि हा हा।
हालाहा लाहाहा लाहाहा चि हा हा।
पाहा हा पाहा हा पाहा हा चि पाहा।
माहां हां माहां हां माहा हां चि माहां॥ १२

अक्का अक्का अक्क अक्का अकक्का।
शक्का शक्का शक्क शक्का शकक्का।
नक्का नक्का नक्क नक्का नकक्का।
वक्का वक्का वक्क वक्का वकक्का॥ १५

कमळाकमळाकमळाकमळा।
कमळाकमळाकमळाकमळा।
कमळाकमळाकमळाकमळा।
कमळाकमळाकमळाकमळा॥ ३१

चटकि चटका चट छाउनि जातो।
झटकि झटका झट होउनि येतो।
लटकि लटका लट लंपट मातो।
नटकि नटका नटकिंनटसावो॥ ४१

फर्सा पुसूनि सर्सा आर्सा चि जैसा ।
पर्सा पतंग जर्सा फर्सा चि तसा ।
नर्सा करून जर्सा हर्सा गमे तो ।
पीर्सा अखंड थीर्सा गिर्सा नव्हे तो ॥ ८४

आतां आणखी एकच उदाहरण देतों.

जा जा जा जा आजा जा इजभीण तुमुजा फार जा चाल वोंजा ।
जा जा जा जा भजा जा भवहर उमजा सौख्य राजाधिराजा ।
जा जा जा जा तजा जा खळखळ समजा देवपूजा विराजा ।
जा जा जा जा धजा जा समरस नलजा ज्ञानगंगा नवाजा ॥ २५४

करुणाष्टकें वाचीत असता ज्या दोन महत्त्वाच्या अडचणी भासतात त्यांचें ग्वाह्यार्थे आपल्यापुढें मांडलें आहेच. या दोन अडचणी वगळल्या म्हणजे मात्र दहाव्या भागांत सर्वत्र सुंदर काव्य आढळून येतें. जुन्या मराठी कवींत काव्य नाहीं, निसर्गाशीं तादात्म्य नाहीं, तत्त्वबोधावांचून कविता नाहीं, मानवी सुख-दुःखांशीं समरस होण्याची इच्छा नाहीं, आयुष्यातील बऱ्या वाईट प्रसंगांचें चित्रण नाहीं; एका शब्दात सांगावयाचें झाल्यास ज्याला काव्य म्हणता येईल अशी एकहि कृति जुन्या मराठी कवींची—विशेषतः संत कवींची—नाहीं, असे आक्षेप वेळीं अवेळीं अलीकडे घेतले जातात. फार काय, जुन्या कवींना स्फूर्तीचीहि मातब्बरी नाहीं, असें म्हणण्यापर्यंत आधुनिक टीकाकारांची मजल जाते. या आक्षेपकांनीं कृपा करून एकवार तरी समर्थांचीं करुणाष्टकें नजरेखालीं घालावीं म्हणजे वरील आक्षेप किती फोल आहेत हें त्यांचे ध्यानीं येईल. यावरून सर्व जुने मराठी कवि सर्वकाव्यगुणसंपन्न होते, असा अपसिद्धान्त मात्र कोणीं काढूं नये.

सूक्ष्म निरीक्षण, मनुष्यस्वभावाचें यथार्थ ज्ञान, मानवी सुखदुःखांविषयीं अंतःकरणपूर्वक सहानुभूति, निसर्गप्रीति; फळें, फुलें, वनश्री यांचें यथार्थ पण बहारीचें वर्णन, प्रेमविषयक वर्णनाचा अभाव असूनहि सरस प्रसंगांनीं निर्माण केलेला रसोत्कर्ष इत्यादि अनेक साहित्यगुणांचें संमेलन करुणाष्टकांत पहावयास मिळतें.

सर्वसामान्य मनुष्याचा व्यवहार चालण्यास साधारणपणें दोन हजार शब्द पुरे होतात. चतुरस्र विद्वानाची शब्दसंपत्ति फार तर पांच सहा हजार भरेल. शेक्सपीअरला दहा हजार ते पंधरा हजार शब्द माहीत होते असें म्हणतात. अशा दृष्टीनें

मराठी कवींत तरी 'शब्दसृष्टीचे ईश्वर' ही पदवी ज्याना यथार्थतेनें लावता येईल असे कवि फक्त श्रीज्ञानेश्वर, श्रीसमर्थ व मोरोपंत दिसतात. समर्थ शब्दसृष्टीचे ईश्वर तर होतेच, पण एकाच शब्दाचें प्रसंगपरत्वें अर्थांतर कसें होतें व त्यामुळें प्रत्येक शब्द वापरताना किती सावधगिरी बाळगावयास पाहिजे, याहि बाबतींत ते मार्मिक परीक्षावंत होते. या विधानाच्या पुष्ट्यर्थ करुणाष्टकांतील एक प्रकरण देतों.

पुष्पमाळ भूमिमाळ मानमाळ जाणिजे।
वाद्यताळ क्रोधताळ वृक्षताळ नेणिजे।
वृत्तिढाळ रत्नढाळ पाणढाळ बोलिजे।
मुख्य जाळ पोटजाळ दुखजाळ खोलिजे ॥ १५७-१
काष्टपाट वाजपाट तोयपाट वेगळा।
मुख्य पाट मेळकाट पापकाट तो खळा।
पात्रघाट घाटघाट आटघाट भिन्न तो।
कातताट शस्त्रताट वंशताट छिन्न तो ॥ २
घातवेळ सायवेळ काळवेळ ते भली।
शस्त्रधार बोधधार दुग्धधार देखिली।
शस्त्रतीर काष्ठतीर पैलतीर ते पहा।
राजभार भूमिभार वृक्षभार ते महा ॥ ३
शस्त्रसींग धान्यसींग उच सींग देउळा।
शस्त्रमार शब्दमार खेळमार राउळा।
सौरयरंग रागरंग सर्वरंग रंगतो।
वस्तसार बुद्धिसार अर्थसार सार तो ॥ ४

इत्यादि

या दिलेल्या नमुन्यावरून सूक्ष्म अर्थभेदाविषयीं समर्थांची कल्पना काय होती हें समजेल.

'Poetry is a spotaneous outburst of powerful feelings' ही पाश्चिमात्य कवींची व्याख्या आधुनिक विद्वानांत मान्यता पावलेली आहे. या व्याख्येंत स्फूर्तीला (inspiration) अत्यंत महत्त्वाचें स्थान दिलें आहे, हें रसिकास सांगणें नलगे. ज्या वेळीं एखादी वस्तु अगर देखावा अगर प्रसंग कवि पहातो त्या वेळीं त्या त्या गोष्टीविषयीं त्याच्या मनांत निरनिराळे तरंग अगर

भावना उठरात व ते सर्व तरङ्ग अगर त्या भावना तो आपल्या हृदयावर कोरून ठेवतो, व त्या भावना हृदयात भावनाशा झाल्यावर सहजस्फूर्तीच्या उद्रेकामुळें शब्दाचें रूप धारण करून बाहेर पडतात. त्या स्फूर्तीविषयीं समर्थांनीं केलेलें वर्णन अत्यंत बहारीचें आहे. देवाजवळ स्फूर्ति देण्याबद्दल मागणें करताना स्फूर्ति कशी असावी याबद्दल समर्थ म्हणतात:

हवाया नळे बाण भांडीं अनंतें। बळें सोडितां जाति आकाशपंथें।
वती लागतां वेळ नाहीं उठाया। तयाचे परी स्फूर्ति दे देवराया॥
१०२-१

वरी पाहतां दृष्टि हे दूरि धांवे। तयाच्या सवें कल्पना हे उठावे।
उठे मारुती वेळ नाहीं उडाया। तयाचे परी ............॥ २
फिरे वावरे वात सर्वांत जैसा। चळे नीवळे ही फळे पष्ट तैसा।
धरीतां बळें संधि नाहीं धराया। तयाचे परी ............॥ ३

हें झालें स्फूर्तीबद्दल. आता (आधुनिक अर्थानें) समर्थ निसर्गवर्णन कसें करतात तें थोडक्यात पाहूं या. वर्षाकालीन वनश्रीचें हें वर्णन पहा:

पसरले सरले गिरि साजरे। सरवटें धुकटें भरितें भरे।
बहुत वात झडांत झडाडितो। थर तरू थरता चि कडाडितो॥ ३२-१
झिरपती झरती झरती झरे। न धरितां धरतां निर वावरे।
बहुत पाभळ थोंव महीतळीं। नभकडें धुकटें फटपाभळी॥ २
सरस रम्य रसाळ वनांतरा। हरित रंग सुरंग दिसे धरा।
दिसतसे रमणीय वसुंधरा। नुतन पल्लव हा तरु साजिरा॥ ३
द्रुम लता समता तृण मातलें। सुरस मनीं सुमनीं मन रातलें।
परम सुंदर ते खग बोलती। गमतसे वसती कमळापति॥ ४
विमळ सूसिळ हे स्थळ पाहतां। सुख विशेष घडे पळ राहतां।
वरदराज विराजतसे वनीं। जिनटला नटला रत सज्जनीं॥ ५

हें पाण्याचें वर्णन पहा:

मही हे आपरूपी अभिन्न उदकामाजि वसते।
जळाच्या आधारें फणिवर तया भार दिसते।
जळें होतें जातें जळरूप सदा सृष्टिरचना।
बरें घ्यावें श्रोतीं अविकळपणें चीत वचना॥ १७४-१

पडे पाणी तेथें सकळिक जिवां जन्म घडतो।
नसे पाणी तेथें विकळचिपणें देह पडतो।
पिकें झाडें वढी करपत नसे जीवन जरी।
वरी पाणी होतां रसमस दिसे सार कुसरी॥ २
जनीं मेघांसाठीं तळमळित किती देश फुटती।
गुरें ढोरें पोरें चरफडित किती देह सुटती।
नसे पाणी तेव्हां कठिण चि जनामाजि घडतें।
देहेधारी प्राणी अगणित भुमी थाट पडतें॥ ३
जळें काया माया वहुविध सुखें लोक झुलती।
नसे तेव्हां जाती रडत चि पुढें देश डुलती।
करी मारामारी सकळ भुवनें घोस पडती।
कितेकां लोकांचें न चलत पुढें गर्व गळती॥ ४
जळाचा हा वांधा चळवळ देहेमात्र तितुका।
वरें शोभे नीरें चमकत घडे सौख्य जितुका।
चतुर्खाणी पाणी जियवित जिवांलागि सदनीं।
नसे पाणी तेव्हां सकळिक उठे वा× वदनीं॥ ५

वरील स्फुट प्रकरण वाचल्यावर पाश्चात्य वाङ्मयलेखकांत कला व शास्त्रें यांच्या संबंधावद्दल जी चर्चा सुरू आहे त्याची आठवण बहुश्रुत वाचकांस झाल्याखेरीज रहाणार नाहीं. शास्त्रीय शोधांची प्रगति काव्यास विघातक आहे, असा समज पाश्चिमात्य लेखकांत एके काळीं रूढ होताच. त्यांचें अंधानुकरण करणारे जे आम्ही तेहि विशेष विचार न करता त्याला अनुमोदन देत होतों. पण अलिकडील पाश्चिमात्य लेखकांनीं शास्त्र व कला परस्परमारक नसून उलट एकमेकांस पोषक आहेत असें आपल्या लिखाणानें सिद्ध केलें आहे. कला व शास्त्र यांचा मधुर संगम असलेलें लिखाण मराठींत उपलब्ध नाहींच म्हटलें तरी चालेल. परंतु जुन्या मराठी कवींचें काहीं अशा प्रकारचें लिखाण आपणास उपलब्ध आहे व त्यामध्यें ललितकला व शास्त्र यांचा मधुर मिलाफ पहावयास मिळतो, ही गोष्ट समजल्यावर कोणा साहित्यमक्तास अभिमानानें भरतें येणार नाहीं! करुणाष्टकांतील १७२, १७३, १७५, १७६, हीं प्रकरणें वाङ्मयांतील या

नवमतवादाच्या निकषावर घासल्यास तीं पूर्णपणें कसोटीला उतरतील याविषयीं प्रस्तुत लेखकास मुळींच शंका नाहीं.

आता या पुष्पयाती पहा.

त्या वळी आंवळी रावळी जांवळी । चाफळी पोफळी कर्दळी च्यावळी ।
सुंदरा मंदिरा इंदिरा ही वरा । वल्लरी झल्लरीच्या परी विस्तरा ॥ ४७-१
केतकी त्या जुति मालती सेवंती । मांडवी वोलल्या डोलती तोलती ।
माजल्या गाजल्या फुलल्या त्या भल्या । पुष्पयाती कितीयेक पाल्हाळल्या ॥ २

समर्थांचें निरीक्षण इतकें सूक्ष्म आहे कीं, त्याविषयीं वर्णन न करतां मूळातूनच त्याचा आस्वाद घेतलेला बरा. अलिकडे Illustrated Weekly सारख्या प्रसिद्ध इंग्रजी साप्ताहिकातून मृगया व हिंस्र पशुपक्षी यांचीं वर्णनें नाहींत असा बहुतेक अंक आढळावयाचा नाहीं. अशा जनावरांपैकीं कित्येकांचीं नावेंहि आपण ऐकिलीं नसतील. या दृष्टीनें करुणाष्टक नं. ८० हेंहि वाचनीय आहे.

संसारातील मनुष्याची दुर्दशा, त्याच्यावर येणारे बरेवाईट प्रसंग यांचें वर्णन ठिकठिकाणीं इतक्या तन्मयतेनें समर्थांनीं केलें आहे कीं, खुद्द संसारी माणसासहि तसें साधणें दुरापास्त आहे. त्याचा नमुना पहा :

नसे आंथराया नसे पांघराया । नसे धाम ना दृढ छाया निजाया ।
नसे अन्न खाया नसे रम्य जाया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥ २१-१
नसे द्रव्य कांहीं घरीं धान्य नाहीं । बहू वेष्टिला कामक्रोधादि देहीं ।
पराधेनता वेळ नाहीं मराया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥ २
मनासारिखा मित्र तो ही मिळेना । परत्रीक ते ज्ञान पोटीं वसेना ।
सदा कोप आरोप संतप्त काया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥ ३

अशा संसारात जर

सदा तेल आणा सदा मीठ आणा ।
सदा धान्य आणा सदा द्रव्य आणा ।
सदा वस्त्र आणा सदा शास्त्र आणा ।
सदा सर्वदा सर्व आणा चि आणा ॥ १३४-१२८

असें झाल्यावर मनुष्याच्या फजितीला काय सीमा उरणार? अशा तऱ्हेचीं संसार-चित्रें समर्थांनीं ठिकठिकाणीं रंगविलीं आहेत. अतिशय मोजक्या शब्दात कोण-

पडे पाणी तेथें सकळिक जिवा जन्म घडतो ।
नसे पाणी तेथें विकळचिपणें देह पडतो ।
पिकें झाडें वल्ली करपत नसे जीवन जरी ।
वरी पाणी होता रसमस दिसे सार कुसरी ॥ २
जनीं मेघासाठीं तळमळित किती देश फुटती ।
गुरें ढोरें पोरें चरफडित किती देह सुटती ।
नसे पाणी तेव्हा कठिण चि जनामाजि घडतें ।
देहेधारी प्राणी अगणित भुमी थाट पडतें ॥ ३
जळें काया माया बहुविध सुखे लोक धुलती ।
नसे तेव्हा जाती रडत चि पुढें देश डुलती ।
करी धावावारी सकळ भुवनें वोस पडती ।
कितेका लोकाचें न चलत पुढें गर्व गळती ॥ ४
जळाचा हा बाधा चळवळ देहेमान तितुका ।
वरें शोभे नीरें चमकत घडे सौख्य जितुका ।
चतुर्खाणी पाणी जिववित जिवालागि सदनीं ।
नसे पाणी तेव्हा सकळिक उठे धा × वदनीं ॥ ५

वरील स्फुट प्रकरण वाचल्यावर पाश्चात्य वाङ्मयलेखकांत कला व शास्त्रें यांच्या संबंधाबद्दल जी चर्चा सुरू आहे त्याची आठवण बहुश्रुत वाचकांस झाल्याखेरीज रहाणार नाहीं. शास्त्रीय शोधाची प्रगति काव्यास विघातक आहे, असा समज पाश्चिमात्य लेखकांत एके काळीं रूढ होताच. त्याचें अधानुकरण करणारे जे आम्ही तेहि विशेष विचार न करता त्याला अनुमोदन देत होतों. पण अलिकडील पाश्चिमात्य लेखकांनीं शास्त्र व कला परस्परमारक नसून उलट एकमेकास पोषक आहेत असें आपल्या लिखाणानें सिद्ध केलें आहे. कला व शास्त्र याचा मधुर संगम असलेलें लिखाण मराठींत उपलब्ध नाहींच म्हटलें तरी चालेल. परंतु जुन्या मराठी कवींचें काहीं अशा प्रकारचें लिखाण आपणास उपलब्ध आहे व त्यामध्यें ललितकला व शास्त्र याचा मधुर मिलाफ पहावयास मिळतो, ही गोष्ट समजल्यावर कोणा साहित्यभक्तास अभिमानाचें भरतें येणार नाहीं ! करुणाष्टकांतील १७२, १७३, १७५, १७६, हीं प्रकरणें वाङ्मयांतील या

नवमतवादाच्या निकषावर घासल्यास तीं पूर्णपणें कसोटीला उतरतील याविषयीं प्रस्तुत लेखकास मुळींच शंका नाहीं.

आता या पुष्पयाती पहा.

त्या वळी आंवळी रावळी जांवळी । चाफळी पोफळी कर्दळी च्यावळी ।
सुंदरा मंदिरा इंदिरा ही वरा । वल्लरी झल्लरीच्या परी विस्तरा ॥ ४७-१
केतकी त्या जुति मालती सेवंती । मांडवी वोलल्या डोलती तोलती ।
भाजल्या गाजल्या फुलल्या त्या भल्या । पुष्पयाती कितीयेक पाल्हाळल्या ॥२

समर्थांचें निरीक्षण इतकें सूक्ष्म आहे कीं, त्याविषयीं वर्णन न करता मूळातूनच त्याचा आस्वाद घेतलेला बरा. अलिकडे Illustrated Weekly सारख्या प्रसिद्ध इंग्रजी साप्ताहिकातून मृगया व हिंस्र पशुपक्षी यांचीं वर्णनें नाहींत असा बहुतेक अंक आढळावयाचा नाहीं. अशा जनावरांपैकीं कित्येकाचीं नावेंहि आपण ऐकिलीं नसतील. या दृष्टीनें करुणाष्टक नं. ८० हेंहि वाचनीय आहे.

संसारातील मनुष्याची दुर्दशा, त्याच्यावर येणारे बरेवाईट प्रसंग यांचें वर्णन ठिकठिकाणीं इतक्या तन्मयतेनें समर्थांनीं केलें आहे कीं, खुद्द संसारी माणसासहि तसें सांगणें दुरापास्त आहे. त्याचा नमुना पहा :

नसे आंथराया नसे पांघराया । नसे धाम ना दृढ छाया निजाया ।
नसे अन्न खाया नसे रम्य जाया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥ २१-१
नसे द्रव्य कांहीं घरीं धान्य नाहीं । बहू वेष्टिला कामक्रोधादि देहीं ।
पराधेनता वेळ नाहीं मराया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥ २
मनासारिखा मित्र तो ही मिळेना । परत्रीक ते ज्ञान पोटीं वसेना ।
सदा कोप आरोप संतप्त काया । वृथा सीण संसार कर्ती रडाया ॥ ३

अशा संसारात जर

सदा तेल आणा सदा मीठ आणा ।
सदा धान्य आणा सदा द्रव्य आणा ।
सदा वस्त्र आणा सदा शास्त्र आणा ।
सदा सर्वदा सर्व आणा चि आणा ॥ १३४-१२८

असें झाल्यावर मनुष्याच्या फजितीला काय सीमा उरणार ! अशा तऱ्हेचीं संसार-चित्रें समर्थांनीं ठिकठिकाणीं रंगविलीं आहेत. अतिशय मोजक्या शब्दात कोण-

त्यादि प्रसगाचें अगर व्यक्तीचें हुबेहूब शब्दचित्र वठविण्याचें समर्थांचें कौशल्य कांहीं अपूर्वच आहे. करुणाष्टकात अशीं निरनिराळ्या व्यक्तींचीं व प्रसगांचीं शब्दचित्रें जागोजागीं विखुरलेलीं आढळून येतील. उदाहरणादाखल कित्येक प्रकरणाकडे बोट दाखविता येईल. पण निबंधाच्या मर्यादेस्तव हा मोह आवरून धरणें भाग आहे फक्त नमुन्यादाखल एकच वर्णन येथें उतरून घेतों

वण वण वण हिंडे चित्त वृधाप्यकाळीं।
भण भण भण माझा भोंवती सर्व नाळीं।
घण घण घण पीसा आणि ढेकूण खातीं।
सण सण सण मुग्या तोंडका फार येती॥ १४२-१
गड गड कफ कंठीं सर्वदा दाटलासे।
भड भड भड वातीं यत्र सर्वांग नासे।
धड धड धड सीतें कापता जीव त्रासे।
चड चड चड गर्धी सूटली ते न सोसे॥ २
भर भर भर वातें सर्वदा आग सूजे।
पर पर पर कांहीं बोलता तोंड वाजे।
गर गर गर भोंवे आग हें भोवडीने।
हर हर हर प्राणी साडिला वैभवाने॥ ३
तर तर तर केली वैभवें दो दिसाची।
भर भर भर अतीं होलसे यातनेची
कर कर कर दाढा वाजती पायखोडी।
फर फर फर देहे सूजता प्राण सोडी॥ ४

'भीम रुद्रावतारी' ( १४३ ) व 'नृसिंह' ( १४९ ) हीं शब्दचित्रेंहि उत्कृष्ट आहेत

समर्थांनीं उपयोगात आणलेल्या निरनिराळ्या वृत्ताविषयीं चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे पण कोणी मनावर घेतल्यास त्याला समर्थांच्या लिखाणांत विपुल सामुग्री आहे एवढें येथें सुचवून ठेवावें असें वाटतें आधुनिक सुनीतातील एकांतरित यमकाची पद्धत समर्थांना सुद्धा मान्य होती असें दिसतें करुणाष्टक न २१४ पहा

वरील विवेचनावरून तरी जुन्या कवितेंत काव्यगुण बरेच असतात,

एवढी गोष्ट मान्य होईल असें वाटतें. जुनी मराठी कविता काव्य नव्हे हा जसा अपसिद्धान्त, तसा जुने कवि काव्याला लागणाऱ्या सर्व गुणांनीं संपन्न होते असा अपसिद्धांत मांडण्यास प्रस्तुत लेखक तयार नाहीं. जुन्या संत कवींची कविता बहुंशीं अध्यात्म, आत्मानात्मविचार वगैरे गंभीर विषयावर अधिष्ठित असल्या मुळें तिच्याकडे विवक्षित दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. परंतु जुनी कविता या कारणा-मुळें अभ्यसनीय नाहीं, असा जो सिद्धांत प्रस्थापित होऊं पहात आहे तो कसा भ्रममूलक आहे हें दाखविण्याकरिताच वरील सर्व विवेचन केलें आहे.

आता फक्त समर्थांची रामभक्ति व करुणाष्टकातील करुणरसाचा उत्कर्ष या दोन मुद्द्यांचेंच विवेचन करून मी आपला निबंध पुरा करणार आहें. राम-भक्तीचा विषय निघाल्याबरोबर प्रचलित रामायणवादाची आठवण होते. ज्या रामाच्या नयनीतीबद्दल, उदात्त चारित्र्याबद्दल व सत्यवक्तेपणाबद्दलहि आक्षेप घेतले जातात, किंबहुना रामायणाची कथा मूळची इजिप्शिअन असून ती वाल्मि-कीनें चोरली असें म्हणण्यापर्यंत ज्या ठिकाणीं मजल जाते, त्या ठिकाणीं समर्थांची रामभक्ति निःसंशय टीकेला पात्र होईल. पण वरील आक्षेपाचें वैयर्थ सिद्ध करण्याचें हें स्थल नव्हे. प्रस्तुत त्या वादाकडे लक्ष न देता समर्थांनीं रामभक्तीवर रचलेल्या करुणाष्टकाचाच आस्वाद घेणें इष्ट आहे.

रघूनायकासारिखा देव नाहीं । क्रिया पाहतां चोखडी सर्व कांहीं ॥
१८-३

परमसुंदर रूपशामळ । इंद्रनीळकीळ कांतिकोमळ ।
भयनिवारण भक्तवछळ । वरपराक्रम कीर्त्तिचीमळ ॥ ३६-१

प्रभु रामचंद्राच्या चरणावर सुमारें ४२ सुमनाचा अत्यंत सुंदर हार श्रीसमर्थांनीं

अखंडीत हे सांग सेवा घडावी । न होतां तुझी भेटि काया पडावी ।
दिसेंदीस आयुष्य हें वेर्थ आटे । उदासीन हा काळ कोठे न कंठे ॥५६-८

अशा व्याकुळतेनें अर्पण केला आहे, त्याचें वर्णन मी काय करूं ! हारातील पानाच्या वेलबुट्टीनें, जरतारी कलाबतूच्या शोभेनें, पुष्पाच्या सौरभानें व रंगांच्या सौंदर्यानें ज्याप्रमाणें निरनिराळ्या रसिकाना आनंद होऊन त्याची तृप्ति व्हावी, त्याप्रमाणें करुणाष्टकातील या हाराच्या अवलोकनानें वाचकाची स्थिति होईल.

समर्थांच्या वाग्वैजयंतींतील

निळवमाळ तनू अति साजिरी । रुळत माळ सुढाळ तयेवरी ।
जडित लोळ कपोळ प्रकाशलें । हसित मूखसरोज विकासलें ॥ ६६-४
परम सुंदर मूख रसाळ तें । मृगमदांकित भाळ विशाळ तें ।
नयनरंग सुरंग विकासले । सगुण ध्यान मुनीजन तोषले ॥ ५
हिरे माणिकें फांकती दिव्य कीळा । सुढाळा गळां रूळती मुक्तमाळा ॥
६८-४

वरी साजिरी मुकुटीं रम्य शोभा । वरी कीरटी हेमकल्लोळ गाभा । ५

अशा सुंदर चन्दचिनाची वेलबुट्टी, त्याचप्रमाणें

घननीळ तनू अति सांवळें । जघनिचें चिर सुंदर पींवळें ।
कटिं किंकिणि नागर वाजती । पद नेपुर वांकि झणाणिती ॥ १४-३
रचित मूगुटि कीरटि कुंडलें । पदक ढाळ सुढाळक दंडलें ।
जडित कंकण किंकिणि मेखळा । भुषणमंडित राम त्रिदागळा ॥ ६६-२
कटतटीं निकटीं लघु किंकिणी । लिगटल्या नटल्या नटदामिणी ।
प्रगटतां तुळितां तुळणा नसे । परम सुंदर राम मनीं वसे ॥ ३

ही वर्णनाची वेलबुट्टी, व

माथां मूगुटि कीरटी मनगटीं वीराजती कंकणें ।
कर्णी कुंडल मुक्तमाळ ह्रदईं दिव्यांबरें भूषणें ।
हेमीं रत्नकिळा सुरंग विमला लावण्य नानापरी ।
ऐसी मूर्ति उदार धीर मिरवे सिंहासनीं साजिरी ॥ २३४-१
माथां मूगुट पींवळा वरि किळा रत्नाचियां फांकती ।
भाळीं केशर पींवळें परिमळें झुंकार झेंपावती ।
पुष्पें चंपक पींवळीं बहुविधें जाईजुई सेवंती ।
कासे अंबर पींवळा पितमणीमाळा गळां डोलती ॥ २

-असलें वर्णसौंदर्य व करुण आणि भक्तिरसाचा सौरभ यानें कोणा रसिकाचें चित्त उचंबळून येणार नाहीं !

आता करुणाष्टकातील करुणरसाविषयीं थोडेंसें विवेचन करून निबंध पुरा करतों; मात्र हें करुणरसाचें विवेचन शास्त्रीय नव्हे, एवढें सुचवावेंसें वाटतें.

संस्कृत साहित्यकारानीं करुणरसाची नवरसात गणना केलेली प्रसिद्धच आहे. दुःखपर्यवसायी काव्यें अथवा नाटकें यांमध्यें करुणरसाच्या उत्कर्षानें वृत्तीला खिन्नता उत्पन्न होते, उद्वेग वाटतो, त्या प्रकारची खिन्नता करुणाष्टकाच्या वाचनात उत्पन्न न होतां निर्मळ आनंद उत्पन्न होतो. भक्तीला स्वतंत्र रसाचें स्थान द्यावें किंवा नाहीं हा जरी वादग्रस्त प्रश्न असला, तरी प्रस्तुत ठिकाणीं भक्ति व करुण-रस जुळ्या भावंडाप्रमाणें वावरताना दिसतात, इतकेंच नव्हे तर भक्तिरसाच्या पार्श्वभूमिकेवर करुणरसाचा विलास अधिकच उठून दिसतो. श्रीरामचंद्राच्या दर्शनासाठीं अत्यंत व्याकुळ होऊन श्रीसमर्थांनीं श्रीरामाची करुणा निरनिराळ्या तऱ्हेनें भाकिली आहे, तीच करुणाष्टकाच्या रूपानें आपणां सर्वांच्या परिचयाची आहे. पण भक्तिमार्गप्रदीपातील एक दोन करुणाष्टकापलिकडे सामान्य वाचकास त्याची माहिती नाहीं. अत्यंत व्याकुळतीला येऊन समर्थ श्रीरामाला म्हणतात :

घडी लाविता चित्त कोठें जडेना। समाधान ते काहिं केल्यां घडेना।
नव्हे धीर नैनीं सदा नीर लोटे। उदासीन हा काळ कोठे न कंठे ॥
५६-३

आवरछा मनीं लागली काय सांगो। गुणीं गुंतला हेत कोण्हासि मागो।
बहुसाल भेटावया प्राण फूटे। उदासीन हा काळ कोठे न कंठे ॥ ४

रामावाचून समर्थांना अगदीं करमेनासें होऊन गेलें. समर्थ विचारतात :

परतंत्र जीणे कंठूं किती रे। उच्चाट माझे मनीं वाटतो रे।
ललाटरेखा जपीं पालटेना। तुजवीण रामा मज कंठवेना ॥ ५७-२

श्रीरामाच्या वियोगामुळें

रघुनायेकावीण हा सीण आहे। सदा सर्वदा रंग वोरंगताहे।
निसीदीन या राघवाच्या वियोगें। उदासीन हे वृत्ति कोठे न लागे ॥७८-१
मनीं नावडे द्रव्य दारा पसारा। मनीं नावडे भाइकाचा उबारा।
मनीं नावडे भोग हा राजयोगे। उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ६

अशी समर्थांची स्थिति झाली. स्वतःबद्दल रामाजवळ रदबदली करताना समर्थ म्हणतात :

नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं। नसे प्रेम हें रामविश्राम नाहीं।
असा दीन अज्ञान मी दास तुझा। समर्था जनीं घेतला भार माझा ॥
१०१-१

अशा तऱ्हेनें परोपरी विनंति करूनहि श्रीरामाची भेट होत नाहीं म्हणून रामाला समर्थ विचारतात:

दुःखानळे मी संतप्त देहीं। तुजवीण रामा विश्रांति नाहीं।
आधार तुझा मज मी विदेसी। सर्वोत्तमा कै मज भेटि देसी॥
११०-१

कारण,

श्रीरामचंद्रा करुणासमुद्रा। ध्यातों तुझी राजस योगमुद्रा।
नेत्रीं नये रे तुजवीण निद्रा। कै भेटसी या मजला समुद्रा॥
१३४-१३६

अशी त्याची अवस्था झाली. शेवटीं निकरावर येऊन समर्थ रामाला रोकडा सवाल विचारतात:

परम कोमळ राम कठीण कां। दिनदयाळ दया तुपजे चि कां।
मज बहुत उदासिन वाटले। न धरिता नयनीं निर लोटलें॥ १३४-७७

तेव्हा आतां

जळत हृदय माझें जन्म कोट्यानकोटी।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी।
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधु।
षडरिपुकुळ माझें तोडि याचा विरोधु॥ १४७-६
वणवण विषयाची सर्वथा ही शमेना।
अनुदिन मोहमाया लागली हे तुटेना।
झडकरि मज रामा सोडवीं पूर्ण कामा।
तुजविण गुणधामा कोण रक्षील आम्हा॥ १५०-३
हुर हुर हुर वाटे अंतरीं धाप्प दाटे।
तुजविण रघुराजा लोचनीं नीर लोटे।
तनमनधन वीटे दु:ख देहीं न कटे।
बहुविध उपचारें क्षोभलें चित्त ऊठे॥ १५४-१७

अशा तऱ्हेनें दगडालाहि पाझर फोडणाऱ्या वाणीनें समर्थांनीं रामाची विनवणी केली आहे, करुणरसाचा जणूं पूरच करुणाष्टकांत समर्थांनीं वाहविला आहे, असें म्हटलें तरी चालेल.

माझ्या अल्प मतीप्रमाणें करुणाष्टकांतील उत्तमोत्तम प्रकरणांची निवड करून मीं आपणापुढें त्यांचें प्रदर्शन मांडलें आहे. प्रदर्शनाच्या मांडणीमध्यें जर कांहीं न्यून असेल तर त्याचा सर्वस्वीं दोष माझ्याकडे आहे.

ज्या समर्थांच्या वाणीमुळें रघुनाथभजनाची आवड उत्पन्न झाली त्या समर्थांजवळ इतकेंच मागणें कीं,

बहु वृष्टि नाहीं अनावृष्टि नाहीं।
कदा ही भुमी पीक साडीत नाहीं।
जना दंड नाहीं तथा मार नाहीं।
जरा मृत्य ना व्याधि कांहींच नाहीं॥ ९७-३

असें भाग्य भारतवासीयांच्या वांट्याला लवकरच येवो!



( २८ )

॥ श्री. ॥

# ' भगवंताचें अधिष्ठान ' या पदांचा निश्चित अर्थ

(लेखक— श्री. रामचंद्र महादेव आठवले, मधुराश्रम, ठाणें)

आपला हिंदु समाज, आपली हिंदु संस्कृति, आपला हिंदु धर्म व त्या-बरोबरच आपला हिंदुस्थान देश यांच्याविषयीं आंतरिक जिव्हाळा व जागृत तळमळ असणाऱ्या महाराष्ट्रांतील कांहीं आधुनिक थोर पुरुषांचें लक्ष्य श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या 'दासबोधा'कडे वळल्यापासून व त्यांच्या पुरस्कारानें सर्व-सामान्य जाणत्या महाराष्ट्रीयांत आपला अनन्य उद्धारग्रंथ अशी त्याच्याविषयींची भावना प्रसृत झाल्यापासून त्या ग्रंथांतलीं जीं कित्येक महत्त्वाचीं वचनें लोकांत वेळोवेळा पुढें मांडलीं व विशद केलीं जात असतात त्या सर्वांमध्यें

सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।
परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६

ही ओवी प्राय अग्रगण्यच ठरेल यांत शंका नाहीं. बहुधा लोकजागृतीवर अव-लंबून असणारें कोणतेंहि सामुदायिक स्वरूपाचें कार्य लोकांना हालविल्या व चेत-विल्यावांचून सिद्धीस जाणारें किंवा रुपारूपास येणारें नसल्यामुळें आणि ह्या हालविण्याच्या व चेतविण्याच्या क्रियेला आजकाल तरी 'चळवळ' हा शब्द सार्वत्रिक रीतीनें रूढ झालेला असल्यामुळें त्या शब्दाचा व त्या क्रियेचा स्पष्ट-पंटानें पुरस्कार करणारी ही ओवी सर्वांच्याच मोठी आवडीची व्हावी हें स्वाभाविक आहे. तथापि कोणतीहि गोष्ट कितीहि आवडीची किंवा प्रिय होऊन

बसली तरी तिचें यथार्थ स्वारस्य सर्वदाच आकलित होतें असें नाहीं. आणि तोच प्रकार प्रस्तुत ओवीच्या संबधातहि घडलेला प्रत्ययास येतो.

प्रस्तुत ओवीचा पूर्वार्ध अगदींच घोपट व सुगम असून तोच मुख्यतः लोकांचें लक्ष्य उत्कटत्वानें खेंचून घेत असतो. परंतु ओवींतील खरी मख्खी किंवा मुख्य मंत्र तिच्या उत्तरार्धांतच आहे, आणि तेथें मात्र सर्व जण ठेंचाळतानाच दृष्टीस पडतात. त्यातील 'भगवंताचें अधिष्ठान' हीं पदेंच वास्तविक खरीं महत्त्वाचीं आहेत. पण हींच पदें सर्वांना गूढ व म्हणूनच विशद करून सांगण्यासारखीं वाटत असतात; आणि आइजिनच जो तो आपापल्या परीनें त्या पदांचा अर्थ लावून तोच अर्थ सत्य व विहित म्हणून लोकांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न किंबहुना अट्टाहास करीत असलेला आढळतो. मात्र आश्चर्याची गोष्ट अशी कीं, एवढी प्रख्याति पावलेली व लोकप्रिय झालेली ही ओवी, पण तींतील सारभूत असें जें 'भगवताचें अधिष्ठान' हें पदद्वय त्याच्या अर्थाविषयीं मोठमोठ्या विद्वानांतहि अद्यापि एकवाक्यता झालेली नाहीं आणि त्याचा योग्य उकल होऊन एकच एक निश्चित अर्थ लोकांच्या ठायीं अद्यापिहि पडलेला नाहीं!

पण अशा प्रकारें 'भगवताचें अधिष्ठान' या पदाचा निर्णायक उलगडा अद्यापि कोणाकडून काहींच झालेला नसला तरी श्रीसमर्थांनीं मात्र उक्त ओवींत हीं पदें योजितांना काहींतरी निश्चित अर्थानेंच योजिलेलीं असलीं पाहिजेत एवढें तरी मला वाटतें निश्चितपणें मान्य होण्यास प्रत्यवाय नसावा. सामान्यत कोणत्याहि शब्दाला किंवा शब्दसहतीला जो निश्चित अर्थ प्राप्त होत असतो त्याचा एक मुख्य व महत्त्वाचा प्रकार म्हणजे परपरेनें विशिष्ट बोधाचा अंतर्निवेश त्यात होणें, अर्थातच पूर्वसूरींकडून विशिष्ट अर्थी त्याची योजना केली गेलेली असणें. वाङ्मयातल्या कोणत्याहि पदपदातराचा योग्य उकल करावयाचा असेल तर शक्य तितका पूर्ववाङ्मयाच्या आधारानेंच तो करू जाणें हाच सर्वांत पहिला व खरा शास्त्रशुद्ध मार्ग होय ह्या मार्गानें निर्वाह होतच नसेल तरच नतर दुसऱ्या येर मार्गाकडे वळणें युक्त ठरतें. समर्थांचें वाङ्मय किंवा त्याचा 'दासबोध' ग्रंथ ह्याच्या सबधात हा पहिला शास्त्रशुद्ध मार्ग धाव्दात निरुपयोगी आहे असें मुळींच नाहीं उलट श्रीसमर्थ हे अखड चाळणेचे, अत्यंत व्यासंगी, जाड अभ्यासी व 'ग्रंथ मात्र धांडोळावा' असें आग्रहानें उपदेशिणारे पुरुष असल्यामुळें त्याचें सर्व वाङ्मय हें त्याच्या पूर्वसूरींच्या गाढ व्यासंगाचेंच अत्यत प्रगल्भ असें फळ आहे.

त्याच्या महनीय अशा ग्रंथराज 'दासबोधा'तहि पूर्वाचार्यांच्या वाङ्मयाचें शोभनीय व अभिनव असें प्रतिबिंब आणि अप्रतिम परिपाक अनेक ठिकाणीं प्रतीत होतो हेंच ह्या म्हणण्यास पुरेसें प्रमाण होय. अर्थात् त्याच्या उपरोक्त ओवींतील 'भगवंताचें अधिष्ठान' या पदाचा योग्य उकल करतेवेळीं पहिल्यानें पूर्ववाङ्मयाचाच शोध व विचार घेणें सर्वस्वीं विहित आहे.

आणि केवढी आनंदाची गोष्ट ! समर्थांचें ' भगवंताचें अधिष्ठान ' म्हणजे काय हें निश्चित सांगण्याच्या संबंधात ह्या पूर्ववाङ्मयाचा शोध व विचारच नेमका उपयोगीं पडतो. समर्थांच्या आयुष्याच्या पूर्वभागातच आपला आयुष्यक्रम संपवून गेलेल्या व भगवद्गीतेवरील सवा लाख टीकेमुळें विख्यात असलेल्या दासोपंताच्या त्या ' गीतार्णवा 'तच ह्या 'भगवंताच्या अधिष्ठाना'ची नेमकी व निश्चित फोड झालेली आपल्याला लभ्य होते. गीतेच्या सातव्या अध्यायातल्या

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥

ह्या ८ व्या श्लोकातील 'पौरुष नृषु' ह्या पदावर टीका करताना दासोपंतांनीं आपल्या 'गीतार्णवा'त जी शब्दयोजना केलेली आहे, तींत 'भगवंताचें अधिष्ठान' हें पदद्वय आलेलें असून त्याचा बरोबर अर्थहि तेथेंच त्याच्या जोडीला पाठीशीं उभा टाकलेला आहे.

पुरुषाअंगीं पुरुषपण । तें चि भगवंताचें अधिष्ठान ।

ही ती दासोपंताच्या टीकेची ओव्यर्ध. ही दासोपंताचा ओव्यर्ध वाचतांच वा ऐकतांच ' भगवताचें अधिष्ठान ' म्हणजे खरोखर काय त्यावर नेमका व निर्णायक प्रकाश पडतो आणि समर्थांच्या वरील सबंध ओवींचा प्रभावी भाव एकदम मनांत उतरतो. ' भगवंताचें अधिष्ठान ' म्हणजे ' पुरुषाअंगींचें पुरुषपण ' अर्थात् ' पौरुष ' हें आतां निराळें स्पष्ट करून सांगण्याचें प्रयोजन नाहीं.

समर्थांनीं आपल्या पूर्वींच्या ज्या ज्या थोर थोर संत महंतांचें वाङ्मय अभ्यासिलें असल्याचीं प्रमाणें त्याच्या ग्रंथांतरीं आढळतात त्यात दासोपंताचा अंतर्भाव प्रामुख्यानें होतो. प्रत्यक्ष त्यांच्या ' दासबोधा 'बरहि दासोपंताच्या वाङ्मयाचा ठसा बराच उमटलेला दिसतो. ' दासबोधा 'च्या तिसऱ्या दशकांतील संसाराची प्रसिद्ध कहाणी तर दासोपंतांच्या ' ग्रंथराज ' ह्या ग्रंथांतील वर्णनावरूनच अनुवादिलेली आहे हें अभ्यासकांना विदितच आहे. तेव्हां दासोपंतांच्या

उपरोद्धृत ओव्यर्धातलींच 'भगवंताचें अधिष्ठान' हीं पदें तेवढ्याच अर्थानें समर्थांकडून योजिलीं जाणें मुळींच असंभाव्य नाहीं. तथा त्यात दूषणीय असेंहि कांहींच नाहीं. उलट वाङ्मयाच्या योग्य अभिवृद्धीचा तो अत्यंत स्पृहणीय असाच क्रम आहे.

पण तें राहो. 'भगवंताचें अधिष्ठान' हीं पदें असलेली ती समर्थांची वरील ओवी 'दासबोधा'च्या विसाव्या दशकाच्या ज्या ४ थ्या समासात आलेली आहे त्या समासाचा प्रारंभापासून त्या ओवीपर्यंतचा एकूण ओघ पाहताहि त्या पदाचा 'पौरुष' हाच अर्थ समर्थांना अभिप्रेत होता हें सहज स्पष्ट होतें; बुचकळ्यांत पडण्याचें कारणच पडत नाहीं.

> सकळ जनांस प्रार्थना । उगें च उदास करावेंना ।
> निरूपण आणावें मना । प्रत्ययाचें ॥ २०-४-१
> प्रत्यये राहिला येकेकडे । आपण धांवतो भलतेकडे ।
> तरी सारासाराचे निवाडे । कैसे होती ॥ २
> उगि च पाहातां सृष्टी । गल्वला दिसतो दृष्टीं ।
> परी ते राजसत्तेची गोष्टी । वेगळी च ॥ ३

अशा 'राजसत्तेची वेगळीच गोष्टी' सांगूं लागण्याच्या प्रस्तावानें ह्या समासाचा प्रारंभ करून समर्थ लागलीच

> पृथ्वीमधें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें ।
> नाना सुखें येणें द्वारें । प्राप्त होती ॥ ४
> त्याचा महिमा कळेल कोणाला । माता वांटून कृपाळु जाला ।
> प्रत्यक्ष जगदीश जगाला । रक्षितसे ॥ ५
> सत्ता पृथ्वीमध्यें वांटली । जेथें तेथें विभागली ।
> कळेनें सृष्टि चालिली । भगवंताचे ॥ ६

या ओव्यांत 'भगवंताच्या घरा'ची कल्पना विशद करून सांगतात. 'भगवंताच्या घरां' ची ही कल्पना हेंच पुढील 'भगवंताचें अधिष्ठान' या पदांतील अभिप्रायाचें बीजसर्वस्व आहे. फार काय, पण दासोपंताच्या वरील ओव्यर्धांत आलेल्या 'पुण्याअंगीं पुरुषपण' या पदांतील 'पुरुष' शब्दहि ह्या वेळीं समर्थांच्या दृष्टीपुढून दूर झालेला नाहीं. पुढच्याच दोन ओव्यांत

(२) ऐसा उत्तम गुणी विशेष। तयास म्हणावे पुरुष। १२-१०-१५

(३) जो उत्तम गुणें शोभला। तो चि पुरुष माह्य मला।
कित्येक लोक तयाला। शोधीत फिरती॥ १२-१०-२९

(४) विचार न करितां जें जें केलें। तें तें वाउगें वेर्थ गेलें।
म्हणोनि विचारीं प्रवर्तलें। पाहिजे आधीं॥ १०-९-२७
विचार पाहेल तो पुरुषु। विचार न पाहे तो पशु।
ऐसीं वचनें सर्वेशु। ठाईं ठाईं बोलिला॥ २८

(५) जो मानला बहुतांसी। कोणी बोलों न शके त्यासी।
धगधगीत पुण्यरासी। माहांपुरुष॥ १९-४-९

... ... ...

उत्तम गुणे शृंघारला। तो बहुतांमधें शोभला।
प्रगट प्रतापें उगवला। मार्तंड जैसा॥ १५
जाणता पुरुष असेल जेथें। कव्हो कैचा उठेल तेथें।
उत्तम गुणाविर्णे रितें। ते प्राणी करंटें॥ १६

... ... ...

दुसऱ्याच्या दुःखें दुखवे। दुसऱ्याच्या सुखें सुखावें।
आवघे चि सुखी असावे। ऐसी वासना॥ २३
उदंड मुलें नानापरी। वडिलांचे मन अवघ्यावरी।
तैसी अवघ्यांची चिंता करी। माहापुरुष॥ २४

.. ..

धीकारिल्या धीकारेना। तो चि माहापुरुष॥ २५

... .. ...

धीर उदार गंभीर। माहापुरुष॥ ३०

.

जितुकें कांहीं उत्तम गुण। ते समर्थाचे लक्षण। ३१

(६) सकळकर्ता तो ईश्वरु। तेणे केला आंगिकारु।
तया पुरुषाचा विचारु। विरळा जाणे॥ १८-६-१३

... . ...

येश कीर्ती प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा ।
नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६

(७) जे सत्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश ।
धर्मस्थापनेचा हव्यास । तेथें चि वसे ॥ १७ १-२९

(८) धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार । १८-६-२०

(९) आपल्या पुरुषार्थवैभवें । बहुतांस सुखी करावें । १२-१०-२७

(१०) जो दुसऱ्याचे अंतर जाणे । देश काळ प्रसंग जाणे ।
तया पुरुषा काये उणें । भूमंडळीं ॥ १४-७-२८

(११) राजें जाणे नीतिन्याय । न करी न करवी अन्याये ।
कठीण प्रसंगीं उपाये । करूं जाणे ॥ ११-६-१८
ऐसा पुरुष धारणेचा । तो चि आधार बहुतांचा ।
दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९

असे कितीतरीच उतारे देतां येण्यासारखे आहेत. तथापि यापेक्षा अधिक जिज्ञासा असणारांनीं विशेषेंकरून बाराव्या दशकातील १० वा व अठराव्या दशकातील ६ वा हे दोन 'उत्तमपुरुषनिरूपणा'चे आणि एकोणिसाव्या दशकातील ४ था हा 'सदेवलक्षणनिरूपणा'चा असे अवघे तीन तरी समास गळीं व चित्तीं उतरवावेत.

चळवळीचें स्वमात्रसिद्ध सामर्थ्य योग्य रीतीनें सिद्ध होऊन ती यश-स्वाळी होण्याकरिता तिचा पुरस्कर्ता किंवा नेता 'पुरुष' हा संज्ञेला कसा यथार्थ-तेनें पात्र असणारा अर्थात् कोणत्या महनीय गुणाचें साक्षात् आधान हवा तें असें नाना ठिकाणीं नानाप्रकारें विवरून सांगता सांगता एकोणिसाव्या दशकाच्या ९ व्या समासात तर समर्थांनीं त्या सर्व विवरणाचें जणू काय अंतर्हित प्राणगूजच

गनीमाच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा ।
ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ २५

असें स्पष्ट शब्दात सांगून टाकिलें आहे. असा जातिवंत व जीवंत स्फूर्तीचा नेता 'चळवळी'ला लाभला कीं मग काय विचारता ! समर्थ सांगतात—

तयास देखतां दुर्जन धाक । वैसवी प्रचीतीचे तडाखे ।
बंडपापांडाचे वारे । सहज चि होती ॥ २६

आणि ती चळवळ निरपवाद अतुळ यशानें सुमंडित होते. सबल 'पुरुष-गुणा'चा

परिणतिरूप परमोत्कर्षच समर्थांनीं येथें निःसंदिग्धपणें सांगितला आहे. तेंच त्यांना अभिप्रेत असलेलें 'भगवंताचें अधिष्ठान' होय.

असो. एतावता प्रकृतविषयीभूत ओवींत समर्थांना उद्दिष्ट असलेलें 'भगवंताचें अधिष्ठान' म्हणजे 'पुरुषाअंगींचें पुरुषपण' अर्थात् 'पौरुष' हाच अर्थ अगदीं निश्चित झाला. ह्या उलगड्यानें ओवीचा आशय व स्वतः ओवीहि किती सहजप्रभावी होत आहे पहा!

शेवटीं हें येथें सांगितलेंच पाहिजे कीं प्रस्तुत लेखांतील शोध हा माझा स्वतःचा नव्हे. 'महाराष्ट्रमहोदयाचा पूर्वरंग' ह्या विद्वन्मान्य पुस्तकाचे कर्ते वाईचे सुप्रसिद्ध विवेचक साहित्यभक्त कै. नारायण कृष्ण गद्रे यानाच ह्या शोधाचें सर्व श्रेय आहे. ठाणें येथील 'मराठी ग्रंथसंग्रहालया'च्या एका वार्षिकोत्सवप्रसंगीं* अध्यक्ष ह्या नात्यानें केलेल्या व्याख्यानांत त्यांनीं ह्या शोधाचा ओझरता परिस्फोट केलेला होता. त्याला त्या वेळीं तितकासा प्रकाश न मिळाल्यामुळें व त्यांनीं स्वतंत्रपणेंहि तो शोध कोठें पुढें न मांडल्यामुळें आतापर्यंत तो विद्वानांपुढें आलाच नाहीं. आज ह्या 'श्रीसमर्थवाग्देवतामंदिरा'च्या 'उद्घाटनसमारंभा'च्या ज्ञानसत्रांत मी तो नम्रपणें स्वतंत्ररीत्या प्रकाशांत आणीत आहें.



*१३ वा वार्षिकोत्सव, सन १९२६.

## ( २९ )

# श्रीसमर्थांचें नेमस्त राजकारण

( लेखक — श्री. चिं. ह. गोखले, मनमाड )

श्री. नानासाहेब देव यांचा शब्द अमान्य करूं नये या भावनेनें हें टाचण नानासाहेबांच्याकडे पाठवीत आहें. खरोखर विशेष कांहीं लिहावें या हेतूनें तें लिहिलेलें नाहीं.

कांहीं दिवसांपूर्वी समर्थांच्या 'राजकारण' शब्दाची बरीचशी छाननी झाली, पण आज त्याच्या विशेषणाकडे-' नेमस्त ' या शब्दाच्या अर्थाकडे-आपलें लक्ष वेधणार आहें.

श्रीसमर्थांनीं असंतुष्ट महाराष्ट्राला आनंदवनभुवन करून समाधान प्राप्त करून दिलें. प्रपंच-परमार्थ कसा करावा, इहलोकीं व परलोकीं सार्थकता कशी प्राप्त करून घ्यावी तें सांगितलें, व मराठ्यांना सामर्थ्यसंपन्न करून महाराष्ट्राचें नांव यथार्थ केलें. यांच समर्थांच्या कामगिरीमुळें समर्थांच्या शिकवणीकडे पवित्र दासांचें लक्ष लागणें स्वाभाविक आहे. श्रीसमर्थांनीं राष्ट्राला पुढील शिकवण दिली :

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११-५-४

व पुढें राजकारण समासांतील सर्व उपदेश.

हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण ।
वर्तायाचें लक्षण । तें हि असावें ॥ ११-६-४

पुढें महंतलक्षण समासांतील उपदेश.

हरिकथानिरूपण । बरेपणें राजकारण ।
प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२-२-२९

" व्यापक धोरण, अचूक राजकारण, सद्विद्योपासनारूप भगवद्भजन. "

समर्थांचें राजकारण नेमस्त होतें म्हणजे १९०८ सालापासून ज्या नेमस्त राजकारणाला आपण परिचित आहोत तें नसून 'नेमस्त' शब्द समर्थांनीं वेगळ्या अर्थानें ह्या ठिकाणीं योजिलेला आहे, असें पुढील ठिकाणच्या अर्थावरून स्पष्ट दिसतें.

( १ ) पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत । निरूपण करावें नेमस्त ।
बहुधा बोलणें अव्यावेस्त । बोलों चि नये ॥ ४-२-१८

नेमस्त निरूपण = व्यवस्थित निरूपण.

( २ ) विश्कळित मात्रुका नेमस्त कराव्या । ११-६-२

नेमस्त = दुरुस्त, बरोबर, व्यवस्थित.

( ३ ) पष्ट नेमस्त वाचावें । १२-९-१४
नेमस्त नेटकें पुसावें । १२-९-१५

नेमस्त = बरोबर, नेमकें, न चुकता, अचूक, निःसंदिग्ध.

( ४ ) जानवें हेंवडकारें जालें । ढिलेंपणें हेवड आलें ।
नेमस्तपणें शोभलें । दृष्टीपुढें ॥ १५-१-५

नेमस्त = बरेपणें, व्यवस्थितपणें.

( ५ ) वाष्कळ आणि नेमस्त । येक कैसा ॥ १५-१-२०
( ६ ) नेमस्त कांहीं च कळेना । नेमस्त कोणी च मानीना ।१५-३-१५
( ७ ) मोठीं राजकारणें चुकती । राजकारणीं वेढा लागती ।
नाना चुकीची फजीती । चहुंकडे ॥ १९-८-११

नेमस्त राजकारण = बिनचूक, व्यवस्थित राजकारण. वाष्कळ, ढिलें, अव्यावेस्त याच्या विरुद्ध तें नेमस्त. समर्थांचें नेमस्त राजकारण हें बिनचूक, व्यवस्थित, बरेपणानें केलेलें विजयी राजकारण होय. तें आपण सामान्यपणें समजतों त्याप्रमाणें अघवट, बेताबाताने, माफकपणें, जहाल न होता, सोनेरी मध्यमावरचें राजकारण नव्हे. समर्थांचें शिक्षण उत्कटत्वाचें होतें.

कांहीं येक उत्कटेंवीण । कीर्ति कदापि नव्हे जाण ।

तेव्हां त्यांचें राजकारणच कोठून मिळमिळीत असणार !

हे धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ।
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ १९-९-२७

नेमस्त शब्दाचा श्रीदासबोधात पुढील ठिकाणीं उपयोग केलेला आहे.

नेमस्त

विषयजनित जें जें सुख । तेथें चि होतें परम दुःख ।
पूर्वी गोड अंतीं शोक । नेमस्त आहे ॥ ३-१०-६५
प्रसंगें बोलाल्या अनेका । धात माता नेमस्त ॥ ४-२-१०
पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत । निरूपण करावें नेमस्त ।
बहुधा बोलणें अव्यावेस्त । बोलों चि नये ॥ ४-२-१८
मनासारिखें होता स्वभावें । सख्य घडे नेमस्त ॥ ४-८-५
शिष्य पाहिजे नेमस्त । सर्वप्रकारीं ॥ ५ ३-२१
सद्गुरुवचनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५-६-३९
सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५-६-५३
आतां असो हें बहुत । सत्संगें कळे नेमस्त । ६-६-५६
साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ६-७-३२
हा विचार पाहोन नेमस्त । मज निरोपावा ॥ ९-५-१०
हे कल्पनिक श्रोतीं । नेमस्त जाणावें ॥ ९-५-२८
म्हणोनि वायोचा गुण । नेमस्त जाणावा ॥ ९-६-१३
ब्राह्मणामधें कोणी नेमस्त । कोणी जालें अव्यावेस्त । ९-१०-४
तेव्हां जाणावा नेमस्त । महाप्रळये जाला ॥ १०-५-३
विद्कळित मातृका नेमस्त कराव्या । ११-६-२
सागायाचें नेमस्त न ये । ११-६-३
नेमस्तपणें राजकारण । ११-६-४
ब्रह्मा जाणावा नेमस्त । १२-६-८
जो बहुताच्या बोलें लागला । तो नेमस्त जाणावा बुडाला ।
१२-६-३१

पष्ट नेमस्त वाचावें । १२-९-१४
नेमस्त नेटकें पुसावें । १२-९-१५
नेमस्तपणें वंश वाढला । १३-५ ११

वाढणें मोडणें आत्मयास । नेमस्त आहे ॥ १३-९-८
नेम आंगीं लाऊं नये । भरवसा कोणास देऊं नये ।
अंगिकार करूं नये। नेमस्तपणाचा ॥ १४-१-२१
जानवें हेंवडकारें जालें । ढिलेपणें हेवड आलें ।
नेमस्तपणें शोभलें । दृष्टीपुढें ॥ १५-१-५
वाष्कळ आणि नेमस्त । येक कैसा ॥ १५-१-२२
नेमस्त कळेना वचन । नेमस्त नये राजकारण । १५ ३-१४
नेमस्त कांहीं च कळेना । नेमस्त कोणी च मानीना । १५-३-१५
ते जीव मरतां जगती । नेमस्त होये ॥ १५-४-१६
दोनी नामें येकास पडिलीं । लोकीं नेमस्त कल्पिलीं ॥ १५-५-४
नेमस्त आणी वाष्कळपण । १६-९-२५
विलेनें नेमस्त लाविलें । १६-१०-१५
जाणतेपणे वर्तलें । पाहिजे नेमस्त । १८-२-१
नेमस्तपणाच्य ।अभ्यास नाहीं । वाष्कळपणें ॥ १८-३-८
येक देव नेमस्त कळेना । १८-८-२
नेमस्त मनामधें आकळे । सारासार ॥ १८-१० ७
नेमस्तपणाचा विसर । पडणार नाहीं ॥ १९-४-७
नेमस्त अर्थ सांगो जाणें । १९-४ ८

नेमस्त हा शब्द संस्कृत नियम व त्यापासून अपभ्रष्ट नेम यावरून साधलेला दिसतो. नेमस्त या शब्दाचे ( १ ) नियमित, नियमबद्ध, नियमानुसार; ( २ ) मर्यादित, व्यवस्थित, निश्चित; ( ३ ) चांगलें, अचूक, बरोबर, योग्य; ( ४ ) मध्यम, माफक, बेतानातांत इत्यादि अर्थ होतात, व तशा तो वापरलेला दिसतो. याप्रमाणेंच श्रीदासबोधात नेमक, नेटक, नीट, नेमकपणा वगैरे शब्दहि बरेच वेळा आलेले आहेत.



( ३० )

## श्रीग्रन्थराजांतील दशकांचीं नांवें
## व
## श्रीसमर्थांचें दासबोधांतर्गत आत्मचरित्र

( लेखक — श्री. भगवंत विनायक महाजन, वकील, सोलापुर )

ग्रंथराजाचे वीस दशक असून प्रत्येक दशकात दहा समास आहेत. दशकातील दहा समासापैकीं एखादे समासास जें नाव दिलें आहे, तेंच नाव दशकास केव्हा केव्हा दिलेलें आढळून येतें. केव्हां केव्हा दशकात जो महत्वाचा विषय प्रतिपादन केला गेला, त्याचें नाव दशकास दिलेलें आढळतें. वरील विधानार्थ खालील खुलासा पहा.

| दशक | नाव | कारण |
|---|---|---|
| १ ला | स्तवन | बहुतेक समासात स्तवनाचा विषय आहे. |
| २ रा | मूर्खलक्षण | पहिला समास त्याच नावाचा आहे. |
| ३ रा | स्वगुणपरीक्षा | समास २ ते ५ याच नावाचे आहेत. |
| ४ था | नवविधाभक्ति | हाच विषय सर्व दशकात आहे. |
| ५ वा | मंत्राचा | गुरुशिष्यलक्षण—अर्थात् गुरूनें शिष्यास मंत्रोपदेश देणें हा विषय. समास ४ मध्यें बरेचसे मंत्र सांगितले आहेत. |
| ६ वा | देवशोधन | समास पहिलाच या नांवाचा आहे. |
| ७ वा | चतुर्दशब्रह्म | समास तिसरा या नावाचा आहे. |

| दशक | नाव | कारण |
|---|---|---|
| ८ वा | ज्ञानदशक मायोद्भव | यांतील सर्व विषय ब्रह्मज्ञानाचा आहे. |
| ९ वा | गुणरूप | समास सहावा त्याच नावाचा आहे. |
| १० वा | जगज्जोति | समास नऊमध्ये हा विषय आहे. |
| १२ वा | विवेकवैराग्य | समास चवथा त्याच नांवाचा. |
| १४ वा | अखंड ध्यान | समास आठवा त्याच नावाचा. |
| १६ वा | सप्ततिन्वयाचा | सूर्यवंश किंवा वाल्मीकि वगैरेंचा वंश वर्णन करणें हा विषय आहे. |
| १७ वा | प्रकृतिपुरुष | समास दुसरा शिवशक्ति या नावाचा आहे. |
| १८ वा | बहुजिनसी | पहिलाच समास बहुदेवस्थान या नावाचा आहे. इतर समासातून उत्तम पुरुष, करटपरीक्षा, अंतर्देव, श्रोता, अवलक्षण वगैरे अनेक तऱ्हेचे विषय आले म्हणून |
| १९ वा | शिकवण | यात लेखनक्रियेपासून राजकारणापर्यंत-ची अनेक तऱ्हेची शिकवण आहे. |
| २० वा | पूर्ण | पहिलाच समास पूर्णापूर्णनिरूपणाचा, शिवाय या दशकात ग्रंथ पूर्ण झाला. |

आता राहिले दशक ११।१३ व १५. अकराव्या दशकास भीमदशक हें नांव आहे. मारुति अकरावा रुद्र म्हणून हें नाव दिलें असावें. यातील पाचवा समास सांप्रदायिक लक्षणांचा आहे. संप्रदायात मारुति मुख्य देव म्हणूनहि हें नाव दिलें असावें

तेराव्या दशकास नामरूप हें नाव आहे यात नामाचा काहीं संबंध दिसत नाहीं समास आठवा, कर्तानिरूपण, यात वरीच नावें आलीं आहेत, पण तेवढ्यावरून हें नाव दिलें असावें वाटत नाहीं पर्जन्यकर्ता, प्रेमकर्ता असेंहि म्हटलें आहे. श्रीसमर्थांचा आवडता नाममंत्र "श्रीराम जयराम जय जय राम" हा त्रयोदशाक्षरी आहे तेराव्या दशकास नाव देण्याच वेळीं त्रयोदशाक्षरी मंत्राची साहजिक आठवण होऊन तेंच नाव दिलें असावें. दशक पंधरावा यास आत्मदशक हें नांव आहे. ग्रंथराजात सर्व जागीं समर्थांनें चरित्र महादवास लिहिलें. तथापि या

दशकात विशेषेंकरून समर्थांनी आपलें चरित्र सहजरीत्या रेखाटलें व म्हणून "आत्मदशक" हें नाव दिलें असावें असा तर्क वाहतो व तो वावगा दिसत नाहीं. समास दुसरा पहा—निस्पृहव्यापलक्षण, "उदंड करी गुप्तरूपें", "क घालून राजकारण। लोक लावी॥" वगैरे व तिसाव्या ओवीचे शेवटीं "दास म्हणे स्वभावें। सकेतें बोलिलें॥" यावरून गुप्त रीतीनें 'आत्मचरित्र' सांगणेचा प्रसंग साधला आहे. समास पहिला, ओव्या २६ ते ३५ यांतहि "वेष धरावा बावळा" वगैरे लक्षणें आत्मचरित्रपरच आहेत

समास तिसरा "श्रेष्ठ अंतरात्मा" हा समास श्रीशिवछत्रपतींस उद्देशून लिहिला असावा. ओव्या १०, १३, १४ वगैरे पहा.

समास ६ ओव्या १६, २१, २४.

समास ९ ओव्या २५, २९.

समास १० ओवी ३३.

यावरून वरील विधानास पुष्टि मिळेल.

याच दशकांत दहाव्या समासांत "देही माझी उपासना" या शब्दांत आपली उपासना स्वमुखानें सांगितली आहे, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

दशक किंवा समास अनुक्रमानें रचले गेले नाहींत, वेगळ्या वेगळ्या प्रसंगानें रचले गेले हें लक्षांत घेता दशकांस नांवें ग्रंथ पूर्ण झाल्यावर दिलीं असावींत. केव्हां पहिल्या समासाचें नांव तें दशकाचें नांव, कधीं कधीं दहा समासांपैकीं एखादे समासाचें नांव तें दशकाचें नांव, व केव्हां केव्हां दशकांतील समासांत जो विषय महत्त्वेंकरून प्रतिपादित झाला तें नांव अशीं नांवें दिलीं व पंधरावा दशक यानून स्वाभाविकरीत्या "आत्मचरित्र" संकेतानें समर्थ बोलून गेले म्हणून "आत्मदशक" हें नांव दिलें असावें.

"आत्मदशक" या दशकांत आत्मविषयक ज्ञान प्रतिपादित केलें आहे व म्हणून हें नांव दिलें असाहि पक्ष मांडता येईल परंतु थोड्याबहुत पद्धतीनें आत्मविषय हा सर्व दशकांतून प्रतिपाद्य आहेच शिवाय 'ज्ञानदशक' व 'पूर्ण दशक' अशीं नांवें ज्ञान प्रतिपाद्य असणाऱ्या दशकांस दिलींच आहेत. पुन त्याच अर्थानें 'आत्मदशक' हें नांव देण्याची जरूरी रहात नाहीं.

प्रो. रानडे यांचें मत समर्थांनीं आत्मचरित्र पधराव्या दशकांत सांगितलें आहे असें आहे.

अकराव्या दशकांत "आर्धी केलें मग सांगितलें" या ओंवीवरून अकराव्या दशकांतील दहावा समास आत्मचरित्रपर आहे, असें रा. देव यांनीं म्हटलें आहे. त्या समासांत किंवा इतरत्र समर्थांचें आत्मचरित्र सांपडणार नाहीं असें आम्ही म्हणत नाहीं. परंतु "आत्मदशक" हें नामाभिधान देतांना दासानीं समर्थचरित्र पधराव्या दशकांत विशिष्ट रीतीनें पहावें ही समर्थांची इच्छा असूं शकेल. समर्थांची उपासना, वर्णनची हातोटी, 'सकेतें बोलिलें' हें सांगणें, यावरून वरील कल्पना तर्कशुद्ध वाटते. असो. आपलें "श्रीसमर्थचरित्र" लिहितांना रा. देव यांनीं वरील कल्पना आपले विचारांत घेऊन शक्य तर तिचा उपयोग करावा अशी आमची विनंति आहे.



( ३१ )

श्री

## जय जय रघुवीर समर्थ

(लेखक — श्री. विनायक परशुराम भागवत, वकील, चाळीसगांव)

सह्याद्रिगिरींचा विभास विलसे मंदारशृंगापरी ।
नामें सज्जन जो नृपें वसविला श्रीउर्वशींचे शिरीं ।
साकेताधिपति कपी भगवती हे देव ज्याचे शिरीं ।
तेथें जागृत रामदास विलसे जो या जना उद्धरी ॥ १

अनंत कवि

( १ ) परिचय — श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं केसरींतून श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिराचे उद्घाटनप्रसंगीं समर्थसांप्रदायिक वाङ्मयासंबंधीं लहानमोठे निबंध लिहावे अशी विनंति महाराष्ट्रास केली, तीच त्याची आज्ञा समजून मला जे विचार स्फुरले त्याचा अल्प गोषवारा आज येथें नमूद करण्याचें मी योजिलें आहे.

( २ ) मागील इतिहास — समर्थसंप्रदाय व महाराष्ट्रधर्म याचें समीकरण आहे. सनातन वैदिक धर्मास ग्लानि आली तेव्हा त्याचा निरास करण्यासाठीं शक १२०० पासून ज्ञानेश्वर व त्यानंतरच्या जाहलेल्या साधुसंतांनीं धर्माला उजळा दिला व भक्तिमार्गाचा फैलाव करून वैष्णवधर्म अथवा भागवत-धर्माचा उपदेश केला. परंतु भागवतधर्म ( संप्रदाय ) व महाराष्ट्रधर्म यांचे तपशिलांत अंतर आहे. भागवतधर्म सहिष्णु असून महाराष्ट्रधर्म जयिष्णु व वर्धिष्णु आहे. पूर्वसंत म्हणजे ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, नामदेव वगैरे हे कर्म-

संन्यासी, भक्तिमार्गी, अगर लोकोपकारी या तीन वर्गांत मोडत. पहिले दोन वर्गांतील संतांना कर्मसंन्यासानें किंवा भक्तिमार्गानें स्वतःला मोक्ष मिळावा असा ह्यास असे. तिसरे लोकोपकारी संत याच्यात व श्रीसमर्थांत किंचित् साम्य होतें. परंतु त्यांची लोकोपकार करण्याची पद्धति समर्थांच्या पद्धतीहून निराळी होती. यवनांनीं जुल्म केला, अन्याय केला, स्त्रिया भ्रष्टविल्या, देवळें जमीनदोस्त केलीं, मूर्ति फोडल्या अगर चवाठ्यावर गोवध केला, तर हे संत आपली शांति ढळू न देतां लोकानांहि शांति ढळू न देण्याचा उपदेश करीत. ते समजत व सांगत कीं, अन्याय करणारास स्वतःचे कृतीची लाज वाटून अन्याय करण्याचें तो सोडून देईल. त्यांच्यात अहवणुकीची बुद्धि मुतराम् नव्हती त्यामुळें त्यांचे पुढारीपणाखालीं महाराष्ट्रजनतेंत दया, क्षमा, शांति, सोशिकपणा, इत्यादि गुण वृद्धिंगत झाले हें खरें असलें तरी आतून त्यांचे मनाला पीळ पडला हें तितकेंच खरें आहे. परंतु त्यानें जुल्म करणाराचे स्वभावात फरक पडला नाहीं व हें सत्याग्रहाचें व सोशिकपणाचें कुसुमास्त्र निर्माल्यवत् ठरलें. श्रीसमर्थांना व शिवाजीराजे यास हें स्पष्ट दिसत होतें. म्हणून धर्मद्रोह, न्यायद्रोह व देशद्रोह करणाराचा विनाश करण्यासाठीं व रामराज्य अगर धर्मराज्य स्थापणेसाठीं सशस्त्र प्रतिकार करणें त्यास भाग पडलें.

शिवाजीराजानें गर्विष्ठ व सत्ताधारी औरंगजेब, देवता फोडणारा अफजलखान, व हनुमताची व वानराची थट्टा करणारा शाहिस्तेखान याची कशी दुर्दशा केली व धर्मरक्षण केलें हें इतिहासप्रसिद्ध आहे. अशा हा पूर्वसंत व समर्थ आणि समर्थशिष्य याच्यात भेद आहे. पूर्वसंताचा यांत दोष नाहीं, अनुभवानें नवीन मार्ग सुचतात व आचरणात आणावे लागतात. पूर्वसंतांनीं धर्म सांभाळून भूमि तयार करून ठेविली होती, त्याचा श्रीसमर्थांस उपयोग झाला यांत शंका नाहीं.

( ३ ) पार्श्वभूमि—मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११-५-४

जय जय रघुवीर समर्थ

जय जय रघुवीर समर्थ हा महामंत्र आहे, हें सूत्र आहे, या तीन पदच्छेदात मोठा अर्थ भरलेला आहे, ही प्रेरकशक्ति आहे, हा जयघोष आहे, ही हृदयाची हाक आहे, हा रोकडा सवाल आहे, हें गूढ कोडें आहे, ही ललकारी

आहे, ही भक्ति आहे, शक्ति आहे, मुक्ति आहे, हें शास्त्र आहे, हें अस्त्र आ. हें विधिविधान आहे, हें आत्मनिवेदन आहे, हा देवदेवाचा जयजयकार आ. हा कार्याचा जयजयकार आहे, यात कथानिरूपण, राजकारण व सावधपण साठविलेलें आहे

आज्ञा आज्ञा बहु आज्ञा । काये आज्ञा कळेचिना ।
गुप्त तें गुप्त जाणाने । आनदवनभुवनीं ॥ रू म ५८-१७

× × ×

रामदासाचा विसावा । रुद्र जाहला आज्ञावा ।
भक्तजन वेग धावा । दर्शनासी ॥ भीमस्वामी

दासबोधाचे प्रस्तावनेंत श्री देव यांनीं "श्रीदासबोधातर्गत श्रीसमर्थचरित्र" दिलें आहे व इतकें विश्वसनीय चरित्र दुसरें कोणतें असणार असा त्याचा सवाल आहे खरेंच, आत्मचरित्र लिहिण्याचे श्रम न घेतां आपण लिहिलेल्या ग्रंथांतून आपलें चरित्र कसें न जाणता उतरलें आहे हें पाहण्यासारखें असतें व समर्थांचें चरित्र दासबोधात साठविलेलें आहे त्याचें कारण त्याची प्रतिज्ञा "आधीं केलें मग सांगितलें" हीच प्रभावी आहे तसेंच

जय जय रघुवीर समर्थ

या तीन पादात त्याचें चरित्र व अवतारकार्य साठविलेलें आहे, असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं

आम्ही यदाचे मे महिन्यांत जाब सस्थान येथील श्रीसमर्थांचे उत्सवास गेलों त्या वेळीं महाराष्ट्रधर्म या ग्रंथाचे कर्ते, राजवाडे सशोधनमंदिराचे महत श्री भट यांचीं महाराष्ट्रधर्मावर सात प्रवचनें श्रवण केलीं व जाब मठात सकाळ सायकाळ दोन वेळीं प्रसादाचा लाभ घेत असता मनाचे श्लोक व

जय जय रघुवीर समर्थ

हा घोष अखड कानांवर पडत असल्यानें हा घोष काय असावा, हा इतका प्रभावी व सर्वतोमुखी कसा जाहला, या मत्राचीं अक्षरें अकराच कां, या मत्राचे आंत बाहेर, आरपार, मागें पुढें—सर्व बाजूंनीं, पर्यायानें, प्रमाणानें, धर्मानें, स्थलकाल, व्यक्ति व मठ यांना अनुसरून काय काय गूढें व रहस्यें भरलीं आहेत, यांचें मनन व विवेचना करतां करता एक एक दालन दिसू लागलें डोळ दिपावे, पुरा मराच पेठानें उघडावे तर एक एक देखावा पहावयार घेऊन

आहे. आश्चर्य वाटे, मनात तरंग येत जात. एखादा रामदासी यावा, त्यानें मनाचा श्लोक म्हणावा :

भवाचे भयें काय भीतोस लेंडी ।
धरीं रे मना धीर धाकास सांडी ।
रघुनायकासारिखा स्वामि शीरीं ।
नुपेक्षी कदा कोपल्या दंडधारी ॥

या नुसत्या श्लोकामध्ये सुद्धा जिवंत ममत्व, निवांत निर्भयता, व खाधार आश्वासन आहे. परंतु मंत्रमुग्ध करणारें शेवटचें महावाक्य ऐकिल्याशिवाय समाधान होत नाहीं व

जय जय रघुवीर समर्थ

चा गजर झाला कीं मान डोलूं लागते, मन हेलावतें, प्रेमाचा व सद्भावाचा पाझर फुटतो. असें गूढ काय असावें बरें !

( ४ ) योगीराजांची पूर्वपरंपरा—

शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ।

समर्थांचे वडिलांचें नाव सूर्याजीपंत व मातोश्रीचें नांव राणूबाई हें सर्वांना माहीत आहे. समर्थांचे वाडवडिलापासून त्यांचे कुळात श्रीराम हें कुलदैवत होतें. समर्थांचे कुळात पूर्वीपासून सूर्याची उपासना अखंड चालत होती. सूर्याजीपंताचे वडिलांनीं समर्थांचे वडिलांचें नाव सूर्याजीपंत ठेविलें ह्यावरून ही सूर्योपासना घराण्यात पूर्वजापासून असावी असें म्हणण्यास आधार मिळतो. मातोश्रीचें नाव राणूबाई हें अन्वर्थकच होतें. श्रावण महिन्यात प्रत्येक रविवारीं घरोघरीं स्त्रिया सूर्याची प्रतिमा ( पाटावर ) रक्तचंदनानें काढून त्याची पूजा करतात त्यास आदित्यराणूबाईची पूजा म्हणतात व त्याची कहाणीहि सांगतात. भगवान् सविता सूर्यनारायणाची उपासना मातापितरास असल्यामुळें रामदासस्वामी हे शुद्ध बीजापोटीं परिपाक होऊन परिणत झालेलें रसाळ व परिपक्व फळ होतें. सूर्यनारायणाचे प्रसादानें प्राप्त झालेल्या ह्या सुपुत्राचें नाव 'नारायण' ठेविलें हें योग्यच होतें. श्रीरामराय हे सूर्यवंशातील असल्यामुळें प्रतिसूर्य असा नारायण त्यांचे अनुग्रहास किशोरावस्थेंतच निवडला गेला. नारायणास त्याचे अकरावे वर्षीं अचानक ध्यानीं मनीं नसता श्रीरामरायाचा वरप्रसाद मिळाला. सदरचा आश्चर्यकारक नवनवोन्मेषी प्रसंग इतिहासात एकमेवाद्वितीय असाच आहे. आम्ही ऐतिहासिक

*प्रसंग म्हणतों याचें कारण त्या प्रसंगासंबंधी गैरविश्वास करण्याचें कारण नाहीं.* समर्थांचे ह्यातींत व नंतर ह्यात असलेल्या त्यांचे शिष्यांनीं 'स्वानुभवदिनकर' या ग्रंथांत तो प्रसंग वर्णन केला आहे त्याचें स्वारस्य मूळावरूनच कळण्यासारखें आहे, म्हणून त्या ओंव्या खालीं दिल्या आहेत अकराने वर्षी हा अनुग्रह-योग आला हें अकरा आंकड्याचें गूढ यांत आहेच

गौतमीचा उत्तरतीरीं जांबेसी । ग्रामलेखनाधिकार पितयासी ।
पिता गोदेसी गेला स्नानासी । तव नवल वर्त्तलें मागें ॥

स्वा दि १६ ४४६

निजगृहीं असता नारायण । तव दूतवेषे आला येक वानरगण ।
तेणें परमक्लेशी करून । ब्राह्म प्रदेशासी नेलें ॥ ४७
वय तरी वर्षे अकराचें । परंतु पदरीं जन्मांतर पुण्य साचें ।
योगभ्रष्ट तेणें निजवृत्तीचें । चळण न घडे कदापि ॥ ४८
दूतें झोले देत ब्राह्म प्रदेशीं । नेलें तेणें नारायण भयभीत मानसीं ।
होऊनि पावे तव दृष्टीसी । अपूर्व कौतुक देखिलें ॥ ४९
मेघ श्यामरूप क्षत्रीवेषें । सिंहिकेमाजीं बैसलीं स्त्रीपुरुषें ।
सभवतें निजगण यथा सतोषें । उभे असती दोहीं भागीं ॥ ५०
तव यासी नेऊनि पुढे उभें केलें । पिता कोठें आहे म्हणौनि पुसिलें ।
रघुपति भाषा वाक्य बोलिलें । आणि वेष हि तैसा चि ॥ ५१
येणें पितृवर्तमान सांगितलें । तव प्रभूनें जवळीं पाचारिलें ।
मस्तक कुरवाळूनि येक पत्र दिधलें । निजकरें नारायणासी ॥ ५२
निजमुद्रांकित पत्र करीं लाधतां चि । अवस्था पालटली नारायणाची ।
थरथरां कांपत तेणें सर्वांगाची । येगडी चळली ॥ ५३
वाचा जातसे येंवळपण । हांसे रडे नाचे सत्राणें ।
शब्द बोलवेना निर्बळपणें । उगा चि टकमका पाहातसे ॥ ५४
आंग कांपतसे थरथरां । विस्मयें दाटलासे सैरा ।
घामेजोनि अति घाबिरा । रडे पडे आक्रंदे ॥ ५५
क्षणें हासे क्षणें रडे । उड्या मारी क्षणें पडे ।
इतुकियामाजीं निजनिवाडें । कौतुक देखे निजदृष्टी ॥ ५६
तंव मूर्ति देखिली घवघवीत । मेघ श्याम प्रभा लसलसित ।

वामांगीं जानकी शोभत । पाठीसीं सौमित्र भरत ॥ ५७
तया सेजीं उभा शत्रुघ्न । पुढें उभा वीर हनुमान ।
अकस्मात बांहादुली येऊन । इतुकें देखे तत्काळीं ॥ ५८
ऐसें देखेना जवं अकस्मात । तवं श्रीरामें मस्तकीं ठेऊनि कृपाहस्त ।
महावाक्य उपदेशुनि त्वरित । हनुमंतासी निरविलें ॥ ५९
ते समई दिग्मंडळ दणाणिलें । तेणें नारायणाचें सर्वांग थरारिलें ।
म्हणे काय ब्रह्मांड कोसळलें । मजवरी ये काळीं ॥ ६०
म्हणौनि थरथरां असे कांपत । तेणें दांतखिळी बैसो पाहात ।
सभंवतें टकमकां अवलोकित । तवं धुधुकार देखिला ॥ ६१
इतुकियामाजीं अकस्मात । विज्जुसारिखें लखलखित ।
निजांगीं दिव्य वस्त्र वेष्टित । सीतनिवारणार्थ ॥ ६२
वस्त्र रंगाथिलें अति मनोहर । आरक्त शोभा मंडित सुंदर ।
कुमुंजीसारिखे सपरिकर । दिव्य तेजें विलसे ॥ ६३
सव्य करीं पत्र राममुद्रांकित । वामकरीं अर्द्धचंद्र बाण राम देत ।
इतुकियामाजीं तत्काळ जाली गुप्त । राममूर्ति निजांगें ॥ ६४
इतुकें जवे क्षणमात्रें हों न सरे । तवं नारायणासीं पडलें अंधारें ।
वाचा स्तब्ध होऊनि येक संवत्सरें । निजसमाधीं तटस्त ॥ ६५

अशा रीतीनें श्रीरामरायानें मस्तकीं कृपाहस्त ठेवून महावाक्य उपदेशिलें. तें काय असावें हें गूढ केव्हांच उकलण्यासारखें नाहीं.

(५) महोत्छाव—

अंतरीं कल्पना केली । येकांतीं बोलिलों बहु ।
रक्षिता देव देवांचा । त्याचा उछाव इच्छिला ॥ स्फु. म. ६७-४५
आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।
जो समर्थाचा हि समर्थ । देवां सोडविता । ६-७-२१

पूर्वसंत श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचेपासून रामदासस्वामी यांचेपर्यंतचे काळीं 'पुंडलिक वरदे हारी विठ्ठल' हीच परंपरा चालू होती यांत संशय नाहीं. पुढें रामरायाचा उत्छाव करावा अशी रामदासांना इच्छा झाली तेव्हां कृष्णातीरीं येऊन त्यानीं चाफळेस रघुनाथदेवाची स्थापना शके १५७० त केली. तेव्हांपासून अगर कदाचित् स्वामींस अकरावे वर्षी अनुग्रह झाला त्यानंतर तीर्थयात्रेच बारा वर्षें प्रवास केला

तेव्हापासून " जय जय रघुवीर समर्थ " ही घोषणा भरतखंडाचे कोनाकोंपऱ्यातून त्यांनीं घुमवली असावी.

' जय जय ' यांतील द्विरुक्ति लक्षात ठेवण्यासारखी आहे. यात गाढ रहस्य भरलें आहे. पहिलें जयात उत्साह, उत्साव पूर्णपणें भरला असून सर जय जो द्विरुक्तीनें मुद्दाम घातला आहे त्यात यश साठविलेलें आहे, व दोन्ही जय मिळून पुढील कार्यांत अभ्युदय ठेवलेलाच आहे, अशी सद्भावना व प्रतिज्ञा आहे.

श्रीरामरायाची स्थापना करून त्याचा महोत्साव करावयाचा त्याकरिता व भक्तिमार्गानें धर्मस्थापना करण्याकरिता स्वामींनीं बऱ्याच योजना केल्या होत्या; त्यात यश येऊन चढता वाढता महोत्साव होत जावा म्हणोन सरसक बधनें घालून ठेविलीं होतीं त्याचा प्रकार असा :

चाफळक्षेत्रें आदिल्शाही राज्यात मोडत होतें, म्हणून आदिलशाहीचे मातबर व महाराष्ट्रधर्माचे अभिमानी सरदार याजकडून इनाम जमिनींच्या सनदा मिळविल्या होत्या. त्यापैकीं मुरार जगदेव ऊर्फ राजश्री यानतराऊ हे आदिलशाईंतील मोठें प्रस्थ होतें. तसेंच, बाजीराजे घोरपडे हेहि नामांकित सरदार होते. याची मदत मिळाल्यावर देशमुख, देशपांडे, कमाविसदार व नायकवाडी यांचेकडून प्रसादपुष्पावर हात ठेवून श्रीरामरायाचे अधिष्ठानाची भक्ति व साह्यता सर्व प्रकारें करू अशाबद्दल भाक घेवविली. त्यापैकीं नरसो मल्हार हा ब्राह्मण कमाविसदार होता, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. गावकऱ्यांनीं व गावपुढाऱ्यानीं रामाचें देऊळ स्वत चे खर्चानें व श्रिवरायानें दिलेल्या पाचशें होनांचे मदतीनें बांधलें. पुढें उत्सव, दिंड्या, सिंहासनें वगैरे सर्व सोहळे गांवकऱ्यांनींच केले व चाफळ, सिंगणापूर येथील जमिनी इनाम करून दिल्या. समर्थांनीं आपले पथाचें मुख्य ध्येय धर्मरक्षण केलें होतें. ह्या ध्येयाचे सिद्धीस तीन उपाय सांगितले आहेत. पहिली भक्ति या उपायाची सिद्धता रामोपासना प्रचलित करून त्यांनीं साधिली. नागपूरपासून तुगभद्रेपर्यंतच नव्हे, तर काशीपासून रामेश्वरपर्यंतचे प्रांतांत जागोजाग मठ स्थापून त्या त्या स्थळींच्या ब्राह्मण क्षत्रिय-वैश्य-शूद्रांना रामभक्तीचे सूत्रांत घेता येईल तितके गोवून घेतलें.

( ६ ) रघुवीराचे पराक्रम—

दुर्जना मंदार सज्जना आधार । भाविकासी पार पावविलो ॥

पाठवितो पार या भवसिंधूचा । राघव दीनाचा दीनानाथ ॥

'जय जय रघुवीर समर्थ' या एकशेष समासांतील जयजयचे नंतरचा दुसरा व गाभ्याचा मधला शब्द "रघुवीर" हा आहे

रघुवीर हा पराक्रमाचा प्रतीक आहे. हा धनुर्धारी आहे, हा वीर्याची, धैर्याची व शौर्याची मूर्ति आहे. रामरायानें बंदींत पडलेल्या देवाना सोडविलें, तेव्हां तो देवाधिदेव आहे. रघुवीराचें मनन करता करता जे निरनिराळे देखावे दिसू लागतात, त्यात त्याचे लहानपणचा देखावा म्हणजे विश्वामित्र ऋषींनी यज्ञसरक्षणाकरितां दशरथराजाजवळ रामलक्ष्मणाची मागणी केली तो होय. त्या वेळीं लहान वय असतांहि त्यानीं बरेच राक्षसाचा सहार करून यज्ञरक्षण केलें व मुनीजनास सतोषित केलें लहानपणापासूनच त्याना कष्ट सहन करण्याचा व पराक्रमाचीं कृत्यें करण्याचा प्रसग पडला हा रम्य व उत्साहवर्धक देखावा सपतो न सपतो तों पुढें सीतास्वयवराचा व धनुर्भंगाचा देखावा दिसतो. पुढें रामरायास युवराज्याभिषेक करण्याचें कायम झालें असता एखादा देखावा बदलावा ( ट्रॅन्स्फर सीन ) त्याप्रमाणें तीं गुढ्या तोरणें, सुगधी पाण्याचे रांजरस्त्यातील सडे, नगारे, चौघडे, मगलवाद्यें, वगैरे आनदाची धादल नाहींशी होऊन मथरेनें दशरथाच्या आवडत्या कैकयी राणीस दश करून ठेवणींत जतन करून ठेवलेल्या दोन वराचे योगानें रामा "वन" व भरता "सिंहासन" मागितल्याचा देखावा दृष्टीसमोर येतो, व त्याप्रमाणें अयोध्यावासी सर्व प्रजाजनाना व वसिष्ठ, कौसल्या, दशरथ याना दु खाचा कडेलोट करणारा रामचद्राचा वनवास सुरू होतो सीता देवीसह हा वनवास सुसह्य होत होता दडकारण्यातून जाताना त्यानीं चौदा हजार राक्षस यमसदनीं पाठविले व जनस्थान उध्वस्त करून रामानें ऋषींना अभयदान दिलें व दडकारण्य अगदीं मोकळें करून सर्वांना क्षेमयुक्त केलें

इतक्यात, रावणानें, राम आश्रमात नसता, सीतेचें हरण करून तिला घेऊन पलायन केलें

सीतेच्या विरहानें रामास अत्यत शोक झाला व सीताशुद्धीचें काम वीर हनुमानावर येऊन पडलें

वीर हनुमानास सीताशुद्धि करण्याविषयीं श्रीरामाची आज्ञा झाली म्हणून मारुति शोधार्थ निघाले त्यानीं पुष्कळ गावें ओलांडलीं, अरण्यें धुडलीं, नाना देश पालथे घातले, तरी सीतेचा कांहीं शोध लागला नाहीं नतर सर्व कपींसह

मारुतिराय समुद्रतीरावर येऊन पोंचले व समुद्रापुढें इलाज चालेना म्हणून उदास झाले. पुढें काय करावें, प्रभूचें कार्य आपले हातून होत नसेल तर मरण पत्करावें, असा सर्वांनीं निश्चय केला. निराशा अत्यंत झाल्यानंतरच प्रयत्न करणारास मार्ग सापडतो, त्याप्रमाणें आशेचा किरण सापडल्याबरोबर सर्वांस धीर देऊन आपण स्वतः एकटे उड्डाण करून उडाले तों,

अकल्पीत लंकापुरी कांचनाची । पुढें देखिली सौख्यदाती मनाची ॥
सुं. का. १०

रावणाची सोन्याची लंका, त्याचें वैभव, अफाट सामर्थ्य व सेनासमूह पाहून मारुति विस्मयानें थक्क होत आहे, तोंच देखावा पालटतो व एकदम त्यास काय दिसतें बरें !

अकस्मात त्या देखिल्या बंदीशाळा ॥ १७

त्या बंदीशाळेंत कोण होते ? सीतादेवी नव्हे, तर सर्व देव होते ! तें पाहून त्याचे डोळे लाल झाले, राग अनावर झाला. देवाची स्थिति त्याना कशी दिसली ?

हिणासारिखे देव ते दीन जाले ।
नसे शक्ति ना युक्ति पोटीं गळाले ।
भयातीत ते कापती दैन्यवाणे ।
बहु गांजिलें दुःख तें कोण जाणे ॥ सु. का. १८

परंतु अशा लाचार, निराश, हीन दीन स्थितींत असलेल्या देवांस सोडविण्याविषयीं मारुति निराश झाला नाहीं. कारण त्याला स्वतःचे अतुल सामर्थ्याची चमक होती, पण त्याचें त्याला विशेष महत्त्व वाटत नव्हतें; परंतु अदृश्य असलेला शक्तिमान् रघुवीर याचा मी दास आहें, मी राममुद्रांकित आहें, हा विश्वास व राघवाचे सामर्थ्याबद्दलची त्याची निष्ठा हीच त्यास निराश न होण्यास प्रोत्साहन देत होती.

मनामाजि आवांकिलें सर्व कांहीं ।
सिमा सांडिली तूळणा त्यासि नाहीं ।
बहु मातले गर्व मोठ्या बळाचा ।
तया झोडितों दास मी राघवाचा ॥ सुं. कां. २०

लघुरामायण म्हणून समर्थांनीं एक प्रकरण लिहिलें आहे. त्यांत विश्व-

स्थितींत देव हतवीर्य होऊन कसे रहत होते व कोणकोणतीं हीन कामें करीत होते याचें बहारीचें वर्णन आहे.

समीर लोटितो खडे। वरुण घालितो सडे।
मयंक साउली धरी। मळीण पावकु हरी॥ स्फु. श्लोक
५८-१३

विधी विधीस धाकतो। सुरेंद्र चाग राखितो।
करावयास निग्रहो। भुमंडळासि विग्रहो॥ १४
अखंड चाकरी करी। सदा यमाची मादरी।
सटी आरंघळी दळी। गणेश गाढवे वळी॥ १५
बहु कठीण काळ हो। समस्त पावले मोहो।
दिणा दिनाचिया परी। सदा गळीत अंतरीं॥ १७
समस्त केश लावले। कितेक वेस्त लोंबले।
नखें चि योग साधले। समस्त देव गादले॥ १८

ही देवाची स्थिति पाहून रामास त्याची करुणा येऊन त्याचे मुक्तीसाठीं त्यानीं धाव ठोकली.

निशाचरें बहु वसे।। कठीण वर्तमानसें।
म्हणोनि राम पावला। बहु बळें उठावला॥ १९
× × ×
बहुत श्रेष्ठ पाहिले। परतु सर्व राहिले।
विबुधपक्षरक्षणा। श्री राम राम हें म्हणा॥ स्फु. श्लो. ३-५

राघवाचे पराक्रम सर्वांत श्रेष्ठ आहेत असें दासाचें म्हणणें आहे व त्यानीं युद्ध-काडाचे आरंभीं तसें वर्णन केलें आहे.

जेणें फेडिला पाग ब्रह्मादिकाचा। वळें तोडिला मद त्या त्रीदशाचा।
म्हणोनी कथा थोर या राघवाची। जनीं ऐकता शात होते भवाची॥
यु. का. १७

कथा थोर रामायणीं सार आहे। दुजी ऊपमा ये कथेला न साहे।
तिन्ही लोक गाती सदा आवडीनें। भविष्योत्तरें वाटिलीं शंकरानें॥ ८

रामरायाचे मनात रावणाचे लंकेंत अशोकवनात बंदींत ठेवलेल्या सीता-देवीस सोडविण्याचें होतें, त्यापेक्षा जास्त त्याची निरपेक्ष दृष्टि देवाना बंदींतून

सोडविणेची होती. अशा रामाचे पराक्रमानें रामायण भरलेलें आहे, व राघवाचें ब्रीद अनाथाचें रक्षण करण्याकडे विशेष असल्यानें रघुवीर दैवतावर दासांचें अचल प्रेम व भक्ति होती. तीच या "जय जय रघुवीर" यात त्यांनीं प्रकट केली आहे.

रामरायाचे ठायीं उत्साह, तेज, उद्योग, साहस हे गुण ज्याप्रमाणें होते त्याचप्रमाणें धर्म, नीति, तप, अनासक्तता इत्यादि गुणहि होते व याच गुणामुळें त्यास राक्षसाचे बलाढ्य राजास म्हणजे रावणास व त्याचे बलाढ्य सहकारी प्रहस्त कुंभकर्ण, इंद्रजित यास नामोहरम करण्यास कांहीं कष्ट पडले नाहींत.

अशा रामरायाचा "जय जय रघुवीर समर्थ" असा जयजयकार करण्यास रामदासस्वामींस मनापासून उत्साह वाटत असे.

(७) समर्थे समर्थ करावे—"समर्थ" हा तीन अक्षरी शब्द असला। तरी त्यात त्रैलोक्य साठविलेलें आहे. दासाचे कुलदैवतास थोडक्यांत सुटसुटीतपणें संबोधावयाचें म्हणजे, दास त्याना समर्थ म्हणत असत.

ह्या घोषातील तिसरें पद 'समर्थ' असून तें शेवटचें पद आहे, म्हणजे शेंडे-फळ असावें तसें, उच्च व व्यापक आहे. महाभारताची गोष्टी अशी प्रतिवर्षी वाढत जाते तशी या पदाची गोष्टी परमोच्च पदास पोंचली आहे.

ज्यास सामर्थ्य आहे तो समर्थ.

सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील तयाचें।
परंतु येथें भगवंताचे। अधिष्ठान पाहिजे॥ २०-४-२६

समर्थ या शब्दात सावधानता, सततोद्योग व प्रयत्न याचा परिपाक आहे. यांत चाल्ना, योजना, यत्रणा, विवचना, कार्यकारणसंगति व प्रयोग्य प्रचीति आहे. समर्थ होण्यास कष्ट, सायास, तपश्चर्या, मंडळीकरण, संघ, समुदाय, साधनें, मळणें यांकणें हीं पाहिजेत, व निरिच्छा, स्वार्थत्याग, समयसूचकता, निर्णायक बुद्धि, सर्वभूतहितरतत्व व स्थितप्रज्ञता व समबुद्धि यांची आवश्यकता आहे.

जय जय रघुवीर समर्थ

यात धर्म, राजकारण व सावधानता हीं ओतप्रोत भरलीं आहेत. मंत्रराज रामघोष हा ह्या सुटसुटीत मंत्राचें प्रवचन अगर विस्तार आहे. याच मंत्रांत दासांचें चरित्र व चारित्र्य भरलें आहे.

रामरायाला समर्थ म्हणतो म्हणता ते इतके अनन्य अगर एकरूप झाले की स्वत च समर्थ बनले. समर्थ रघुवीरानें जें कार्य केलें तेंच समर्थ दासांनी आपले देखरेखीखालीं शिवाजीमहाराजांकडून करविलें

रामरायास विश्वामित्र ऋषीनें असें शिकविलीं गायत्रीमंत्राचे प्रणते विश्वामित्र ऋषि व त्या गायत्री मंत्राचें बारा वर्षे पुरश्चरण रामदासांनी केलें सूर्यवंशांतील रामरायाकरिता, दासांनी पुरश्चरण म्हणजे सूर्यस्तुतिच केली

दासांनी बारा वर्षे तीर्थाटण केलें म्हणजे भरतखंडाचें निरीक्षण करून कोठें कोण आपले पुढील भगीरथ प्रयत्नास सहाय्य करील याची तपासणी केली व ठिक ठिकाणी मठस्थापना केली

रामराय जसे समर्थांचे समर्थ तसे रामदास हे महाराष्ट्राचे महाराष्ट्रधर्म स्थापणारे समर्थ होत रामदासस्वामी कळवळ्यानें म्हणतात—

समर्थानें समर्थ करावें। तरी च समर्थ म्हणवावें।
त्रैलोक्यास पहिलें ठावें। सामर्थ्य ज्याचें ॥

हेंच आम्हीं तुम्हीं पुष्कळ जोरानें म्हटलें तरी यशशुद्धि, आत्मशुद्धि, जनशुद्धि व अनन्यभावें भक्ति करण्याची पात्रता असल्याशिवाय समर्थ होऊन सर्वांस सामर्थ्य प्राप्त करून देणें अशक्य आहे

" समर्थांचा कविता–प्रथमखंड " याच्या प्रस्तावनेंत बऱ्याच शिकवणी दिल्या आहेत, त्या पाळल्यास ज्या मानाची उत्कटता व प्रयत्न असेल त्या मानानें समर्थ होण्याची किंचित् आशा आहे

ग्रंथराज दासबोधातील ओव्या इतक्या वक्तृत्वपूर्ण आहेत कीं त्यांवर खुलासा करणें नलगे

प्रत्यहीं मागणें भीक्षा। मिळाली न मिळे तरी।
नित्य नूतन हिंडावें। धुडावे भक्त प्रेमळ ॥ स्फु. प्र. ३-६
हिंडता पारखी लोका। कार्यकर्तो जिवीं धरी ॥ स्फु प्र १ ६

रामदासस्वामींनी मठ व मठपति याची भरतखंडभर स्थापना केली तें धर्मस्थापना व स्वराज्यस्थापना यांचें जाळें होतें भक्तिमार्ग हा सर्वसाधारण लोकास सहज-सुलभ होता व त्यातून धर्मनिष्ठ कार्यकर्ते पारखून निवडावयाचे होते समर्थांचें राजकारण म्हणजे धर्मरक्षी ऐसा शिवाजीराजा त्यास सर्वतोपरी सहाय्य करणें. शिवाजीराजास आपले पूर्ववयात हजार पथरायें प्रकट मठ व किती तरी गुप्त मठ

यांचा देणग्यानीं परामर्ष व योगक्षेम करणें शक्य नव्हतें. केवळ भिक्षेवर मठपति आपला योगक्षेम चालवीत. मठ व मठपति यांचे द्वारा ब्राह्मणमंडळ्या, क्षत्रियमंडळ्या, वैश्यमंडळ्या व शूद्रमंडळ्या जागोजाग स्थापून शिवरायाचें राजकारण जेणेंकरून सुगम व सफळ होईल अशी स्थिति समर्थांनीं उत्पन्न केली व हें जें मठाचें यंत्र निर्माण केलें त्याचा बोजा शिवराजावर एक पैचाहि नव्हता. समर्थांचे उद्योगानें व त्याचे योगसामर्थ्यामुळें देशाकरिता, धर्माकरिता व संस्कृतीकरिता त्या वेळीं हजारों तरुणानीं स्वार्थाचा व सर्वस्वाचा यज्ञ आरंभिला होता.

जय जय रघुवीर समर्थ

याचा गगनभेदी मेघनाद त्यानीं असंख्य मठस्थापना करून उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत पसरून दिला होता.

देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।
मुलुक बडवावा बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं ॥
देवद्रोही तितके कुत्ते । मारूनि घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । येदर्थी संशयो नाहीं ॥
महंतें महंत करावे । युक्तीबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखुरावे । नाना देशीं ॥

रघुवीर समर्थास मस्तकीं धरलें म्हणजे केवढा आत्मविश्वास उत्पन्न होतो, व केवढा हलकल्लोळ करून मुलूख बडवून व बुडवून धर्मस्थापना करता येते, अशा देवदासाना देवद्रोही कुत्ते मारून कशी फत्ते मिळविता येते व अशा देवदासांना युक्तिबुद्धीनें भरून व शिकवून, जाणते करून, महंतपद देऊन, देशोदेशीं विखरून कसे सोडता येतात व समर्थपणा कसा प्राप्त होतो हें वरील ओव्यावरून दिसतें.

नाना पुरश्चरणें करावीं । नाना तीर्थाटणें फिरावीं ।
नाना सामर्थ्यें वाढवावीं । वैराग्यबळें ॥
ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या ।
संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥
लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।
भूमंडळी सत्ता चाले । गुप्तरूपें ॥
मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
याविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसति ॥

या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षितां ऐसा नाहीं ।
महाराष्ट्र धर्म राहिला कांहीं । तुम्हांकरितां ॥
वहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी ।
ऐसी हे समर्थपदवी । विवेकें होते ॥

वरील सहा ओव्यामध्यें रामदासस्वामींचें चरित्र उपदेशरूपानें साठविलेलें आहे, इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रधर्म, व राजे यानीं महाराष्ट्रधर्मस्थापनेसाठीं केलेले प्रयत्न व दासास मिळालेली समर्थ पदवी याचा बोध सूत्ररूपानें यात पाहण्यास सापडतो.

समर्थ होण्यासाठीं किती श्रम व सायास, कष्ट व मनोनिग्रह करावा लागतो व शिस्त व नियमितपणा किती काटेकोर सांभाळावा लागतो, याचें प्रत्यंतर या ओव्यातून प्रामुख्यानें दिसत आहे. योगीराज रामदास हे बाराव्या वर्षी आप्तजनाचा त्याग करुन व लग्नातील सावधान या इशाऱ्याचा फायदा घेऊन एका वस्त्रानिशीं कसे हालअपेष्टा सोशीत टाकळीस पोंचले व तेथें सारले एका देवकार्यासाठीं बारा वर्षे मधुकरी मागून लहान वयात राहिले, हें दृश्य मनावर ठसवून घेण्यासारखें आहे.

जयासि वाटे सुख चि असावें । तेणें रघुनाथ भजनीं लागावें ।

अशी त्याची शिकवण आहे. यात्रा करीत असताहि नाना संकटातून त्यांस दिवस काढावे लागले व बहुत सायासानें व बहुत धर्म्यें सांभाळून त्याना समर्थ पदवी प्राप्त झाली. तेव्हा मागचे सर्व दैन्य आठवून गहिंवर येऊन त्याचे मुखातून अकरा ओव्यातून जे सहजोद्गार निघाले ते मुळातून सर्वांस कळावे म्हणून देण्याचा मोह अनिवार होतो. पुनःपुन्हा वाटतें कीं, त्याचे शतांशहि आपण प्रयत्न करू तर देवकार्य व देशकार्य याचे सुंदर इमारतीस एक मूठभर चुना लावल्याचें श्रेय आपणास लाभेल.

परंतु येकवचनी देव येक । जेणें सोडिले देव अनेक ।
सेवाहीन मी सेवक । त्याचा म्हणवी ॥
समर्थें अंगिकार केला । नाना संकटीं रक्षीला ।
त्याचिया अन्नें पिंड वाढविला । जन्मवरि ॥
मारुति सारखे सेवक । तेथें मी मानवी रंक ।
नवल सामर्थ्याचे कौतुक । काय सांगों ॥

समर्थ आणि दिनानाथ । वैभवें समर्थाहून समर्थ ।
जेणें माझे मनोरथ । पूर्ण केले ॥
जें जें मनें अभिळाषिलें । तें तें समर्थें पुरविलें ।
मज दीनास वाढविलें । मर्यादेवेगळें ॥
समर्थानें समर्थ करावें । तरी च समर्थ म्हणवावें ।
त्रैलोक्यासि पडिलें ठावें । सामर्थ्य ज्याचें ॥
आर्जाक्य रजनीचर माजले । देव कारागृहीं घातले ।
म्हणोनि वैकुंठाहून पातले । देव सोडवावया ॥
देव मात्र जाजावला । म्हणोनी कैपक्षी पावला ।
भूवनकंटक निर्दाळिला । दशमुख शत्रु ॥
जिहीं त्रैलोक्य जिंकिलें । त्यास मर्कटाहातीं मारविलें ।
भुवनत्रय आनंदविलें । दाशरथीनें ॥
देवांचे बंद सोडविले । देव स्वस्थानीं स्थापिले ।
प्राणी मात्र आनंदविले । रामराजें ॥
बिभीषणास दिधली लंका । सुरवराची फिटली शंका ।
समर्थें रामदास रंका । नयाजिलें ॥

प्रत्येक ओवींत समर्थांचें म्हणजे एकवचनी रघुवीराचें सामर्थ्य व दासांवर केलेला कृपाप्रसाद थाटविला आहे.

येथपर्यंत ' जय जय रघुवीर समर्थ ' या जयजयकाराचें थोडक्यात त्रोटक विवरण केलें आहे व हाच मंत्र प्रकट व गूढ असून त्याची परंपरा जितकी विषद करता आली तेवढी केली आहे. परंतु महाराष्ट्रधर्माची स्थापना ह्या जयजयकारात कशी उत्पन्न झाली तें दाखविल्याशिवाय हें विवरण संपवता येत नाहीं.

( ८ ) महाराष्ट्रधर्म— वेदप्रणीत व श्रुतिस्मृतींत सांगितलेला धर्म तो महाराष्ट्रधर्म. हा सनातनधर्म भरतखंडात फार वर्षें चालला, परंतु कालांतरानें त्यास मालिन्य आलें व लोप झाला. तेव्हा सामान्यतः सर्व हिंदुस्थानाव व प्रामुख्येंकरून महाराष्ट्रास जागृत करून त्या धर्माचें रहस्य श्रीसमर्थ रामदासांनीं ग्रंथराज दासबोधात ग्रथित केलें त्याची त्रोटक रूपरेषा खालीं देतों.

दासबोधाचा विशेष हाच की, समर्थकालीन स्थितीस अनुलक्षून महाराष्ट्रास हा उपदेश आहे.

सद्गुरु तयार झाला म्हणजे सद्शिष्य तयार होतात. अडचण असेल तर अगर बोल लावावयाचा असेल तर अडक्याचे तीन गुरु अगर पोटभरू गुरु हेच समाजास बिघडवीत असतात.

सर्वज्ञ असे जे सद्गुरु ते ज्ञानानें, अनुभवानें, विरक्तीनें, तपश्चर्येनें समाजाचें पुढारीपण स्वीकारण्यास व त्यास योग्य वळण लावण्यास समर्थ असतात. असें झालें म्हणजे योग्य अनुयायी अगर सद्शिष्य तयार होतात. दासानीं योग्य ते शिष्य निवडून त्यास महत पदवी देऊन महाराष्ट्र उपदेशिला.

कोणत्याहि काळीं व कोणत्याहि देशात बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध अशा चार कोटींतील जनसमाज असतो. समर्थकालींहि तसाच होता.

(१) समर्थांसारखे सिद्ध बोलून चालून स्वतंत्र असतात.

(२) साधकहि त्याच स्थितीला जाऊन पोंचण्याचे मार्गांत असतात.

(३) मुमुक्षुना स्वतंत्र स्थितीला जाऊन पोंचण्याची उत्कट इच्छा असते.

(४) बद्धाना मुक्तीचे मार्गास पोंचविण्याचा प्रयत्न सिद्धाना व साधकाना मुमुक्षूचे साह्यानें करावयाचा असतो.

सिद्ध व साधक यांनीं केलेल्या उपदेशाचा परिणाम अज्ञ अगर बद्ध यास मायेचे बंधनापासून सोडविण्यास म्हणजे परमार्थ प्राप्त करून घेण्यास उपयोगी पडतो.

आता अज्ञ अगर बद्ध जे आहेत त्यास नीतीची म्हणजे धर्माची ओळख नसते, इतकेंच नव्हे तर त्याच्यात निंदा, द्वेष, अनीति, भ्रष्टाचार, कपट, कलह, पाखंड, क्रौर्य, कातर्य, पैशुन्य, दुराशा, इत्यादि दोष रोमरोमीं भिनलेले असतात. परंतु उपदेशाचा मारा तेजस्वी अधिकारी सिद्धानें केल्यास ते सुधारण्याचे मार्गास लागतात.

बद्धच परंतु विकृत असे काहीं लोक असतात ते पढतमूर्ख होत. ते बहुश्रुत व व्युत्पन्न असतात, परंतु क्रोध, मत्सर, अभिमान, दुराशा यांनीं पछाडलेले असतात, याना सुधारणें अज्ञ जनापेक्षा कठिण असतें.

अशा मूर्खांचे व पढतमूर्खांचे दोष काढून त्यास उपासनामार्गास लावावें लागतें. अध्यात्मविचेचें श्रवण, देवपूजन, भजन, स्नानसंध्यादि कर्में याचा अंतर्भाव उपासनेंत होतो.

उपासना ज्ञानस्वरूप असल्यामुळें उपासनेंत (भक्तिमार्गांत) कर्मांचा व

ज्ञानाचा समावेश होतो.

भक्तिमार्गाची स्थापना केल्यानें परमार्थ जो मोक्ष अथवा स्वतंत्रता ति-अंशतः प्राप्ति होते.

अंशत म्हणण्याचें कारण सत्ता असल्याशिवाय अगर राज्यस्थापने शिवाय तिची पूर्ण व अप्रतिबद्ध प्राप्ति होऊ शकत नाहीं.

अडथळे कोणते —

समाजातील बहुजनसमाज, मुमुक्षु म्हणजे मुक्तीची इच्छा करणारा नीतिमान् नसतो.

बहुजनसमाज म्हणजे बद्ध, मुक्तीला पराङ्मुख व अनीतिमान् असतो. अनीतिमानाची अन्यायाकडे व नीतिमानाची न्यायाकडे प्रवृत्ति असल्यामुळें विरोध उत्पन्न होऊन खटका उडतो. नीतिमान् लोक सहजासहजीं अनीतिमा नांस दाबात ठेवूं शकत नाहींत.

सबब नीतीचें व धर्माचें संरक्षण करण्यास व अनीतीचें उत्पाटन करण्यास शासनसत्ता असावी लागते.

समर्थकालीं म्लेंच्छांची सत्ता चालत होती.

म्लेंच्छ परधर्मी होते. स्वधर्मीतील पाखंडी व नास्तिक हा देवधर्माविरुद्ध सदा कंकण बांधून तयार असतो परंतु परधर्मीयांचे आचारविचार व कल्पना आपले धर्माविरुद्ध असल्यानें व म्लेंच्छांची तामसवृत्ति प्रभावी असल्यानें ते देव-धर्माचा द्वेष करितात त्यांचेपासून देवधर्माचें संरक्षण करण्यास राजसत्ता जरूर व श्रमप्राप्तच असते. व ती स्थापन करणें समर्थांस जरूर वाटलें विश्वामित्राचे यज्ञाचे संरक्षणास रामरायाचें क्षात्रतेजच उपयोगी पडलें, त्याप्रमाणें शिवरायाचें क्षात्रतेज धर्मरक्षणास उपयोगास आलें

या राजसत्तेचें तत्त्व समर्थांनीं मोठें नामी प्रतिपादिलें आहे. ध्यांचेभूत नरदेहाचा आश्रय करून राहणारा जो आत्मा तो जाणीवरूप आहे. परंतु ती जाणीव अपुरी पडते म्हणून जाणिवेचा अखंड साठा जो परात्पर आत्मा त्याच्याशीं सायुज्यता होण्यास आपणाहून अधिक जाणिवेचें अधिष्ठान त्याचा आश्रय करावा लागतो.

रायाचे सत्तेनें चालतें । परंतु अवघीं पंचभूतें ।
मुळीं अधिक जाणीवेचें तें । अधिष्ठान आहे ॥ १९-३-४

राजा किंवा राज्यसंस्था ही अधिक लागणाऱ्या जाणिवेचें अधिष्ठान आहे. राजा हा परमेश्वराचा अंश आहे असें गीता सांगते व कमी जाणीव असणाऱ्या लाखों लोकांच्या समाजावर जास्त जाणिवेची परमेश्वररूपी राज्यसंस्था अधिकार चालविते.

महाराष्ट्रधर्म म्हणून ज्याची वर फोड करून दाखविली तो जारी कर ण्याचें कारण महाराष्ट्रांत मूळ जो सनातन वैदिक धर्म त्याची पायमल्ली झाली होती, सर्व वर्णांत श्रेष्ठ असे ब्राह्मण ते भ्रष्ट झाले व दावलमलीक पीरास मजू लागले, कित्येकांना मुसलमानी धर्म स्वीकारला, ब्राह्मणांचा बुद्धिनाश झाला, त्याचें गुरुत्व जाऊन शूद्र व अतिशूद्र ब्राह्मणांस शास्त्र शिकवू लागले, चातुर्वर्ण्य बुडालें, त्यामुळें बजबजपुरी माजली ती नाहींशी करण्यासाठीं व पुन्हा स्वधर्म प्रस्थापित करणेसाठीं महाराष्ट्रधर्माचा प्रसार करावा लागला म्हणजे धर्माचें पुनरुज्जीवन करावें लागलें.

पाश्चात्य लोक मराठ्यांचे राज्यास बावटळ म्हणतात, पण तें तसें नसून महाराष्ट्रधर्म प्रस्थापित करण्याचा व नीति व सुव्यवस्था स्थापण्याचा तो उपक्रम होता

(९) समारोप — आजहि हिंदुधर्मावर परधर्मांचीं आक्रमणें चालली असून स्वधर्मांतील कांहीं बुद्धिमान् व वजनदार लोक ब्राह्मणांना नाहींसे करण्याचा व अतिशूद्र व मुसलमान यांस वरचढ करण्याचा पद्धतशीर प्रयत्न करीत आहेत. परंतु ही त्यांची चूक आहे आज हजारों वर्षे वंशशुद्धि, आत्मशुद्धि या स्वरूपानें ब्राह्मणांनीं जें कांहीं कमाविलें आहे त्याचा नाश जाहल्यास व मलत्याच भरीं पडल्यास धर्म, नीति व सुव्यवस्था हीं पारखीं होतील.

वर्णाश्रम व जाति यांचे योगानें हा सनातनधर्म टिकला आहे जसें धान्यांत एकच गहूं अगर तांदूळ असें एकच धान्य ठेवावयाचें, बाकीचीं धान्यें नाहींशीं करावयाचीं, अगर तांदुळांतील आंबेमोहोर, कमोद, वगैरेचा नायनाट करून एकच सर्वांशी तांदूळ म्हणजे सर्वांचें मिश्रण किंवा रगुनी तांदूळ ठेवा यचें असें ठरविल्यास अनवस्था प्राप्त होईल पाश्चात्य देशांत विद्वान् व विचारी लोक मनुस्मृतींतील व्यवस्था हीच कोणत्याहि देशास स्थैर्य व सुख-समृद्धि प्राप्त करून देण्यास समर्थ आहे असें प्रतिपादन करूं लागले आहेत असें असतां आपलें बहुमोल अधिष्ठान व धर्मव्यवस्था यांस हीन संस्कृति अगि

कारण्यांत कोणता शहाणपणा आहे देव जाणे! असा अविचार महाराष्ट्रांतील लोक करणार नाहींत अशी सदिच्छा प्रकट करतों.

रामदासानीं धर्माची विस्कटलेली घडी

जय जय रघुवीर समर्थ

या हृदयाचे हाकेनें व दासबोध ग्रंथातील अमोलिक शिकवणीनें टाकठीक केली आहे. समर्थांच्या शिक्वणीप्रमाणें वागल्यास आपला तरणोपाय आहे. या मंगलप्रसगीं जमलेले अधिकारी व विद्वान् समर्थविद्यापीठ काढण्याचा उपक्रम करतील अशी आशा प्रकट करून हें लांबलेलें टाचण पुरें करतों.

स्मरलें लिहिलें आहे। बोलता चालता हरी।
काये होईल पाहावें। आनंदवनभुवनीं॥ स्फु. प्र.५८-५७

जय जय रघुवीर समर्थ॥



## ( ३२ )

# श्रीमत् दासबोधाचे कांहीं विशेष

( लेखक — श्री. विठ्ठल सखाराम पाग, बी. ए., बन्दाड )

महाराष्ट्रातील आत्मानुभवी तत्त्वज्ञान्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांत श्रीमद्दासबोध हा अगदीं अखेरअखेरचा ग्रंथराज होय. असे प्रमुख ग्रंथकार म्हणजे श्रीमुकुंदराज, श्रीज्ञानेश्वर, श्रीएकनाथ हे तिघे च होत. या सर्वांचे स्वतंत्र व टीकाग्रंथ पाहिल्यास महाराष्ट्रीय तत्त्वज्ञानाची भूमिका सहज समजेल. श्रीसमर्थ हे या तत्त्वज्ञान-मंदिराचे चवथे आधारस्तंभ होत. कांहीं विद्वानांचा आक्षेप असा कीं, महाराष्ट्रीय तत्त्वज्ञान संस्कृत वाङ्मयावरून घेतलें आहे, इतकेंच नव्हे तर अडाणीपणानें चोरी करतांना चुका केल्या आहेत. अजागळ वेदान्ताची अडगळ या ग्रंथांतून फार.

सदर आक्षेप मराठींतील इतर ग्रंथांना लागू असेल, पण आत्मानुभवी साधूंनीं ही चूक मुळीं च केलेली नाहीं.

श्रीनामदेवराय व तुकोबा या घटपटांत पडलेच नाहींत. वर उल्लेखिलेले चार ग्रंथकार मात्र मराठींत वेदान्त सांगण्याच्या भानगडींत पडले आहेत. हे सर्व ब्राह्मण असून संस्कृतज्ञ होते. आतां या महाराष्ट्रीय वेदान्ताचें स्वरूप संस्कृत-प्रमाणेंच आहे काय ? संस्कृत आचार्यग्रंथांहून यांत विशेष काय आहे ? नसल्यास हीं नुसतीं भाषान्तरेंच नव्हेत काय ?

वरील प्रश्नांचीं उत्तरें फार विस्तारपूर्वक द्यावयास हवींत. दुर्दैवानें महाराष्ट्रीय वेदान्ताचा संकलित अभ्यास अजून मराठींत झालेला नाहीं.

वादाची भूमिका टाकून समन्वयाची भूमिका स्वीकारणें, क्वचित् वाद वाद-

व्याच तर शब्दखंडण करून ब्रह्मज्ञानाची अनुभवात्मक बाजू उचलून धरणें, उपमा, दृष्टांत संस्कृतपेक्षांहि अधिक मार्मिकपणें योजणें, इत्यादि महाराष्ट्रीय तत्त्वज्ञानाचे विशेष आहेत.

या दृष्टीनें महाराष्ट्रीय तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांत श्रीमद्दासबोधाचेहि कांहीं विशेष आहेत.

तत्त्वज्ञानाच्या मांडणींत दासबोधाचें ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, भागवत या वारकरी ग्रंथापेक्षां, विवेकसिंधु व परमामृत या मुकुंदराजी ग्रंथांशीं अधिक जुळव असलें तरी, ज्ञानेश्वरतत्त्वज्ञानाशीं समर्थांचा विरोध खास नाहीं.

या ग्रंथातील तत्त्वज्ञान काय आहे हा विषय निराळा, पण असलेलें तत्त्वज्ञान सांगण्यांत समर्थांनीं कोणती पद्धति योजिली आहे, हें या छोट्या निबंधांत पहावयाचें आहे.

इतर ग्रंथाप्रमाणें दासबोध सप्रचित, स्वानुभवपूर्वक लिहिला आहे, ही गोष्ट अगदीं परिचयाची आहे.

वक्ता अधिकारेवीण । वक्तृत्वाचा करी शीण । क्रियेवीण ब्रह्मज्ञान ।
असला प्रकार समर्थवाङ्मयांत कोठेंच नाहीं.

दासबोधाचा विशेष हा कीं, हें क्रियेचें ओझें–विवेकाचें जोखड–श्रोत्यांवर इतर ग्रंथापेक्षां त्यानें जोरानें लादलें आहे.

"प्रचीत पहा" हें दासबोधाचें पालुपदच आहे. "महावाक्यांच्या नुसत्या जपानें भ्रांतीचा अंधकार फिटणार नाहीं, त्याला विचारच हवा" असा समर्थांचा उपदेश आहे.

पूर्वीचें महाराष्ट्रीय समन्वयवादी तत्त्वज्ञान चांगलें आत्मसात् करूनहि ज्या आशंका उरतात त्या दासबोधांत मुद्दाम उपस्थित करून दूर केल्या आहेत. अशा अनेक शंका आहेत. घनदाट संचलेल्या आत्मस्थितींत माया कशी झाली, मायाब्रह्मभेद कळला, पण दोहोंचा संबंध काय? विवर्तवाद व परिणामवाद यांत खरें काय? जग हें आत्मविकास व संकोच करणारें स्वयंसिद्ध यंत्र आहे काय? ईश्वर अकर्ता, तर माया कोणें केली? सृष्टि मिथ्या, तर कां दिसते, सत्य, तर कां नासते? एक ना हजार प्रश्नांचीं उत्तरें दासबोधांत स्पष्ट शब्दांत दिलीं आहेत.

इतर अमृतानुभवादि ग्रंथांत कारण पार, दासबोधांत कार्याइून सरळ-स्याचें प्रमाण अधिक. समर्थांची भाषाच व्याख्यानाप्रमाणें. स्फूर्ति हाच प्रमुख

काव्यगुण वाकी स्वतन्त्र विचार पटविण्याची हातोटी, अधिकार जाणून उपदेश, पूर्वीचा सिद्धांत बळकट करून मुद्दे निरूपण, मधूनमधूनच अवतरणें, इत्यादि वक्तृत्वाचेच गुण दासबोधांत फार अनुभव व्यक्त करण्यासाठीं वर्ई आणि भाषा ही कमालीची धडपड करताना ज्ञानेश्वरवाङ्मयात आढळतील, तर व्यक्त झालेला अनुभव उघड तर्कानें व सरळ भाषेनें श्रोत्याला पटविण्याची धडाडी दासबोधात सापडेल.

पूर्णाद्वैत, शब्दनिरसन, सद्गुरुमाहात्म्य, ज्ञानाज्ञानलक्षण, बादमीमांसा, इत्यादि विषय ज्ञानेश्वर व रामदास यांनीं सारख्याच स्वरूपात मांडले आहेत. महाराष्ट्रीय संतामध्यें या बाबतींत भेद मुळींच नाहीं

दासबोधातील मूळमाया, गुणमाया, इत्यादि शब्दप्रक्रिया व पचीकरणात्मक विषय मुकुंदराजात, मायाब्रह्मसंबधाची सूक्ष्म चर्चा ज्ञानेश्वरात, तर सोपें व परिणामकारक वक्तृत्व एकनाथी भारुडात आढळेल

दासबोधात अत्यंत महत्त्वाचें काय असेल तर दृष्टांतनिरसन। दृष्टान्तानीं भरलेल्या गूढ अशा ज्ञानेश्वरवाङ्मयावर हा समर्थवाङ्मयाचा न फिटणारा उपकार आहे

दृष्टान्त तितुका एकदेशी। देणें घडे कळावयासी।

असें म्हणून, घटाकाश मठाकाश, पट तंतु, थिजलें ओथिजलें घृत, कनक अलंकार, बीज तरु, सर्प दोरी, इत्यादि असंख्य सिद्धान्तवजा दृष्टान्ताना समर्थांनीं उकलून दाखविलें आहे अवच्छेदवाद, परिणामवाद, इत्यादि वादाचा ज्ञानेश्वरानीं केलेला गुप्त समन्वय समर्थांनीं कारणापुरतें उघड खंडण करून विवर्तवादानें सिद्ध केला आहे दासबोध म्हणजे दृष्टांत उडवून अखंडज्ञान हातीं देणारा ग्रंथ असें मी मानतों.

मात्र एवढें खरें कीं, वास्तविक ज्ञानेश्वर आणि समर्थ यामध्यें मुळींच भेद नाहीं अपूर्व म्हणून समजला जाणारा ज्ञानेश्वराचा स्फूर्तिवाद मुकुंदराज व समर्थ यांचे वाङ्मयात आला आहे

अहं ऐसी स्फूर्ति जाली। ते चि माया॥

हाच स्फूर्तिवाद

इतर संताचें तत्त्वज्ञान हें स्फूर्तिजन्य काव्य आहे समर्थांचें काव्य स्फूर्तिप्रद व्याख्यान आहे

स्फूर्ति वादापासून भिन्नच असणार. तिच्यात बुद्धि असली तरी समन्वयात्मकच असणार

तर्कप्रतिष्ठा आणि शब्दप्रामाण्य हे ब्रह्मसूत्रभाष्यातील शांकरसिद्धान्त दासबोधातहि वरचेवर डोकावतात.

सत तर्कांनें समाधान करीत नाहींत, हीहि एक कृपाच. कारण तर्क भिन्न भिन्न असतात, तर्सी समाधानेंहि भिन्न भिन्न होतील, पण भिन्नपणानें समाधानाचें सत्त्वच जाईल. सत्य सर्वत्र सारखें असावें.

संतवाङ्मयात तर्कानें सिद्धान्त सिद्ध करण्यापेक्षा अनुभवसिद्ध सिद्धान्त मांडण्यामध्यें शुद्ध तर्काचा अवलंब केलेला आहे. ब्रह्मज्ञान हा वाद नसून तें ' प्रत्यक्षावगम शास्त्र ' आहे व त्यामुळें तर्काला येथें भौतिक शास्त्रातल्याप्रमाणेंच थोडी किंमत आहे.

दुसरें शब्दप्रामाण्य. समन्वयवादी दृष्टि हा महाराष्ट्रीय संताचा विशेष. योग्य प्रमाणात शब्दप्रामाण्य मानण्यानेंच समन्वयी दृष्टीची सिद्धि होत असते. असो.

स्वयें आपण जेविला । त्यास वाटे लोक धाला ।
परंतु हें समस्ताला । घडलें पाहिजे ॥

ही दासबोधात प्रमुख दृष्टि आहे.

आपण जेवोनिया तुका । संतर्पण करी लोका ।

हीच समर्थांचीहि इच्छा !

तत्त्वज्ञानाच्या निष्कळ मांडणींतील श्रीमद्दासबोधाचे हे एक दोन विशेष सांगून हें ' पत्रपुष्प ' मी समर्थचरणीं विनम्रभावानें अर्पण करितों.



॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्रीसमर्थ व सनातनधर्म

( लेखक—श्री. दुर्गाराम बाल हरिदास रामदासी, मंगलूर )

श्रीसमर्थांचा अवतार पूर्ण होऊन २५४ वर्षे झालीं. थोर अवतारी महात्मे या दृष्टीनें पूर्वींच्या दोन शतकांत श्रीसमर्थांकडे लोक पहात असत, असें तत्का लीन वाङ्मयावरून दिसतें. सध्यांचें तिसरें शतक वेगळ्या प्रकारचें दिसतें. सध्या सर्व लोक श्रीसमर्थ हे थोर विभूति असल्याचें प्राजलपणें मान्य करीत असूनहि स्वमताचीं तत्त्वें श्रीसमर्थांच्या अवतारकार्यांत दाखविण्याचा प्रयत्न करितात. कांहीं वर्षांपूर्वी कै. वैद्य यांनीं श्रीसमर्थ हे आपल्याप्रमाणें हिंदु मिशनरी होते असें लिहिल्याचें आठवतें. श्री. सदाशिव खंडो अळतेकर यांनीं आधुनिक समर्थ म्हणून कै. लो. बाळ गंगाधर टिळक, कै. लाला लजपतराय, कै. दादाभाई नवरोजी, महात्मा गांधी व पंडित मदन मोहन मालवीय यांचे फोटो दिले आहेत. कांहीं महिन्यांपूर्वी नवशक्ति पत्रांत एका तरुण पदवीधरानें श्रीसमर्थचरित्रांतील कांहीं महत्त्वाचे मुद्दे घेऊन, त्याची कांहीं स्मृतिवाक्यांशीं तुलना करून, मेळ पडत नाहीं असें म्हणून, श्रीसमर्थांनीं शास्त्रांना बाजूस सारून पुढें होणाऱ्या सुधारकास वाट मोकळी केली, असें प्रतिपादिलें आहे.

परित्राणाय साधूनाम् विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

या भगवदुक्तीप्रमाणेंच श्रीसमर्थांचा अवतार झाला, असें मला वाटतें.

श्रीसमर्थांच्या अवतारात सनातनधर्माकडे किंचिन्मात्रहि उपेक्षा झाली नाहीं. श्रीसमर्थांनीं ग्रंथराज दासबोधात

आचारवीचारेवीण । जें जें करणें तो तो सीण ।

असें सांगितलें असून

आधीं केलें मग सांगितलें । ११-१० २४

असें ते स्पष्ट म्हणत आहेत. श्रीसमर्थांचें वर्तन सनातनधर्माप्रमाणेंच कसें होतें हें दाखविण्याचा व सुधारकांच्या आक्षेपांना उत्तर देण्याचा या ठिकाणीं मी यथामति प्रयत्न करित आहें.

श्रीसमर्थांचा जन्म जांब येथें शके १५३० चैत्र शु० ९ स मध्यान्हीं झाला. वयाचे पांचवे वर्षी उपनयनसंस्कार झाला. ( गर्भाष्टमे ब्राह्मणम् उपनयेत् । पचमे ब्रह्मवर्चसकाम । आश्वलायन गृ. सू. ।। ) तत्कालीन परिस्थितीस अनुसरून श्रींनीं अध्ययन अल्पकालांतच पार पाडलें. वयाचे सातवे वर्षी वडिलांनीं इहलोक सोडिला. नरजन्माचें जें अंतिम ध्येय श्रीभगवद्दर्शन, तें श्रींना वयाचे नववे वर्षी शके १५३८ श्रावण शुद्ध ८ स रात्रीं लाभलें. त्यांचें पाळण्यांतील नांव नारायण असून दर्शनानुग्रहसमयीं श्रीरामांनीं त्यास रामदास असें नांव ठेविलें. नंतर कांहीं काल श्रींनीं मौन धरिलें व कांहीं काल इतस्ततः उदास वृत्तीनें भ्रमण चालविलें. श्रींची वृत्ति पाहून मुलाचें एकदांचें लग्न केल्यास तो सहज घरीं राहील असें मातुःश्रींच्या मनात आलें व त्याप्रमाणें त्यांनीं प्रयत्न चालविला. पण ती हकिकत मित्रमुलानें रामदासास समजली व त्यामुळें त्याची वृत्ति पूर्वीपेक्षांहि निराळी दिसू लागली पुढें अनेक प्रसंगावरून मुलाची ब्रह्मचर्यैक निष्ठा आईच्या ध्यानीं आली व तिनें अखेरचा उपाय म्हणून मुलास एकांतीं नेऊन विवाहाविषयीं बोध केला. श्रींनींहि मातेस पुष्कळ समाधानाच्या गोष्टी सांगितल्या असतील, पण मातेनें तें सारें बाजूस सारून आपलें वचन तू ऐकणार कीं नाहीं असें विचारलें असता, मी आपले आज्ञेपरता नाहीं म्हणून प्रणाम केला. तेव्हां अंतःपट धरीपर्यंत ल्याची गोष्ट काढली असता रागाऊ नये अशी आज्ञा केली. श्रींनीं उत्तम आहे असें म्हणून त्या दिवसापासून पूर्वीचे प्रकार सर्व सोडून दिले. पुढें श्रींच्या विवाहाची तयारी झाली, पण ऐन लग्नसमारंभांतून अंतःपट धरल्यावर मातेची आज्ञा पूर्ण झाली असें पाहून श्रींनीं पलायन केलें नंतर गोदातीरीं बारा वर्षें पुरश्चरण अनुष्ठान करून आत्मबलवर्धन केलें. शके १५५४

च्या फाल्गुनात यात्रेस निघाले. सर्व यात्रा करून पुढें कांहीं काल बालोन्मत्तादि वृत्तीनें देशाचें सूक्ष्म निरीक्षण करून शके १५६६ सालीं कृष्णातीरीं येऊन जगदुद्धार केला. लोकांचें अज्ञानदैन्य घालविलें व धर्मस्थापना केली. मतामतांच्या गलबल्यांतून लोकांस सुलभ मार्ग दाखविला. धर्मराज्याच्या बळकटीसाठीं अनेक वर्णांचे व आश्रमाचे शिष्य केले, व जेथें तेथें मठ करून त्या ठिकाणीं योग्य महंतांची योजना केली व आपल्या वयाच्या ७४ व्या वर्षीं शके १६०३ माघ वद्य ९ स दोनप्रहरीं अवतारसमाप्ति केली.

असें हें श्रीसमर्थांचें थोडक्यात चरित्र आहे. आता धर्मविचार करूं.

धर्म हा शब्द धृञ्-धारणे धातूपासून झाला आहे.

धारणाद्धर्म इत्याहुः धर्मो धारयते प्रजाः ।
यत्स्याद्धारणसंयुक्तं स धर्म इति निश्चयः ॥ भारत

प्रवृत्तीच्या गाळात फसणाऱ्या लोकांस सावरून धरणारा तो धर्म. वैशेषिक दर्शनात

यतोऽभ्युदय निःश्रेयससिद्धिः स धर्मः ।

असें सांगितलें आहे. म्हणजे ज्यामुळें अभ्युदय, इहलोकींचें सुख व निश्रेयस म्हणजे मोक्ष साधतो तो धर्म.

शक्ति आहे तो चि फावे । दोन्ही लोक साधावे ।
इहलोक परलोक शत्रु सर्व रोधावे ।
राघवाच धर्म जागो ॥ श्रीसमर्थ

धर्म कसा समजावा ?

वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीलेचतद्विदाम् ।
आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेवच ॥ मनुस्मृति
श्रुति आश्रयाचा धर्म । दासबोध

श्रुतिप्रतिपादित धर्म सर्वांस समजणें कठीण झालें तेव्हा तत्कालीन महात्म्यांनीं वेदाचें स्मरण करून जे ग्रंथ लिहिले ते धर्मशास्त्र अथवा स्मृति या नांवानें प्रसिद्ध आहेत. पुढें स्मृतींकडेहि जेव्हा लोकांचें दुर्लक्ष होऊं लागलें तेव्हा तत्कालीन महात्म्यांनीं ऐतिहासिक व सामाजिक गोष्टीरूपानें तोच धर्म सांगितला, त्यास पुराणें म्हणतात. आता सनातनी लोक श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्म असें म्हणतात. तदनंतर म्हणजे पुराणकालानंतर या सुवर्णभूमींत बाहेरील राजस व तामस लोकांचे

अनेक हल्ले झाले, त्यात वैभव तर लुटलें गेलें, पण त्याबरोबर धर्मावरहि अनेक आपत्ति आल्या. पण अशा स्थितींत सुद्धा अनेक महात्म्यांनीं अवतरून लोकांत धर्मजागृति केली.

धर्मांत प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन मार्ग परस्परपोषक आहेत. उपनिषदांत यासच अविद्या व विद्या म्हटलें आहे.

विद्यांचाविद्यां च यस्तद्वेदोभयँसह
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ॥ ईशावास्य

श्रीसमर्थपूर्वकालीन बहुतेक महात्म्यांनीं धर्माच्या एकाच (निवृत्ति) अंगावर विशेष जोर दिला; पण श्रीसमर्थांनीं धर्माची घडी बरोबर बसविली.

धर्मतत्व । संगच्छध्वं संवदध्वं संवोमनांसि जानताम् ।
देवाभागं यथापूर्वे संजानाना उपासते ॥ ऋग्वेद
विद्वद्भिस्सेवितस्सद्भिर्नित्यमद्वेष रागिभिः ।
हृदयेनाभ्यनुज्ञातोयो धर्मस्तन्निबोधत ॥ मनुस्मृति
जाणता चालेल तैसें चालावें । जाणता सांगेल तैसें बोलावें ।
जाणत्याचें ध्यान घ्यावें । नानापरी ॥ दासबोध

समाजाची सुव्यवस्था व्हावी म्हणून निर्माण झालेलें वर्गीकरण चातुर्वर्ण्य नावानें प्रसिद्ध आहे.

ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहु राजन्यः कृत. ।
ऊरुतदस्ययद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ ऋग्वेद

शमदमादि साधनसंपन्न, आचारानें शुद्ध, स्वभावानें सरळ, सात्त्विक वृत्तीचे, पूर्ण वेदविद्यापारंगत असल्यामुळें अध्यापन, याजन व प्रतिग्रह यास समर्थ, व विचारी, ते ब्राह्मण; शरीरानें सुदृढ, मनाचे खंबीर, सत्यासाठीं देहाची पर्वा न करणारे, धर्मशास्त्र व युद्धकला जाणणारे असून देवाब्राह्मणाचे ठिकाणीं श्रद्धा असलेले, वृत्तीचे राजस, ते क्षत्रिय, धनार्जनाचे उपाय, व्यापार, शेती, गोरक्षण वगैरे कार्यांत प्रवीण असून धर्मासाठीं वाटेल तो स्वार्थ सोडण्यास तयार, सत्त्वरजोमिश्र वृत्तीचे, ते वैश्य; शरीरानें सुदृढ पण मनाचे दुर्बल, वरील तिन्ही वर्णांचे आज्ञेप्रमाणें समाजपोषक कार्ये करणारे ते शूद्र. या सर्व वर्णांचे धर्म शास्त्रांत वेगवेगळे वर्णिलेले आहेत. त्या सार्‍याचा उल्लेख येथें करीत नसून फक्त सार्ववर्णिक धर्मच येथें सांगतों.

अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता ।
भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः ॥ भागवत

हे धर्म श्रीसमर्थांनी एकेच ठिकाणीं जरी प्रतिपादिले नाहींत, तरी श्रींच्या श्रीमत् दासबोध, मनोबोध, अभंग, श्लोक, पदें वगैरे सर्व वाङ्मयांतून हीं तत्त्वें विशद केलीं आहेत. अखेरचा धर्म भूतप्रियहितेहा याबद्दल तर भगवान् सांगतात:

हरिः सर्वेषु भूतेषु भगवानास्त ईश्वरः ।
इति सचिंत्य मनसा कामैस्तैरसाधुमानयेत् ॥ भागवत

श्रीसमर्थ सांगतात :

नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।
याकारणें तोषवावी । कोणीतरी काया ॥ दासबोध

पण त्यातहि तारतम्य आहे.

पूज्य पूजेसी अधिकार । उगे चि तोषवावे इतर ।
दुखऊं नये कोणाचें अंतर । म्हणिजे बरें ॥ दासबोध

वरील चार वर्णांपैकीं प्रथम तीन वर्णांस द्विज म्हणत असून, त्यांत चार आश्रम आहेत. त्यास अनुक्रमें ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास असें म्हणतात. या चारी आश्रमास प्रमाण असा जो धर्म तो दशलक्षणयुक्त आहे.

धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकम् धर्मलक्षणम् ॥ मनुस्मृति

श्रीसमर्थवाङ्मयांत हीं लक्षणेंहि प्रतिपादिलीं आहेत. तें सर्व उतारे देण्यास वेळ थोडा असल्यामुळें श्रीग्रंथाचा हवाला देऊन ते आमूलाग्र एकवार वाचावे, अशी विनंति करितों.

उपनिषदांत ज्याला अविद्या व विद्या म्हटलें आहे, त्यासच श्रीसमर्थांनीं प्रपंच व परमार्थ म्हटलें असून याविषयींचें प्रतिपादन दासबोधाच्या बाराव्या दशकाच्या पहिल्या समासांत केलेलें आहे. तसेंच दासबोधांत इतरत्र यासच आचारविचार म्हटलें आहे.

इहलोकींचा आचार । परलोकीं सारासारविचार ।
आधीं सांसावा आचार । मग पाहावा विचार ।
आचारविचारें पैलपार । पाविजे तो ॥

एकंदरींत श्रीसमर्थांना श्रुतिस्मृतिप्रतिपादित धर्म सर्वथैव मान्य होता इतकेंच नव्हे,

तर त्यांनीं तो स्वत आचरून इतरांसहि शिकविला.

आधीं केलें मग सांगितलें ।

आता सुधारकाचे आक्षेप नमूद करून त्याना उत्तर देण्याचा विचार करावयाचा आहे.

( १ ) आक्षेप — श्रीसमर्थांचा आश्रम कोणता ?

उत्तर — श्रीसमर्थांचा आश्रम विद्यास्नातक ब्रह्मचारी आश्वलायन गृह्यसूत्रात ब्रह्मचर्याची मर्यादा बारा वर्षे सागून पुढें, ग्रहणान्त वा शिकेपर्यंत, मद असेल तर मर्यादा वाढेल व तीक्ष्ण बुद्धि असेल तर लवकर शिकून झाल्या मुळें मर्यादा घटेल. श्रीसमर्थांचें अध्ययन फार लवकर पुरें झालें, इतकेंच नव्हे तर ज्ञानाची शीग श्रींनीं अल्पावर्धीत गाठली

( २ ) आक्षेप — अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकम् अपि द्विज । श्रीसमर्थांच्या होऊ घातलेल्या लग्नानें त्याचें समावर्तन ( सोडमुज ) झालें होतें

उत्तर — हें वरील प्रमाण मानणें कठीण आहे कारण समावर्तनोत्तर त्रिरात्र अशौच सांगितलें आहे मग अशौचात विवाह कसा होईल ? दुसरें, ब्रह्मचर्य सोडलेल्या दिवशींच जर विवाह व्हावा, तर स्मृति व सूत्रें यात इतके स्नातकाचे धर्म सागण्याची जरूरच नव्हती आता स्नातकाचे सारे धर्म बाजूस ठेवून फक्त स्नातक कसा होतो, किती प्रकारचा असतो, व आमरणान्त स्नातक राहता येतें याबद्दल विचार करू समावर्तन म्हणजे विद्या पूर्ण करून गुरुकुलातून परत येणें, तेवढ्यावरून त्यानं ब्रह्मचर्य सोडलें असा अर्थ होत नाहीं, म्हणून तो अनाश्रमी ठरत नाहीं, गुरुकुलात असताना विवाहविचार होणें शक्य नाहीं व विचार न करता विवाह होत नाहीं यावरूनहि समावर्तन होताच विवाह झालाच पाहिजे हें म्हणणें बुद्धिसमत होत नाहीं आता शास्त्र काय म्हणतें तें पहावयाचें

त्रय स्नातक भवति । विद्यास्नातको
व्रतस्नातको विद्याव्रतस्नातकश्च ॥ ( हारीत )
वेदव्रतानि पार वा नीत्वा ह्युभयमेव वा ॥ (याज्ञवल्क्य १ ५१)

विद्याध्ययन पूर्ण करून ब्रह्मचर्यव्रतानें राहणारा तो विद्यास्नातक, अध्ययन पूर्ण होण्यापूर्वी गुरूची आज्ञा घेऊन विवाह करूनहि अध्ययन करणारा तो व्रतस्नातक, विद्या पूर्ण करून ब्रह्मचर्यहि पूर्ण करून गुरुकुलातून परत आलेला तो उभयस्नातक उभयस्नातकाचीं कर्तव्ये शास्त्रात पुष्कळ वर्णिलीं आहेत स्नात

मुख्य स्वतः शरीराची खबरदारी आपण वाहणें, नीतीचें उल्लंघन न करणें, आपले विद्येनें लोकांस उपयोगी पडणें, यास्तव लोकसेवा करणें, हें मुख्य असून आप्तइष्टांस भेट देणें हें गौण आहे.

यत्रैनं पूजयिष्यंतो भवंति तत्रैतां रात्रिं वसेत्। (आ. गृ. सू.)
अर्थात् एके ठिकाणीं चार दिवस राहू नये.

एत्या त्रिवेक्ष्यमाणानि शाश्वतो नियतव्रतः।
आशरीरं व्रतानीह स्नातकस्य भवंति हि॥

शरीरसमाप्तीपर्यंत या लोकीं हीं स्नातकव्रतें होत. खालील पाच सूत्रें महत्त्वाचीं आहेत.

सत्यधर्मा। (गौतमसूत्र प्रथम प्रश्न अ. ९ सू. ६८)
आर्यवृत्तः॥ ६९॥ शिष्टाध्यापकः॥ ७०॥
शौचशिष्टः॥ ७१॥ श्रुतिनिरतः स्यात्॥ ७२॥

या पाच सूत्रांपैकीं पहिल्या दोन सूत्रांत सत्य व आर्यांचा (पूर्वजांचा) संप्रदाय राखावा असें सांगितलें असून तिसऱ्या सूत्रांत उच्छिष्यास उपदेश करावा असें सांगितलें आहे; चौथ्यांत शौचाकडे विशेष जोर दिला आहे, व पाचव्यांत श्रुतिप्रतिपादित मार्गात रंगून रहावें, असें सांगितलें आहे.

नित्यमहिंस्रो मृदुदृढकारी दमदानशीलः॥ ७३

या सूत्रांत स्नातकानें लोकसेवा कशी करावी, हें स्पष्ट सांगितलें आहे. पुढें गौतम म्हणतात —

एवमाचारो मातापितरौ पूर्वापरांश्च संबंधान्दुरितेभ्यो मोक्षयिष्यन् स्नातकः शश्वत् ब्रह्मलोकात् न च्यवते न च्यवते॥ ७४॥

म्हणजे वरीलप्रमाणें वागणारा स्नातक आईबाप, आजीआजा, वगैरे सर्वांना पापापासून मोकळे करून त्यासह शाश्वत अशा ब्रह्मलोकापासून ढळत नाहीं, अर्थात् मुक्ति गाठतो.

आता महिन्याचे आत लग्न करावें म्हणणारें वाक्य आश्वलायन स्मृतींत आहे, पण त्याचा उत्तरार्ध पाहिला असताच शंकेचें समाधान होतें; व पुढचे श्लोक पाहिले तर शंकेला जागाच उरत नाहीं. तीं वाक्यें खालीं देतों:

स्नात्वैव विधिना काले मासमासमपि द्विजः।
अनाश्रमी न तिष्ठेत सुखस्थः सुसमाहितः॥

निःस्वो रोगार्दितो भीतस्त्वापन्नोन्यैश्चकारणैः ।
स्नातकः प्रयतो वह्निं न त्यजेदिति वै श्रुतिः ॥
नित्यदा ब्रह्मचारी स्याच्चतुर्यज्ञपरायणः ।
जापी तीर्थकरो वास्यात्तावद्वै लौल्यवर्जितः ॥
श्राद्धे निमंत्रितो गच्छेत् कुर्यात् षट्कर्मचद्विजः ।
येन केनाप्युपायेन व्रतचर्यां न लोपयेत् ॥
शकलाञ्जुहुयात् प्रातः तन्मन्त्रैः कार्यमेव च ॥

आश्वलायनस्मृति

गर्भाष्टमे ब्राह्मणम् उपनयेत् ॥ आ. गृ. सू.
षट्त्रिंशदाब्दिकं चर्यं गुरौ त्रैवेदिकं व्रतम् ॥ मनु

याप्रमाणें ४४ वर्षे हा समावर्तनाचा काल. तेव्हा काळे समावर्तन करून लग्न करणें असल्यास एक महिनाहि अनाश्रमी म्हणजे लग्न न करता राहूं नये, यात स्नातक म्हणजे अनाश्रमी असा अर्थ नसून आश्रम शब्दानें येथें गृहस्थाश्रम असा अर्थ आहे. पण पुढें सुस्वस्थः सुसमाहितः हे दोन शब्द फार महत्वाचे आहेत. सर्व परिस्थिति अनुकूल असून शरीर व मन सुस्वस्थ असेल तरच. अर्थात् अस्वस्थ असेल तर वरील वचन लागू नाहीं. तसेंच दारिद्य, रोग, भय किंवा अन्य कोणत्याहि कारणानें आपन्न म्हणजे अडकलेला असेल तर त्यानेंहि अग्नि सोडूं नये. अर्थात् पूर्वीप्रमाणें अग्निसेवा करून रहावें, अशी वेदाची आज्ञा आहे. चतुर्यज्ञपरायणः मनुष्य अतिथिसत्कार त्याला लागू नाहीं. तसेंच जप ( पुरश्चरण ), तीर्थयात्रा वगैरे करून लौल्यवर्जितः स्वार्थत्यागपुरःसर वागावें. आमंत्रण झाल्यास श्राद्धास जावें, षट्कर्मे करावीं, सर्वतोपरी ब्रह्मचर्यलोप होऊं देऊं नये. तसेंच, अग्निकार्य करावें. याप्रमाणें पाहिलें असताहि श्रीसमर्थांचें मन जगाच्या चिंतेनें अस्वस्थ होतें, त्यांचें मन भवाच्या भयें भ्यालें होतें, अखंड ब्रह्मचर्यावांचून त्यांचें कार्य साधणारें नव्हतें, पण त्यांना मातुश्रींचें वचन आडवें येत होतें, व तें वचनहि अंतःपट धरीपर्यंतच होतें. तेव्हां स्नातकवृत्तीनें राहून कार्य करावें असा त्यांनीं संकल्प केला व त्याप्रमाणें विवाहमंडपांतून सावधान शब्द ऐकताच पलायन केलें.

वैणवीं धारयत् यष्टिं सोदकं च कमंडलुम् ।
यज्ञोपवीतं वेदं च शुभे रुक्मे च कुंडले ॥ मनु

श्रीसमर्थांचे हातांतील वेणुयष्टि श्रीसज्जनगडावर अजून आहे. त्याच्या हातात नेहमी पाण्याने भरलेला कमंडलु ( तुंबा ) असे. कुबडी होती ती त्यांच्या अनुष्ठानयात्रा इत्यादि कालांत हरवली असावी. पुनः प्रतापगडावरील देवीने आपल्या हारातील मोती काढून स्वहस्ते चौकटा कुंड्यां लेववित्याचे चरित्र प्रसिद्ध आहे. श्रीसमर्थ अग्निसेवा करीत असत याची साक्ष सज्जनगडावरील त्यांचें अग्निकुंड होय. वरील विवेचनावरून श्रीसमर्थांनी शास्त्रविरुद्ध कांहींच केलें नाहीं, असें सिद्ध होतें.

स्वाध्यानेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः ।
महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥ मनुस्मृति

सकळ धर्मांमधें धर्म । स्वरूपीं राहाणे हा स्वधर्म ॥ ८-९-५४

हें आश्रमाचें भेद तर त्यांनी पूर्वीच ठापलें.

( ३ ) आक्षेप — स्मृतिग्रथांतून भिक्षा म्हणजे सिद्धान्नभिक्षा (मधुकरी) आहे, पण श्रीसमर्थांनी कोरान्नभिक्षा सुरू केली. त्याची उपपत्ति त्यांनीं कोठें दाखविली नाहीं. दासबोधांतील भिक्षेच्या समासात दत्त, गोरक्ष वगैरे भिक्षेची परंपरा सांगितली आहे. पण ते सारे सिद्धान्नभिक्षा मागणारे होते.

उत्तर — श्रीसमर्थ बाळ्यांत असतांना, तसेंच माहुली, वाई वगैरे ठिकाणीं, मधुकरीच मागत. भिक्षा कोणाची घ्यावी याविषयीं शास्त्रांत पुष्कळ चिकित्सा केलेली आहे.

वेदयज्ञैरहीनानां प्रशस्तानां स्वकर्मसु ।
ब्रह्मचार्याहरेद्भैक्षं गृहेभ्यः प्रयतोन्वहम् ॥ मनु

वेद, यज्ञ व स्वकर्मरत गृहस्थाचे घरींच भिक्षा घ्यावी. जेथें तशी परिस्थिति नाहीं तेथें शास्त्रानें कोरान्न भिक्षा सुरू केली.

आममेवाददीतास्मादवृत्तावेकरात्रकम् ।
आमं पूयतिसंस्कारे धर्म तेभ्यः प्रयच्छताम् ॥
तस्मादामं ग्रहीतव्यं शूद्रादप्यंगिरोऽब्रवीत् ॥

* * *

संतासंत जे जन । तेथें कोरान्न मागोन करी भोजन । १४-२-३

( ४ ) आक्षेप — गृहस्थानें भिक्षा मागू नये, असें शास्त्र आहे. पण समर्थसंप्रदायी गृहस्थहि भिक्षा मागतात.

उत्तर — शास्त्रात गृहस्थाचे वृत्तींत भिक्षा सांगितली आहे.

ऋतामृताभ्यां जीवेत्तु मृतेन प्रमृतेन वा ।
सत्यानृताभ्यामपिवानश्ववृत्या कदाचन ॥ मनु ४-४
ऋतमुञ्छशिलं ज्ञेयममृतं स्यादयाचितम् ।
मृतं तु याचितं भैक्षं प्रमृतं कर्षणं स्मृतं ॥ ५
सत्यानृतं तु वाणिज्यं तेन चैवापि जीव्यते ।
सेवाश्ववृत्तिदा ख्याता तस्मात्तां परिवर्जयेत् ॥ ६

* * *

गोरज्य वाणिज्य कृषी । त्याहून प्रतिष्ठा भिक्षेसी । १४-२-१८

( ५ ) आक्षेप — समर्थसंप्रदायात संन्यासाचा निषेध आहे.

उत्तर — हा आक्षेप निराधार आहे. श्रीसंप्रदायात शास्त्रविहित कोणत्याहि वर्णाचा किंवा आश्रमाचा निषेध नाहीं. पण ढोंगाचा निषेध आहे.

संन्यासी म्हणिजे न्यासी । विचारवंत सर्व संन्यासी ।१५-१०-१६

( ६ ) आक्षेप — शास्त्रात ज्याना पापयोनि म्हटलें आहे, अशा स्त्रियाना पुरुषाचे बरोबरीनेंच नव्हे तर पुरुषापेक्षा काकणभर पुढें जाऊन आध्यात्मिक कार्य करून दाखविता येतें, हें सक्रिय दाखवून भावी सुधारकास मार्ग मोकळा केला.

उत्तर — शास्त्रानें स्त्रियास पापयोनि म्हटलेलें नाहीं. पापयोनि शब्द धर्मविरुद्ध स्त्रीपुरुषसंयोगानें उत्पन्न झालेल्या संततीस उद्देशून आहे. स्त्रियांची उत्पत्ति तशी नाहीं, तर श्री ब्रह्मानें आपल्या अर्धापासून स्त्री निर्माण केली असें शास्त्र सांगतें.

द्विधा कृत्वात्मनो देहमर्धेन पुरुषोऽभवत् ।
अर्धेन नारी तस्यां सविराजमसृजत्प्रभुः ॥ मनु १-३२

वेदकालापासून तहत आतापर्यंत वेळोवेळीं पुष्कळ स्त्रिया आध्यात्मिक, व्यावहारिक, वैज्ञानिक, राजकीय वगैरे सर्वोत्कृष्ट कार्यांत पुढें आल्या आहेत. वेदांत ऋषि ( मंत्रद्रष्ट्या ) स्त्रिया आहेत. तसेंच उपनिषदांतहि आध्यात्मिक विद्येंत पुढें आलेल्या दिसतात. गार्गी हिनें जनकाचे यज्ञमंडपांत तत्त्वज्ञानिशिरोमणि याज्ञवल्क्यास निरुत्तर केलें. असेरीस त्यानें " गार्गि मातिप्राक्षी. " असें सांगितल्यावरून ती उगी राहिली, असें बृहदारण्यक उपनिषद् ( अ. ३ ब्रा. ४ ) यामध्यें आहे. तसेंच पुढें त्याच अध्यायाच्या आठव्या ब्राह्मणांतहि तिचा व याज्ञवल्क्याचा

संवाद होऊन बरेंच तत्त्वज्ञान प्रकट झालें आहे. तसेंच वडवा, प्रातियेयी, सुलभा, मैत्रेयी या आध्यात्मिक ज्ञानी स्त्रिया होत्या. या स्त्रियांची गणना आमच्या अर्चातर्पणांत आहे. श्रीसमर्थांनींच यात काय केलें ?

जें वेदांचे अभ्यंतरीं । तें काढून अपत्यापरी ।
शिष्यश्रवणीं कवळ भरी । उद्गारवचनें ॥

हें त्याचें ब्रीद. त्याप्रमाणें त्यांनीं शरणागत सत्‌शिष्याची योग्यता पाहून मार्ग दाखविला. जो निश्चयानें व श्रद्धेनें झटला तो पुढें गेला. आता सुधारकाची वाट त्याना केव्हांहि मोकळीच आहे. वरील विवेचनावरून इतकें सिद्ध होतें कीं, श्रीसमर्थांनीं धर्मशास्त्र बाजूस सारलें नसून ते स्वतः धर्मशास्त्राप्रमाणें वागले व धर्मशास्त्र ज्यासाठीं निर्माण झालें तें ज्ञान त्यांनीं

यज्ज्ञात्वानेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥

साधलें, नव्हे, स्वतः शेवच बनले. आपण त्या ज्ञानानें तृप्त होऊन इतर लोकांस आपल्या ज्ञानदानाचा त्यांनीं लाभ दिला. श्रीसमर्थ मूर्तिमंत धर्मच, व त्यांच्या हजारों शिष्यप्रशिष्यांनींहि धर्मशास्त्राच्या आज्ञा घेऊन सबंध भरतखंडभर फिरून सर्वत्र धर्मजागृति केली. त्या वेळीं सारें भरतखंड खडबडून जागें झाल्याची साक्ष इतिहास देत आहे.

अविद्या झोंप येते भरें । भरे सर्वांगीं फाविरें ।

अशी आज आमची स्थिति झालेली आहे.

ही आमची झोंप इतराकडून दूर होण्यासारखी नाहीं. श्रीसमर्थकृपा जेव्हां होईल तेव्हांच ही झोंप उडून आम्ही जागे होऊं.

माझी काया गेली खरें । परी मी आहे जगदाकारें ।
ऐका स्वहित उत्तरें । सांगतो ॥
नका करूं खटपट । पहा माझा ग्रंथ नीट ।
तेणें सायुज्याची वाट । ठायीं पडे ॥

असें श्रीसमर्थांनीं योकतत शिष्याना उद्देशून महाराष्ट्रास सांगितलें आहे.

आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वत सिद्ध ।
असतां न मनावा खेद ।

असें श्रीसमर्थांचें आश्वासन आहे, आज्ञा आहे.

श्रीसमर्थांच्या या आश्वासनावर पूर्ण निष्ठा ठेवून, त्यांच्या आज्ञेचें पालन

करण्यासाठीं ज्या दिवशीं तरुण महाराष्ट्राचें चित्त

श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं

जास्त जोरानें वेधेल, तो दिवस माझ्याचा श्रीसमर्थकृपा होवो आणि तो माझ्याचा दिवस लवकर उगवो, ही श्रीचरणीं प्रार्थना

॥ श्रीसमर्थ रामदास स्वामी महाराज की जय ॥

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

१८५७ वैशाख वद्य ९ रविवार



## ( ३४ )

श्रीगुरुप्रसन्न

# श्रीसमर्थ व त्यांचा योग

( लेखक — श्री. त्र्यंबक भास्करशास्त्री खरे, मुंबई व नागपूर )

समर्थपदवंदना करुनि कार्य आरंभिलें ।
परीक्षण करावया मजसि संकटीं घेरिलें ।
दयार्द्र प्रभु धांवले दिधलि दीपयष्टी परी ।
तिला धरुनि चाललों फळलि की कृपा ही खरी ॥ स्वकृत

श्रीसमर्थांनीं श्रीमद्दासगीतेंत श्रीमद्भगवद्गीतेप्रमाणें सर्व प्रकारच्या प्रापंचिक प्रश्नाचा व आध्यात्मिक प्रश्नाचा उलगडा गुरुशिष्यामधील प्रश्नोत्तररूपानें केलेला आहे. श्रीमद्भगवद्गीतेप्रमाणेंच श्रीमद्दासगीतेंत समर्थांनीं वेळोवेळीं योगशास्त्राची महती वर्णन केलेली आहे व प्रसंगवशात् योगाभ्यासाचेंहि विवरण केलेलें आहे. सुमारें १०।२५ वर्षांपूर्वी धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेचे अध्वर्यु गु. म. शंकरराव देव यांनीं सभेमार्फत श्रीसमर्थांचे स्वानुभवी सच्छिष्य श्रीदिनकरस्वामी यांनीं रचलेला "स्वानुभव दिनकर" हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यापूर्वी लेखकाला श्रीदासगीतेंतील योगमार्गीय वचनाचा अर्थ समर्थवाङ्मयातून साधार रीतीनें न दाखविता आल्यानें श्रीसमर्थांनीं आपल्या अधिकारी शिष्यास योगमार्गातील गुह्य तत्त्वें व गूढ युक्तिल्या सांगितल्या होत्या हें सिद्ध करिता येत नसे. त्यापूर्वी लेखकानें श्रीसमर्थशिष्य श्रीउद्धवस्वामी यांच्या परंपरेंतील "श्रीहंस" संप्रदाय-संस्थापक श्रेष्ठ विभूति म्हणजे वेदेश्वरी, वाक्यवृत्ति वगैरे ग्रंथाचे प्रणेते श्रीहंसराज

स्वामींचे प्रशिष्य श्रीमहादेव हंस यांचें शिष्यत्व संपादन केलें होतें. या संप्रदायांत श्रीदासगीतापारायणाची अगर अभ्यासाची परिपाठी नव्हती तर श्रीहंसराजप्रणीत वेदेश्वरी व वाक्यवृत्ति वगैरे ग्रंथांचा अभ्यास करावा लागत असे. त्या वेळीं लेखकाचें मन ज्ञानयोगातील सहजसमाधिसुख अनुभविणें हेंच खरें इतिकर्तव्य या गोष्टीकडे वळविल्यानें योगें रोगभयं असेंहि त्यास बिंबवून दिल्यानें कांहीं काळपर्यंत हठयोग व राजयोग ह्याच्या प्रक्रियासंपादनापासून तो परावृत्त झाला. परंतु वयाच्या १२ व्या वर्षापासून राजयोगातील षट्चक्राचें वर्णन वाचून योगाबद्दल अतिशय तीव्र जिज्ञासा उत्पन्न झालेली होती. ती जरी वर लिहिल्याप्रमाणें कांहीं काळपर्यंत सुप्त झाली होती तरी ती पुन्हा जागृत झाली व त्या योगाचे ज्ञानसंपादनार्थ त्याची खटपट सुरू झाली. ब्रह्मीभूत योगीपदधारी श्रीरेवतीनंदनमहाराज नैमिषारण्यवासी यांचे सच्छिष्य श्रीरावजीमहाराज, गणेशपुरी संस्थान व प्रेश्वरी, यांचेजवळ हठयोगातील कांहीं क्रियांचा अभ्यास त्यानें केला व त्यांनीं षट्चक्रांचीं स्थानें, देवता वगैरेंची माहिती दिली. परंतु प्रपंचभारानें अभ्यासातून त्यास खेंचून नेलें व त्याचा तो अभ्यास तेथेंच थांबला. पुढें श्रीदिनकरस्वामींचा 'स्वानुभव दिनकर' हा ग्रंथ त्याचे वाचनांत आला. त्यांतील योगाचें व योगमार्गस्थ कुंडलिनीचक्राचें वर्णन वाचूं लागल्यावर त्याची खात्री झाली कीं, समर्थांनीं अधिकारी साधकास योगसंप्रदाय सांगितला होता. ह्या स्वानुभव दिनकर ग्रंथांतील कुंडलिनीचें वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या गीताभाष्यांतील ५ व्या अध्यायांतील वर्णनाशीं तंतोतंत जुळून येतें असें त्यास आढळून आलें.

(२) लेखकास आजपावेतों श्रीसमर्थांचें शुद्ध योगपरंपरागत ज्ञान प्राप्त करून घेतलेले सांप्रदायिक क्वचितच भेटले. कै. वा. दादामहाराज, बडोदें मठ, व कै. वा. आत्मारामहाराज, लखनौ मठ, यांच्या गांठी लेखकानें घेतल्या. परंतु इष्ट हेतु साध्य झाला नाहीं. अशा शोधनांतच योगज्ञानसंपादनास योग्य अशी वयसा निघून गेली; तरी पण तळमळ संपली नाहीं. म्हणून समर्थसांप्रदायिक असूनहि श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या परंपरेंतील श्रीनृसिंहसरस्वती आळंदीकर यांचे सच्छिष्य श्रीमदार्णे अण्णासाहेब आपटेय नागपुरकर यांचेकडे जाऊन "योगमार्गाचा अभ्यासक्रम द्यावा" अशी याचना केली. त्यांनीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांची आज्ञा घेऊन श्रीज्ञानेश्वरप्रणीत "द्वादश गुरुवचनभाष्य" व श्रीनिवृत्तिनाथांनीं दिलेला अभ्यासक्रम व वैष्णवी महाविद्या ह्या गोष्टी साधनार्थ

दिल्या, परंतु वर नमूद केल्याप्रमाणें योगसाधनाच्या प्रारंभीं लागणारें वयोमान म्हणजे ३२ वर्षे हीं निघून गेलीं असल्यानें योगमार्गांतील आमनस्क स्थितीपर्यंत पोंचवून या जन्मांत एवढेंच पुरें असें सांगितलें. पुढें १९२७ सालीं श्रीसमर्थांनीं केवळ श्रीकल्याणमहाराजांसच सांगितलेलें "सोलीव सुख" हें प्रकरण चिमड सांप्रदायिक श्री. कारखानीस यांचेकडून मिळालें, त्यावरून पूर्ण खात्री झाली कीं, समर्थांनीं अनेक शिष्यांपैकीं श्रीदिनकरस्वामी व श्रीकल्याणस्वामी यांस योगसंप्रदाय सांगितला होता. पुढें हें सोलीव सुख व द्वादश गुरुवचनभाष्य ह्याचा अर्थ श्रीआपदेवमहाराजांनीं तयार करून दिला व तीं दोन्ही प्रकरणें ह. भ. प. पांगारकरमहाराजांच्या 'मुमुक्षुं'त छापून निघालीं. ह्या दोन्ही प्रकरणांच्या अर्थावरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा अथवा श्रीसमर्थांचा काय दोन्ही मोठे संप्रदाय एकच आहेत अशी खात्री झाली व श्रीसमर्थांनीं योगसंप्रदायाबद्दलहि ज्ञानदान केलें होतें हें पाहून अत्यानंद झाला. पुढें १९२८ सालीं श्रीयोगानंद माधवनाथमहाराज चित्रकूटवाले यांची कृपा झाली व त्यांनीं आमनस्क स्थितींत भूतभविष्यज्ञान कसें होतें तें समजावून दिलें, व अजपाजपाची नित्य उपासना कशी करावी, त्रिकूटस्थानांत त्रिसंध्या अजपा गायत्रीचा जप कसा करावा व भ्रमरगुंफेंत अजपेच्या अव्यक्तवाचेचा अनुभव कसा घ्यावा हें समजावून दिलें. या योगानें श्रीदासगीतेंतील अजपा ह्या समासाचें चांगलें स्पष्टीकरण झालें. याच वेळीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांचेंहि अजपाजपाचें प्रकरण मिळालें. आज्ञाचक्रापासून पुढें अनुभव कसे येतात यावद्दल साग्र माहिती श्रीज्ञानेश्वरसंप्रदायांतील व श्रीसमर्थसंप्रदायातील प्रकरणांवरून लेखकानें लिहिलेल्या "कुंडलिनी अग्नियोग" या लेखांत दिलेली आहे. हा समग्र लेख इंदूर येथील श्रीमाधवनाथसांप्रदायिक 'आत्मबोध' या मासिकांत येत आहे. 'जें जें आपणांस ठावें तें तें इतरांस सांगावें,' अशी समर्थांची आज्ञा आहे तिला अनुसरून हा लेख लिहिण्याचें धाष्टर्य केलें आहे. ह्या लेखांत चुका होत असतील परंतु जो भाग ग्राह्य असा असेल त्यावरून समर्थसांप्रदायिकांत चैतन्य उत्पन्न होऊन कांहीं मंडळी तरी विचार व आचारप्रवण होतील अशी आशा आहे.

(३) योगसांप्रदायिक वेंचे—योगाची महती—

जे मोक्षश्रिया महामंगळा। जे सत्रावी जीवनकळा।
जे सत्वलीला सुशीला। लावण्यखाणी ॥

इतुके नलगे योगियासि । तो जिता चि पुण्यराशि ।
तिलांजली पापपुण्याची । दिधली जेणें ॥

एक योगी गुप्तपंथें व प्रभुवन पावले.

आकाशमार्गें गुप्तपंथें । जाणती योगी समर्थ ।
इतरांस हा गुह्यार्थ । सहसा न कळे ॥
युक्तिवीण साजिरा योग । तो दुराशेचा रोग ।
संगतीच्या लोकांचा भोग । उभा ठेला ॥
अखंड योग म्हणोनि योगी । योग नाहीं तो वियोगी ।
वियोगी तोहि (होय) योगी । योगबळें ॥
उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन ।
उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ॥

वरील उताऱ्याचें स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं. ह्या उताऱ्यातून योगाची महतीच गाइली आहे. सत्रावी जीवनकळा ह्या पदाचा अर्थ खालील-प्रमाणें आहे. श्रीतुकाराममहाराज म्हणतात, योगिया सायली जीवन कळा (सत्रावी जीवनकळा). यातील सोळा जीवनकळा अशा: (१) आकाश, (२) वायु, (३) तेज, (४) आप, (५) पृथ्वि अशा पाच कळातून जीव अन्ननामक सहाव्या कळेंत येऊन रेतनामक सातव्या कळेंत येतो. पुढें नऊ महिन्यांच्या नऊ कळा अशा सोळा कळांनीं तो जीव जन्मास येतो. पुढें सत्रावी कळा म्हणजे प्राणवायु व अपानवायु सम करून वाड्यंत्रानें (२-६-२९) जिव्हा छेदन करून खेचरी मुद्रेनें दोन्ही नाड्या बंद करून केवळ हृदयस्थित वायु ब्रह्मरंध्रांत नेला म्हणजे स्वेच्छेनें शरीर सोडता येतें ही सत्रावी जीवनकळा होय.

तिसऱ्या ओवींत आकाशमार्गें गुप्तपंथें असें लिहिलें आहे. यात आकाश-मार्ग म्हणजे विहंगममार्ग होय. कुंडलिनीयोगात आज्ञाचक्रापर्यंत पिपीलिका-मार्गानें एका चक्रापासून दुसऱ्या चक्रात जावें असें सांगितलें, परंतु पुढें त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट या चक्राच्या मार्गानें न जाता एकदम दशमद्वारीं जावें असें समर्थांनीं कल्याणस्वामींस अनुभवास आणून दिलें. तो हा गुप्तपंथ होय. यत्न-नाचा राजमार्ग व योगाचा गुप्तपंथ किंवा गुप्तमार्ग होय.

हा योग युक्तीशिवाय केला तर तो दुराशेचा रोग होतो. आणि संग-तीचे लोकांना तो भोगच होय. अखंड योग म्हणजे जीवात्मयोगांत मग्न असतो

तोच खरा योगी आणि असा योग साध्य झाला नाहीं तर तो वियोगी होय. म्हणून योगबलानें वियोगी असेल तोहि योगी होतो.

(४) योगसांप्रदायिक योगाभ्यासाबद्दल वेंचे
साधकें होवोनी बैसावें एकचित्त ।

श्रीतुकाराममहाराजहि असेंच सांगतात कीं,

ठायींच बैसोनी करा एकचित्त । आवडी आनंत आळवावा ॥

श्रीभगवद्गीतेंत श्रीभगवान सांगतात :

तत्रैकाग्रंमनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्यात् योगमात्मविशुद्धये ॥

श्रीभागवतकार सांगतात कीं,

तत्रैकाग्रमनः कृत्वा नकिंचिदपि चिंतयेत् ॥

श्रीपतंजली महामुनि सांगतात :

योगश्चित्तवृत्तिनिरोधः स्थिरसुखमासनं ।

श्रीभगवंतानीं तत्र असा शब्द योजला आहे. त्याचा संदर्भ मागील श्लोकात आहे तो असा कीं,

शुचौदेशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनिचं चैलाजिन कुशोत्तरं ॥

या चरणात आसन कसें असावें हें सांगितलें. समर्थ सांगतात, साधक व्हावें मग एकचित्त बैसावें. साधक होण्याला जीं साधनें सांगितलीं तीं करावीं.

चित्त सुचित करावें । बोललें तें जीवीं धरावें ।
सावध होवोनी बैसावें । निमेषमात्र ॥
नित्यनेम जपध्यान । करी तो सत्वगुण ॥

पुढें सांगतात कीं,

अति नेमेसी चाले ।
योगी जेणें तोषविले । तो सत्वगुण ॥

या एकंदर उताऱ्यावरून योगसूत्राच्या पहिल्या दोन सूत्राचा मथितार्थ श्रीसमर्थानीं सांगितला आहे.

(५) तो चि सद्गुरुनिधान दाखवी डोळां ।

गोपी उद्धवाला सांगतात, " सगुण रूप नयनीं दावा । " या वचनात सद्गुरूंनीं

निधान म्हणजे आत्मरूप डोळा दाखवावें असें म्हणतात. योगशास्त्रात २४ मुद्रा सांगितल्या आहेत, त्यात षण्मुखी व शांभवी ह्या मुख्य मुद्रा आहेत. ह्या दोन मुद्राचा संबंध दृश्य दोन डोळे व अदृश्य तृतीय नेत्र यांच्याशीं येतो. अर्थात् यावरूनहि योगाभ्यास श्रीसमर्थांनीं सांगितला असें दिसून येतें.

( ६ ) ऐशी माळा अंतःकरणीं । गुंफूनि पूजा रामचरणीं ।
ॐकारतंतू अखंडपणीं । खंडों च नये ॥

योगसूत्रात 'क्लेशकर्म विपाकाशयैरपरामृष्टपुरुष विशेषईश्वरः । तस्य वाचकः प्रणवः ।' असें सांगितलें आहे. समर्थहि हेंच सांगतात कीं, श्रीराम म्हणजे वरील सूत्रांत वर्णन केलेले ईश्वर त्याच्या चरणीं त्याचा वाचक अथवा त्याचें व्यक्त रूप जो ॐकार त्याची अखंड माळ अंतःकरणात वसों यावी. श्रीरामरायहि सांगतात:

ॐकार एषः प्रथमः प्रकल्पितः । ॐकारवाच्यस्त्वंराम ।

असें अहल्या आपल्या स्तोत्रात म्हणते. एकंदरींत समर्थांनीं योगसूत्रात सांगितल्याप्रमाणें व अध्यात्म रामायणात सांगितल्याप्रमाणें आपल्या दासगीतेंतहि तेंच सांगितलें, म्हणजे योगाचे एका अंगाचेंच वर्णन केलें असें होतें.

( ७ ) आधीं देवास ओळखावें । मग अनन्यभावें भजावें ।
अखंड ध्यान धरावें । सर्वोत्तमाचें ॥
तरी तो हरी आहे कैसा । ओळखोनी भजन कीजे जैसा ।
साहेब नमस्कारिजे तैसा । ओळखल्या उपरि ॥
ते निजरूप जगज्ज्योति । सत्तारूप ज्ञानरूप ।
प्रकाशरूप जोतिरूप । कारणरूप चिद्रूप आळखावें ॥

श्रीरामराय सांगतात:

प्रकाशरूपोहमजोहमद्वयो । सकृद्विभातो ह्मतीव निर्मलः ।

वेद सांगतात:

वेदाहमेतं पुरुषं महन्त । आदित्यवर्णं तमसस्तुपारे ।

गीता:

यदादित्य गतं तेजो । यचंद्रमसि यचाग्नौ तत्तेजो विद्धिमामकं ।

गायत्री:

तत्सवितुर्वरेणीयं भर्गः धीमही ।

( ८ ) या सर्व वरील वचनांवरून आत्मा प्रकाशरूप आहे. अशा प्रकाश-

रूप देवाला ओळखावें व नंतर त्याला भजावें म्हणजे देव आपलासा करावा. 'हरि तो ओळखा आधी। भजन करा मग त्याचें' असेंहि एक कवि म्हणतात. हें ओळखणें योगसाधनाशिवाय दुसऱ्या मार्गानें साध्य होणार नाहीं. समर्थ म्हणतात, मानसपूजा व प्रत्यक्ष दर्शन यांत मद्दंतर. यांत प्रत्यक्ष दर्शन म्हणजे प्रकाशरूप आत्मदर्शन होय. आत्मा 'अरे द्रष्टव्य श्रोतव्यो निदिध्यासितव्यः' असें श्रुति म्हणतात. असें प्रकाशरूप होणें हें योगमार्गानें कुंडलिनीजागृति केल्याशिवाय होणार नाहीं. म्हणून समर्थ म्हणतात योगाचा अवलंब करावा.

(९) देह देऊळ आत्मा देव।
कोठें धरूं पहाता भाव। देव ओळखोनि जीवेंची लावावा।
रामदासी योग झाला देहीं देव प्रगटला।
रूप पहातां लोचनीं, सुख झालें हो साजणी।

या चरणांत देह हें देऊळ आहे तर आत्मा कोठें पहावा तर समर्थच सांगतात, तो आत्मा सद्गुरु दाखवितात, लोचनीं रूप पहातां म्हणजे डोळ्याचे आंत अंतर्दृष्टीनें पहावें म्हणजे अधऊर्ध्व पाहणें म्हणजे दृष्टि नासाग्री व लक्ष्य भ्रूमध्यात असा अभ्यास केला तर प्रकाशाचा साक्षात्कार होतो. हा योगाभ्यासच होय.

(१०) पीतापासूनि कृष्ण जालें। भूमंडळीं विस्तारलें।
तेणेवीण उमगलें। हें तो घडेना॥

वरील ५ व्या स्तंभात विवरण करिताना सद्गुरुनिधान दासची डोळां असें लिहिलें आहे. डोळ्यात निधान दाखविण्याकरिता अधऊर्ध्व दृष्टि करण्यास सांगतात. अध म्हणजे नासाग्र दृष्टि. ही नासाग्र दृष्टि अर्धोन्मीलित दृष्टीनें करावयाची असते. ऊर्ध्व दृष्टि म्हणजे आपलें लक्ष्य त्रिकूटशिखरावर ठेवावें लागतें. त्रिकूटशिखर म्हणजे मेरुदंडाची शिखरि. हिलाच पाश्चिमात्य शारीरशास्त्रज्ञ Medulla oblongata असें म्हणतात. ह्या शिखरीचा शेवट शिवलिंगाकार आहे व त्यावर प्रकाशाचे परिमाणु आहेत असें पाश्चिमात्य शास्त्रकार म्हणतात. ह्या शिखरीवर लक्ष्य दिलें म्हणजे शुक्राच्या चांदणीसारखी चांदणी दिसते, असा अनुभव आहे. आता अर्धोन्मीलित दृष्टि केली तर नेत्राचा श्वेतभाग पापण्याखालीं लपतो व श्वेतभागानंतर नेत्रातील पीत वर्तुळ व्यक्त होतें. त्या पीत वर्तुळापासून कृष्ण झालें. नेत्राचा काळा भाग दिसतो, तो कृष्णवर्ण बाहुली होय. म्हणजे पीतापासून कृष्ण जहालें. भूमंडळीं विस्तारलें म्हणजे भूमंडलावर ह्या कृष्णवर्णाची छाया पडून

त्यात सर्व भूमंडळाचा विस्तार समाविष्ट झाला. म्हणजे कृष्णवर्ण मायेच्या आवरणात भूमंडळ झाकून गेलें. आणि अशा रीतीनें मायोपाधीनें व्यात झालेल्या भूमंडळाचा कार्यभाग चाललेला आहे. ही मायोपाधि समजल्याशिवाय ज्ञान झालें असें म्हणता येत नाहीं. त्याकरितां अंतर्दृष्टि केल्याबरोबर प्रकाशसाक्षात्कार होऊन मायोपाधीचें पटल दूर होऊन जातें. अशी अंतर्दृष्टि करणें हा योगाचाच अभ्यास आहे.

(११) " महीसुत सरसावला । सरसाऊनि द्विधा केला ।
उभयतां मिळोनि चालला । कार्यभाग ॥
श्वेताश्वेतास गाठी पडतां । मध्ये कृष्ण मिश्रित होतां ।
इहलोकसार्थकता । होत आहे ॥
विवरतां याचा विचार । मूर्ख तो चि होय चतुर ।
सद्यप्रचीत साक्षात्कार । परलोकीचा ॥ "

मही म्हणजे पृथ्वी व पृथ्वी म्हणजे हें शरीर. अर्थात् यास क्षेत्र असें म्हणतात. 'इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।' या क्षेत्रापासून म्हणजे देहात पहिल्यानें उत्पन्न झाला तो श्वासोच्छ्वास व श्वासोच्छ्वास सोऽहंरूपी आहे. तो द्विधा केला तर स आणि ह असें झालें. सकार म्हणजे प्राण आणि हकार म्हणजे अपान वायु होय. ह्या दोघांच्या मिळणीनें सर्व प्रापंचिक व पारमार्थिक कार्यभाग चालू आहेत. इडा नाडी श्वेतवर्ण आहे व पिंगला नाडी ताम्रवर्ण आहे. यामध्यें कृष्णवर्णरूपी सुषुम्णा मिळविली तर जीवा ( धूम्रवर्ण )च्या इहलोकींची सार्थकता होऊन तो सुषुम्णेच्या द्वारें देवरूप होऊन जातो व त्याची इहलोकींची या क्षेत्राची सार्थकता होते. श्वेतवर्णात तांबुस रंग मिळविला तर तो पीतवर्ण होतो व पीतवर्णात कृष्णवर्ण मिळविला तर तो नीलवर्ण होतो. अर्थात् इडापिंगला या नाड्यांची मिळणी होऊन सुषुम्णा नाडी जागृत झाल्यावर ऊर्ध्व दृष्टि फेंकली तर पहिल्यानें नीलवर्ण मसुरेचें दर्शन होतें. याचें विवरण व अभ्यास केल्यास मूर्ख चतुर होतो, सद्यप्रचीत होऊन परलोकाचा म्हणजे स्वर्लोक, महर्लोक अशा श्रेष्ठ लोकाचा अनुभव येतो.

(१२) " महाद्वारासि ओलांडावें । मग देवदर्शन घ्यावें ।
तैसें हृदय सोडावें । जाणोनिया ॥
नवरत्नाचे उपरि । राम तयाच्या मस्तकावरी ।

आठ खण ओलांडिल्यावरी । नवखण चढे ॥
जो आठ खण सोडोनि नवमध्यें गेला। आणि नवम मस्तकीं चढला।
तयाशीच आत्माराम भेटे । परते भोवती भोवतीं ॥ ''

योगाबद्दलच्या वाङ्मयात दशमद्वार म्हणजे सहस्रार चक्राचे निकट असलेलें गुतद्वार होय. या दशमद्वारीं गेल्यावर म्हणजे महाद्वार ओलांडल्यावर देवदर्शन होतें, म्हणजे परमप्रकाशमय परमात्मस्वरूपात जीव विलीन होतो व परत आल्यावर तेथील सुखाचा अनुभव सागतो. याच न्यायानें मुमुक्षूनें वरील अनुभव घेतल्यावर इतर वैषयिक व क्षणिक प्रकाश तो सोडून देतो व सनातन आत्मप्रकाशात विलीन होतो. नवखणाचे उपरि म्हणजे नवद्वाराचे वर दशमद्वारीं म्हणजे मस्तकावर श्रीरामाचें स्थान आहे. आठ खण ओलांडून नवव्या खणात म्हणजे नेत्रद्वारात जाऊन नवमाचे मस्तकीं म्हणजे दशमद्वारीं गेला त्यालाच श्रीरामराय भेटतील. इतर लोक इकडे तिकडेच हिंडत बसतील म्हणजे त्याना सहस्रार चक्रातील परमपुरुषाचें तादात्म्य प्राप्त होणार नाहीं.

( १३ ) सप्तकंचुक ब्रह्मांड त्यात सप्तकंचुक पिंड—या अवतरणात जीवाच्या सप्तकोशाचें वर्णन आहे, उपनिषद् ग्रंथात पचकोशाचें वर्णन आहे, योगवासिष्ठात वासनामय असा सहावा कोश सागितला आहे, व शुद्ध धर्ममंडळातील योगी मंडळानें प्रसिद्ध केलेल्या प्रणवप्रकाश ग्रथात वियत्कोश म्हणून सातवा कोश सागितला आहे. हा वियत्कोश प्रकाशमय आहे असें खालील अवतरणात दिसून येतें. ''त्यामध्यें मुख्य आकाश। पंचभूतामध्यें विशेष। त्याच्या प्रकाशें प्रकाश। सकळ काहीं.'' आता आपल्याकडील पंचीकरणप्रक्रियेंत आकाशाचा शब्द हा एकच गुण सागितला आहे, परंतु समर्थ प्रकाश हाहि त्याचा एक गुण आहे असें सांगतात व अलीकडील शोधकानीं Ether and Ethereal body — वियत् आणि वियत् शरीर या विषयावर अनेक ग्रंथ निर्माण केले आहेत त्यावरूनहि वरील सप्तकंचुकाबद्दल समर्थोक्ति सिद्ध होत आहे. याचा योगाशीं संदर्भ असा दाखविता येतो कीं, या कोशाच्या द्रव्याची माहिती असल्यानंतर त्या द्रव्याची संघटना व विघटना अथवा कोशाची संकोचक्रिया अथवा विकासक्रिया माहीत असल्यानें क्षणात अन्नमय प्राणमय कोश मनोमय कोशात लय करून मनोमय कोशानें कोठेंहि जाता येतें व इष्ट स्थळीं गेल्यावर पुन्हा त्या कोशाचा विकास करून अन्नमय कोशात येता येतें. श्रीसमर्थ याप्रमाणें अकस्मात् शिवरायाच्यासमोर येऊन

उभे राहिले त्या वेळीं तेथील लोकास समर्थ आपल्याजवळ कसे आले याचा अचंबा वाटत असे. योगक्रियेचे नियम माहीत नसलेल्या लोकास हे चमत्कार वाटले व तसे त्या चमत्काराचें वर्णनहि केलें गेलें. वस्तुतः योगक्रियापारंगत सिद्धाला या गोष्टी करबदरसदृशवत्च आहेत.

(१४) मुख्य शक्तिपात तो ऐसा। नाहीं चळवळीचा वळसा।
निवांतीं निवांत कैसा। निर्विकारी ॥

लेखकानें इंदूर येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'आत्मबोध' मासिकाच्या १८५७ च्या ध्वजारोपणाच्या अंकात 'कुंडलिनी शक्तियोग' या विषयावर निबंध लिहिला आहे. त्यात पौर्वात्य तत्रमार्गीय ग्रंथाच्या आधारें सिद्ध केलें आहे कीं, मनुष्यास दोन मनें आहेत. एक मन विषयानुगामी व दुसरें विचारानुगामी. विषयभोगापासून उत्पन्न झालेला आनंदाचा भोग विषयानुगामी मनास अनुभूत होतो, व विचारानीं एखादें कोडें सुटलें तर आनंद होतो तो विचारानुगामी मनास होतो. विषयानुगामी मनाचें स्थान हृदयाच्या उजवीकडे आहे. त्याच्या आठ पाकळ्या आहेत. विचारानुगामी मन गोल्हाट चक्राचे आसमंतात् आहे. त्याच्या सोळा पाकळ्या आहेत. शक्तिपात म्हणून जी क्रिया करण्यात येते ती या विचारानुगामी मनावर करण्यात येते. कारण ह्या विचारानुगामी मनातच नाना प्रकारच्या उर्मी उत्पन्न होत असतात. ह्या नाना प्रकारच्या वृत्तींपासून मन परावृत्त करून सत्-असत्-विवेकाकडे तें लावलें तर मनाची चंचलता नाहींशी होते व सर्व मनोविकार नाहींसे होतात. अशा आमनस्क स्थितीचा अगर उन्मनी अवस्थेचा अनुभव मनुष्यास आणून देणें हाच शक्तिपात होय असें ज्ञानी योगी म्हणतात. अशी निर्विकार स्थिति प्राप्त झाली म्हणजे विषयवासनात्मक वृत्ति शांत होतात. नाना प्रकारच्या वृत्तींची ओढ म्हणजे वेग हीच शक्ति होय व ही शक्ति थांबविणें म्हणजेच तो शक्तिपात होय. आता हठयोगी असें सांगतात कीं, वृत्ति उत्पन्न होण्यास तिच्या मुळाशीं चैतन्य पाहिजे, त्याशिवाय चालना होणार नाहीं. अर्थात् चैतन्याच्या साहचर्यानेंच वृत्तींची ओढ सुरू होते. सद्गुरूचें चैतन्य एकवृत्त्यवलंबी असतें. त्या एकवृत्त्यवलंबी चैतन्यशक्तीची प्रेरणा शिष्याच्या अनेकवृत्त्यवलंबी चैतन्यावर करितात. ही प्रेरणा दृष्टिपातानें अगर हस्तस्पर्शानें करितां येते. त्या दृष्टिपातानें शिष्याचे चैतन्याचे ठायीं एकवृत्त्यवलंबित्व आरूढ होतें व त्या एकवृत्त्यवलंबित्वानें शिष्याला आत्मप्रकाशाचा

अनुभव येतो व त्या प्रकाशांत ताशाचे तास तो विलीन होऊन राहतो. अशा वेळीं त्याचे श्वासोच्छ्वासहि कमी प्रमाणानें चालूं लागतात. प्रसंग-विशेषीं ते शांतहि होतात. हीच शक्तिपाताची समाधि होय. अशी समाधि श्रीसमर्थांनीं श्रीशिवाजीमहाराजास लाविली होती. तसेंच विवेकसिंधुकार श्रीमुकुंदराज यांनी जयंतपाळ राजास अशीच समाधि लाविली होती. घोड्याच्या रिकिबींत एक पाय व एक पाय वर उचलीत आहे अशा वेळीं लाविली, त्यामुळें तो तसाच उभा राहिला. अशी ही समाधि शक्तिपातानेंच लाविली गेली होती. तेव्हां हा शक्तिपात योग्याशिवाय इतरांना साध्य होणार नाहीं. अलीकडे अशा शक्तिपात करणारे योगी क्वचित्च दिसून येतात. बंगाल्याकडे श्रीलोकनाथतीर्थ या नांवाचे एक सिद्ध पुरुष आहेत, ते अशा शक्तिपात करीत असतांना लेख-कानें स्वतः पाहिलें आहे.

(१५) उच्चारेवीण जे शब्द । ते जाणावे सहजशब्द ।
प्रत्यया येती परंतु नाद । कांहीं च नाहीं ॥
ते शब्द सांडून बैसला । तो मौनी म्हणावा भला ।
योगाभ्यासाचा गलबला । याकारणें ॥
सहज समजावया कारणें । नाना हठयोग करणें ।
परंतु एकाएकीं समजणें । घडत नाहीं ॥

या अवतरणात समर्थांनीं खरा मौनी कसा असतो व तें मौन साधण्या-करिता योगाभ्यासाची खटपट करावी लागते हें स्पष्टच सांगितलें आहे. ही क्रिया अंगवळणीं सहजासहजीं घडावी म्हणून नानाप्रकारच्या हठयोगाचीं साधनेंहि करावीं लागतात; तर मग एकाएकीं ते सहजशब्द कसे जाणता येतील? आपल्या मध्यमा वाणींत शब्द होतात, परंतु ते अनुच्चारित असतात. अशा प्रकारानें पश्यती व परावाणीच्या पलीकडे अतिमहाकारण देहात गेला तोच खरा मौनी होय. पाटीवर लिहून दाखवून बोलणारे पुष्कळ मौनी म्हणून आपल्यास म्हणवून घेतात ते खरे मौनी नव्हत. ह्या अवतरणांत हठयोग करावा असेंहि श्रीसमर्थांनीं उप-देशिलें आहे.

(१६) आवरणोदकी हाटकेश्वर । त्यास न घडे नमस्कार ।
महिमा अत्यंत चि थोर । तया पाताळलिंगाचा ॥
परंतु तेथें जावयेना । शरीरें दर्शन घडेना ।

विवेकें आणावे अनुमाना। तया ईश्वराशी ॥
जें आपणासि न टावें। तें जाणतयासि पुसावें।
मनोगतीनें फिरावे। हें तो घडेना।
जें चर्मदृष्टीस नव्हे ठावें। तें ज्ञानदृष्टीनें पहावें।
ब्रह्मांड विवरोनि राहावें। समाधानें ॥

योगशास्त्रात भ्रूमध्यात पाताळलिंग आहे, अनाहत चक्रात बाणलिंग आहे व मूलाधारात म्हणजे गुदद्वाराजवळ स्वयंभुलिंग आहे असें वर्णन आहे. पाताळ लिंग या शब्दावरून हें लिंग पाताळात आहे अशी योगशास्त्र न जाणणाऱ्याची समजूत होते, व पृथ्वीच्या खालीं तल, अतल, सुतल, तलातल, रसातल, पाताल अशीं सप्तपाताळें आहेत. अशा वर्णनावरून पाताळात पाताळलिंग आहे अशी समजूत झाली आहे, परंतु आपल्या मानवी देहाची मुळें ऊर्ध्वमूल मध शाखा या वचनाप्रमाणें ऊर्ध्व आहेत. म्हणजे मानवी देहाचें पाताळ सहस्रार चक्रात आहे व त्याखालीं भ्रूमध्यात आज्ञाचक्राचे समीप पाताळलिंग आहे. आता पाताळलिंग हें आवरणोदकात आहे. या ठिकाणीं आवरणोदक म्हणजे सप्तसमुद्र. तसें या मानवी शरीरात सप्तसमुद्राचे ऐवजीं सप्तधातु आहेत. अशा सप्तधातूनीं वेष्टित भ्रूमध्यात पाताळ लिंग आहे म्हणून त्यास नमस्कार देहानें म्हणजे स्थूलदृष्टीनें करिता येत नाहीं. ह्या पाताळलिंगाचें स्थान मेरुशिखरावर आहे व तें मेरुशिखर लिंगाकृतीचें आहे. ही माहिती आपणास नसेल तर दुसऱ्यास विचारावी असें श्रीसमर्थ सांगतात. आपल्या मन मानेल त्या रीतीनें कल्पना करीत बसू नये चर्मदृष्टीनें जें दिसणार नाहीं तें पाहण्याकरिता ज्ञानदृष्टीचा उपयोग केला पाहिजे अशा रीतीनें आपल्या पिंडावरून ब्रह्मांडाचा शोध घेऊन समाधानानें रहावें असें समर्थ सांगतात.

( १७ ) घालोनी आसन करी एकचित्त। मेरुदंड जाण उभारावे ॥
भ्रुकुटीपासोनी अगुळें तीं चार। दृष्टि करी स्थीर तेणे ठायीं ॥
प्रथम प्रकाश चांदणी होईल। मग तें दाटेल महातेज ॥
तया तेजामाजी नीळ भाव जाय। निर्विकल्प होय समाधीतें ॥
दास म्हणे ज्याचें पूर्वपुण्य शुद्ध। तयासि हा बोध होय बापा ॥

वरील श्रीसमर्थांचे अभगांत सर्व योगाभ्यासक्रम सांगितला आहे. त्याचें स्पष्टीकरण स्वत सिद्धच आहे, तें निराळें लिहिण्याचें कारण नाहीं त्यांतील शब्दप्रयोग फारच स्पष्ट रीतीनें मांडले आहेत हा मुद्राभ्यास आहे

(१८) 'घोलीव सुत्र' या लहान प्रकरणात श्रीसमर्थांनी जो अनुभव दाखविला आहे तोहि थोडक्यात देण्यांत येत आहे. श्रीगुरूंनी अर्धयाभारहस्य श्रीकल्याणाचे कर्णरंध्रांत ओतलें. तें त्याच्या नेत्रात उतरून सर्व प्रकाशित होऊन आतील दिव्य दृष्टि उघडली त्या दिव्याकाशात सोहचा उदय होऊन त्याच्या जीवरूप अंशानें हें सर्व विराट लखलखीत होतें त्या वेळीं त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट हे सर्व मावळतात. अतिशय उग्रतेनें दिसून स्थूल सूक्ष्म, कारण महाकारण व अतिमहाकारण हे देह विरून जातात. शिष्य स्वरूपस्थितीस विसरून जातो. नतर श्रीगुरूंनीं शिष्याचे मस्तकावर हस्त ठेवून त्यास जागृत केलें व हा पिपीलिका-मार्ग आहे असें सांगितलें. नंतर विहंगममार्गानें अलक्ष्याच्या पलीकडे नेऊन त्यास मूळ निर्वाणस्वरूप करून सोडलें. आता तुजला दशनादाचा अनुभव करून देतों असें सांगून घटा, किंकिणी, अनाहत अशा दशनादाचा अनुभव करून दिला. आता वरती लक्ष लाव असें सांगून फारच मोठें सूर्यबिंब त्यास दाखविलें. त्याचहि मागें टाकून शीतल चंद्रप्रकाश त्यास दाखविला व त्यातच सत्य श्रीहरि दाखविला. हाच देहातील खरा परमात्मा असें सांगितलें. त्याचीच प्रभा सर्वत्र पसरली आहे, असें त्यास दाखविलें. हेंच खरें गुप्त आहे. हें फक्त योग्यानाच लाभलें आहे असें त्यास सांगितलें.

### भगवद्गीता आणि दासगीता

(१९) श्रीव्यासानीं 'भगवद्गीतासूपनिषत्सु' असें प्रत्येक अध्यायाचे शेवटल्या वाक्यात म्हटलें. म्हणजे पुढें 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदन:' असें भगवद्गीतामहात्म्यात सांगितलें. यावरून सर्व उपनिषदाचा आधार श्रीभगवद्गीतेस आहे असें वर्णन आहे. आणि दासगीता उपनिषदें, वेदश्रुति, पुराणें याचे आधार घेऊन सांगितली असें समर्थांनीं दासगीतेंत स्पष्ट लिहिलें आहे. भगवद्गीतेंत प्रयत्नप्राधान्य सांगून कर्मयोगाचें प्राधान्य सांगितलें व धर्मसंमूढ झालेल्या अर्जुनाला 'युध्यस्व विगतज्वर' असें सांगून त्याचेकडून युद्ध करून स्वार्थी व अन्यायी लोकाचा नाश करविला व धर्मराज्य स्थापविलें. श्रीसमर्थांनीं दासगीतेंत म्लेंच्छ माजले उदंड असें सांगून धर्मस्थापनापूर्वक धर्मराज्य स्थापन करविलें. सुप्त महाराष्ट्राला जागृत करून आनद व नवभुवन स्थापन केलें म्हणून आम्हा महाराष्ट्रीयास दासगीता सदा सर्वकाळ वंद्य आहे व प्रस्तुत काळीं ती भगवद्गीतेप्रमाणें मार्गदर्शीच आहे. प्रपच नेटका करण्याकरिता सर्व प्रकारचा उपदेश केला व अगदीं

बारीकसारीक गोष्टीहि सांगितल्या.

प्रातःकाळीं उठावें ।
यथानुशक्ति आठवावें । ईश्वरासी ॥
मुखमार्जन प्रातःस्नान । मग करावें देवतार्चन ।
पुढें फलाहार घ्यावा । मग संसारधंदा करावा ।
सुशब्दें राजी राखावा । सकळ लोक ॥

इत्यादि वर्तन कसें करावें हें सांगितलें आहे.

कर्म उपासना आणि ज्ञान । येणें राहे समाधान ।

शिवाय

प्रपंचीं पाहिजे सुवर्ण ॥

असेंहि सांगितलें.

प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ।

याशिवाय

पहिलें ते हरिभजन । दुसरें राजकारण । तिसरें सावधपण ।

या सर्व अवतरणाकडे पाहिलें असता दासगीता ही सर्व तऱ्हेनें उत्तमच ठरते. म्हणून भगवद्गीता आदरानें सेवावी व दासगीता ही आचरणानें आचरावी असें ठरतें.

भगवद्गीतेचा १९ वा अध्याय दासगीतेचा २१ वा दशक

(२०) भगवद्गीता १८ अध्यायाची प्रसिद्धच आहे. हिमालयस्थ शुद्ध धर्म मंडलाकडून प्रसिद्धीस आलेल्या गीतेचे २४ अध्याय आहेत. या २४ अध्यायाचें कारण असें लिहितात कीं, भारताचा पहिला अवतार जय या नांवानें प्रसिद्ध होता व त्याचे २४००० श्लोक होते. त्या अनुरोधानें भगवद्गीतेचेहि त्या वेळीं २४ अध्याय होते. पुढें महाभारताचे १००००० श्लोक झाले व १८ पर्वें झालीं. त्या वेळीं भगवद्गीता १८ अध्यायाची झाली. अलीकडे शके १८३५ सालीं भारत इतिहास संशोधक मंडळींनीं श्रीमगवद्गीतेचा १९ वा अध्याय प्रसिद्ध केला. त्याबरोबर श्रीपूर्णानंदमहाराजांची प्राकृत व श्रीएकनाथमहाराजांची प्राकृत टीका प्रसिद्ध केली, यावरून श्रीएकनाथमहाराजांस हा १९ वा अध्याय माहीत होता असें दिसतें. या १९ व्या अध्यायात ॐकार व त्याचें माहात्म्य, त्याचें रूप व स्थान हें सांगून योगशास्त्रांतील मूलतत्त्वें सांगितलीं आहेत. श्रीमद्भगवद्गीतेंत ॐकाराचें

महत्त्व वर्णन केलें, परंतु ॐकाराचें विशेष स्पष्टीकरण या अध्यायांत सांगितलें आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांस हा अध्याय माहीतच नव्हता असें म्हणतां येत नाहीं, कारण हा अध्याय योगशास्त्राचाच असल्यानें याचें स्पष्टीकरण अधिकारी शिष्यानें अधिकारी गुरुकडून करून घ्यावयाचें आहे. या अध्यायाचा येथें निर्देश करण्याचा हेतु हाच कीं, योगाधिकारी गुरुसांप्रदायिकांनीं हा अध्याय अभ्यासिला जावा.

तसेंच दासगीतेचे २० दशकच आहेत अशी समजूत आहे, परंतु त्या गीतेचाहि एकविसावा दशक आहे. हा दशक शके १८१९ सालीं पंडित किसनलाल यांनीं ज्ञानसागर प्रेस, मुंबई, येथें छापविला आहे. यातहि उदंड प्रकाश दिसतो कैसा त्यात आरम्याचा प्रकाश केला असा आरंभ करून प्रकाशसाक्षात्कार कसा करावा हें निरूपण केलें आहे.

गोशृंगावरी मोहरी । मन निश्चळ होय तोवरी ।
दोन्ही कुळांस उद्धरी । तो योगेश्वर ॥
अत्यंत चि धारणा जागे । तरी मग भविष्य फळूं लागे ।

ही योगसिद्धि सांगितली आहे.

वासनात्मक सूक्ष्म जीव । भूतें देवतें देवता देव ।
वायुरूपें विचरती सर्व । तितुके नामें ज्योति ॥
ईश्वर माया जग ज्योति ।

या उताऱ्यावरून हा दशकात प्रकाशसाक्षात्काराचें वर्णन केलें आहे हें उघड दिसतें.

### व्यक्तिगत उपासना व सामाइक उपासना

(२१) हल्लीं श्रीसमर्थसंप्रदायात व्यक्तिगत उपासनापद्धति प्रामुख्यानें दिसून येते. हा व्यक्तिगत उपासनासंप्रदाय वृद्धीचे कामीं उपयोगीं पडत नाहीं. भजनाचे फड ठायीं वाढवावे असें श्रीसमर्थ सांगतात त्या त्याच्या सांगण्यांत सामाइक उपासना वाढविली पाहिजे असा त्यांचा अभिप्राय दिसतो. सामाइक उपासनेंत बहुतांचीं अंतरें दिसून येतात. ऐक्य वाढतें. परस्परप्रेम वृद्धिंगत पावतें. समत्वभावहि वाढतो. मागें उभा राहणारा टाळकरी व निरूपण करणारा महंत हे दोघेहि जेव्हा भजनानंदांत निमग्न असतात तेव्हा भजन करणाऱ्या इतर मंडळींस निरूपणकार व आपण भजन करीत असता एकाच भूमिकेवर असतों अशी

साली पटल्यामुळें मजनानुयायी पुष्कळ मिळवात. हल्लीं अस्तित्वात असलेल्या मठांतून समर्थकृत अभंग म्हणून निरूपण करणारे थोडेच आहेत. सामुदायिक उपासनेचा पुनरुद्धार झाला पाहिजे.

श्रीदासगीतेंतील अजपागायत्री

(२२) एका दिवसातील २४ तासाच्या अवधींत मनुष्यप्राण्याच्या ठायीं एकदर २१६०० इतके श्वासप्रश्वास होत असतात.

एकान्तीं मौन धरून बैसे । सावध पहातां कैसें भासे ।
सोहं सोहं ऐसे । शब्द उठती ॥
ऐसी हे अजपा सकळांसीं । परंतु कळे जाणत्यासी ।

एकान्तीं मौन धरून बसलें तर आपण श्वास बाहेर सोडताना हं असा शब्द होतो व श्वास आत घेताना हं असा शब्द होतो. या सहज उत्पन्न होणाऱ्या शब्दापासून सोहं असा शब्द घटित झाला. म्हणजे यात ॐकार हा गुप्त रीतीनें राहतो असें समजून येतें. हा आजपा गायत्रीचा जप उदमेसून करावा लागत नाहीं. तर हा जप आपोआपच होत असतो. ही अजपा गायत्री जपण्यास सर्वांस अधिकार आहे. तो अधिकार कोणास हिरावून घेता येत नाहीं. या जपाचे वेळीं स्त्रिया, शूद्र, अतिशूद्र सर्वच एका भूमिकेवर येतात. अनुहत म्हणजे अनाहत ध्वनिश्रवण. हा योगाभ्यासाचा एक भाग आहे. अजपाजप म्हणजे सोहं ध्वनि अनाहत आहे. कोणत्याहि प्रकारचा आघात केल्याशिवाय होतो. बाकीचे ध्वनि आहत ध्वनि होत. म्हणजे एका वस्तूवर दुसरी वस्तु मारल्यानंतर झालेला ध्वनि होय. ही अजपा स्वेदज, उद्भिज, जारज व अंडज अशा चारहि सृष्टींतील वस्तूंमध्यें दृग्गोचर होते. या ठिकाणीं समर्थांनीं उद्भिज म्हणजे वनस्पतींना चैतन्य आहे व त्यांना होणारे सुखावेश व दुःखावेश आपल्या हालचालींनीं दाखवितां येतात, त्यास सुखावेश व दु:खावेशहि असतात व त्यांना श्वासोच्छ्वासहि असतो असें शिकविलें आहे. अजपा म्हणजे महावाक्याचा उपदेशच होय. या अजपेचा ध्यास घेतला तर अखंड नामस्मरण आपोआपच होतें. प्रत्येक देवता ॐकार हें माझें रूप आहे असें सांगते. अर्थात् ॐकाराचा जप म्हणजे त्या त्या इष्टदेवतेचें ध्यानच होय. असा जप झाला तर जगद्‌व कळोन येतो. सर्व जीवमात्राचे ठायीं ही अजपा आहे असें समजल्यानें सर्वांभूतीं भगवद्भाव जागृत होतो. अर्थात् सर्वांभूतीं समत्वभाव अनुभूतीस येतो. अगज्योति म्हणतात तीच ही अजपा होय.




षट्चक्र

( २३ ) वरील स्तमात अजपेची समजूत घातली आहे म्हणजे ज्ञानात् भूतादि अजपा आहे असें सांगितलें, परंतु ज्ञानशक्तीनेंच कार्य होत नाहीं कार्य संपादन होण्यास क्रियाशक्तीची आवश्यकता आहे.

नाम–ब्रह्मरंध्र, शक्ति–ज्ञान, स्थानशून्य मस्तक, अजपार्पण–१००० दल–सहस्र, ध्यानफल–सायुज्य, वर्ण–रक्त, निर्वाण–मोक्ष, तत्त्व–ब्रह्मतत्त्व, बी –विसर्ग, पीठस्थान–महापीठ, निर्वाणकला।

देवता–दत्तगुरु, नाम–चंद्रमंडल, स्थान–मूर्धा, ध्यानफल– ( अमृतपान

• नाम–आज्ञाचक्र, बीज–ॐ, स्थान–भ्रूमध्य, पीठस्थान– ( हिरण्यगर्भ

वर्ण–श्वेत, अजपार्पण–१०००, दल–द्विदल, शक्ति–चिच्छक्ति, दलों बीज–हँ, क्षँ, ध्यानफल–आत्मज्ञान, तत्त्व–महत्तत्त्व, देवता–परमात्मा।

नाम–विशुद्धाख्य, शक्ति–प्राणशक्ति, स्थान–मेरुमध्यस्थ कण्ठ, अजपार्पण १०००, ध्यानफल–अमरत्वलाभ, दल–षोडश, वर्ण–धूम्र, दलोंके बीज–षोडश स्वर वर्ण, तत्त्व–आकाश नील, तत्त्वबीज–हँ, यंत्र–षट्कोण, देवता–जीव।

नाम–अनाहत, शक्ति–गौरी, स्थान–मेरुमध्यस्थ हृदय, अजपार्पण ६०० ध्यानफल–अष्टसिद्धिलाभ, दल–द्वादश, वर्ण–अरुण, दलोंके बीज ( कादिगन तत्त्व–वायु, धूम्रवर्ण, तत्त्वबीज–यँ, यंत्र–षट्कोण, देवता–रुद्र।

नाम–मणिपुर, शक्ति–लक्ष्मी, स्थान–मेरुमध्यनाभी, ध्यान फल–दिव्यलो निवास, अजपार्पण–६०००, दल–दश, वर्ण–नील, दलोंके बीज–डादिफान तत्त्व–अग्नि, रक्तवर्ण, तत्त्वबीज–रँ, यंत्र–त्रिकोण, देवता–विष्णु।

नाम–स्वाधिष्ठान, अजपार्पण–६०००, स्थान–मेरुमध्यस्थ लिंगमूल ध्यानफल–वरुणलोकनिवास दल–षट्, वर्ण–सिंदूर, दलोंके बीज–बादिलान्त तत्त्व–जल, श्वेतवर्ण, तत्त्वबीज व यंत्र–अर्धचंद्र, देवता–ब्रह्मा, शक्ति–सावित्री

नाम–मूलाधार, यंत्र–चतुष्कोण, स्थान–मेरुमध्यस्थलिंग गुह्यांतर, देवता गणेश, शक्ति–सिद्धि, अजपार्पण–६००, दल–चतु , वर्ण–अरुण, दलोंके बीज वादिसान्त, ध्यानफल–सर्वत्र पृथ्वीमें प्राधान्य, तत्त्व–पृथ्वी, पीतवर्ण, तत्त्व–बीज लँ

नाम–कुण्डलिनी, वर्ण–विद्युत्, स्थान–मूलाधार, आकार–भुजसर्पिणी, शार्द त्रिवलयतु–शषि, जीव–चैतन्य, ध्यानफल–अज्ञाननाश

लिंगवेष्टिनी

स्वयंभुलिंग, ध्यानफल–शिवतत्त्वम, ज्योतिर्मय

ब्रह्मज्ञान समजून ब्रह्मभूत प्रसन्नात्मा जो असतो तोच परमात्मपदाला जातो.

## प्रस्तुत काळांत सांप्रदायिकांचीं कर्तव्यें

( २७ ) श्रीसमर्थांची वाग्देवतेची उपासना करणें हें तर श्लाघ्यच आहे, परंतु समर्थांनीं ईश्वराचें अधिष्ठान संपादन करून मगच ते कार्यप्रवण झाले हें त्यांच्या चरित्रावरून आपणांस दिसून येतें " यावज्ञानुग्रह साक्षाज्जायते परमेश्वरात् " या उक्तीप्रमाणें साक्षात् रामरायापासून अगर आपापल्या इष्टदेवतेपासून साक्षात् अनुग्रह झाल्याखेरीज खरी क्रियाशक्ति प्राप्त होत नाहीं क्रियाशक्तीशिवाय ज्ञान-शक्ति लंगडी पडते म्हणून आधुनिक काळांत चळवळीचें सामर्थ्य प्राप्त होण्यास ईशकृपाप्रसादानें तशी क्रियाशक्ति प्राप्त करून घेणें हें आधुनिकांचें आद्य कर्तव्य आहे. ही क्रियाशक्ति उपासनेनें प्राप्त होईल अगर योगसामर्थ्यानें प्राप्त होईल. अशी क्रियाशक्ति प्राप्त झाल्यावर समाजापुढें यावें समर्थ सांगतात—अभ्यासें प्रकट व्हावें । नाहीं तरी झांकोनि असावें । प्रकट होवोनि नासावें । हें बरें नव्हे ॥ चुके बहु घडी घडी । असी कथी महतडी । म्हणजे थोडें सामर्थ्य आहे की लोकसमुदायापुढें येणें बरें नाहीं परंतु समर्थ सांगतात, पहिलें तें हरिभजन । हा मार्ग सोपा आहे म्हणून समर्थसांप्रदायिक म्हणविणाऱ्यांनीं समर्थांचे नांवावर भिक्षावृत्ति पतकरून उदरपोषण करणाऱ्या रामदासी मंडळींनीं समर्थांच्या गाथ्यां-तील एक तरी अभंग पाठ करावा व समर्थांनीं सांगितल्याप्रमाणें प्रत्यहीं पंचपदी करावी व समर्थांचेंच अगर समर्थ-सांप्रदायिक हसदासस्वामींचें अगर समर्थपंचायतनांतील सिद्धपुरुषांचे कवित्वाच्या आधारें कीर्तन अगर प्रवचन अगर निरूपण करण्याचा पाठ ठेवावा. ही झाली सामुदायिक उपासना. तशीं प्रत्येक व्यक्तीनें आपापलीं विहित कर्मे आचरण करून समर्थगीतेंतील २ समास व मनाचे १३ श्लोक एवढें तरी पाठांतर ठेवावें व प्रतिवर्षी जांबेस अगर पदरीस अगर सज्जनगडावर जाण्याचा क्रम ठेवावा आपल्या उपास्याचा अभि-मान ठेवून इतरांच्या उपास्यांत श्रीरामच भरले आहेत अशी भावना ठेवून कोणाचा उपमर्द करू नये.

शेवटीं वर लिहिलेल्या चार ओळींकडे सांप्रदायिकांचें, लक्ष्य जावें व समर्थसंप्रदाय अखंड भारतवर्षास मार्गदर्शी होवो, अशी श्रीसमर्थांची प्रार्थना करून त्यांच्या शब्दांत म्हणजे

जनीं भक्ति नाहीं मनीं भाव नाहीं।
मला युक्ति ना बुद्धि कांहीं च नाहीं।
कृपाळूपणें राज्य रंकासि द्यावें।
समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥

हा श्लोक लिहून हा लेख पुरा करितों.



नाम—कन्दर्पाग्नि, वर्ण—अरुण, देवता—प्रजापति।

अजपाजपेचा अभ्यासक्रम: षट्चक्राची माहिती

(२४) वरील स्तभात अजपागायत्रीचा २१६०० जप होतो म्हणून सांगितलें. त्या जपापैकीं कोणत्या देवतेस किती जप समर्पण करावयाचा, कोणत्या ठिकाणीं कोणती देवता आहे वगैरे सर्व माहिती साकल्यानें समजली पाहिजे. त्याकरिता सोबत शरीरातील चक्रांचा नकाशा दिला आहे. त्यावरून सर्व कळून येईल. अजपाजपाची उपासना हीच प्रणवोपासना होय.

(२५) अशा अजपेचा संकल्प प्रातःकाळीं स्नानापूर्वी करावा अगर स्नानानंतर करावा. गंगा नदीवर जाऊन गंगा नदीचे जलानेंच जसें गंगेचें तर्पण करितात त्याप्रमाणें श्वासोच्छ्वासरूपी गंगायमुना नद्यांतून दिवसांतून कांहीं वेळ अजपेचें स्मरण करून बसलें तर तितकाच अमृतत्वाचा अनुभव घेतां येतो. उजव्या नासारंध्रातून वहाणाऱ्या श्वासाला पिंगला व डाव्या रंध्रातून वहाणाऱ्या श्वासाला इडा म्हणतात. सूर्योदयीं व सूर्यास्तीं ह्या नाड्या साम्यावस्थेंत वहातात. म्हणजे दोन्ही नासारंध्राच्या पुटातून सारखा श्वास वहात असतो. त्यास संधि म्हणतात. अशा संधींत संध्या करावी हें इष्ट आहे. म्हणजे त्या वेळीं एकाग्रता लवकर साध्य होते व अशा एकाग्रतेंत भ्रूमध्यामध्यें असलेल्या आज्ञाचक्रस्थ परमात्म्याला अजपेच्या जपाचें समर्पण करावें. मुमुक्षूचे श्वासोच्छ्वास २ तास २४ मिनिटांनीं बदलत असतात. म्हणजे इडा नाकपुडींतून वहाणारा श्वास पिंगला नाकपुडींतून वाहूं लागतो. साधक लोक सूर्यचंद्राचे उदयास्तांबरोबर हे श्वास कायम करितात. म्हणजे सूर्योदयाबरोबर इडा नाडींतून वहात असणारा श्वास १२ तास त्याच नाकपुडींतून वहावा असा अभ्यास करितात. त्यास ह्या एकाग्रतेचा अनुभव लवकर येतो असें या विषयाचें अधिक स्पष्टीकरण सद्गुरूकडून करून घेणेंच योग्य आहे.

भगवद्गीतेंतील साम्ययोग व दासगीतेंतील साम्ययोग

(२६) श्रीकृष्ण भगवानांनीं गीतेंत कर्मयोग, सांख्ययोग, भक्तियोग व राजयोग असे योगाच्या मार्गांचे वर्णन केलें आहे. श्रीसंमोहनतंत्रात योगाचे पांच भाग केले आहेत. लेखकाचें असें म्हणणें आहे कीं, भगवद्गीतेंत दुसऱ्या अध्यायात साम्ययोगच सांगितला आहे व वर नमूद केलेले योगाचे भाग साम्ययोगांतर्भूत आहेत. दुसऱ्या अध्यायांत ४७ व्या श्लोकांत कर्मफलाचा सोडण्यास सांगितलें

व कर्मे करावीं, सोडू नयेत असेंहि बजावलें. ४८ व्या श्लोकात कर्मफलाशेचा संग सोडून कर्मे करावीं परंतु तीं योगस्थ होऊन करावीं. तो योग कोणता तर सिद्धि व असिद्धि या दोहोंच्या ठिकाणीं साम्य बुद्धि ठेवणें हा होय. ५१ व्या श्लोकात कर्मफलाच्या ठिकाणीं अनासक्ति ठेविली तर प्राणी जन्मबंधापासून मुक्त होतो व अनामय परमात्मपदाला जातो. समाधीच्या ठिकाणीं अचल बुद्धि होईल तेव्हाच योग प्राप्त होतो व पुढें स्थितप्रज्ञ व समाधिस्थ पुरुष कसा वागतो हें सांगून जो सर्वांना स्नेहबुद्धीनें पहातो व कासव जसा आपले अवयव आकर्षण करून घेतो त्याप्रमाणें इंद्रियार्थांपासून आपलीं इंद्रियें परावृत्त करितो व अशा रीतीनें इंद्रियार्थांपासून परावृत्त झालेल्या योग्याची इंद्रियभोगाची गोडी म्हणजे वासना परब्रह्म पाहिल्यावर परावृत्त होते (परदृष्ट्वानिवर्तते). अशा प्रकारची ज्याची स्थिति प्राप्त झाली म्हणजे सर्वत्र समबुद्धि तो होतो व अंतकाळीं निर्वाण-पदाला जातो. श्रीसमर्थ म्हणतात

साकडीमध्यें यत्नों जाणे। उपाधीमध्यें मिळों जाणे।
अलिप्तपणे राखों जाणे। आपणासी।
आहे तरी सर्वांठायीं। पाहों जातां कोठें च नाहीं।
आले वैभव अभिलाषीना। कांहीं केल्या॥
दिसे सकळांसी सारिखा। पहातां विवेकें नेटका।
कामी विकामी लोकां। बरें पाहे॥
जाणोनि पाहिजेत सर्व। हे चि जयाचें अपूर्व।
ज्याचे त्या परी गौरव। राखों जाणे॥
विवेक आणि वैराग्य। ते चि जाणिजे महद्भाग्य।
रामदास म्हणे योग्य। साधू जाण॥
प्रसर वैराग्य उदासीन। प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान।
स्नानसंध्या भगवद्भजन। पुण्यमार्ग॥

जो उपाधींत असूनहि उपाधींत सांपडत नाहीं, जो सर्व ठिकाणीं असून कोठेंच नसतो म्हणजे अलिप्तपणें वर्तन ठेवतो, वैभवाची अभिलाषा ठेवीत नाहीं, सकळांस सारखा दिसतो म्हणजे सर्वांशीं समभावानें अर्थात् ब्रह्मभावनेनें वागतो, ज्याचे ठायीं विवेक आणि वैराग्य जागृत असतात, तोच योग्य साधु जाणावा. ज्यानें स्नान, संध्या, भगवद्भजन सोडलें नाहीं, ज्याला आत्मप्रत्ययानें

## श्रीसमर्थ मला कसे भासतात

( लेखक — शंकर श्रीकृष्ण देव, धुळें )

ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं ।
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्वमस्यादिलक्ष्यं ।
एकं नित्यं निर्मलमचलं सर्वधीसाक्षिभूतं ।
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥

( १ ) हें श्रीसमर्थांचें नित्याचें स्वरूप होय. श्रीसमर्थ म्हणजे परब्रह्म, असें समीकरण ठरलेलें आहे व त्याच नित्यस्वरूपांत सर्वांनीं त्यांना पाहिलें पाहिजे. तथापि १५३० चैत्र शुद्ध ९ पासून १६०३ माघ वद्य ९ पर्यंत त्या स्वरूपानें जो अवतार धारण केला होता, तो अवतार आपणांस कसा भासतो, याविषयीं आजच्या मंगलप्रसंगीं थोडक्यांत बोलावें, असें मनांत आणलें आहे. वादांत शिरण्याचा हेतु नाहीं. ध्यचित् मला ते कसे भासतात हें मी सांगणार, तेथें ' असे कां ' असा प्रश्नच उत्पन्न होऊं शकत नाहीं. मला ते जसे भासतात, तसे च ते सर्वांना भासावे, अशी माझी किती हि इच्छा असली, तरी तसा माझा आग्रह नाहीं. हें खरें की, माझें म्हणणें ज्यांना पटतें ते

समर्थ हे उपासना । जनांत आणिती मना ।
रघोत्तमा उपासिती । सगे चि ते चि वाटती ॥

या न्यायानें मला प्रिय वाटतात. तथापि ज्यांना ते ज्या स्वरूपांत भासत असतील तें स्वरूप त्यांच्यापुरतें खरें होय, असें मानण्यास मी तयार झालों आहें.

मेळा सर्वथैव पान होते. प्रतापगिरीच्या ठायीं विराजमान होणाऱ्या श्रीरामवरदायिनी-पाशीं त्यांचें ' येक चि मागणें ' होतें, यावरून त्यांचें अंतिम ध्येय ( ultimate end ) पूर्ण निश्चित ( well determined ) होतें, हें उघड आहे. त्या ध्येयाच्या प्राप्तीकरितां त्यांनीं आपली सारी पुण्याई खर्च केली.

( ५ ) एवढे कर्तृत्ववान् चाणक्य नंदाचें उन्मूलन करून चंद्रगुप्तास राज्यावर बसवितात, पण त्यांच्या स्वतःच्या आश्रमाचा थाट

उपलशकलमेतद्भेदकं गोमयानां ।
बटुभिरुपहृतानां बर्हिषां स्तूपमेतत् ।
शरणमपि समिद्भिः शुष्यमाणाभिराभिः ।
विनमितपटलान्तं दृश्यते जीर्णकुड्यम् ॥

असा असे. तीच स्थिति

उदंड जाहले पाणी । स्नानसंध्या करावया ॥

असा आनंद मानणाऱ्या श्रीसमर्थांच्या मठाची होती, असो.

( ६ ) मुद्राराक्षसाच्या अभ्यासानें भासलेली ही साम्याची कल्पना पुढें पुढें बळावतच गेली. म्हैसुर संस्थानांतील शामशास्त्री यांनीं १९१५ त कौटिल्याच्या अर्थशास्त्राचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केलें. त्याला डॉ. जे. एफ्. फ्लीट यांनीं प्रस्तावना लिहिलेली आहे. त्या प्रस्तावनेंत त्यांनीं म्हटलें आहे:

Chanakya, tradition tells us overthrew the last king of the Nanda *dynasty* and placed the great Maurya Chandra-gupta on the throne thus the two* verses with which the work ends *recite that it was written by Vishnugupta* who from intolerance of misrule rescued the scriptures the science of weapons and the earth which had passed to the Nanda king, and that he wrote it because he had seen many discrepancies on the part of previous commentators

---

* येन शास्त्रं च शस्त्रं च नन्दराजगता च भूः ।
अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ॥
दृष्ट्वा विप्रतिपत्तिं बहुधा शास्त्रेषु भाष्यकाराणाम् ।
स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रं च भाष्यं च ॥

आणि श्रीसमर्थांनी तरी दुसरें काय केलें ? मुसलमानी सत्तेला शह देऊन व ती संपुष्टात आणून श्रीशिवरायाकरवीं रामराज्याची स्थापना केली, धर्माचें रक्षण केलें, भूभार हरण केला, जगदुद्धार केला, आणि

' मतें मतांतरें सगट । प्रत्ययें बोलोन '

सपाट केलीं. ह्याच प्रस्तावनेंत फ्लीट पुढें म्हणतात :

Kautilya is renowned, not only as a King maker, but also for being the greatest Indian exponent of the art of government, the duties of kings, ministers and officials, and the methods of diplomacy.

आणि आपल्या श्रीसमर्थांनी हि ठिकठिकाणीं राजकारणाचे अनेक धडे घालून दिले, राजधर्म-क्षात्रधर्म-सेवकधर्म सांगितले, धूर्तपणाची आणि चातुर्याची लक्षणें प्रतिपादिलीं आणि

' करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये ॥ '

परभारें ' हुंब्याशी हुंबा लाऊन द्यावा, ' इत्यादि राजनीतींतील असंख्य तत्त्वें प्रकट केल्या.

( ७ ) दृष्टान्त तितुका नेहमीं एकदेशी असतो, तो संपूर्णांशानें केव्हा च मानावयाचा नसतो, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कवि या नात्यानें श्रीसमर्थांना वाल्मीकीची उपमा देतात, ती जशी कवित्वापुरती च मानावयाची असते, वाल्मीकीच्या आरंभींच्या चरित्राकडे पहावयाचें नसतें, तद्वत्च आर्य चाणक्याच्या राजकीय कर्तृत्वशक्तीपुरती च त्याची उपमा येथें अपेक्षित आहे, असें समजावें.

( ८ ) एकएकाचा एक एक गुण श्रीसमर्थांच्या ठिकाणीं होता व तेवढ्यापुरता प्रत्येकाचा दृष्टांत त्यांना लागू करावयाचा. श्रीसमर्थांचे एक चरित्रकार, षद्वसुत यांचें श्रीसमर्थांवर एक अष्टक आहे. त्याचा पहिला श्लोक

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।
वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ।
कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥

असा आहे. तो मला पहिल्यापासून फार आवडतो. त्यांत वैराग्य, ज्ञान, कवित्व या तीन गोष्टी आल्या आणि एकच राहिली, असें मला वाटलें, म्हणून उद्धव-

(२) मला मात्र श्रीसमर्थ हे महाराष्ट्राचे प्राण भासतात. श्रीसमर्थांची महाराष्ट्रास विस्मृति होईल, तर महाराष्ट्र मेला असें समजा. पण, श्रीसमर्थचरणावरून महाराष्ट्राची दृष्टि कदापि ढळणार नाहीं, तर महाराष्ट्र अमर होईल, त्यास कोणी मारूं शकणार नाहीं, हें निश्चित होय. श्रीसमर्थ हे राष्ट्रगुरु आणि महाराष्ट्र हा त्यांचा भक्त, अशीं

दोन्हीं सामर्थ्यें येक होतां। काळास नाटोपे सर्वथा।
तेथें इतरांची कोण कथा। कीटकन्यायें॥

(३) श्रीसमर्थ मला कसे भासतात, तें सांगून झालें. तेव्हां आतां बोलणें आटोपतें घेतलें तरी चालेल. तथापि त्या भासावर दृष्टि निश्चल ठेवून किंचित् पाल्हाळ करावा, असें म्हणतों.

(४) शक १८१३ च्या अखेरीं म्हणजे इ. स. १८९२ च्या आरंभीं श्रीमत् ग्रन्थराज दासबोध आणि संस्कृत मुद्राराक्षस नाटक असे दोन्ही ग्रन्थ माझ्या हातीं एकदमच पडले. त्या वेळीं मुद्राराक्षसांतील मुख्य नायक आर्य चाणक्य आणि दासबोधाचे कर्ते श्रीसमर्थ या उभयतांच्या चरित्रांतील साम्यस्थळांकडे माझें लक्ष प्रथम गेलें. मुद्राराक्षसाच्या प्रस्तावनेंत न्या. तेलंगांनीं लिहिलेलें वाचलें कीं, सदर नाटकांत Chanakya is represented as a clear-headed, self-confident, intriguing, hard politician, with the ultimate end of his ambition thoroughly well-determined, and directing all his clear-headedness and intrigue to the accomplishment of that end आणि वाटलें कीं, श्रीसमर्थांच्या ठिकाणीं यांतल कोणते गुण कमी होते? Clear-headed म्हणजे मी 'संदेहरहित' समजतों. Self-confidence म्हणजे आत्मविश्वास, तो समर्थांच्या ठिकाणीं परमावधीचा होता:

"राघवाचा दास मी जालों पावन। पतित तो कोण उरों शके॥
येणें काळें मोक्ष जरी मी देईना। दास म्हणवीना राघवाचा॥"

Intriguing मध्यें कांहीं वाईट अर्थ असला, तर तो वाजूस सारून त्याचा योग्य बोध, 'अंतरीं असाव्या नाना कळा।' यानें होतो. Hard म्हणजे 'निश्चयाचा महामेरु'. या उपमेनें श्रीशिवरायाला संबोधणारे श्रीसमर्थ स्वतः त्या उप-

मेळा सर्वथैव पात्र होते. प्रतापगिरीच्या ठायीं विराजमान होणाऱ्या श्रीरामवरदायिनी-पायीं त्याचें ' येक चि मागणें ' होतें, यावरून त्याचें अंतिम ध्येय ( ultimate end ) पूर्ण निश्चित (well-determined) होतें, हें उघड आहे. त्या ध्येयाच्या प्राप्तीकरिता त्यानीं आपली सारी पुण्याई खर्च केली.

( ५ ) एवढे कर्तृत्ववान् चाणक्य नंदाचें उन्मूलन करून चंद्रगुप्ताव राज्यावर बसवितात, पण त्याच्या स्वतःच्या आश्रमाचा थाट

उपलशकलमेतद्भेदकं गोमयानां ।
बटुभिरुपहृतानां बर्हिषां स्तूपमेतत् ।
शरणमपि समिद्भिः शुष्यमाणाभिराभिः ।
विनमितपटलान्तं दृश्यते जीर्णकुड्यम् ॥

असा असे. तीच स्थिति

उदंड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ॥

असा आनंद मानणाऱ्या श्रीसमर्थांच्या मठाची होती; असो.

( ६ ) मुद्राराक्षसाच्या अभ्यासानें भासलेली ही साम्याची कल्पना पुढें पुढें बळावतच गेली. म्हैसुर संस्थानातील शामशास्त्री यानीं १९१५ त कौटिल्याच्या अर्थशास्त्राचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केलें. त्याला डॉ. जे. एफ्. फ्लीट यानीं प्रस्तावना लिहिलेली आहे. त्या प्रस्तावनेंत त्यानीं म्हटलें आहे :

Chāṇakya, tradition tells us, overthrew the last king of the Nanda dynasty and placed the great Maurya Chandragupta on the throne thus, the two* verses with which the work ends recite that it was written by Vishnugupta, who from intolerance of misrule rescued the scriptures, the science of weapons, and the earth which had passed to the Nanda king, and that he wrote it because he had seen many discrepancies on the part of previous commentators,

---

* येन शास्त्रं च शस्त्रं च नन्दराजगता च भूः ।
अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ॥
दृष्ट्वा विप्रतिपत्तिं बहुधा शास्त्रेषु भाष्यकाराणाम् ।
स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रं च भाष्यं च ॥

आणि श्रीसमर्थांनीं तरी दुसरें काय केलें ? मुसलमानी सत्तेला शह देऊन व ती संपुष्टात आणून श्रीशिवरायाकरवीं रामराज्याची स्थापना केली, धर्माचें रक्षण केलें, भूभार हरण केला, जगदुद्धार केला, आणि

' मतें मतांतरें सगट । प्रत्यये बोलोन '

सपाट केलीं. ह्याच प्रस्तावनेंत फ्लीट पुढें म्हणतात :

Kauṭilya is renowned, not only as a King maker, but also for being the greatest Indian exponent of the art of government, the duties of kings, ministers and officials, and the methods of diplomacy.

आणि आपल्या श्रीसमर्थांनीं हि ठिकठिकाणीं राजकारणाचे अनेक धडे घालून दिले, राजधर्म-क्षात्रधर्म सेवकधर्म सांगितले, धूर्तपणाचीं आणि चातुर्याचीं लक्षणें प्रतिपादिलीं आणि

' करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये ॥ '

परभारें ' ठुम्याची हुया लाऊन द्यावा,' इत्यादि राजनीतींतील असंख्य तऱ्हा प्रकट केल्या.

( ७ ) दृष्टान्त तितुका नेहमी एकदेशी असतो, तो संपूर्णांशानें केव्हा च मानावयाचा नसतो, हें लक्षात ठेवलें पाहिजे. कवि या नात्यानें श्रीसमर्थांना वाल्मीकीची उपमा देतात, ती जशी कवित्वापुरती च मानावयाची असते, वाल्मीकीच्या आरंभींच्या चरित्राकडे पहावयाचें नसतें, तद्वत्‌च आर्य चाणक्याच्या राजकीय कर्तृत्वशक्तीपुरती च त्याची उपमा येथें अपेक्षित आहे, असें समजावें.

( ८ ) एकएकाचा एक एक गुण श्रीसमर्थांच्या ठिकाणीं होता व तेवढ्यापुरता प्रत्येकाचा दृष्टांत त्यांना लागू करावयाचा. श्रीसमर्थांचे एक चरित्रकार उद्धवसुत यांचें श्रीसमर्थांवर एक अष्टक आहे. त्याचा पहिला श्लोक

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।
वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ।
कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥

असा आहे. तो मला पहिल्यापासून फार आवडतो. त्यात वैराग्य, ज्ञान, कवित्व या तीन गोष्टी आल्या आणि एकच राहिली, असें मला वाटलें. म्हणून उद्धव--

-सुताची क्षमा मागून त्याच्या चवथ्या चरणाऐवजीं मी निराळा चरण योजीत असतों. मी माझ्या मनाशीं म्हणत असतो तो सबंध श्लोक असा :

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।
वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ।
कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा ।
मला भासला आर्य चाणक्य जैसा ॥

या श्लोकानें आता त्याच्या चतुरंग अधिकाराचें दिग्दर्शन होतें. शुकासारिखे ते सिद्ध होते, वसिष्ठाप्रमाणें तत्त्वज्ञानी होते, वाल्मीकीच्या तोलाचे कवि होते. आणि इतके सर्व असून आर्य चाणक्याप्रमाणें ते निस्पृह, कर्तृत्ववान्, राजनीति-निपुण होते हे चारहि अधिकार दर्शविण्यासाठीं क्रमश: Prophet, Philosopher, Poet व Politician असे चार इंग्रजी शब्द योजिता येतील.

( ९ ) श्रीसमर्थवाङ्मय आणि श्रीसमर्थचरित्र यांच्या आधारें हे चारहि अधिकार प्रस्थापित करता येतील, असें मला वाटतें. सर्वांत मोठा अधिकार कृतबुद्धि सिद्धाचा. त्याच्यानंतर बाकीचे तीन अधिकार एकाखालीं एक येतात-कनिष्ठ अधिकार म्हणजे राजकीय कर्तृत्वाचा श्रीसमर्थांच्या पहिल्या तीन अधिकाराविषयीं फारशी कोणी शंका प्रदर्शित करीत नाहींत. मधून मधून काहींहि रण माजविण्यात येतें तें शेवटल्या अधिकाराच्या बाबतींत. पण तो अधिकार सिद्ध करण्याला एकटा श्रीमत् दासबोध ग्रन्थ हि समर्थ आहे. दासबोध ग्रन्थ म्हणजे प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें च स्वरूप होय दासबोध म्हणजे श्रीसमर्थांचें आत्मचरित्र होय, असें मी मानीत आलों आहें. मोठ्या आशेनें त्यात मी त्यांना शोधीत असतों, दशकात शोधतों, समासांत पहातों, ओवी ओवीला विचारतों. मला त्यांचा शोध लागला, किंवा मीं त्यांना पाहिलें किंवा मला उत्तर मिळालें, असें मी म्हणत नाहीं. इतकें भाग्य कोठें आहे ! पण ते तुमते माझ्यात इतकें मात्र खरें. एकट्या दासबोधात हि त्यांची सिद्धावस्था पहावी, त्यांचें तत्त्वज्ञान पडताळून घ्यावें, कवि म्हणून त्यांना ओळखावें आणि राजकारणांतील त्यांचें नैपुण्य प्रत्ययास आणावें. आज फक्त शेवटच्या अधिकाराचा प्रश्न आहे, म्हणून ग्रन्थराजांतील ज्या अनेक वचनांकडे पाहून मला त्यांचा तो अधिकार भासतो, त्यापैकीं ठळक अशीं अवघीं तीस वचनें येथें वाचकांस सादर करावीं, असें मनांत येतें.

## ( १ ) दासबोध वाचल्यानें

भ्रांत अवगुणी अवलक्षण । ते चि होती सुलक्षण ।
धूर्त तार्किक विचक्षण । समयो जाणती ॥ १-१-३२

## ( २ ) विरक्त कसा असावा – नसावा

विरक्तें उपाधी करावी । आणी उदास वृत्ति न सडावी ।
दुराशा जडों नेदावी । कोणयेकविषईं ॥ २-९-२६
विरक्तें समय जाणावा । विरक्तें प्रसंग वोळखावा ।
विरक्त चतुर असावा । सर्व प्रकारें ॥ २८
विरक्तें येकदेसी नसावें । विरक्तें सर्व अभ्यासावें ।
विरक्तें अदर्वे जाणावें । ज्याचें त्यापरी ॥ २९
विरक्तें असावें जगमित्र । विरक्तें असावें स्वतंत्र ।
विरक्तें असावें विचित्र । बहुगुणी ॥ ३४

## ( ३ ) रघुनाथ भजनाचा रोकडा चमत्कार

आमुचें कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।
जो समर्थांचा हि समर्थ । देवां सोडविता ॥ ६-७-२१
त्याचे आम्ही सेवकजन । सेवेकरितां जालें ज्ञान ।
तेथें अभाव धरितां पतन । पाविजल कीं ॥ २२
तरी आता ऐसें न करावें । रघुनाथभजनीं लागावें ।
तेणें चि ज्ञान बोलावें । चळेना ऐसें ॥ २८
करी दुर्जनाचा सव्हार । भक्तजनासी आधार ।
ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥ २९
मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघें चि नासोन जातें ।
कृपा केलिया रघुनाथें । प्रचित येते ॥ ३०
रघुनाथभजनें ज्ञान जालें । रघुनाथभजनें महत्व वाढलें ।
म्हणोनियां तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१
हें तों आहे सप्रचित । आणी तुज वाटेना प्रचित ।
साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ३२

## ( ४ ) श्रीसमर्थसंप्रदायाचीं कांहीं लक्षणें

अनन्य राहे समुदाव । इतर जनास उपजे भाव ।
ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ११-५-३

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्वं विषईं ॥ ४
चौथा अत्यंत साक्षप । फेडावे नाना आक्षप ।
अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५
जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर ।
नीतिन्यायासि अंतर । पडों च नेदावें ॥ ६
संकेतें लोक वेधावा । येकूनयेक बोधावा ।
प्रपंच हि सावरावा । येथानशक्त्या ॥ ७
प्रपंच समयो वोळखावा । धीर बहुत असावा ।
संमंध पडों नेदावा । अति परी तयाचा ॥ ८
उपाधीसी विस्तारावें । उपाधींत न संपडावें ।
नीचत्व पहिलें च घ्यावें । आणि मूर्खपण ॥ ९
दोष देखोन झांकावे । अवगुण अखंड न बोलावे ।
दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥ १०
तन्हे भरों च नये । सुचावे नाना उपाये ।
नव्हे तें चि करावें कार्ये । दीर्घ प्रेत्नें ॥ ११
फड नासों चि नेदावा । पडिला प्रसंग सावरावा ।
अतिवाद न करावा । कोणी येकासी ॥ १२
दुसऱ्याचें अभिष्ट जाणावें । बहुताचें बहुत सोसावें ।
न सोसे तरी जावें । दिगांतराप्रती ॥ १३
दुःख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोन तरी वांटून घ्यावें ।
बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥ १४
अपार असावें पाठांतर । सन्निध चि असावा विचार ।
सदा सर्वदा तत्पर । परोपकारासी ॥ १५
शांती करून करवावी । तन्हे सांडून सांडवावी ।
क्रिया करून करवावी । बहुतांकरवीं ॥ १६
करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये ।
परस्परें चि प्रत्यये । प्रचितीस आणावा ॥ १७
जो बहुतांचें सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना
बहुत सोसितां उरेना । महत्व आपुलें ॥ १८
राजकारण बहुत करावें । परंतु कळों च नेदावें ।
परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ १९

लोक पारखून सांडावे । राजकारणें अभिमान झाडावे ।
पुन्हा मेळऊन घ्यावे । दुर्लिळ दोरें ॥ २०
हिरवटासी दुरी धरावें । कचरगासीं न चोलावें ।
समध पडतां सोडून जावें । येकीकडे ॥ २१
ऐसे असो राजकारण । सांगतां तें असाधारण ।
सुचित असतो अंत:करण । राजकारण जाणे ॥ २२

## ( ५ ) धारणेचा पुरुष

जाणायाचें सांगतां न ये । सांगायाचें नेमस्त न ये ।
समजल्याविण काहीं च न ये । कोणी येक ॥ ११-६-३
हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण ।
वर्तायाचें लक्षण । तें हि असावें ॥ ४
सांकडीमधें वर्तों जाणे । उपाधीमधें मिळों जाणे ।
अलिप्तपणें राहों जाणें । आपणासीं ॥ १३
आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठें चि नाहीं ।
जैसा अंतरात्मा ठाईंचा ठाईं । गुप्त जाला ॥ १४
त्यावेगळें काहीं च नसे । पाहों जातां तो न दिसे
न दिसोन वर्तवीतसे । प्राणीमात्रांसी ॥ १५
तैसा च हा हि नानापरी । बहुत जनास शाहाणे करी
नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६
आपणाकरितां शाहाणे होती । ते सहज चि सार्थ धरिती
जाणतेपणाची महती । ऐसी असे ॥ १७
राखों जाणे नीतिन्याय । न करी न करवी अन्याय
कठीण प्रसंगीं उपाये । करूं जाणे ॥ १८
ऐसा पुरुष धारणेचा । तो चि आधार बहुतांचा ।
दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९

## ६ ) श्रीसमर्थांनीं सांगितलेलें प्रत्यक्ष आत्मचरित्र !

मुर्ख येकदेसी होतो । चतुर सर्वत्र पाहातो ।
जैसा बहुधा होऊन भोगितो । नाना सुखें ॥ ११-१०-१
तो चि अंतरात्मा महंत । तो कां होईल संकोचित ।
प्रशस्त जाणता समस्त । विख्यात योगी ॥ २
कर्ता भोक्ता तत्वता । मूमंडळीं सर्व सत्ता ।
त्यावेगळा त्यास ज्ञाता । पाहेसा कवणु ॥ ३

ऐसें महंतें असावें । सर्व सार शोधून घ्यावें ।
पाहों जातां न सपडावें । येकायेकीं ॥ ४
कीर्तिरूपें उदंड ख्यात । जाणती लाहान थोर समस्त ।
वेश पाहातां शाश्वत । येक हि नाहीं ॥ ५

प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनास कळेना ।
पाहों जातां आडळेना । काये कैसें ॥ ६
वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण ।
चाळणेविण येक क्षण । जाऊं च नेदी ॥ ७

त्यागी वोळखाचे जन । सर्वकाळ नित्य नूतन ।
लोक शोधून पाहातां मन । परी इच्छा दिसेना ॥ ८
पुढें कोणाकडे पाहेना । पुढें कोणासीं बोलेना ।
पुढें येके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ९

जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना ।
आपुली स्थिती अनुमाना । येवों च नेदी ॥ १०
लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें तें उलथवी ।
लोकीं तर्किलें तें दावी । निष्फळ करूनी ॥ ११

लोकांस पाहाणें आदर । तेथें याचा अनादर ।
लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिच्छा ॥ १२
एवं कल्पितां कल्पेना । नाना तर्कितां हि तर्केना ।
कदापी मार्दिलां मावेना । योगेश्वर ॥ १३

ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठाईं पडेना ।
क्षणयेक विसांवेना । कथाकीर्तनें ॥ १४
लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघे चि निष्फळ होती ।
जनाची जना लाजवी वृत्ती । तेव्हां योगेश्वर ॥ १५

बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें ।
तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १६
अखंड एकांत सेवावा । अभ्यास तो करीत जावा ।
काळ सार्थक चि करावा । जनासहित ॥ १७
उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास सिकवावे ।
उदंड समुदाय करावे । परी गुप्तरूपें ॥ १८
अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग ।
लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ॥ १९

आधीं कष्ट मग फळ । कष्ट चि नाहीं तें निर्फळ ।
साक्षेपेंविण केवळ । वृथापुष्ट ॥ २०
लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ।
जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ २१
अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नस्तां वेर्थ जातें ।
जाणोनि शोधावीं चित्तें । नाना प्रकारें ॥ २२
अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें ।
आपला मगज राखणें । काहींतरी ॥ २३
हें प्रचितीचें बोलिलें । आधी केलें मग सांगितलें ।
मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीयेकें ॥ २४
महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विसरावे । नाना देसीं ॥ २५

## ( ७ ) दीर्घसूचनेचे लोक

पर्णाळि पाहोन उचलें । जीवसृष्टि विवेकें चालें ।
आणि पुरुष होउन भ्रमले । त्यासी काये म्हणावें ॥ १२-१-११
म्हणौन असावी दीर्घ सूचना । अखंड करावी चाळणा ।
पुढील होणार अनुमाना । आणून सोडावें ॥ १२
सुखी असतो खबर्दार । दुःखी होतो बेखबर ।
ऐसा हा लौकिक विचार । दिसत चि आहे ॥ १३
म्हणौन सर्व सावधान । धन्य तयाचें महिमान ।
जनीं राखे समाधान । तो येचि येक ॥ १४
चाळणेचा आळस केला । तरी अवचिता पडेल घाला ।
ते वेळे सावरायाला । अवकाश कैंचा ॥ १५
म्हणौन दीर्घसूचनेचे लोक । त्यांचा पाहावा विवेक ।
लोकांकरितां लोक । शाहाणे होती ॥ १६
परी ते शाहाणे वोळखावे । गुणवंताचे गुण घ्यावे ।
अवगुण देखोन सांडावे । जनामधें ॥ १७
मनुष्य पारखूं राहेना । आणि कोणाचें मन तोडीना ।
मनुष्यमात्र अनुमाना । आणून पाहे ॥ १८
दिसे सकळांस सारिखा । पाहातां विवेकी नेटका ।
कामी निकामी लोकां । बरें पाहे ॥ १९
जाणोन पाहिजेत सर्व । हे चि तयाचें अपूर्व ।
ज्याचें त्यापरी गौरव । राखों जाणे ॥ २०

## (८) खरी विद्या

जगदांतर निवळत गेलें। जगदांतरीं सख्य जालें।
मग जाणावें वोळलें। विश्वजन ॥ १२-२-१९
जनींजनार्दन वोळला। तरी काये उणें तयाला।
राजी राखावें सकळांला। कठीण आहे ॥ २०
हरिकथानिरूपण। बरेपणें राजकारण।
प्रसंग पाहिल्याविण। सकळ खोटें ॥ २९
विद्या उदंड चि सिकला। प्रसंगमान चुकत चि गेला।
तरी मग तये विद्येला। कोण पुसे ॥ ३०

## (९) धूर्त आणि विचक्षण

जीव जीवांत घालावा। आत्मा आत्म्यांत मिसळावा।
राहराहों शोध घ्यावा। परांतरांचा ॥ १५-१-४
जो जगदांतरें मिळाला। तो जगदांतर चि जाला।
अरत्रीं परत्रीं तयाला। काये उणें ॥ १४
आचारविचारेंविण। जें जें करणें तो तो सीण।
धूर्त आणि विचक्षण। तें चि शोधावें ॥ २४
उदंड बाजारी मिळाले। परी ते धूर्तें चि आळिले।
धूर्तांपासीं कांहीं न चले। बाजाऱ्याचें ॥ २५
धाकाऱ्णें मुख्य मुख्य। तयासी करावें सख्य।
येणें करितां असंख्य। बाजारी मिळती ॥ २६
धूर्तांसि धूर्त चि आवडे। धूर्त धूर्तीं च एवाडे।
उगे चि हिंडती वेडे। कार्येंविण ॥ २७
धूर्तांसि धूर्तपण कळलें। तेणें मनास मन मिळालें।
परी हें गुप्तरूपें केलें। पाहिजे सर्वें ॥ २८
वेष धरावा बावळा। अंतरीं असाव्या नाना कळा।
सगट लोकांचा जिव्हाळा। मोडूं नये ॥ ३१
येके ठाईं बैसोन राहिला। तरी मग व्याप चि बुडाला।
सावधपणें ज्याला त्याला। भेटि द्यावी ॥ ३४

## (१०) श्रीसमर्थांची सत्ता चालली गुप्तरूपें

प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें। जाणे सकळांचीं अंतरें।
निरूपणें तदनंतरें खटक लागे ॥ १५-२-१६

मतें मतांतरें सगट । मध्यें बोलोन करी सपाट ।
दडक सोडून नीट । वेधी जना ॥ १७
नेमकें भेदकें वचनें । असड पाहे प्रसंगमानें ।
उदास वृत्तीच्या गुमानें । उठोन जातो ॥ १८
मध्यें बोलोन उठोन गेला । चरक लागली लोकांला ।
नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १९
परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना ।
वेष पाहातां हीन दीना । सारिखा दिसे ॥ २०
उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।
तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१
ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी ।
मठ्रमतांची गोवी । लागों च नेदी ॥ २२
रानाळामधें जाऊन राहे । तेथें कोणी च न पाहे ।
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३
अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहाणें नेमक ।
सृष्टीमधें सकळ लोक । धुडोन येती ॥ २४
तथें कोणाचें चालेना । अनुमात्र अनुमानेना ।
कष्ट घालून राजकारणा । लोक लावी ॥ २५
लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६

## ( ११ ) व्याप आटोप

व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती ।
तेणें प्राणी सदेव होती । देखतदेखतां ॥ १५-३-७
ऐसें हें आतां वर्ततें । मूर्ख लोकांस कळेना तें ।
विवेकी मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ ८

## ( १२ ) धके चपेटे

धके चपेटे सोसावे । नीच शब्द साहात जावे ।
प्रस्तावान परावे । आपले होती ॥ १५-६-२२
प्रसंग जाणोनि बोलावें । आपपण कांहीं च न घ्यावें ।
लीनता धरून जावें । जेथतेथें ॥ २३
कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें ।
भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ २४

## (८) तरी वियोग

जगदांतर निवळत गेलें। जगदांतरीं सख्य जालें।
मग जाणावें पीकलें। विश्वजन॥ १२-२-१९
जनीजनार्दन वोळला। तरी काये उणें तयाला।
राजी राखावें सकळांला। कठीण आहे॥ २०
हरिकथानिरूपण। बरेपणें राजकारण।
प्रसंग पाहिल्याविण। सकळ वोंगें॥ २९
वियोग उदंड चि मिळाला। मसगमान चुकत चि गेला।
तरी मग तये वियोगा। कोण पुसे॥ ३०

## (९) धूर्त आणि विचक्षण

जीव जीवांत घालावा। आत्मा आत्म्यांत मिसळावा।
राहराहों शोध घ्यावा। परांतरीचा॥ १५-१-४
जो जगदांतरें मिळाला। तो जगदांतर चि जाला।
आत्मीं परत्रीं तयाला। काये उणें॥ १४
आचारविचारेंविण। जें जें करणें तो तो सीण।
धूर्त आणि विचक्षण। त चि शोधावे॥ २४
उदंड वाजारी मिळाले। परी ते धूर्ते चि आकळिले।
धूर्तापासीं कांहीं न चले। वाजारीयांचें॥ २५
पाकाणें मुख्य मुख्य। तयासी करावें सख्य।
येणें करितां असंख्य। वाजारी मिळती॥ २६
धूर्तांसि धूर्त चि आवडे। धूर्त धूर्तीं च पवाडे।
उगे चि हिंडती वेडे। कार्येविण॥ २७
धूर्तासि धूर्तपण कळलें। तेणें मनास मन मिळालें।
परी हें गुप्तरूपें केलें। पाहिजे सर्वें॥ २८
वेष धरावा बावळा। अंतरीं असाव्या नाना कळा।
सगट लोकांचा जिव्हाळा। मोडूं नये॥ ३१
येके ठाईं बैसोन राहिला। तरी मग व्याप चि बुडाला।
सावधपणें ज्याला त्याला। भेटि यावी॥ ३४

## (१०) श्रीसमर्थांची सत्ता चालली गुप्तरूपें

प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें। जाणे सकळांचीं अंतरें।
निरूपणें तदनंतरें घटक लागे॥ १५-२-१६

मतें मतांतरें सगट । प्रत्यये बोलोन करी सपाट ।
दडक सांडून नीट । वेधी जना ॥ १७
नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें ।
उदास वृत्तीच्या गुमानें । उठोन जातो ॥ १८
प्रत्यये बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला ।
नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १९
परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना ।
वेष पाहातां हीन दीना । सारिखा दिसे ॥ २०
उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।
तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१
ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी ।
मछरमताची गोवी । लागों च नेदी ॥ २२
सनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणी च न पाहे ।
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३
अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहाणें नेमक ।
सृष्टीमधें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४
तेथें कोणाचें चालेना । अनुमात्र अनुमानेना ।
कष्ट घालून राजकारणा । लोक लावी ॥ २५
लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६

## ( ११ ) व्याप आटोप

व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती ।
तेणें मार्गी सदेव होती । देसतदेसतां ॥ १५-३-७
ऐसें हें आतां वर्ततें । मूर्ख लोकांस कळेना तें ।
विवेकी मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ ८

## ( १२ ) धके चपेटे

धके चपेटे सोसावे । नीच शब्द साहात जावे ।
प्रस्तावोन परावे । आपले होती ॥ १५-६-२२
प्रसंग जाणोनि बोलावें । जाणपण कांहीं च न घ्यावें ।
लीनता धरून जावें । जेथतेथें ॥ २३
कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें ।
भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ २४

बहुतीं कांहींतरी सांपडे । विचक्षण लोकीं मित्री घडे ।
उगे च बैसतां कांहीं च न घडे । किर्ति विवर्णे ॥ २५
सावधपणें सर्व जाणावें । वर्तमान आधीं च घ्यावें ।
जाऊं ये तिकडे जावें । विवेकें सहित ॥ २६

## ( १३ ) श्रीशिवरायास देणें ईश्वराचें

नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर शृंघारणें ।
विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंघारिजे ॥ १८-६-१
शरीर सुंदर सतेज । वरी भूषणें केलें सज्ज ।
अंतरीं नस्तां चातुर्यबीज । कदापी शोभा न पव ॥ २
तुंड हेंकाड कठोरवचनी । असड तोले साभिमानी ।
न्याय नाति अंत कर्णीं । घेणार नाहीं ॥ ३
तन्हे सीघ्रकोपी सदा । कदापि न धरी मर्यादा ।
राजकारण सर्वदा । मिळों चि नेणें ॥ ४
ऐसे लोंद बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं ।
पापी अपस्मार जनीं । राक्षेस जाणावें ॥ ५
समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना ।
नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ ६
आलें स्वतंत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें ।
हटनिग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥ ७
बहुत ।चि करितां हट । तेथें येऊन पडिले तट ।
कोणीयेकाचा सेवट । जाला पाहिजे ॥ ८
बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजाभोवानी ।
परंतु विचार पाहोना । कार्य करणें ॥ ९
असड चि सावधाना । बहुत कायें'करावी सूचना ।
परंतु कांहीं येक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ १०
समर्थापासीं बहुत जन । राहिला पाहिजे साभिमान ।
निश्चळ करूनिया मन । लोक असती ॥ ११
म्लेंच दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ।
याकारणें अखंड । सावधान असावें ॥ १२
सकळकर्ता तो ईश्वरु । तेणें केला अंगिकारु ।
तया पुरुषाचा विचारु । विरळा जाणे ॥ १३
न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंगप्रकार

परीक्षिणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १४
माहायेल सावधपणें । समई धारिष्ट धरणें ।
अद्भुत चि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १५
येश कीर्ती प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा ।
नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६
देव ब्राम्हण आचार विचार । कितेक जनासी आधार ।
सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७
येहलोक परलोक पाहाणें । अखंड सावधपणें राहाणें ।
बहुत जनाचें साहाणें । देणें ईश्वराचें ॥ १८
देवाचा कैपक्ष घेणें । ब्राम्हणाची चिंता वाहाणें ।
बहु जनासी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९
धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ २०
उत्तम गुणाचा माहिक । तर्क तीक्ष्ण विवेक ।
धर्मवासना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥ २१
सकळ गुणांमधें सार । तजविजा विवेक विचार ।
जेणें पाविजे पैलपार । अरत्रपरत्रींचा ॥ २२

## ( १४ ) कष्ट आणि भाग्य

कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं ।
केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥ १८–७–३
आधीं कष्टाचें दुःख सोसिती । ते पुढें सुखाचें फळ भोगिती ।
आधीं आळसें सुखावती । त्यासी पुढें दुःख ॥ ५
येहलोक अथवा परलोक । दोहिंकडे सारिसा चि विवेक ।
दीर्घ सूचनेचें कौतुक । कळलें पाहिजे ॥ ६
जेहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले ।
येर ते बोलत चि राहिले । करंटे जन ॥ १६

## ( १५ ) श्रीसमर्थपदवी

बहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी ।
ऐसी हे समर्थपदवी । विवेकें होते ॥ १८–२–२६

* * * *

प्रपंची जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण ।
सर्वांमधें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १९–४–१७

## (१६) उत्कट भव्य तें चि घ्यावें

ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या ।
संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥ १९–६–१४
उत्कट भव्य तें चि घ्यावें । मळमळीत अवघें चि टाकावें ।
निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ १५
अक्षर बरें वाचणें बरें । अर्थांतर सांगणें बरें ।
गाणें नाचणें अवघें चि बरें । पाठांतर ॥ १६
दीक्षा बरी मात्री बरी । तीक्ष्ण बुधी राजकारणीं बरी ।
आपणास राखे नानापरी । अलिप्तपणें ॥ १७
दुर्जनासी राखों जाणे । सज्जनासी निवऊं जाणे ।
सकळांचे मनींचें जाणे । ज्यांचें त्यापरी ॥ १९
सगतीचें मनुष्य पालटे । उत्तम गुण तत्काळ उठे ।
असाड अभ्यासीं लगटे । समुदाव ॥ २०
जेथें तेथें नित्य नवा । जनासी वाटे हा असावा ।
परंतु लालचीचा गोवा । पडों चि नेदी ॥ २१
उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन ।
उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ॥ २२
उत्कट निस्पृहता धरिली । त्याची कीर्ति दिगांतीं फांकली ।
उत्कट भक्तीनें निवाली । जनमंडळी ॥ २३
कांहीं येक उत्कटेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण ।
उगें च वणवण हिंडोन । काये होतें ॥ २४
नाहीं देहाचा भरवसा । केव्हां सरेल वयसा ।
प्रसग पडेल कैसा । कोण जाणे ॥ २५
या कारणें सावधान असावें । जितुकें होइल तितुकें करावें
भगवत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥ २६
आपणांस जें जें अनकूळ । तें तें करावें तत्काळ ।
होईना त्यास निवळ । विवेक उमजावा ॥ २७
विवेकामध्यें सांपडेना । ऐसें तों कांहीं च असेना ।
येकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ २८
अगाद तनर्कजा चाळणा जेथें । पाहातां काये उणें तेथें
येकांतेंविण प्राणीयातें । बुद्धि कैंची ॥ २९

येकांतीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ।
येथून तेथवरी गोवा । कांहीं च नाहीं ॥ ३०

## ( १७ ) गाजी

सृष्टिमधें बहु लोक । परिभ्रमणें कळे कौतुक ।
नाना प्रकारींचे विवेक । आडळों लागती ॥ १९-८-१
किती प्रपंची जन । असड वृत्ती उदासीन ।
सुखदुखें समाधान । दृढलेंना ॥ २
स्वभावें चि नेमक बोलतो । सहज चि नेमक चालतो ।
अपूर्व बोलण्याची स्थिती । सकळांसि माने ॥ ३
सहज चि ताळज्ञान येतें । स्वभावें चि रागज्ञान उमटतें ।
सहज चि कळत जातें । त्यावेगळीं लक्षण ॥ ४
येसादा आडळे गाजी । सकळ लोक असड राजी ।
सदा सर्वदा आवडी ताजी । प्राणीमात्राची ॥ ५

## ( १८ ) जैशास तैसा

ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास ।
तेणें असड सावकाश । येकांत सेवावा ॥ १९-९-१
जेथें तजवीजा कळती । असड चाळणा निघती ।
प्राणीमात्राची स्थिती गती । कळों येते ॥ २
आळसें आळस केला । तरी मग कारबार चि बुडाला ।
अंतरहेत चुकत गेला । समुदायाचा ॥ ७
नष्टासी नष्ट योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे ।
आपणावरी विकल्पाचे गोवे । पडों च नेदी ॥ ११
कांटीनें कांटी झाडावी । झाडावी परी ते कळों नेदावी ।
कळकटेपणाची पदवी । असों द्यावी ॥ १२
जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।
जो आपण चि कष्टत गेला । तो चि भला ॥ १६
अवघ्यास अवघें कळलें । तेव्हां तें रितें पडिलें ।
याकारणें ऐसें घडलें । न पाहिजे कीं ॥ १७
मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें ।
कित्तेक खलक उगवावे । राजकारणामधें ॥ १८
धोलके पहिलवान कळकटे । तयासी च द्यावे झटे ।
दुर्जनें राजकारण दाटे । ऐसें न करावें ॥ १९

दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे ।
सज्जनापरीस आळवावे । महत्व देउनी ॥ २३
जनामधें दुर्जन प्रगट । तरी मग असाड खटखट ।
याकारणें ते वाट । बुझूनि टाकावी ॥ २४
गनीमाच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा ।
ऐसा पाहिजे कीं राजा । केपक्षी परमार्थी ॥ २५
हे धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ।
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७
कोठें च पडेना दृष्टी । ठाई ठाई त्याच्या गोष्टी ।
वाग्विळासें सकळ सृष्टी । वेधिली तेणें ॥ २८
हुन्यासी हुंवा लाऊन द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ।
लौंदास पुढें उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९
धटासी आणावा धट । उत्पटासी पाहिजे उत्पट ।
खटनटासी खटनट । अगत्य करी ॥ ३०
जैशास तैसा जेव्हां भेटे । तेव्हां मज्यालसी थाटे ।
इतुकें होतें परी धनी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१

## (१९) धकाधकींचा मामला

जेथें असंड नाना चाळणा । जेथें असड नाना धारणा ।
जेथें असड राजकारणा । मनासी आणिती ॥ १९-१०-१
उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे ।
भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ ८
जाणती परी आडळेना । काये करितो तें कळेना ।
नाना देशींचे लोक नाना । येऊन जाती ॥ ९
तितुक्यांची अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं ।
कडोविकडीचीं विवरावीं । अंत:करणें ॥ १०
किती लोक तें कळेना । किती समुदाव आकळेना ।
सकळ लोक श्रवण मनना । मध्यें घाली ॥ ११
धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ।
नाना बुद्धि शक्ताला । म्हणोनी सिकवाव्या ॥ १२
व्याप होईल तों राहावें । व्याप राहतां उठोन जावें ।
आनंदरूप फिरावें । कोठें तरी ॥ १३ ॥

उपाधींपासुनी सुटला । तो निस्पृहपणें चळावला ।
जिकडे अनकूळ तिकडे चालिला । सावकास ॥ २४
कीर्ति पाहतां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ति नाहीं ।
केल्याविण काहीं च नाहीं । कोठें तऱ्ही ॥ २५

## ( २० ) सामर्थ्य

सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।
परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २० ४ २६

( १० ) या सर्व खटाटोपाची मला स्वतःला आवश्यकता भासत नाहीं. ज्या संप्रदायप्रवर्तकानें आपल्या संप्रदायाच्या लक्षणांतच परमार्थाच्या खालोखाल राजकारणाला स्थान दिलें, त्या आद्यप्रवर्तकाचा राजकारणाशीं काहीं संबंध होता किंवा नाहीं, असा प्रश्न तरी कसा उत्पन्न होऊं शकतो, हेंच मला समजत नाहीं तथापि प्रश्न उद्भवला आहे खरा, तेव्हां त्याचा विचार अवश्य करावा लागतो व केला पाहिजे वास्तविक पाहता असा प्रश्न च उद्भवू नये कोणीं गाय मारली म्हणून काय ब्राह्मणानें वासरू मारण्यास पुढें सरसावें ? कोणीं इतर साधुवताना अकारण नांवें ठेविलीं म्हणून काय श्रीसमर्थ जसे होते तसे नव्हते असें असत्य प्रतिपादन करण्याचा आपण अट्टहास करावा ! श्रीसमर्थांच्या वाङ्मयातील एखादा शब्द आपल्या प्रतिपादनास नडतो म्हणून त्या शब्दाचा साऱ्या जगानें मानलेला जो अर्थ तो श्रीसमर्थांपुरता मात्र निराळा होता, असलें प्रतिपादन करण्याला आपण प्रवृत्त व्हावें, हें कोणी हि आपल्या सद्हेतूचें लक्षण मानील काय ? असल्या प्रयत्नाला कधीं तरी यश आलें आहे काय ? मजवर हि कोण काय आरोप करतील त्याची जाणीव मला आहे निर्णय देण्याचें काम वाचकाचें आहे माझ्यातर्फे मी फक्त एवढेंच म्हणेन कीं, माझा प्रयत्न पूर्वजांनीं आधींच उभारलेल्या मंदिराचा जीर्णोद्धार करण्याचा तरी आहे, आक्षेपकाच्याप्रमाणें विध्वंसनाचा नव्हे !

( ११ ) वर उद्धृत केलेलीं ग्रन्थराजांतील वचनें वाचून वाचकाच्या मनावर जे संस्कार होतील तेच संस्कार श्रीसमर्थचरित्रांतील काहीं विश्वसनीय प्रसंगांवरून हि होण्यासारखे आहेत. तसले दोन चार प्रसंग यापूर्वी पुष्कळदा इतरत्र सांगितले होते ते आणखी एकवार आज या निमित्तानें सांगतों ते कृपा करून ऐका आणि श्रीसमर्थ आपणास जसे भासतील तसे त्यांना पहा.

( १२ ) श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर हे काहीं वर्षे श्रीसमर्थांपाशीं होते त्यांनीं

समर्थस्वामींचीं चरित्रें । कांहीं देखिलीं ऐकिलीं पुण्यश्लोत्रें । १-५

त्यामुळें श्रीसमर्थांच्या चरित्रग्रन्थात श्रीसमर्थप्रताप हा ग्रन्थ विश्वसनीय मानण्यात येतो. त्यात श्रीसमर्थांची ल्हानपणची एक गोष्ट दिली आहे. श्रीसमर्थांच्या वयाच्या अकराव्या वर्षी त्यांचे वडील गेले. त्याना एक च वडील बंधु होते. त्यांचें हि वय त्या वेळीं सुमारें चौदा वर्षांचें होतें अशा अल्प वयात प्रपचाचा सारा भार त्याच्यावर पडला. बारा गावचें कुलकर्णपण त्याना पहावें लागे. अशा स्थितींत एकदा मातुश्री राणुबाई नारायणाला म्हणाल्या,'नारायणा, तू कांहीं आता लहान नाहींस, गगाधर तरी तुझ्यापेक्षां तीन च वर्षांनीं मोठा आहे, त्याला सारा कारभार पहावा लागतो. तू कांहीं प्रपचाची चिंता करीत जा.' आईचें बोलणें ऐकून नारायण कोणास न कळत अडगळीच्या खोलींत जाऊन आसन घालून ध्यानस्थ होऊन चिंता करीत बसला. तिन्ही सांजा झाल्या, नारायण कोठें दिसेना. आईनें सर्वत्र शोध केला. येईल अशी समजूत करून घेऊन कांहीं कामानिमित्त त्या त्या खोलींत गेल्या, तों कोणास त्याचा पाय लागला. 'कोण रे बसलें आहे येथें ?' 'मी नारायण.' आईनें विचारलें, नारायणा,

बापा काय हें करितोसी येकांतस्थळीं ।

आईनें सांगितलें होतें, तू हि कांहीं प्रपचाची चिंता करीत जा, म्हणजे तेवढी च गगाधराला सोडवणूक होईल, आणि नारायण उत्तर देतो.

आई चिंता करितों विश्वाची ॥ २-२२

ही जी वयाच्या अकराव्या वर्षी या बाळानें विश्वाच्या कल्याणाची चिंता वाहिली, तीच साऱ्या जन्मभर केली.

श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती ।
प्रांतीचे लोक दर्शनासी येती ।
सकळ प्रांतींचा स्वामी परामृश घेती ।
चिंता करिती विश्वाची ॥ २०-५८
देशकाळ वर्तमानें ।
आपण चिंताग्रस्थ होती मनें ।
म्हणती कैसी वाचतील जनें ।
कैसी ब्राह्मण्यें राहतील ॥ ५९
कैसी क्षेम राहेल जगती ।

कैसीं देवदेवाल्ये तगती ।
कैसे कुटुनवछल लोक जगती ।
कोणेकडे जातील हे ॥ ६०

यात काहीं राजकारण भासत असेल तर श्रीसमर्थांनीं राजकारण केलें म्हणावें, नसेल तर नाहीं केलें म्हणावें

( १३ ) आज राजसत्ता ज्याचे हातीं आहे, त्याच्यापासून धर्माला प्रत्यक्ष उपसर्ग पोंचत नाहीं. त्या काळीं प्रत्यक्ष धर्मावर संकट ओढवलें होतें, वेळ आणीबाणीची आली होती, धर्म टिकणार का बुडणार, असा प्रसंग येऊन ठेपला होता. आज खायला कसें मिळेल ही विवंचना येऊन पडली आहे, त्या वेळीं धर्म कसा टिकणार ही चिंता लागली होती. त्यामुळें आजच्या राजकारणाचें स्वरूप जसें आर्थिक बनलें आहे, तसें त्या वेळच्या राजकारणाचें स्वरूप धार्मिक होतें वस्तुत खादींत किंवा पाढऱ्या टोपींत काय राजकारण असावें, पण आहे असें आपण प्रत्यक्ष पाहतों, का, तर खादीच्या बुडाशीं आर्थिक भावना आहे. त्यामुळें हल्लींचें राजकारण आणि अर्थकारण हीं एक झालीं आहेत. त्या काळीं राजसत्तेमुळें या देशातला पैसा दुसरीकडे कोठें जात नव्हता, त्या सत्तेचा सारा कटाक्ष धर्मावर होता आणि म्हणून तेव्हा धर्मकारणाला राजकारणाचें स्वरूप प्राप्त झालें होतें ते धर्मकारण, त्या काळीं श्रीसमर्थांनीं सर्व भरतखंडभर एवढ्या प्रचंड प्रमाणात केलें कीं, ज्ञात इतिहासात त्याला क्वचित्च तोड आढळेल ! श्रीसमर्थ-प्रतापाच्या १० व्या आणि ११ व्या समासावरून असें दिसतें कीं, उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत व पश्चिमेस द्वारकेपासून पूर्वेस जगन्नाथापर्यंत असें एक हि क्षेत्र किंवा राजधानीचें ठिकाण किंवा मोठें शहर नव्हतें कीं, जेथें किंवा ज्याच्या जवळपास श्रीसमर्थांचा मठ आणि शिष्य नव्हता.

कित्तेक शिष्य सदाचारी ।
कित्तेक शिष्य राज्याधिकारी ।
कित्तेक शिष्य राज्यधारी ।
देशाधिकारी कित्तेक ॥ १२-२
नाना पर्वतदुर्गीं शिष्य केले ।
नाना भूमिदुर्गीं शिष्य केले ।

नाना सिंधुदुर्गी शिष्य केले ।
सद्गुरुनायसमर्थे ॥ ३

आपण नुसतें ऐकत होतों कीं, श्रीसमर्थांचे असे सुमारें ११०० शिष्य होते, पण तें आपलें ऐकणें शब्दशः खरें होतें असें गिरिधर सागतात.

नाना उदास धव्य मूर्ति । नाना महंत भव्य मूर्ति ।
संत सज्जन दिव्य मूर्ति । अनंत निस्पृह स्वामीचे ॥ ७-३३
रुद्रशतसंख्या गणित मूर्ति । विख्यात ज्याच्या पुण्य कीर्ति ।
समर्थस्वामी अवतारमूर्ति । नाना महंतरूपें विस्तारले ॥ ३४

-रुद्रशत = ११००. त्यापैकीं गिरिधरानीं काहीं थोडीं नावें दिलीं आहेत, कारण ते म्हणतात

समर्थें कित्येक गुप्त शिष्य केले ।
ते ते समर्थासी विदित भले । १०-१०

हे गुप्त शिष्य दुसरे कशासाठीं होते तें कोणी सागल काय !

( १४ ) याप्रमाणें समुदाय करण्यावर श्रीसमर्थांचा केवढा कटाक्ष असे ! शिष्याला पहिली गोष्ट करावयास ते सागत, ती समुदाय करण्याची. तो समुदाय देखील कसा करावा, मुलें कोठून आणावीं, तीं कशीं असावीं, इत्यादि ज्या त्याच्या सूचना असत त्या पाहिल्या म्हणजे हा सप्रदाय केवळ हरिकथानिरूपणाचा नसून त्याच्या पाठीमागें राजकारण असलें पाहिजे, हें कोणी हि कबूल करील. श्रीसाप्रदायिक विविध विषयाक २४ यात जें श्रीसमर्थांचें एक अपूर्व आज्ञापत्र दिलें आहे, त्याची या वेळीं वाचकास आठवण झाल्यावाचून राहणार नाहीं. महाराज आता आपली भेट केव्हा होणार म्हणून कोणा शिष्यानें विनविलें असतां श्री समर्थ पहिल्या तीन ओव्यांत त्याचें उत्तर देऊन एकदम समुदायाकडे वळून तो कसा करावा याची शिकवण देत आहेत.

विवेक जालिया देवाचा योग । मग होणार नाहीं वियोग ।
देव सर्वांचें अतरग । अखंडित भेटी ॥ १
या समाधानें असावें । निरूपणीं विवरावें ।
मानसपूजनें आठवावें । सकळ काहीं ॥ २
ऋणानुबंधें भेटी होईल । परस्परें समाचार कळेल ।
सहज वर्तमान नियमेल । ते प्रसंगीं ॥ ३

कांहीं समुदाव करणें। येविषीं आलस्य न करणें।
आलस्य करितां उदंड उणें। दिसेल परमार्थी ॥ ४
पोहोणारें बुडते तारावे। सामर्थ्यें बुडों नेदावे।
मूर्ख ते शाहाणे करावे। विवेकी पुरुषें ॥ ५
आपणाहुन जो धींग। त्यासीं करूं नये प्रसंग।
आपणाधीन जो प्रसंग। तो चि करावा ॥ ६
सोईऱ्याधाईऱ्याचीं मुलें। तीक्ष्ण बुद्धीचीं सखोलें।
तयासी बोलणें मृद बोलें। करीत जावें ॥ ७
त्याचा संसार समाचार। पुसत जावा विस्तार।
उदंड सांगतां तत्पर। होऊनि ऐकावें ॥ ८
दुःख ऐकतां दुःख जातें। त्याचें दुःख हलु होतें।
मग तें सर्वे चि धरितें। मित्रभावें ॥ ९
निकट मित्रि बरी होतां। मग त्यासी न्यावें येकांता।
म्हणावें रे भगवंता। कांहीं तऱ्हीं भजावें ॥ १०
पूर्वी देव पूजिला नव्हता। म्हणोनि आली दरिद्रता।
या कारणें अनंता। कांहीं तऱ्हीं भजावें ॥ ११
मान्य होतां जप सांगावा। मग तो इकडे पाठवावा।
मग तयाचा सकळ गोवा। उगऊं आम्ही ॥ १२

(१५) हें पत्र काय दर्शवितें? मठ्ठ डोक्याच्या आणि उथळ अंतःकरणाच्या मुलांना उद्धरून जावयाचें नसतें काय? हा जर केवळ परमार्थाचा च मार्ग असता तर तीक्ष्ण बुद्धीच्या आणि खोल अंतःकरणाच्या मुलांची च तेवढी अपेक्षा कां असावी? श्रीसमर्थ म्हणतात, अशीं मुलें मिळवा, त्यांच्या पोटांत शिरा, त्यांना आपलीशीं करा, सद्यस्थितीचीं कारणें त्यांना समजावून सांगा आणि अशा रीतीनें तीं पूर्ण तुमचीं झालीं म्हणजे त्यांना मंत्रोपदेश द्या आणि मग त्यांना आमच्याकडे पाठवा. आणि मग आम्ही काय करूं? त्यांच्या ठिकाणीं आणखी कांहीं किल्मिष राहिलें असल्यास तें ठोकून ठाकून साफ करून मग आमच्या मनांत येईल तिकडे त्यांना आम्ही पाठवूं! अशा शिकवणीनें तयार झालेले हजारों शिष्य त्यांनी सर्व भरतखंडभर पसरविले होते. इतिहासांत कोठें लिहिलेली नसली तरी राष्ट्राची आणि धर्माची त्या शिष्यांनीं केवढी कामगिरी

बजाविली असली पाहिजे, याची कल्पना करा. याप्रमाणें प्रांतोप्रांतीं शिष्यांची रवानगी होत असे, याला प्रतापातच आधार आहे.

विश्वनाथ नामा पंडित । खंडित ज्ञानी अखंडित ।
आशंका खंडोनियां नवांकित । प्रेरिला अंकित उत्तरपंथें ॥ १०-२९
शिवराम नामा समर्थसंगें । कितेक दिवस अंतरंगें ।
पुढें पुढें जगदोद्धारणप्रसंगें । तेलंगणप्रांतें आज्ञापिला ॥ १०-६९

( १६ ) हा सारा व्याप धर्मसंस्थापनेसाठीं होता, असें मानलें तरी चालेल. कारण त्या वेळच्या राजकारणाचा हेतु च मुळीं धर्मसंस्थापनेचा होता. जगदुद्धार म्हणजे धर्मसंस्थापना हें श्रीसमर्थांच्या अवताराचें कार्य होतें. त्यावरून निघाले आणि त्यांनी पंचवटी गाठली.

समर्थें मिठी घातली श्रीचरणकमळीं ।
येक मुहूर्त मानसपूजा संपूर्ण केली ।
उठोनि सप्रेमें डोळां जव देखिली ।
तंव ब्रह्मगोळीं परिपूर्ण श्रीराम पूजिला ॥ २-८२

आणि श्रीरामाच्या स्तवनाला आरंभ करून प्रार्थना करिते झाले

श्रीरामदास आम्हीं सर्व हि त्वद्रूपें । देव दानव मानव तुझीं च स्वरूपें ।
आत्माराम तुम्ही निजात्मरूपें । धर्मस्थापना करावी ॥ २-८९

श्रीरामांनीं प्रत्युत्तर केलें कीं,

श्रीरामदास तुम्ही सर्व हि मद्रूपें । देव दानव मानव माझीं च स्वरूपें ।
आत्माराम मी निजात्मरूपें । धर्मस्थापना करीन हे ॥ २-९१
आतां धर्मस्थापना करावी तुम्ही । सेव्यसेवकभावें ऐक्य तुम्ही आम्ही ।
सकळ साधुसंतसंकल्प कर्मभूमीं । सिद्धीसी नेईन निर्धारें ॥ ९२
मज वैकुंठीहूनि जालें येणें । तुमच्या अनुमहाकारणें ।
सेव्यसेवकभावें हें बोलणें । येन्हि आत्माराम मी परिपूर्ण ॥ ९३

पुढें हिमालयकुंडीं देहाचें विसर्जन करण्यास श्रीसमर्थ प्रवृत्त झाले असतां श्रीरामानें वरच्यावर धरून बजाविलें कीं,

तुम्हासी जगोद्धार करणें आहे । तुमची तनु ते आमुची तनु पाहे ।
दोनि सर्पें तुमची रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणें ॥ ३-८

त्या धर्मस्थापनेला स्वराज्यस्थापनेची आवश्यकता होती, म्हणून श्रीशिवछत्रपतींचा

अवतार ! श्रीशिवछत्रपतींना तरी स्वराज्य पाहिजे होतें तें सत्ता उपभोगण्यासाठीं नसून, केवळ धर्मस्थापनेसाठीं च पाहिजे होतें. इतकें त्या काळीं धर्मस्थापनेला राजकारणाचें स्वरूप प्राप्त झालें होतें. धर्मस्थापनेपासून राजकारण निराळें नव्हतें.

( १७ ) महाराष्ट्राच्या पदरीं काय पुण्याई होती, सांगतां येत नाहीं; पण जबरदस्त पुण्याई असली पाहिजे कीं जिच्यामुळें असले दोन अवतारी पुरुष एका काळीं महाराष्ट्रांत जन्मास आले. दोघेहि स्वतंत्र स्वयंभु अवतारी पुरुष होत. दोघांचा हेतु एकच,

श्रीरामराज्य करणे सर्वत्र हो ॥ २०-७२

एकाचें धर्मकारण स्वराज्यासाठीं होतें व दुसऱ्याचें राजकारण स्वधर्मासाठीं होतें. गंगा आणि यमुना या दोन महानद्यांप्रमाणें दोघांनीं हि काहीं काळ स्वतंत्रपणें आपआपलें कार्य सुरू केलें आणि पुढें प्रयागला त्या दोन नद्या एकत्र होऊन जसा त्यांचा प्रचंड प्रवाह सुरू होऊन साऱ्या जगास या क्षणापर्यंत पावन करीत आहेत, तद्वत्च हे दोघे महापुरुष परमेश्वरी संकेतानुसार एकत्र होऊन महाराष्ट्रास सुखविते झाले; इतके कीं, तें सुख दृष्टीआड होऊन शंभरावर वर्षे लोटलीं, तरी महाराष्ट्रास अजून त्या सुखाचा विसर पडत नाहीं ! आणि त्यावरून महाराष्ट्राची दृष्टि ढळत नाहीं !

( १८ ) माझे श्रीसमर्थ हे असे होते. मला ते महाराष्ट्राचे प्राण भासतात. थोडासा फरक करून म्हणतों :

श्रीसमर्थ म्हणिजे आपुला प्राण । त्या प्राणासी न करावें निर्वाण ।
परम प्रीतीचें लक्षण । तें हें ऐसे असे ॥ ४-८-१०
ऐसें परम सख्य धरितां । श्रीसमर्थांस लागे तुमची चिंता ।

मला ते जसे भासतात, तसेच ते तुम्हांसहि भासावे, ही माझी इच्छा. म्हणून त्यांच्या स्वरूपाविषयीं माझ्या मनात यत्किंचित् हि संशय नव्हता मला हें इतकें बोलावें लागलें, याची दयाळुपणें क्षमा करा. येथें थांबावें हें बरें. मुद्दाम थांबल्यावाचून लेखनाचा शेवट येणार च नाहीं. भास हा सारखा होत च राहणार, मग तुम्ही डोळे उघडे ठेवा किंवा मिटा, ऐकत रहा किंवा कानावर हात ठेवा, बोला किंवा मौन धारण करा, सारखें लिहीत सुटा किंवा हात जोडून बसा ! दोन्ही गोष्टी सारख्याच असतील तर मग लेखणी बाजूस ठेवून, डोळे मिटून, कानाचा व्यापार बंद ठेवून, मौन धारण करून, हात जोडून बसावें, हें उत्तम !

